LIBRARY OF PRINCETON
JAN 13 1928
THEOLOGICAL SEMINARY

# COMMENTARY

ON THE

# GOSPELS OF MATTHEW & MARK.

BY THE REV. R. G. WILDER.

# मात्थीने व मार्कसाने केलेलीं शुभवर्त्तमानें

यावरील

# टीका.

BOMBAY TRACT & BOOK SOCIETY.

Maráthí Series.

800 Copies. A. D. 1870.

मुंबईमध्यें :
ओरिएन्टल छापखान्यांत छापिलें.

सन १८७०.

# प्रस्तावना.

पवित्र शास्त्राला जीवनाचा ग्रंथ ह्मटला आहे, कारण कीं येथेंकडून अक्षय जीवन आणि तें मिळविण्याचा उपाय प्रगट झाला आहे. या शास्त्राला ग्रीक भाषेंत बैबल ह्मणत असत, कारण कीं बैबल या शब्दाचा अर्थ ग्रंथांचा ग्रंथ ह्मणजे सर्व ग्रंथांतला उत्तम व श्रेष्ठ ग्रंथ असा आहे. याकरितां बैबल हें नाम इंग्लिश भाषेंत तसेंच मानलेलें होतें आणि आजपर्यंत राखिलें आहे, आणि जे या शास्त्राची माहिती करून घेतात व याप्रमाणें चालून अक्षय जीवन साधून घ्यावयास पाहतात ते हा ग्रंथ इतर सर्व ग्रंथांपेक्षां मोलवान आहे असें मानितात. हा ग्रंथ खरोखर अनुपमेय आहे. याचे ग्रंथकार राजांपासून धीवरापर्यंत निरनिराळ्या स्थितींतले असे सुमारें चाळीस होते; याचे कितीएक भाग नील नदीच्या कांठावर लिहिले होते, अरबस्थानांतल्या वाळुक स्थळांमध्यें, वचनरूप कनान देश, विद्येवरून नामांकित ग्रीस व बादशाही रोम, अस्या ठिकाणोठिकाणीं त्याचे अनेक भाग रचिले होते; ते सगळे रचायाला सोळा शतक लागले तरी या सगळ्या शास्त्राचा आश्चर्यकारक सुमेळ अढळतो आणि यावरून एक प्रबळ प्रमाण होतें कीं हा ग्रंथ वास्तविक ईश्वरप्रणीत आहे. हा ग्रंथ राजा आणि प्रजा, लहान आणि थोर, गरीब आणि मातबर अस्या सर्वांच्या उपयोगीं पडण्यासारिखा आहे. ह्मणून सर्वांनी अभ्यास करून याचा अर्थ समजून घ्यावा व याप्रमाणें विश्वास धरून चालावें.

प्राचीन काळापासून हें शास्त्र शुद्ध राखण्यास व भाषांतर करून प्रसिद्ध करण्यास धार्मिक लोक फार प्रयत्न करीत आले आहेत. छापण्याची युक्ति योजल्यापूर्वीं याच्या प्रति हातानें लिहून करीत असत, तेव्हां एका प्रतीला सुमारें चारशें रुपयांचा खर्च पडत असे. हल्लीं ईश्वराच्या कृपेने हें अमोल्य शास्त्र एकाच रुपयाने कोणालाहि मिळतें. हें शास्त्र अनेक भाषांत उतरून घेण्यास विद्वान व धार्मिक मनुष्य क-

रीत आले आहेत. एवढी काळजी, खर्च व मेहेनत दुसऱ्या कोणत्याहि ग्रंथाविषयीं कोणीहि कधीं केली नाहीं. आधीं इंग्लंड देशांत सर्व लोक दगड धोंडे वगैरे हलक्या देवांच्या पायीं पडत असत. परंतु देवाच्या कृपेनें हें शास्त्र कळण्यांत आलें तेव्हांपासून ते हलके लटके देव सोडून ते निराकार परमेश्वराची भक्ति करूं लागले, आणि सांप्रतकाळीं जर कांहीं विशेष ज्ञान व सुख व श्रेष्ठत्व व प्राबल्यता त्या लोकांमध्यें असतील तर त्या सर्वांचें मूळकारण हें शास्त्र आहे असें सिद्ध होतें, आणि असें ते सर्व मानितात. इंग्लिश लोकांस हें शास्त्र कळल्यावर अनेक ग्रंथकार मूळभाषांतून आपल्या भाषेंत उतरून घेऊं लागले आणि त्यानी केलीं असीं अनेक भाषांतरें आजपर्यंत आहेत, परंतु हल्लीं रूढींत व सर्वांहून चांगलें इंग्लिश भाषांतर हें १ ला ज्येमज राजाच्या हुकुमानें केलें होतें. त्या राजानें आपल्या इंग्लंड राज्यांतले सर्वांहून विद्वान व धार्मिक असले ५४ मनुष्य नेमून त्यांच्या हातांत हें काम दिल्हें. सन १६०७ व्यांत हें काम सुरू झालें आणि तीन वर्षेंपर्यंत श्रम व मेहनत करीत गेल्यावर त्यानी हें उत्तम भाषांतर सिद्ध केलें, परंतु ते अणखी वर्षभर तपासून शुद्ध करीत गेले आणि मग सन १६११ व्या सालीं याची प्रथम छापणी झाली. त्याप्रमाणें फार जपून बहुत काळजी व मेहनत करून ख्रिस्ती लोकानी हें शास्त्र बहुतेक वेगवेगळ्या भाषांत उतरून प्रसिद्ध केलें आहे.

हें शास्त्र या महाराष्ट्रांत प्रसिद्ध होऊं लागलें याला सुमारें ५५ वर्षें झालीं आहेत. पहिल्यानें दोघे धार्मिक उपाध्ये अमेरिका देशांतून येऊन सन १८१३ व्या सालीं मुंबईस उतरले आणि दोन वर्षें मराठी भाषा शिकल्यावर सन १८१५ व्या सालीं हिंदु लोकांस उपदेश करूं लागले. त्यांच्या मागून अनेक धर्मोपदेशक अमेरिका व विलायत देशांतून येऊन हें काम आजपर्यंत चालवीत आले आहेत. या शास्त्राचें मराठी भाषांतर इंग्लिश भाषेंतल्या नकलीवरून करून घेतलें असें नाहीं, तर तें मूळभाषांतून मराठी भाषेंत उतरून घेतलें आहे. हें मराठी भाषांतर करण्यांत ज्यानी कमजास्त साह्य केलें आहे असले अमेरिकन, विलायत व एतद्देशीय सुशिक्षित व धार्मिक मिशनेरी उपाध्ये, उपदेशक व पालक हे सर्व मिळून शंभर सव्वाशें असतील. परंतु

हें चालतें भाषांतर पवित्र शास्त्रप्रसारक मंडळीच्या मुंबईंतल्या सहाय-
कारक मंडळीनें केलें. कसें केलें, तर अधिक शुद्ध मराठी भाषांतर
असावें असी इच्छा धरून त्या मंडळीनें मिशनेरी व एतद्देशीय असे
सुमारें वीस सुशिक्षित व दक्ष उपाध्ये नेमून हें काम त्यांच्या हातांत सों-
पून दिल्हें. त्यानीं शास्त्रांतल्या वेगवेगळ्या भागांचीं पूर्वीं झालेलीं सर्वां-
हून शुद्ध भाषांतरें हातांत घेऊन बहुत मेहनतीनें व काळजीनें तपासून
व शुद्ध करीत जाऊन पांच साहा वर्षांनीं हें भाषांतर सिद्धीस नेलें, आ-
णि सन १८५९ व्या सालीं याची पहिली छापणी झाली. हें भाषांत-
र अगदीं शुद्ध व बिनचूक आहे असें कोणी ह्मणत नाहीं, तरी सर्व
समंजस व विचारशील मराठी भाषा वाचणाऱ्यांस समजण्यासारिखें आहे.
तें वेळोवेळ अधिक शुद्ध केलें जाईल आणि बहुत सुशिक्षित व विद्वान
ब्राह्मण वगैरे ख्रिस्ती होऊन या कामांत साह्य करतील, तेव्हां १ ल्या
ज्येमज राजाच्या कार्कीर्दींत इंग्लिश भाषांतर अगदीं शुद्ध व परिपूर्ण
झालें तसें हें मराठी भाषांतर अगदीं शुद्ध होईल.

पवित्र शास्त्रांतले अध्याय व ओव्या यांविषयीं असें समजलें पाहिजे
कीं, असले विभाग मुळींच नव्हते आणि येणेंकडून शास्त्राचा अर्थ व
संबंध वरचेवर तुटक झाला आहे, ह्मणून हे विभाग केले नसल्यासा-
रिखें हें शास्त्र वाचलें पाहिजे. ज्यानीं हे विभाग मागून केले त्यानीं
याच हेतूनें केले कीं अमुक गोष्टी अथवा सिद्धांत यांविषयीं प्रमाण प-
टविण्यास फलाणीं शास्त्रवाक्यें दर्शविण्याची सोई पडावी, आणि असें द-
र्शविण्याच्या सोईवरून मोठा लाभ आहे खरा, आणि ही चाल इतकी
दृढावली आहे कीं आतां फेरफार होत नाहीं. या चालीवरून वेगवेग-
ळ्या वाक्यांची तुलना सहज दाखविण्यांत येती आणि शास्त्राचें व्याख्या-
न संक्षिप्त होतें. ही पुढील टीका रचण्यांत, होईल तितका रस थोड-
क्यांत आणावा असी ग्रंथकर्त्याची इच्छा होती ह्मणून अध्याय व ओ-
व्या यांच्या अंकांचा बहुत उपयोग केला आहे. हे अंक ईश्वरी विद्या
शिकणाऱ्यांच्या व उपदेशकांच्या विशेष उपयोगीं पडतील.

मार्कसावर टीका रचतांना ज्या वाक्यांचें व्याख्यान मात्थीवरल्या
टीकेंत आहे त्यांच्या कांहीं नव्या व्याख्या केल्या नाहींत, तर मात्थीव-

रल्या टीकेंत पाहा असें सुचविलें आहे. असें करून मार्कसावरील टीका थोडक्यांत आणिली आहे.

असली टीका रचण्यांत किती श्रम व मेहनत लागतात हें, हातांत काम घेतल्याशिवाय, कोणाला कधीं समजणार नाहीं. मात्थीवरल्या टीकेची पहिली आवृत्ति छापली याला आतां १० वर्षें सरून गेलीं आहेत. एका मिशनाचें सगळें काम टीकाकर्त्यावर पडलें असतां त्याला ही टीका रचण्यास थोडकाच अवकाश मिळत आला आहे खरा, तरी सर्व मिळून बहुत वेळ आणि बहुत मेहनत लागली आहे. असें असतांहि ही टीका सर्व प्रकारें अदोष व अगदीं परिपूर्ण आहे, असें आह्मास वाटत नाहीं. परंतु एतद्देशीय जे लोक हें पवित्र शास्त्र समजून घ्यावयास पाहतात त्यांस, व विशेषेंकरून जे हें शास्त्र खरें आहे असें मानून ख्रिस्ती झाले आहेत त्यांस या टीकेवरून कांहीं मदत होईल असी आशा धरून ही त्यांस सादर केली आहे. ही टीका रचतांना उंच व अलंकारी भाषेचा उपयोग करून कांहीं पांडित्य दाखवावें असा ग्रंथकर्त्याचा हेतु नाहीं; तर सुलभ शब्दानी शास्त्राचा खरा अर्थ दाखवावा हाच नित्य ध्यानांत राखिला आहे.

मात्थीवरची टीका रचूं लागलों तेव्हां सगळ्या नव्या करारावर टीका रचीत जावें असी आशा धरीत होतों, आणि ही आशा सोडावी लागती यावरून दु:ख होतें खरें, तथापि देवाच्या कृपेने हें अमोल्य शास्त्र या देशांत प्रसिद्ध होत चाललें आहे, इतक्यांत हजारों हिंदु हें स्वीकारून ख्रिस्ती झाले आहेत, आणि जें काम आह्मी सुरू केलें आहे तें अधिक दक्ष, धार्मिक व विद्वान मनुष्य हातांत घेऊन सिद्धीस नेतील असा भरवसा आहे, कारण कीं देवाचें राज्य सर्व युगांचें राज्य आहे आणि सर्व मूर्त्ति रद्द होऊन सर्व राष्ट्रें निराकार देवाचीच सेवा करतील तोंवर हें देवाचें काम चालत जाईल.

ही या शुभवर्तमानावरची पहिलीच मराठी टीका आहे खरी, परंतु थोडक्या वर्षांनी, यावर असें केवळ नव्हे, तर सगळ्या पवित्र शास्त्रावर बहुतेक आणि अधिक चांगल्या टीका रचण्यांत येतील आणि हेंच शास्त्र खरें व ईश्वरप्रणीत आहे असें मानून महाराष्ट्रांतले हजारोंहजार

लोक उत्सुकतेने याचा अभ्यास करून आणि याप्रमाणें चालून आपल्या जीवात्म्यांचें तारण साधून घेण्यास प्रयत्न करितील.

फारकरून इतर सर्व कामांवरून झालीं त्यापक्षां ही टीका रचण्यांत विशेष सुख, कर्मणूक व आनंद झालीं आहेत. या कामांत खर्चली असी प्रत्येक घटका आमच्या अंतःकरणाला हितकारक व सुखदायक झाली आहे. हें काम एथवर सिद्धीस आणायाला पुरती शक्ति मिळाली आहे यावरून आह्मी देवाचे उपकार मानितों, आणि ही टीका फलद्रूप होऊन त्याच्या सेवेच्या उपयोगीं पडावी असी आमची इच्छा व ईश्वरापासीं प्रार्थना आहे.

टीकाकर्ता.

कोल्हापूर सन १८६९.

# मात्थीने केलेलें शुभवर्त्तमान.

## अध्याय १.

आब्राहामाचा (१) पुत्र दावीद, (२) याचा पुत्र येशू (३) ख्रीस्त, याची वंशावळी. (४)

२ आब्राहामाने (५) इझाकाला जन्मविलें, आणि इझाकाने (६) याकोबाला जन्मविलें, आणि याकोबाने (७) यहूदा व त्याचे भाऊ यांस जन्मविलें;

३ आणि यहूद्याने (८) फारेस व जारा यांस थामारेपासून जन्मविलें, आणि फारेसाने (९) हेस्रोनाला जन्मविलें, आणि हेस्रोनाने (१०) अरामाला जन्मविलें;

४ आणि अरामाने (११) अमीनादाबाला जन्मविलें, आणि अमीनादाबाने (११) नहशोनाला जन्मविलें, आणि नहशोनाने (१२) साल्मोनाला जन्मविलें;

५ आणि साल्मोनाने (१३) बवाजाला राहाबेपासून जन्मविलें, आणि बवाजाने (१३) ओबेदाला रूथेपासून जन्मविलें, आणि ओबेदाने (१४) इशायाला जन्मविलें;

६ आणि इशायाने (१४) दावीद राजा याला जन्मविलें, आणि

---

(१) उत्प. २२:१८. गल. ३:१६.
(२) गीत. १३२:११. मात्थी. २२:४५.
(३) प्रेषि. २:३०.
(४) लुका. ३:२३. पुढें.
(५) उत्प. २१:२-५.
(६) उत्प. २५:२६.
(७) उत्प. २९:३५ व पुढें.
(८) उत्प. ३८:२९,३०.
(९) उत्प. ४६:१२.
(१०) रूथ. ४:१९.
(११) १ काल. २:१० गण. १:७.
(१२) रूथ. ४:२०.
(१३) रूथ. ४:२१.
(१४) रूथ. ४:२२. १ शमु. १७:१२.

---

१-१६. ख्रीस्ताचा कुलक्रम हें या अध्यायांतील मुख्य सदर आहे. यहूदी लोक याप्रमाणें कुलक्रम मांडून ठेवीत असत. (उत्प. ५:१. ६:९.)

येशू ख्रीस्त हा खरा मशिहा आहे याचें प्रमाण यहूदी लोकांस पटवून यावें ह्मणून शुभवर्त्तमानकर्त्यांनी ही वंशावळी प्रसिद्ध केली. ही खरी आहे किंवा नाहीं याविषयीं समजावयास केवळ सर्कारी दप्तरांत पाहावें ला-

दावीद (१) राजा याने जी पूर्वी उरीयाची बायको होती, तिजपासून
शालमोनाला जन्मविलें;
७ आणि शलमोनाने (२) रहबामाला जन्मविलें, आणि रहबा-
माने अबीयाला जन्मविलें, आणि अबीयाने आसा याला जन्मविलें;
८ आणि आसा याने यहोशाफाटाला जन्मविलें, आणि यहोशा-
फाटाने यहोरामाला जन्मविलें, आणि यहोरामाने उजीयाला जन्मविलें;
९ आणि उजीयाने योथामाला जन्मविलें, आणि योथामाने आहा-
जाला जन्मविलें, आणि आहाजाने हिज्कीयाला जन्मविलें;
१० आणि हिज्कीयाने मनाश्शे याला जन्मविलें, आणि मनाश्शे
याने अमोनाला जन्मविलें, आणि अमोनाने योशियाला जन्मविलें;
११ आणि योशियाने यखन्या व त्याचे भाऊ यांस बाबेलच्या
प्रवासाच्या वेळेस जन्मविलें;
१२ आणि बाबेलचा प्रवास असतां यखन्याने (३) शालतियेलाला
जन्मविलें, आणि शालतियेलाने (४) जरूबाबेलाला जन्मविलें;
१३ आणि जरूबाबेलाने अबीहूदाला जन्मविलें, आणि अबीहूदाने
एल्याकीमाला जन्मविलें, आणि एल्याकीमाने आजोराला जन्मविलें;
१४ आणि आजोराने सादोकाला जन्मविलें, आणि सादोकाने
आखीमाला जन्मविलें, आणि आखीमाने अलीहूदाला जन्मविलें;
१५ आणि अलीहूदाने अलाजाराला जन्मविलें, आणि अलाजाराने
मात्थानाला जन्मविलें, आणि मात्थानाने याकोबाला जन्मविलें;
१६ आणि याकोबाने योसेफ जो मारयेचा नवरा त्याला जन्मविलें,
तिजपासून ख्रीस्त ह्मटलेला येशू तो जन्मला.

(१) २ शमु. १२:२४. (३) १ काल. ३:१७.
(२) १ काल. ३:१०. पुढें पाहा. (४) नहे. १२:१.

गलें. त्या वेळेस बहुत शाहाणे व विद्वान यहूदी व परदेशस्थाहि ख्रिस्ती
लोकांचे शत्रु होते. यास्तव प्रेषितानी प्रसिद्ध केलेली वंशावळी खोटी
असली तर त्यानी तेव्हांच असें प्रमाण पटविलें नसतें की काय ? पण त्याज-
वर असा आळ कोणी कधींहि आणला नाहीं, ह्मणून ही वंशावळी खरीच
आहे आणि हा येशू ख्रीस्त देवाच्या वचनांप्रमाणें दाविदाचा आणि आब्रा-
हामाचा वंशज आहे, असें उघड दिसतें.

१७ याप्रमाणें आब्राहामापासून दावीदापर्यंत सर्व पिढ्या चवदा, आणि दावीदापासून बाबेलच्या प्रवासाच्या वेळेपर्यंत चवदा पिढ्या, आणि बाबेलच्या प्रवासाच्या वेळेपासून ख्रीस्तापर्यंत चवदा पिढ्या, अस्या आहेत.

१८ आणि येशू ख्रीस्ताचा जन्म (१) याप्रकारें झाला; त्याची आई मारया योसेफाला दिल्हेली असतां त्यांची संगती झाल्यापूर्वीं ती पवित्र आत्म्याकडून गरोदर झालेली असी दिसण्यांत आली.

---

(१) लुका. १:२७. व पुढें पाहा.

---

१७ "सर्व पिढ्या." आब्राहाम आणि दावीद यांची गोष्ट व बाबेलचा प्रवास यांची गोष्ट सर्वांच्या ध्यानांत राहण्याजोगी होती. तर एका पुरुषापासून दुसऱ्या पुरुषापर्यंत चवदा चवदा पिढ्या आहेत, हें ध्यानांत ठेविलें ह्मणजे पक्की आठवण राहील, असें समजून हे तीन विभाग केले आहेत. नबूखाद्नेस्सराने ख्रीस्ताच्या येण्यापूर्वीं ५८८ वर्षीं यहूदी लोकांस पाडाव करून बाबेल शहराकडे नेलें. (२ काल. ३६ पाहा.) योशियाच्या कार्कीर्दीत यहूद्यांस अनर्थ प्राप्त होऊं लागले, परंतु तो मेल्यावर ३२ वर्षांनंतर ह्मणजे सिदकीया राजाच्या कार्कीर्दीच्या ११ वर्षीं त्यांच्या सत्तर वर्षांच्या दास्यत्वास आरंभ झाला. बाबेल हें शहर फरात नदीवर वसलें होतें. त्याचें गांवकूस ३० कोस लांब, ४३ हात रुंद आणि १७५ हात उंच असें होतें. शहरांत जावयास प्रत्येक बाजूला २५ ह्मणजे सर्व मिळून १०० पितळी दरवाजे होते. हें शहर मोठ्या विस्तृत राज्याची राजधानी होतें. बाबेल देशांत यहूदी लोक सत्तर वर्षें दासपणांत राहिले.

१८ "येशू ख्रीस्ताचा जन्म." येशू ह्मणजे तारणारा. ख्रीस्त ह्मणजे मशीहा, अभिषिक्त. प्राचीन काळीं राजे व उपाध्ये यांस नेमून त्यांच्या मस्तकावर तेलाचा अभिषेक करीत असत. (लेवी. ४:३. ६:२०. निर्ग. २८:४१. २९:७. १ शमु. ९:१६. १५:१. २ शमु. २३:१.) पाहा, देव जो बाप त्याने ख्रीस्ताला आपल्या लोकांवर राजा, मुख्य उपाध्या आणि भविष्यवादी, असें नेमून ठेविलें, ह्मणून ख्रीस्त ह्मणजे अभिषिक्त असें नांव पडलें. "दिल्हेली असतां." लग्न करण्याच्या पूर्वीं कांहीं काळ वाग्दान करावें असी यहूदी लोकांची रीत होती. (उत्प. २४:५९. न्या. १४:८) "ती पवित्र आत्म्याकडून गरोदर झालेली" इ. ख्रीस्ताचें शरीर लोकजननाप्रमाणें नव्हे परंतु देवाच्या शक्तीकडून उत्पन्न झालें. तो पाप्यांस तारायाला जगांत आला ह्मणून त्याला माणसांचा दुष्ट स्वभाव न लागावा पण त्याने

१९ तिचा नवरा योसेफ तर नीतिमान होता आणि तिचा उघड अपमान करायास इच्छीत नव्हता ह्मणून तिला गुप्तरूपें टाकावें असें त्यानें मनांत आणिलें. (१)

---

(१) अनु.२४:१.

---

निष्पाप आणि निष्कलंक असावें असें अगत्य होतें. स्त्रीपासून जन्म पावल्यामुळें तो आह्मासारिखा झाला. ह्मणजे त्यानें मानवी देह आणि मानवी प्रकृति धारण केली. असा चमत्कारिक जन्म पावल्यानें त्याला माणसांचा भ्रष्ट स्वभाव न लागतां तो निष्पापच राहिला.

१९ "तिचा नवरा." ह्मणजे लग्नासाठीं ज्यासीं तिचें वाग्दान झालें होतें तो. "नीतिमान." त्यानें अन्याय करण्याचें भय धरिलें. तिनें दूताच्या येण्याविषयीं त्याला सांगितलें असेल, (लुका. १:२६. पुढें पाहा) आणि हें खरें आहे ह्मणून ती निर्दोष आहे, असें जरी पुरतें प्रमाण नव्हतें तरी त्यानें तिचा अन्याय करण्याचें भय धरिलें. जे नीतिमान असतात ते फारकरून दयाळूहि असतात. "उघड अपमान." व्यभिचार हें महापाप आहे असें पहिल्यापासून मोजिलें आहे. मिसर देशांत व्यभिचारिणीचें नाक कापीत असत. इराण देशांत नाक आणि कानहि कापीत असत. यहूदी लोक तर दोघांसहि धोंडमार करीत असत. (लेवी. २०:२० यो. ८:५. पाहा) जरी मागणीनें दिल्ही होती तरी दंड एकसारिखाच सोसावा लागता. (अनु. २२:२३, २४.) योसेफ नीतिमान व धार्मिक होता ह्मणून त्याला दया येऊन त्यानें तिला गुप्तरूपें दूर करावें असें मनांत आणिलें. "गुप्तरूपें." मोश्याच्या नेमाप्रमाणें सूटपत्र देण्याचा अधिकार नवऱ्याकडे होता. (अनु. २४:१.) सूटपत्रांत दूर करण्याचें कारण लिहीत असत आणि साक्षी घालीत असत. परंतु मारयेला कांहीं कारण न सांगतां आणि साक्षीदार न ठेवितां दूर करावें असी योसेफानें योजना केली. तिनें व्यभिचार केला असेल आणि तिची अब्रू जाईल असें भय धरून तिला दूर केलेंच पाहिजे, असें त्याला वाटलें. मग दूताचें येणें आणि बोलणें यांविषयीं मारयेनें जें सांगितलें तें मनांत आणून ती पतिव्रता असेल तर तिला दूर करणें फार अवघड आहे असेंहि वाटलें असेल, आणि यावरून मोठया पेंचांत पडला असेल. ती निर्दोष होती खरी, पण याचें प्रमाण तिनें कसें पटवावें! ती अपमानांत व प्राणसंकटांत पडली होती. परंतु निर्दोष्याचें रक्षण कसें करावें हें ईश्वर जाणतो. त्यानें योग्य वेळेस योसेफाला मारयेची निर्दोषता कळविली.

२० परंतु तो त्या गोष्टीविषयीं विचार करीत असतां पाहा, प्रभूचा दूत त्याला स्वप्नांत दिसून ह्मणाला, हे योसेफा, दावीदाच्या पुत्रा, तूं आपली बायको मारया इला घ्यावयास भिऊं नको, कां कीं तिजमध्यें जो गर्भ आहे तो पवित्र आत्म्याकडून झाला आहे.

२१ आणि ती पुत्र प्रसवेल, आणि त्वां त्याचें नाम येशू ठेवावें, कारण कीं तो आपल्या लोकांस त्यांच्या पापांपासून तारील. (१)

---

(१) प्रेषि. ५:३१. १३:२३,३८.

---

या गोष्टीवरून सिद्ध होतें कीं आपण वास्तविक निर्दोष राहावें असी आपणास मोठी काळजी असावी; मग ईश्वर आमची अब्रू राखील आणि शेवटीं सर्व दोष उडवील.

२० "तो त्या गोष्टीविषयीं विचार करीत असतां" त्यानें उतावळीनें कांहीं केलें नाहीं, परंतु देवाची प्रेरणा मागितली. जे विचार करून देवाचें साह्य मागतील त्यांस ईश्वर मार्ग दाखवील. "प्रभूचा दूत." दूत, या शब्दाचा अर्थ फारकरून जासूद असा आहे. लूका ७:२४. ९:५२. कधीं कधीं वाऱ्यालाहि दूत असें ह्मटलें आहे. गीत १०४:४. पटकीलाहि दूत ह्मटलें आहे. गीत ७८:४९. सारांश जें कांहीं देवाची इच्छा प्रगट करायास किंवा सिद्धीस न्यायास नेमिलें आहे, त्याला दूत ह्मटलें आहे. पण आकाशलोकांतील पवित्र व सुखी प्राण्यांस विशेषेंकरून दूत असें ह्मटलें आहे. "स्वप्नांत." ईश्वर आपल्या पुरातन भविष्यवाद्यांस आणि भक्तांस आपली इच्छा स्वप्नांकडून कळवीत असे. उत्प. २०:३. ३१:११,२४. ३७:५. ४१:१. १ राजे. ३:५. दानी. ७:१. ईयोब. ४:१३–१९. गण. १२:६. अमुक स्वप्नें देवाकडून आहेत हें कशावरून कळलें, याविषयीं आतां माहिती नाहीं. देव स्वप्नांत आपली इच्छा कधीं कधीं कळवीत असे हें पक्कें माहीत आहे. परंतु सांप्रत काळीं स्वप्नांकडून नव्हे तर शास्त्राकडून कळवीत असतो. "भिऊं नको." तिच्या पातिव्रत्याविषयीं भिऊं नको. "ती निर्दोष आहे." तिला विशेष मान द्यावा ह्मणून देवाने तिला निवडिलें आहे.

२१ "तो आपल्या लोकांस." ख्रीस्ताचे लोक कोण आहेत? जे त्याजवर विश्वास ठेवितात ते. त्यांच्या विश्वासावरून प्रमाण पटतें कीं बापाने त्यांस ख्रीस्ताला दिल्हें आहे. यो. ६:३७. "त्यांच्या पापांपासून तारील." याच कामावर प्रभु आला. लोकांस त्यांच्या पापांमध्यें तारावें असें नव्हे परंतु त्यांच्या पापांपासून तारावें ह्मणून तो जगांत आला. पाप्यांचें मन पालट-

२२ आणि हें अवघें यासाठीं झालें कीं, प्रभूनें भविष्यवाद्याकडून जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें, तें असें कीं, (१)

२३ पाहा, कुंवार गरोदर होईल आणि पुत्र प्रसवेल, आणि त्याला इम्मानुवेल ह्मणतील; याचा अर्थ, आमच्या संगतीं देव, असा आहे. (२)

---

(१) यशा. ७:१४. (२) यो. १:१४.

---

त्यावांचून त्यांस आकाशलोकांत येऊं दिल्हें तर सुख वाटणार नाहीं. त्या पवित्र लोकांत पाप्यांस केवळ दुःख वाटेल. येशू ख्रीस्त पापापासून कसें तारितो, असें पुसाल तर, १ त्यानें प्राण देऊन पापासाठीं प्रायश्चित्त केलें, आणि असें करून त्यानें पाप केवढें कंटाळवाणें आणि नाशकारक आहे हें दाखविलें, आणि जो कोणी येशूवर विश्वास ठेवणारा आहे त्याला न्यायी ठरवून देवानें न्यायी राहावें हें साध्य केलें. २ त्याच्या लोकांनीं आपल्या आत्मिक शत्रूला जिंकावें ह्मणून ख्रीस्त शक्ति आणि साह्य देतो. तो भयापर्यंत त्यांचें संरक्षण करितो आणि शेवटल्या दिवसीं तो त्यांस पुनः उठवून पवित्र आणि सुखी लोकांत आपल्या जवळ घेईल. ३ ख्रीस्त आपल्या लोकांचें मन नवें व शुद्ध करितो आणि त्यांच्या ठायीं पवित्रतेची आवड उत्पन्न करून ठेवितो. ख्रीस्तानें जें दुःख सोसिलें तें मनांत आणून आणि पवित्र आत्म्याची प्रेरणा बाळगून कोण पाप करील?

**सूचना**—एथें खऱ्या ख्रिस्ती माणसाचें एक लक्षण दिसून येतें. जर आपण पाप सोडीत नाहीं तर आपण खरे ख्रिस्ती आहों, असें प्रमाण नाहीं. ख्रीस्ताच्या रक्ताकडून तारणोपाय सिद्ध झाला असें केवळ नव्हे, तर जो पापी ख्रीस्ताला शरण जातो त्याचें मन तेणेंकडून वास्तविक शुद्ध होतें आणि आकाशलोकाचें पवित्र सुख भोगायाजोगें होतें.

२२, २३. ही भविष्य गोष्ट यशायाचा भविष्यवाद याचा ७:१४ यांत आहे. ही गोष्ट ख्रीस्ताच्या येण्यापूर्वीं ७४० वर्षां अगोदर आहाज राजाच्या दिवसांत सांगितली होती. आहाज राजाला मोठें भय प्राप्त झालें होतें. त्याचें कारण असें कीं इस्राएलाचा राजा जो पेकाह यानें एका दिवसांत यहूदी लोकांचीं १२०००० माणसें मारलीं आणि २००००० पाडाव करून नेलीं होतीं. याशिवाय सुर्या देशाचा राजा जो रजीन हा पेकाह राजासीं मिळाला होता, आणि हे यरूशालेमाचा नाश करून दाविदाचा वंश नाहींसा करून टाकतील, असें भय आहाजाला पडलें. पण या शत्रूस यश प्राप्त होणार नाहीं हें सांगण्याकरितां ईश्वरानें यशायाला या संकटांत आहाजाकडे पाठविलें. या गोष्टीची खातरी होण्यासाठीं यशायानें आहाजाला चिन्ह

२४ तेव्हां योसेफानें झोंपेंतून उठून आपल्याला प्रभूच्या दुतानें जसी आज्ञा दिल्ही होती, तसें करून आपली बायको घेतली;

२५ परंतु ती आपला प्रथम (१) पुत्र प्रसवे तोंपर्यंत त्यानें तिला जाणिलें नाहीं; मग त्याचें नाम येशू (२) ठेविलें.

(१) निर्ग. १३:२. (२) लुका. २:२१.

मागायास सांगितलें. (यशा. ७:१०, ११) तेव्हां आहाज राजा म्याला आणि मी चिन्ह मागणार नाहीं असें ह्मणाला. त्या वेळेस भविष्यवाद्यानें ही विलक्षण गोष्ट सांगून त्याचा अविश्वास निषेधिला, आणि दावीदाच्या वंशांत मशीहा येणार आहे असें जें वचन ईश्वरानें त्याच्या पूर्वजांस दिल्हें होतें त्याची आठवण केली. (उत्पत्ति. १९:१०) भविष्यवाद्याच्या बोलण्याचा सारांश हाच होता कीं, तुमचा विश्वास कोठें गेला आहे? स्त्रीचें बीज, (उत्पत्ति. ३:१५.) ह्मणजे मशीहा, हा अद्याप आला नाहीं. तो येणार आहे असा तुमचा भरवसा नाहीं काय? आणि तो येईपर्यंत दाविदाचा वंश राहिला पाहिजे असें तुह्मी जाणत नाहीं काय? "कुंवार गरोदर होईल." या लेंकराचा जन्म चमत्कारीक रीतीनें होईल. त्याचा देह ईश्वराच्या विशेष शक्तीनें उत्पन्न होईल. (इब्री. १०:५) "इम्मानुवेल." ह्मणजे आमच्या संगतीं देव. हाच या इब्री शब्दाचा अर्थ आहे. हें नाम तारणाऱ्यास शोभतें. तो देव आणि मनुष्यहि होता. जर येशू ख्रीस्त साधारण रीतीनें जन्मला असता तर तो जन्मस्वभावानें पापिष्ट झाला असता, आणि हिंदु देवांच्या अवतारांप्रमाणें स्वतां आपल्या पापाचें प्रायश्चित्त देखील त्याच्यानें करवलें नसतें. ईश्वरी व मानवी हे दोन स्वभाव त्यामध्यें असावे ह्मणून कुंवारीच्या उदरीं ईश्वराच्या शक्तीनें जन्म घ्यावा यापेक्षां दुसरा कोणता जन्म शोभतो? येणेंकडून त्यानें मानवी स्वभाव धारण केला आणि आमची करुणा करण्यास योग्य झाला. तथापि तो खरोखर देव आहे ह्मणून आह्माला तारण्यास पूर्ण पवित्र व समर्थ आहे. तो देव आणि मनुष्यहि आहे. यावरून तारणोपाय विशेष सफळ आणि गौरवयुक्त झाला. ज्याविषयीं दिव्य दूत आचंबा करितात तें हेंच आहे. ज्यावरून तारणोपाय ख्रिस्ती लोकांस बोधकारक व समाधानकारक होतो तें हेंच आहे. ज्यावरून पाप्यांच्या मनांत शांति व आनंद उत्पन्न होतो, ज्यावरून त्यांला आपल्या तारणाविषयीं पूर्ण भरवसा होतो आणि तारणारा फार प्रिय व मोलवान दिसतो तें हेंच आहे.

२५ "तिला जाणलें नाहीं." ख्रिस्त जन्मेपर्यंत मार्या कुंवार होती असें

## अध्याय २.

१ आणि हेरोद राजाच्या दिवसांमध्यें येशू यहूदा देशांतील बेथ-
लहेमांत जन्मल्यानंतर, * पाहा, पूर्वेकडून कोणी मागी लोक यरूशा-
लेमांत येऊन बोलले कीं;

---

* ख्रिस्ती शक चालू लागल्यापूर्वी येशू चार वर्षें अगोदर जन्मला.

---

शास्त्रांत ह्मटलें आहे. हें खरेंच आहे असें मानलें पाहिजे. पण तिला यापुढें लेंकरें झालीं नाहींत असें शास्त्रांत सांगितलें नाहीं. अणखी लेंकरें झालीं असतील. (मात्थी १३: ५५, ५६) "त्याचें नाम येशू ठेविलें." हें नाम देवाच्या आज्ञेवरून ठेविलें होतें. (मात्थी. १:२१.) हें नाम आठव्या दिवसीं सुंता करिते वेळेस ठेविलें. (लूका २:२१.)

१ "हेरोद राजाच्या दिवसांमध्यें" यहूदा हा देश रोमी बादशाहाच्या अमलांत होता. पांपी नामें सर्दार याने ख्रीस्तापूर्वी ६३ वर्षें तो देश हस्तगत करून त्यावर कर बसविला होता. ख्रीस्ताच्या जन्माच्या वेळेस हेरोद राजाला राज्य चालवूं लागून ३४ वर्षें झालीं होतीं. रोमी बादशाहानें त्याला राजा असी पदवी घेऊं दिल्ही, पण त्याला त्याच्या ताबेदारींत राहावें लागलें. तो आपलें राज्य चालविण्यांत प्रख्यात झाला. ह्मणून त्याला महान हेरोद असें ह्मणत. ख्रीस्त जन्मला त्या वेळेस औगुस्तस हा रोमाचा बादशाहा होता. तेव्हां राष्ट्रांची मोठी स्वस्थता होती, रोमी अमल (आणि ग्रीक भाषा) फारकरून सर्वत्र चालत असे. ख्रिस्ती धर्म लवकर प्रसिद्ध व्हावा ह्मणून हा गोष्ट अनकूळ होती. "बेथलहेमांत." बेथलहेम या शब्दाचा अर्थ भाकरीचें घर. हें नाम सुपीक जमीनीवरून पडलें असावें. हें दाविदाचें नगर असें ह्मटलें आहे, (लुका. २: ४.) कारण कीं तो एथें जन्मला. (१ शमु. १६:१,१८.) बेथलहेम नगर एका उंचवट्यावर वसलें असून त्याच्या सभोंवतीं डोंगर व खोरीं होतीं. हल्लीं तेथें मुसलमान व ख्रिस्ती मिळून सुमारें २०० घरांची वस्ती आहे. "कोणी मागी लोक". ह्मणजे उपाध्ये किंवा ज्योतिषी. असे ज्ञानी यरूशलेमाच्या पूर्वेस इराण देशांत आणि अर्बस्थानांत राहत असत. "यरूशलेमांत" हें शहर यहूद्यांची राजधानी होतें. त्याला पूर्वी शालेम असें ह्मणत असत. (उत्प. १४:१८. गीत ७६:२.) हें नगर अनेक डोंगरांवर वसलें होतें. पूर्वी त्याच्या सभोंवतीं मोठें गांवकुसूं बांधिलें होतें. आतां ठिकाणीठिकाणीं त्याच्या भिंती आढळतात. शलमोनाच्या वेळेस त्याची शोभा विशेष होती. नंतर ४०० वर्षांनी

२ यहूद्यांचा जो राजा (१) जन्मला तो कोठें आहे ? कां कीं आह्मी पूर्व प्रदेशांत त्याचा तारा (२) पाहिला आणि त्याला नमन (३) करायास आलों.

३ हें ऐकून हेरोद राजा आणि त्याच्या सुद्धां सर्व यरूशालेम घाबरें झालें.

---

(१) जख. ९:९. (२) गण. २४:१७. यशा. ६०:३. (३) योहान्न. ५:२३.

---

नबूखाद्नेस्सराने या शहराचा नाश करून तेथील लोकांस पाडाव करून नेलें आणि ७० वर्षेपर्यंत यरूशालेम शहर ओसाड पडलें. मग तें पुन्हा बांधलें गेलें, आणि पूर्वीप्रामणें शोभायमान असें ६०० वर्षें राहिलें.

२ "तो कोठें आहे." त्या वेळेस यहूदी लोक बहुत दिवस मशीहाची वाट पाहत होते, आणि त्याच्या येण्याची वेळ जवळ आली आहे हें त्यांस ठाऊक होतें. हा मशीहा मोठा राजा होईल आणि आह्मास रोमी सरकारच्या दासपणांतून मुक्त करील, असें त्यांस वाटत असे. ही त्यांची आशा देशोदेशीं कळली गेली. यहूदी लोक हे मिसर देश, रोम, ग्रीस, आणि पूर्वेकडील मुलूख यांत फांकले गेले असतां, ते आपल्याजवळ धर्मपुस्तक सर्वदां राखीत आणि ही आशा लोकांस कळवीत असत. स्वीतोनियस नामें एक रोमी बखर लिहिणारा याने या आशेविषयीं असें लिहिलें आहे कीं, यहूद्यांत कोणी मोठा राजा उत्पन्न होऊन सर्व पृथ्वीवर राज्य करणार आहे, असें मत पूर्वेकडील सर्व देशांत प्रसिद्ध होतें. तासितस नामें दुसऱ्या एका रोमी इतिहासकाराने असें लिहिलें कीं, याच वेळेस पूर्वदेश जय पावेल, आणि यहूद्यांत कोणी राजा उत्पन्न होऊन सर्वत्र राज्य करील, असें आमच्या उपाध्यांच्या धर्मपुस्तकांत लिहिलें आहे, असें बहुतेक ह्मणत असत. योसेफस, आणि फैलो या दोघां यहूदी इतिहासकर्त्यांनींहि याच आशेविषयीं कांहीं सांगितलें आहे. याच आशेवरून ते ज्ञानी मागी त्याला शोधायास व भजायास आले होते. "त्याचा तारा." तारा अथवा धूमकेतु दिसणें हें विलक्षण गोष्टी होण्याचें चिन्ह आहे, असें प्राचीन लोक समजत असत. हा तारा नवा आणि कांहीं प्रकारें चमत्कारिक; तो पाहून त्या ज्ञान्यांस असें वाटलें कीं ज्या राजाची वाट आह्मी बहुत दिवस पाहत आहों, तो आतां आला असावा. त्यांनी बलामाचें भविष्य (गण. २४:१७) वाचून त्यावरून हें मत धरिलें असेल.

३ "हें ऐकून." ह्मणजे तारा दिसला आणि मागी लोक आले आहेत, आणि त्यांच्या येण्याचा हेतु काय, हें ऐकून. हेरोद राजाने पुष्कळ

४ मग सर्व मुख्य याजक आणि लोकांचे शास्त्री यांस मिळवून
(१) त्याने त्यांच्या जवळ पुसलें कीं, ख्रिस्ताचा जन्म कोठें व्हावा?

५ तेव्हां ते त्याला ह्मणाले, यहूदा देशांतील बेथलहेमांत, कां कीं
भविष्यवाद्याने असें लिहिलें आहे कीं, (२)

६ हे यहूदा देशांतील बेथलहेमा, तूं यहूद्यांच्या सर्व सुभ्यांमध्यें
लाहान आहेस असें कांहीं नाहीं, कारण कीं जो माझे लोक इस्राएल
यांस पाळील, असा अधिकारी तुजमधून निघेल. (३)

(१) गीन २:२. (२) मिखा. ५:२. योहा. ७:४२. यशा. ४०:११.
(३) प्रग. २:२७.

रक्तपात केले व अपराधांच्या योगाने राज्य मिळविलें होतें, ह्मणून राज्य जाईल असें भय धरून तो घाबरला. कोणी राजा जन्मला आहे, आणि हे मागी त्याचा सन्मान करावयास आले आहेत, असें ऐकून, आपण निर्भय कसें राहूं आणि राज्य कसें राखूं असे विचार तो करूं लागला. "सर्व यरूशालेम." कितीएक धार्मिक यहूदी इस्राएलाच्या शांतवनाची वाट पाहत होते, (लूका. २:२५.) आणि ख्रिस्ताच्या येण्याच्या समयीं आनंद करण्यास तयार होते. तरी फारकरून सर्व लोक, व विशेषेंकरून हेरोदाचे मित्र, घाबरले.

४ "शास्त्री." हे विद्वान, शास्त्रज्ञ, आणि सभासद होते. हे सरकारचें व सभेचें दप्तर व व्यापारांतील करार व सूटपत्रें लिहीत असत. हे मुख्य याजक व शास्त्री सान्हेद्रीम नामक यहूदी लोकांच्या सभेंतील सभासद होते. या सभेंत ७२ सभासद असत. त्यांचा अधिकार सर्व सरकारी व धर्मसंबंधी गोष्टींवर चालत असे. हेरोदाने घाबरून त्यांस मशीहाच्या जन्माविषयीं पुसावें, ह्मणून त्यांस एकत्र बोलाविलें. त्यांनी यहूदी शास्त्र लोकांस कळवावें हें त्यांचें काम होतें; ह्मणून भविष्य लेखाप्रमाणें ख्रिस्त कोठें जन्मणार आहे हें त्यांपासून समजून घ्यावें आणि त्याला मारावें, असा राजाचा बेत होता. त्याने ख्रिस्ताच्या येण्याच्या वेळाविषयीं कांहीं संशय धरिला नाहीं, कारण ती वेळ आली असी त्याची खातरी होती, असें दिसतें.

५ "भविष्यवाद्याने." सभासदांनी संशय न धरितां लागलेंच उत्तर दिल्हें. त्यांनी भविष्यवादांतून वाक्य काढून प्रमाण पटविलें.

६ "सुभ्यांमध्यें." यहूदी लोकांचे विभाग, हजार, या संख्येने केले होते, आणि त्यांचीं निरनिराळीं शहरें अथवा प्रांत यांला सुभा असें ह्मणत.

७ तेव्हां हेरोदानें त्या मागी लोकांस गुप्तरूपें बोलावून त्यांपासून तारा दिसण्याची वेळ नीट विचारून घेतली.

८ आणि त्यांस बेथलहेमास पाठवितांना ह्मटलें, तुह्मी जाऊन त्या बाळकाचा चांगला शोध करा, आणि तुह्मास शोध लागल्यावर मला वर्तमान सांगा, ह्मणजे मीहि येऊन त्याला नमन करीन. (१)

(१) नीति. २६:२४.

"लहान." तो गांव वस्तीविषयीं जरी फार लहान होता तरी त्याला मोठा मान मिळाला होता, कारण कीं तेथें मशीहा जन्मायाचा होता. द्रव्य, शोभा, आणि मोठी वस्ती यांकडून जो मान होत असतो त्यापेक्षां विशेषमान ख्रीस्ताच्या जन्माकडून त्या गांवाला प्राप्त झाला. "अधिकारी." अधिकार करणें हा ख्रीस्ताचा एक हुद्दा आहे. (योहा. १८: ३७.) ख्रीस्त हा मेंढपाळावाणी विश्वासूपणानें आणि ममतेनें अधिकार करीत असतो. (योहा. १०:११. यशा. ४०:१०,११. ९:७.)

७ "गुप्तरूपें." एकांतीं. ख्रीस्ताचा जन्मकाळ समजावा, हाच त्याचा अभिप्राय होता. "नीट विचारून घेतली." तारा दिसण्याची वेळ बरोबर समजावी अशी त्याची इच्छा होती. तारा ख्रीस्ताच्या जन्मकाळींच दिसावा, यास्तव तो दिसून किती दिवस झाले, हें समजलें ह्मणजे ख्रीस्ताला जन्मून किती दिवस झाले, हें सहज समजेल, असें त्याला ठाऊक होतें.

८ "चांगला शोध करा." हेरोद आपला दुष्ट हेतु सिद्धीस नेण्यासाठीं फार काळजीनें तजवीज करी. आपण ख्रीस्ताचें जन्मस्थान व काळ हीं बरोबर समजून घ्यावीं असें केवळ नव्हे, पण ज्ञान्यांनी निःसंशय त्याचा शोध काढून तो हाच आहे, असें आपणास पटवून द्यावें, ह्मणून त्यानें त्यांस पाठविलें, आणि त्यांस आपल्या हेतूविषयीं कांहीं संशय न वाटावा, ह्मणून धार्मिकपणाचें सोंग दाखवून मीहि येऊन त्याला नमन करीन असें त्यांस ह्मटलें.

**सूचना**– १. दुष्ट माणसें धर्माच्या मिषानें वारंवार आपले दुष्ट उद्देश झांकून ठेवितात. शिमग्यांतील लाजेचीं कर्मे, रोग्यांस गंगातिरीं नेऊन मारणें, बगाड घेणें, सती जाणें, बालहत्या करणें, इत्यादि क्रूर कर्मे धर्माच्या मिषानें करीत असतात. पण यांकडून ईश्वर फसत नाहीं. तो अंतःकरणाकडे पाहतो. तो चांगल्या व वाईट कामांची झडती घेईल.

२.-- दुष्ट माणसें आपले हेतु सिद्धीस नेण्याकरितां वारंवार धार्मिक माणसांचें साह्य करून घेण्यास पाहत असतात. आपल्या दुष्ट इच्छा सि-

९ तेव्हां ते राजाचें बोलणें ऐकून निघाले. मग पाहा, जो तारा
त्यांनी पूर्व प्रदेशांत पाहिला (१) होता तो त्यांच्या पुढें चालला, आणि
तो बाळक होता तेथें जाऊन वरतीं राहिला.

१० तेव्हां तो तारा पाहून ते अतिशय आनंद पावले. (२)

---

(१) मात्थी. २:२. (२) गीत. ६७:४.

---

द्धीस जाव्या, ह्मणून तीं हेरोदाप्रमाणें कोणतेहि अपराध करायास चुकणार नाहींत. ते याच हेतूस्तव भोळ्यांस फसवायास, निस्संशयितांला मोहविण्यास व अशक्तांला भुलवावयास पाहत असतात.

३.– दुष्ट माणसें विचार करून आपला हेतु सिद्धीस नेण्याचे चांगले उपाय योजितात, आणि हें सर्व धर्माच्या मिषानें करितात. आह्माला ईश्वरी प्रेरणा आहे, असें मीष दाखवून ते मनःकल्पित नवें शास्त्र व नवा धर्म रचून लोकांस भुलवितात आणि दैवी विधीबदल मानवी विधि व नेम प्रवृत्त करितात. असे किती होऊन गेले, पाहा बरें. याचें मूळ कारण लोभ, गर्व, अधिकार इत्यादिकांविषयींची आवड आहे. पण ढोंग हें ईश्वरापासीं लपत नाहीं. तो मानसिक विचार जाणतो.

९, १० "तारा– त्याच्या पुढें चालला." ते यरूशालेमास येत असतां तारा त्यांस अदृश्य झाला असेल, आणि आतां पुन्हा दिसला. त्यांनी तारा पाहिला तेव्हां, ईश्वर आह्मास मार्ग दाखवितो, असी त्यांची खातरी झाली, आणि ताऱ्याला उभें राहतां पाहिलें, तेव्हां ते फार आनंद पावले, कारण कीं जो राजा जन्मला आहे त्याला आह्मी पाहूं असा त्यांला भरवसा आला.

**सूचना**– ख्रीस्ताचा जन्म ही मोठी गोष्ट होती. ईश्वराने त्या ज्ञान्यांस त्याचा शोध लावण्यासाठीं मार्ग दाखवावा हें योग्य होतें.

२.–– जे तारणाऱ्याचा शोध करावयास इच्छितात त्यांस ईश्वर मार्ग दाखवील.

३.–– तारणाऱ्याचा शोध लागतो तेव्हां आह्मी फार आनंद करावा. येशू ख्रीस्त हाच वाट, सत्यता, आणि जीवन आहे. हाच आमचा तारणारा, मित्र, आणि सर्वांमध्यें सर्व, असा आहे. याशिवाय दुसरा तारणोपाय नाहीं. तो सांपडेपर्यंत आत्म्याला शांति व आनंद होत नाहीं. तर सर्वांनीं त्याला शरण जावें. आपण नम्रतेने व आनंदाने त्याजवर विश्वास ठेवून त्याच्या आज्ञा पाळाव्या. (योहा. १२:३५,३६.)

११ नंतर त्यांनीं घरांत जाऊन बाळकास त्याची आई मारया इच्या जवळ पाहिलें आणि पायां पडून त्याला नमन केलें; मग आपल्या द्रव्याच्या थैल्या उघडून सोनें व ऊद व बोळ असीं दानें त्याला अर्पिलीं. (१)

१२ तेव्हां हेरोदापासीं फिरून जाऊं नये असें स्वप्नांत सूचना मिळाल्यामुळें (२) ते आपल्या देशास दुसऱ्या वाटेनें गेले.

१३ तेव्हां ते गेल्यावर, पाहा, प्रभूचा दूत योसेफास स्वप्नांत दिसून ह्मणाला, ऊठ, बाळक आणि त्याची आई यांस घेऊन मिसर

(१) गीत ७२:१०. यशा. ६०:६. (२) मार्त्थी. १:२०. होशे. ११:१.

११ "त्याला नमन केलें." हे लोक तारणाऱ्याचा शोध करण्याकरितां लांबून आले. ईश्वरानें त्यांस मार्ग दाखविला. आणि त्याचा शोध लागतांच जरी तो गव्हाणींत होता, तरी त्यांनीं त्याचें भजन केलें. यावरून हा खरा मशीहा आहे, असें त्यांनीं त्याला ओळखिलें, असें समजण्यास चांगला आधार आहे. "ऊद व बोळ." यांची उत्पत्ति आर्बस्थानांत फार आहे. मेताला सुगंधित करण्याच्या कामांत याचा उपयोग पडत असे. (योहा. १९:३९.) हा पवित्र अभिषेकाच्या तेलांत घालण्याचा एक पदार्थ होता. (निर्ग. ३०:२३.) दशांगांतहि घालीत असत. (एस्ते. २:१२. गीत ४५:८. नीति ७:१७.) आणि कधीं कधीं पिण्यासाठीं द्राक्षरसांत घालीत असत. (मार्क. १५:२३.) हीं दानें त्या ज्ञान्यांनीं सन्मानार्थ अर्पिलीं. थोर मनुष्यांस असीं दानें देण्याची चाल यहूदी लोकांत फार रूढींत होती. (उत्प. ३२:१४. ४३:२–५. १ शमु. १०:२७. १ राज. १०:२. गीत ७२:१०–१५.) जीं उत्तम दानें त्यांच्या देशांत मिळत तीं त्यांनीं आणिलीं. तसेंच आह्मी ख्रिस्ताला उत्तम पदार्थ ह्मणजे आमचीं अंतःकरणें व सर्वस्व अर्पावें.

१२ "स्वप्नांत." अध्याय १. विसाव्या ओवीवरील व्याख्या पाहा. "सूचना मिळाल्यामुळें." हेरोदाकडे परत जाऊन ख्रीस्ताचें जन्मस्थान आणि त्याच्या राहण्याचें ठिकाण कळवावें, असें त्यांच्या मनांत होतें, पण ईश्वरानें त्यांस जाऊं दिल्हें नाहीं. जे ईश्वरास आवडतात त्यांचा तो सांभाळ करील. दुष्टांच्या योजना कोणत्या रीतीनें व्यर्थ कराव्या आणि आपण जे निवडले त्यांचा सांभाळ कसा करावा, हें तो जाणतो.

१३ "मिसर देशांत पळून जा." हा देश हेरोदाच्या ताब्यांत नव्हता, ह्मणून तो राहण्यास फार सोईचा आश्रय होता. ख्रिस्त, हा या एकाच

देशांत पळून जा, आणि मी तुला सांगें तोंपर्यंत तेथें राहा, कारण कीं बाळकाचा घात करायास हेरोद त्याचा शोध करणार आहे.

१४ मग तो उठून बाळक आणि त्याची आई यांस रात्रीं घेऊन मिसर देशांत गेला;

१५ आणि हेरोदाच्या मरणापर्यंत तेथें राहिला, तेव्हां म्या आपल्या पुत्राला मिसर देशांतून बोलाविलें आहे, (१) असें जें प्रभूनें भविष्यवाद्याकडून सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें, ह्मणून असें झालें.

१६ तेव्हां त्या मागी लोकानीं मला फसविलें, हें जाणून हेरोद फार रागें भरला, आणि त्याने त्या मागी लोकांपासून जी वेळ नीट

(१) होशे. ११:१.

---

वेळेस पालस्तीन देशाबाहेर गेला असेल. ज्या देशांत इस्राएल लोक क्रूर दासपणांत होते त्यांत त्याला आश्रय मिळाला. आपल्या लोकानीं निर्भयपणें राहावें ह्मणून ईश्वर राष्ट्रांची देखील उलटापालट करूं शकतो. तथापि तो कांहीं साधनाच्या योगानें आणि आपल्या साधारण सूत्राने आपले हेतु सिद्धीस नेत असतो.

१४ "रात्रीं." त्याच रात्रीं. योसेफ ईश्वरी प्रेरणा पावत तेव्हांच मान्य झाला.

१५ "हेरोदाच्या मरणापर्यंत." हेरोद, हा आपल्या कारकीर्दीच्या सदतिसाव्या वर्षीं मरण पावला. (योसेफस. १७:८.) तो पराकाष्ठेच्या दुःखकारक व घाणेऱ्या रोगाने मेला. (योसेफस. १७:६.) "तें पूर्ण व्हावें." (होशे. ११:१.) हें वाक्य इस्राएल लोकांस मिसर देशांतून बोलावण्याविषयीं सांगितलें होतें. (निर्गम. ४:२२, २३.) परंतु इस्राएल, हे येशूचें दर्शक चिन्ह असें होतें, ह्मणून हें भविष्य ख्रीस्ताला लागू व्हावें हें योग्य होतें.

१६ "फसविलें." मागी लोक त्याच्या आज्ञेप्रमाणें परत आले नाहींत. हेरोदाला फसवावें या हेतूने ते दुसऱ्या वाटेने गेले असें दिसत नाहीं, तरी यावरून तो फसला, ह्मणजे त्याचा आशाभंग झाला. "फार रागें भरला." ज्यानीं त्याची आज्ञा मानली नाहीं ह्मणून. एकट्या येशू ख्रीस्तालाच मारावें असी त्याची इच्छा होती, आणि या इच्छेस अडथळा आल्यावरून त्याला कसें तरी मारून टाकावें असा निश्चय करून त्याने त्या प्रांतांतील सर्व बाळकें मारण्याची क्रूर योजना केली. हेरोद, हा फार रागीट होता असें त्याच्या आयुष्यांतील सर्व आचरणावरून दिसून येतें. "जिवें मारिलें."

विचारून (१) घेतली होती त्या वेळेप्रमाणें, बेथलहेमांत आणि त्याच्या सगळ्या सीमांत जे बाळक दोन वर्षांचे आणि त्यांहून धाकटे होते, त्या सर्वांस त्याने माणसें पाठवून जिवें मारिलें.

(१) मात्थी. २:७.

हेरोदाने जेव्हां बाळकांस वधविलें तेव्हां खीस्ताला जन्मून एक वर्ष देखील झालें नसेल, परंतु काम पक्कें व्हावें असा निश्चय हेरोदानें केला होता, ह्मणून त्यानें ज्ञान्यांस नीट वेळ विचारून घेऊन अणखी एक वर्ष मिळविलें. एवढा क्रूरपणा कोठून असें वाटेल तर यापेक्षां अघोर कामें त्यानें केलीं असें समजावें. योसिफस नामक एका यहूदी इतिहासकर्त्यानें त्याचीं दुसरीं दुष्कर्मे लिहून हेरोद हा फार क्रूर रक्तपाती व जुलमी होता, असें प्रमाण पटविलें आहे. त्याच्या एका सुंदर बायकोचें नाम मेरीआम्नी. तिचा भाऊ आरिस्तोबुलस, हा यरूशालेमांतील राहाणाऱ्यांस कांहीं आवडता आहे असें समजून हेरोदाने त्याला त्याच्या अठराव्या वर्षी वधविलें. त्या बायकोचा हर्केनस नामें आजा याला आपल्या कारकीर्दीच्या सातव्या वर्षी वधविलें. हर्केनस तेव्हां ऐशीं वर्षांचा होता, आणि चांगल्या व सौम्य स्वभावाचा होता. त्यानें एका वेळेस हेरोदाला प्राणसंकटांतून वांचविलें होतें. नंतर हेरोदाने ती सुंदर बायको व तिची आई यांस सर्व लोकांसमक्ष मारविलें, आणि आपल्या दोन पुत्रांविषयीं निष्कारण संशय धरून त्यांला तुरुंगांत फांसीं दिल्हें. त्याने आपल्या मरणसमयीं यहूद्यांतील मुख्य लोकांस यरीहो शहरांत बोलावून आणविलें. जे येत नाहींत त्यांस जिवें मारावें या आज्ञेवरून सर्वांस येणें प्राप्त झालें. हेरोदाने त्यांस रंगांगणांत कोंडून ठेविलें, मग त्याने आपली बहीण सालोम व तिचा नवरा आलेक्सस यांस बोलावून आणून सांगितलें कीं आतां माझें आयुष्य थोडें राहिलें आहे. मी यहूदी लोकांस बरेंच ओळखतों. माझ्या मरणापेक्षां दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीकडून त्यांस अधिक संतोष होणार नाहीं. तर त्यांतील सर्व मुख्य लोक एथें रंगांगणांत तुमच्या स्वाधीन ठेविले आहेत. मी मेलों ह्मणजे हें त्यांस कळलें नाहीं इतक्यांत त्या लोकांस शिपायांच्या हातून मारून टाका. मग यहूदी देशांतील सर्व लोक मजविषयीं नाखुष आहेत, तरी ते माझ्या मरणसमयीं शोक करितील. असें बोलतांना अश्रू गाळून त्याने त्यांस शपथ घातली. (यो. प. ग्रंथ.१७:६. अणखी ठिकाणोठिकाणीं ) त्याच्या मरणानंतर त्यांनी या मनुष्यांस न मारितां जाऊं दिल्हें, हें खरें, तरी हा राजा केवढा क्रूर, किती रक्तपाती, आणि कसा जुलमी होता, हें दिसण्यांस येतें.

१७ त्या वेळेस जें इर्मया (१) भविष्यवाद्याने सांगितलें होतें तें पूर्ण झालें;

१८ तें असें कीं, रामांत शोक व रडणें व मोठा आक्रांत असी वाणी ऐकण्यांत आली; राहेल आपल्या लेंकरांकरितां रडत होती, तीं नाहींत ह्मणून ती शांतवन घेईना.

१९ मग हेरोद मेल्यावर, पाहा, प्रभूचा दूत मिसर देशांत योसेफास स्वप्नांत दिसून ह्मणाला.

२० ऊठ, बाळक आणि त्याची आई यांस घेऊन इस्राएल देशांत जा, कां कीं बाळकाचा जीव घ्यायास जे पाहत होते ते मेले आहेत. (२)

२१ तेव्हां तो उठून बाळक आणि त्याची आई यांस घेऊन इस्राएल देशांत आला.

---

(१) इर्म. ३१:१५. (२) निर्गम. ४:१९.

---

१७ इर्म. ३१:१५. नबूखाद्नेस्सराने यरूशालेम शहर हस्तगत करून तेथील लोक पाडाव करून नेले याविषयीं हें वाक्य आधींच सांगितलें होतें. त्या कैद्यांमध्यें सांखळ्यानी बांधलेला असा स्वतां इर्मयाहि होता. (इर्म. ४०:१.) नबूखाद्नेस्सराने त्यांच्या अमीरांस मारून टाकिलें होतें.

१८ "रामांत." रामा हा लहान गांव बेथलहेमाजवळ होता आणि त्याच्या जवळ याकोबाची बायको राहेल पुरली होती. (उत्प. ३५:७–१९.) तिचें प्रेतस्थान जवळ होतें ह्मणून ती आई आपल्या लेंकरांकरितां शोक करीत आहे असा दाखला काढून भविष्यवादी तेंच वर्णन बेथलहेमांतील आयांस लावितो. त्या जुलमी राजाच्या क्रूरपणाकडून प्रत्येक कुटुंब शोक करीत होतें. पण शुभवर्त्तमानकर्त्ता हेरोदाविषयीं कांहीं निंदोक्ति बोलत नाहीं. तो या क्रूरपणाचें वर्णन सालसमनाने व खरेपणाने करितो, मग त्याचा न्याय करणें देवाला सोंपून देतो.

१९ "हेरोद मेल्यावर." १५ ओवीवरील व्याख्या पाहा. हेरोद मेल्यावर त्याचे तीन पुत्र राहिले, आणि त्या तिघांमध्यें त्याच्या राज्याचा विभाग झाला. त्यांचीं नामें आर्खेलावस, फिलिप्प, व आंतिपास असीं होतीं. त्या सर्वांला हेरोद ह्मणत असत.

२० "ते मेले आहेत." ह्मणजे हेरोद, व याचा पुत्र आंतिपेतर. याला तर हेरोदानेच आपण मेल्यापूर्वी पांच दिवस अगोदर मारिलें होतें.

२२ परंतु आर्खिलावस आपला बाप हेरोद याच्या ठिकाणीं यहूद्यांत राज्य करीत आहे, हें ऐकून तो तेथें जायास भ्याला; तथापि स्वप्नांत सूचना मिळाल्यामुळें तो गालील (१) प्रांतांत गेला.

२३ आणि तो नाजारेथ (२) नामें नगरांत जाऊन राहिला; त्याला नाजोरी (३) ह्मणतील, हें जें भविष्यवाद्यानी सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें, ह्मणून असें झालें.

## अध्याय ३.

१ नंतर त्या दिवसांत (४) बाप्तिस्मा करणारा योहान्न येऊन यहुद्यांतलि रानांत उपदेश करीत बोलला कीं;

(१) मात्थी. ३:१३. लुका २:३९. (२) योहा. १:४५.
(३)गण. ६:१३. न्या. १३:५. १ शमु. १:११. प्रेषित. २४:५. (४)लूका ३:२. योहा. १:१८.

२२ "आर्खिलावस." हा आपल्या बापासारिखा फार क्रूर व जुलुमी स्वभावाचा होता. यानें एका वल्हांडण सणाच्या वेळेस ३००० माणसांस वधविलें. यानें नऊ वर्षे राज्य केल्यानंतर बादशाहानें त्याला देशपार केलें. योसेफ त्याचा स्वभाव जाणून त्याच्या अमलांत जावयास भ्याला आणि ईश्वराच्या आज्ञेवरून गालिलांत गेला. त्या वेळेस पालस्तिन देशाचे तीन विभाग झाले होते. ह्मणजे उत्तरेस गालील, मध्यें शोमरोन, आणि दक्षिणेस यहूदा. गालील हा भाग आंतिपास वल्लद हेरोद याच्या अमलांत होता. हा राजा कांहींसा सौम्य स्वभावाचा होता.

२३ "नाजारेथ." हा गालिलांतील लहानसा गांव काना गांवाजवळ कापेर्णाहूमाच्या पश्चिमेस होता. तो कांहींसा खोऱ्यांत आणि कांहींसा डोंगराच्या उतरणीवर वसला होता. (४:२९.) त्यावेळचे तेथील राहाणारे फार दुष्ट होते. हल्लीं हा गांव बराच आहे आणि तेथें एक मठ व दोन देवळें आहेत. "त्याला नाजोरी ह्मणतील." ह्मणजे त्याला निंदतील व धिःकारतील. त्याला नीच मानतील आणि नाकारतील असें सर्व भविष्यवाद्यांनीं सांगितलें होतें. (यश. ५३) तो नाजोरथकर असल्यावरून नीच मानला गेला. कारण कीं त्या गांवाच्या लोकांची फारच बेअब्रू होती. याविषयीं उदाहरण. ज्या वेळेस नाथानेल याला ह्मटलें कीं, येशू मशीहा हा नाजारेथकर आहे. त्या वेळेस तो असें बोलला, "नाजारेथांतून कांहीं चांगलें निघेल काय ?" (यो० १:४६.) तर यावरून भविष्यवाद्यांचें ह्मणणें पूर्ण झालें.

१ "त्या दिवसांत." ख्रिस्ताचें बाळपण व प्रौढपण यांमधील वर्षे सोडून

२ पश्चात्ताप करा, कां कीं आकाशाचें राज्य जवळ आलें आहे.

दिल्हीं आहेत. "बाप्तिस्मा करणारा." यहूदी लोक आपल्या मतानुसाऱ्यांचा बाप्तिस्मा करीत असत. ही रीत पूर्वीपासून चालत आली आहे. "रानांत." हा यार्देन नदीच्या कांठीं व मोठा वसलेला डोंगरवट प्रदेश होता.

२ "पश्चात्ताप करा." पाहा, पाप हें वाईट आहे, तें ईश्वराविरुद्ध आहे, जें अघोर कर्म (इर्मया ४४:४. ) ईश्वर द्वेषितो तें हेंच आहे, असें मनांत पक्कें आणून खरा खेद करणें आणि पापवासना अगदीं सोडून देणें हाच पश्चात्ताप आहे. पापाकडून केवढें भय व दुःख झालें आहे, ईश्वर किती पवित्र आणि न्यायी आहे. होय, आमच्या पापामुळें ख्रीस्ताला मरण सोसावें लागलें, यांविषयीं मनांत आणल्यावरून पश्चात्ताप होतो. नव्या कराराच्या मूळ भाषेंत पश्चात्ताप या अर्थाचे दोन शब्द अढळतात. एकाचा अर्थ पापामुळें खेद असा आहे. या ओवींतल्या शब्दाचा हाच अर्थ आहे. त्या वेळेस यहूदी राष्ट्रांमध्यें पाप फार मानलें होतें, ह्मणून तुह्मी पश्चात्ताप करा असा योहान्नाचा व ख्रीस्ताचाहि पहिला उपदेश होता. "आकाशाचें राज्य जवळ आलें आहे." आकाशाचें राज्य, देवाचें राज्य, ख्रीस्ताचें राज्य असीं वाक्यें ठिकाणेठिकाणीं शास्त्रांत अढळतात. या तीन वाक्यांचा अर्थ एकच आहे. यहूदी लोकांनीं असें राज्य येण्याची आशा जुन्या करारांतलि कित्येक वाक्यांवरून आणि विशेषेंकरून दानिएल भविष्यवाद्याच्या ७:१३,१४. यांवरून धरली होती. दाविदाच्या बदली दुसरा कोणी तरी सिंहासनावर बसेल, असें भविष्यवाद्यानें सांगितलें होतें. ( १ राजे २:४. ८:२५. इर्म. ३३:१७. ) यहूदी लोक मशीहाची वाट पाहत होते, तो येईल, तेव्हां मेलेले उठतील, न्याय ठरला जाईल, सर्व शत्रु मारले जातील आणि आपल्या राष्ट्राला मोठा मान मिळेल, असें त्यांस वाटत असे. त्या येण्याच्या काळाला यहूदी लोक सदरहू नामें देत असत. ख्रीस्त व त्याचे शिष्य तीं नांवें घेऊन बोलत असत. परंतु त्यांनीं पहिल्यापासून या राज्याविषयीं यहुद्यांचें खोटें मत दाखवायास बरोबर समजून द्यावें ह्मणून प्रयत्न केले. ( मात्थी ५:३,२०. योहा. १८:३६. ) जर योहान्नानें लोकांला बोलावून मोठी फौज मिळविली असती तर हा मशीहाची वाट सिद्ध करीत आहे, आणि देवाचें राज्य जवळ आलें आहे, असें त्यांस वाटलें असतें. पण असें न करितां त्या पवित्र राज्याची सिद्धता होण्यासाठीं त्यानें पश्चात्ताप करावयास सांगितला. तसेंच आताांहि सर्वत्र सर्व

३ कां तर ज्याविषयीं यशाया भविष्यवाद्यानें हें सांगितलें होतें कीं, (१) रानांत ओरडणाऱ्याची वाणी झाली कीं, प्रभूचा मार्ग तयार करा, त्याच्या वाटा नीट करा, तो हाच आहे.

४ आणि या योहान्नाचें वस्त्र (२) उंटाच्या लोचें होतें, आणि त्याच्या कंबरेस कातड्याचा कंबरबंद होता, आणि त्याचें खाणें टोळ (३) व रानमध होतें.

५ तेव्हां यरूशालेम व सर्व यहूदा व यार्देनेच्या चहुंकडील अवघा देश यांतील लोक निघून त्याच्या जवळ गेले;

६ आणि त्यांनी आपलीं पापें पदरीं घेऊन (४) यार्देनेमध्यें त्यापासून बाप्तिस्मा घेतला.

---

(१) यशाया. ४०:३.
(२) २ राज. १:८. मात्थी. ११:८.
(३) लेवी ११:२२.
(४) प्रेषि. १:५. २:३८. १९:४,५.८.

---

लोकांस शुभवर्तमानाचा निरोप हाच आहे कीं, तुह्मी पश्चात्ताप करा, कारण कीं आकाशाचें राज्य जवळ आलें आहे. ख्रीस्तानें तारणोपाय सिद्ध केला आहे आणि आतां तो आपण होऊन तुह्माला बोलावितो. तुह्मी पश्चात्ताप करून त्याजवर विश्वास ठेवा.

४ "वस्त्र उंटाच्या लवेचें होतें." एलीया इत्यादिक भविष्यवादी असीं जाड व स्वस्तीं वस्त्रें नेसत असत. ( २ राज. १:८. जख. १३:४. )

५ "तेव्हां यरूशालेम इ०" बहुत लोकांचे समुदाय त्यांचें ऐकायास गेले. ते ऐकायास व बाप्तिस्मा घ्यावयास खुशी होते, याचीं दोन कारणें दिसून येतात. ( १ ) आपल्या धर्माचा व राज्याचा पालट होणार आहे असें त्या वेळेस त्यांला वाटत असे. ( २ ) यहूदी धर्मानुसाऱ्यांचा बाप्तिस्मा करावा असी चाल रूढींत होती. नवा धर्म अंगीकारण्याकडून शुद्ध होण्याची ही योग्य खूण आहे, असें ते मानीत असत.

६ "बाप्तिस्मा घेतला." त्यांनी आपलीं पापें पत्करलीं आणि बाप्तिस्मा घेण्याकडून आपली पक्की खातरी दाखविली. तेणेंकडून मन स्वच्छ होतें असें नाहीं, केवळ स्वच्छ होण्याचें अगत्य दाखविलें आहे. तो ख्रिस्ती मंडळीची निशाणी आहे, आणि पवित्र आत्म्याकडून अंतःकरण शुद्ध होण्याची बाहेरील खूण व शिक्का असा आहे. हा पश्चात्ताप, विश्वास आणि पवित्र आचरण यांची खूण आहे, आणि तो घेण्याविषयीं ख्रीस्ताची आज्ञा आहे, यावरूनच तो घेण्याचें अगत्य दिसून येतें.

७ परंतु परोशी व सदोकी यांतील बहुतांस आपल्या बाप्तिस्म्या-
साठीं येतां पाहून, तो त्यांस बोलला, अहो सापाच्या पिलांनो, (१)
जो क्रोध होणार (२) त्यापासून पळायास तुह्मास कोणी सुचविलें!

(१) यशा. ५९:५. मात्थी १२:३४. २३:३३. लुका २:७. (२) इमे. ५१:३. रोमे. १:१८.

७ "परोशी व सदोकी." यहूद्यांमध्यें परोशी, सदोकी, आणि एस्सेनी, असे तीन मुख्य पंथ होते. (१) परोशीपंथ हे अधिक होते आणि मातबर होते. परोशी हें नाम इब्रीभाषेंतील ज्या शब्दावरून पडलें, त्या शब्दाचा अर्थ वेगळें ठेवणें असा आहे. आह्मी आपल्या देशस्थ लोकांपेक्षां पवित्र आहों, असें मानून ते त्यांपासून वेगळे राहत असत. माणसांचे आत्मे अमर आहेत, ते उठविले जातील, ते आपआपल्या कर्माप्रमाणें सर्वकालिक सुख अथवा दुःख भोगतील; चांगले व वाईट असे दूत आहेत; ईश्वराला यहूदी लोकांवर विशेष उपकार करणें भाग होतें; आणि आपण आब्राहामाच्या पुण्यानें किंवा नेमशास्त्र पाळल्यानें न्यायी ठरूं असें ते मानीत होते. ते अभिमानी, व साधुमान्य असून, साधारण लोकांस नीच मानीत असत. (योहा. ७:४९.) ते थोरपणाचें ढोंग दाखवीत, डौलानें भजन व धर्म करीत, आणि बाहेरील शुद्धता, उपवास व धुण्याचे संस्कार यांविषयीं ते फार जपत असत. जेवण व सभा यांमध्यें मुख्य आसनाची त्यांला फार आवड वाटे. ते दुष्ट, ढोंगी, अधिकारेच्छु आणि फार अभिमानी असे होते. (२) सदोकी हें नाम त्यांनी सदोकापासून घेतलें, असें ह्मणतात. सदोक, हा अंतीगनस सोकोयिस जो ख्रीस्ताच्या येण्यापूर्वीं २६० वर्षांमागें सभेंतील मुख्य होता त्याचा शिष्य होता. अंतिगनसानें असें शिकविलें कीं, सुखाची आशा अथवा दंडाचें भय यांवरून नव्हे तर ती करणें भाग आहे ह्मणून देवाची सेवा केली पाहिजे. पण सदोकानें त्याचें मत बरोबर न समजतां, परलोकीं कांहींच फळ मिळणार नाहीं, असें मत अंगीकारलें. यावरून हा पंथ उत्पन्न झाला. या पंथांतील लोकांनीं पुन्हा उठणें नाकारिलें. आत्मा नाहीं, दूत नाहींत, आणि परलोक नाहीं, असें त्यांनी ह्मटलें. तथापि जुना करार खरा आहे असें ह्मणत असत. (३) एस्सेनी, या पंथांविषयीं नव्या करारांत कांहीं सांगितलें नाहीं. ते आपली सर्व मालमत्ता समाईक ठेवीत. ते पुष्कळ उपासतापास करीत. त्यांचें मत फारकरून परोश्यांच्या मतासारिखें होतें. "अहो सापाच्या पिलांनो." साप हा दुष्टपणाचें चिन्ह असा आहे. त्याचें विष नाशकारक आहे. तसेंच पापहि नाशकारक असतें, ह्मणून त्यापासून दूर राहिलें पाहिजे. (उत्प. ३:१९.) "जो क्रोध होणार." इतके

८ तर पश्चात्तापास योग्य जीं फळें तीं द्या;

९ आणि आब्राहाम आमचा बाप आहे, असें आपल्या मनांत ह्मणायास योग्य मानूं नका; कां कीं मी तुह्मास सांगतों, आब्राहामासाठीं या दगडाचीं लेंकरें करावयास देव समर्थ आहे.

१० आणि आतांच झाडाच्या मुळावर कुऱ्हाड ठेविली आहे,

---

ढोंगी आणि दुष्ट लोकांस येतां पाहून योहान्नाला आश्चर्य वाटलें. (१) जे गर्विष्ठ आहेत त्यांविषयीं फारकरून आशा नाहीं, कारण कीं ते शुभवर्त्तमानाचा धिक्कार करितात. (२) जे साधुमान्य आहेत त्यांविषयीं फार करून आशा नाहीं, कारण ते आपल्या पुण्याकडून तारण साधावयास पाहतात, आणि ख्रीस्ताचें पुण्य अंगीकारीत नाहींत. (३) जे लोभिष्ट त्यांचें मन द्रव्य व ऐहिक विषयांकडे असतें. ते आकाशलोकांत संग्रह सांठवून ठेवायास इच्छीत नाहींत. (४) ज्यांचें अंतःकरण इतकें कठीण आहे कीं ते पश्चात्ताप करणार नाहींत, त्यांतील बहुतेकांस पवित्र आत्मा अणखी प्रेरणा करणार नाहीं, आणि ते सर्वकाळ तसेच क्रोधपात्र राहतील. क्रोध होणार आहे, आणि तो सर्व अन्यायांवर येईल, असी सर्वांनी आठवण ठेवावी, आणि या क्रोधापासून सर्वांनी पळावें. देवानें कृपाकरून सर्वांस प्रबोधित केलें आहे. जे अगदीं निष्काळजी आहेत त्यांस भय वाटावें.

८ "योग्य जीं फळें तीं द्या." ह्मणजे या कामांत कपटी होऊं नका. पश्चात्ताप करण्यांत कांहीं ढोंग नसावें. तुह्मी खरा पश्चात्ताप करितां, असें पाप सोडण्याकडून दाखवा. हा उपदेश योग्य व अंतःकरणांत ठसण्याजोगा आहे.

९ "आब्राहाम आमचा बाप आहे." (योहा. ८:३३-३७,५३.) आह्मी आब्राहामाचें संतान असल्यावरून आह्माला मोठा मान आहे आणि आमचें तारण होईल, असें त्यांस वाटलें. परंतु योहान्नानें त्यांस निक्षून सांगितलें कीं, ही गोष्ट ईश्वराच्या दिसण्यांत हलकी आहे. तो दगडापासून देखील आब्राहामाला लेंकरें उत्पन्न करून देण्यास समर्थ आहे. वास्तविक पाहिलें तर देवानें त्या गर्विष्ठ परोश्यांतील बहुतेकांस त्यांच्या पापामुळें नाकारलें, आणि आत्म्यानें आब्राहामाचीं लेंकरें होण्यासाठीं बहुत परदेशस्थांस निवडून घेतलें. आमचें मोठें कूळ किंवा नामांकित वडील यांजकडे ईश्वर कांहीं लक्ष देत नाहीं. तो अंतःकरणाकडे पाहतो, आणि कोणी थोर असो किंवा लहान असो तो पवित्रतेवांचून देवाला पाहणारा नाहीं.

१० "झाडाच्या मुळावर कुऱ्हाड." जेव्हां कुऱ्हाड झाडाच्या मळासीं

यास्तव जें जें झाड चांगलें फळ देत नाहीं तें (१) तोडून अग्नींत टाकितात.

११ पश्चात्तापासाठीं मी तुमचा बाप्तिस्मा पाण्याने (२) करितों, परंतु जो माझ्या मागून येतो तो मजपेक्षां समर्थ आहे, त्याच्या वाहाणा वाहायास मी योग्य नाहीं, तो पवित्र आत्म्याने (३) व अग्नीने तुमचा बाप्तिस्मा करील.

---

(१) योहान्न १५:६. (२) लूका ३:१६. प्रेषि. १९:४. (३) प्रेषि. १:५.

---

लावितात, तेव्हां तें खर्ची करण्यासाठीं नव्हे, परंतु तें अगदीं तोडून टाकण्या साठीं. योहान्नाने हा दाखला देण्याकडून असें समजाविलें कीं, आतां न्याय होणार आहे आणि जसें झाड फळावरून कळतें तसा मनुष्याचा न्याय त्याच्या आचरणावरून ठरेल. आतां ढोंग चालणार नाहीं. आपण पश्चात्ताप करितों एवढें ह्मणणें पुरें नाहीं. वास्तविक सुधारून ईश्वराकडे फिरलें पाहिजे.

११ " पाण्याने करितों." पाणी हें स्वच्छ करण्याचें साधन आहे ह्मणून मन स्वच्छ होण्याचें अगत्य दाखविण्यासाठीं बाप्तिस्मा पाण्याने करावा हें योग्य दिसतें. " त्याच्या वाहाणा." हा तारणारा इतका थोर व इतका गौरवयुक्त होणार आहे कीं त्याच्या वाहाणा वाहावयास देखील मी योग्य नाहीं, असें योहान्नाला वाटलें. जे ख्रीस्ताचें गौरव व श्रेष्ठपण जाणतात ते त्याला उंच मानून आपणाला नीच मानितात. जरी ख्रीस्ताने आपणाला नीच करून सर्वांपेक्षां लाजीरवाणें मरण सोसिलें तरी तो आपल्या ईश्वरी व मानवी स्वभावाने सर्वांहून थोर मनुष्यापेक्षां अतिश्रेष्ठ होता. जे ख्रीस्ताची निंदा करितात ते त्याचे गुण अगदीं समजत नाहींत, आणि त्याला धिक्कारण्याकडून आपल्याला केवढें भय प्राप्त होतें हें ते जाणत नाहींत. "पवित्र आत्म्याने." हा देवपणांतील तिसरा आहे. मनांत प्रकाश पाडावा, अंतःकरण पवित्र व नवें करावें, शांति व समाधान द्यावें, हें पवित्र आत्म्याचें काम आहे. जेव्हां पवित्र आत्मा लोकांला प्रेरितो, तेव्हां बहुत लोक ईश्वराकडे फिरतात. (प्रेषि. २:४, ४१.) "अग्नीने." हाहि शुद्ध करण्याची खूण आहे. हा प्रकाश पाडितो, तापवितो आणि जाळून टाकितो. तसाच पवित्र आत्मा अंतःकरणांत प्रवेश करून तें पारखितो. जे अपूर्ण सांपडतील ते सर्वकालिक अग्नींत टाकिले जातील. "बाप्तिस्मा करील." ह्मणजे तुह्मावर पवित्र आत्मा घालील. (नीति १:२३. यशा. ४४:३. योएल २:२८,

१२ त्याचें सूप त्याच्या हातांत आहे, आणि तो आपलें खळें
अगदी निर्मळ करील, (१) आणि आपले गहूं कोठारांत सांठवील,
आणि भूस (२) न विझणाऱ्या अग्नींत जाळून टाकील.
१३ तेव्हां येशू गालीलाहून यार्देनेस योहान्नाजवळ त्यापासून
बाप्तिस्मा घेण्याकरितां आला. (३)
१४ परंतु योहान्न त्याला मना करून ह्मणाला, मला तुजपासून
बाप्तिस्मा घेण्याची गरज आहे, आणि तूं मजकडे येतोस काय?
१५ मग येशूनें त्याला उत्तर दिल्हें कीं, आतां होऊं दे, कां कीं
याप्रकारें सर्व न्यायीपणा पूर्ण करणें हें आह्मास योग्य आहे. तेव्हां
त्याने त्याचें होऊं दिल्हें.

(१) मल. ३:२. (२) गीत १:४. मल. ४:१.मार्क. ९:४४.
(३) मार्क. १:९. लूका ३:२१.

२९. प्रेषि. २:१७,१८.) पवित्र आत्म्याने बाप्तिस्मा करणें ह्मणजे अंतःकरण पवित्र व नवें करण्यासाठीं पवित्र आत्मा पाठविणें असें आहे.

१२ "त्याचें सूप इ." खीस्त, हा लोकांचें अंतःकरण किती सूक्ष्म दृष्टीने पारखितां, हें समजविण्यासाठीं योहान्न हा दाखला सांगतो. शेतकरी दाणा भुसापासून सुपाने वेगळा करीत असतो. तसाच खीस्त हाहि खऱ्या विश्वासणाऱ्यांस दुष्टांपासून वेगळें करून सर्वकालिक जीवनासाठीं राखून ठेवितो. गहूं ह्मणजे देवाचे खरे भक्त, भूस ह्मणजे दुष्ट लोक. ते भुसासारिखे वाऱ्याने उडविले जातील, असें शास्त्रांत सांगितलें आहे. (इयोब २१:१८. गीत १:४ यशा. १७:१३. होशे १३:१३. यशा. ५:२४.) "न विझणाऱ्या अग्नींत." हा अग्नि सर्वकाळपर्यंत जळत जाईल. (२ थेस्स. १:८,९. मार्क. ९:४८. माथी ५:२४.)

१४ "मला तुजपासून इ०" म्या तुझा बाप्तिस्मा पाण्याने करावा, यापेक्षां त्वां माझा बाप्तिस्मा पवित्र आत्म्याने करावा, हें योग्य आहे. मी पापी आहें, मी मशीहाला बाप्तिस्मा देण्यास योग्य नाहीं.

१५ "सर्व न्यायीपणा." येशू पापी नव्हता आणि जसें लोकांला तसें त्याला पश्चात्तापासाठीं बाप्तिस्मा घेण्याचें अगत्य नव्हतें. परंतु यावेळेस तो आपलें मोठें काम चालू करणार होता, ह्मणून त्याने आपली वाट सिद्ध करणाऱ्यापासून बाप्तिस्मा घेऊन त्यासीं संबंध दाखवावा आणि आमच्या बद्दल धर्मनीति पूर्ण करावी हें योग्य होतें. त्याने आपल्या लोकांकरितां कित्ता घालून ठेविला आहे. (पेत्रसाचें पहिलें पत्र २:२१.)

१६ आणि येशू बाप्तिस्मा घेतल्यावर पाण्यांतून तेव्हांच वर
आला; आणि पाहा, त्याच्यासाठीं आकाश उघडलें, आणि त्यानें
देवाच्या आत्म्याला (१) खबुत्रासारिखें उतरतां, आणि आपल्यावर
येतां पाहिलें.
१७ आणि पाहा, आकाशांतून असी वाणी झाली कीं हा माझा
प्रिय पुत्र (२) आहे; याविषयीं मी फार संतुष्ट आहें.

---

(१) यशा. ११:२. ४२:१. ६१:१. योहा. ३:३४.
(२) गीत २:७. लूका ९:३५. एफे. १:६. २ पेत्र. १:१७.

---

१६ "आकाश उघडलें." स्तेफानसाच्या मरणसमयींहि असेंच उघडलें. (प्रे. ७:५६.) हाच मशीहा आहे, असें प्रमाण योहान्नाला पटवून देण्यासाठीं हा चमत्कार झाला. (योहा. १:३३.) "खबुत्रासारिखा." खबुत्र हें पवित्रता व निर्दोषीपण यांचें चिन्ह असें मानिलें आहे. तारणाऱ्याची पवित्रता, नम्रता, आणि कनवाळूपण दाखविण्यासाठीं आत्म्यानें हें रूप धारण केलें असें दिसतें.

१७ "आकाशांतून असी वाणी झाली." ही वाणी जे जवळ होते त्यांनीं ऐकिली असेल. जेव्हां ख्रिस्ताचें रूप डोंगरावर पालटलें तेव्हां हीच वाणी फिरून ऐकू आली. (मात्थी १७:५. लूका ९:३५,३६. २ पेत्र. १:१७.) ख्रिस्ताच्या मरणापूर्वीं एका वेळेस ही वाणी ऐकू आली, आणि गडगडाट झाला, असें कितीएकांस वाटलें. (योहा. १२:२८-३०.) ईश्वरानें या वाणीकडून, हा मशीहा आहे, असी साक्ष दिल्ही.

"हा माझा प्रिय पुत्र आहे." ईश्वरानें स्वतः हें नाम ख्रिस्ताला दिल्हें. या नांवावरून ख्रिस्ताचा देवासीं जवळचा संबंध आणि देवाची त्याजवर अतिशय प्रीति दिसून येती. (इब्री १:१.) तो देवासमान आहे, असेंहि या नांवावरून दाखविलें जातें. (इब्री १:५-८. योहा. १०:२९-३३. १९:७.) ख्रिस्त हा ईश्वराला प्रिय आहे, ह्मणून त्याला पुत्र असें ह्मटलें. ख्रिस्त बाप्तिस्मा घेतेवेळेस जें घडलें त्यावरून देवपणांत तिघे आहेत असें दाखविलें गेलें. ह्मणजे येशू ख्रिस्त यानें बाप्तिस्मा घेतला, पवित्र आत्मा त्यावर उतरला, आणि देव जो बाप त्याची वाणी ऐकू आली.

## अध्याय ४.

१ नंतर सैतानाकडून त्याची परीक्षा व्हावी, (१) ह्मणून येशूला आत्म्याने (२) रानांत नेलें.

२ आणि तो चाळीस दिवस व चाळीस रात्री उपासी राहिल्यावर त्याला भूक लागली.

३ आणि परीक्षक त्याजपासीं येऊन बोलला, तूं देवाचा पुत्र असलास तर या धोंड्याच्या भाकरी व्हाव्या ह्मणून सांग.

४ तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, असें लिहिलें आहे, (३) मनुष्य

---

(१) मार्क. १:१२. लुका ४:१. (२) १ राज. १८:१२. यहे. ११:१,२४. प्रेषि. ८:३९.
(३) अनु. ८:३.

---

१ "सैतानाकडून." सैतान या शब्दाचा मूलार्थ वैरी असा आहे. दुष्ट दूतांतील जो मुख्य त्याला शास्त्रांत वारंवार हें नाम दिल्हें आहे, कारण तो माणसांचा मोठा वैरी आहे. (इयोब १:६–१२. मात्थी १२:२६.) त्याला बाबलसहि ह्मणजे दोष लावणारा असें ह्मटलें आहे. बालजबूल, मात्थी १२:२४. जुना साप, आणि मोठा अजगर, प्रग. १२:९. अंतरिक्षांतील सत्तेचा अधिकारी, एफे. २:२. असेंहि त्याला ह्मटलें आहे. "आत्म्याने." लुका ४:१. या ओवीमध्यें येशू पवित्र आत्म्याने पूर्ण आहे असें ह्मटलें आहे. यावरून तो पवित्र आत्म्याकडून रानांत नेला गेला असें समजावें.

२ "उपासी राहिल्यावर." त्याने कांहीं खालें नाहीं. (लुका ४:२.) दुसऱ्या कित्येकांनी ४० दिवस उपवास केले आहेत. (निर्ग. ३४: २८. १राजक. १९:८.) देवाने निःसंशय चमत्कार करून त्यांस वांचविलें.

३ "परीक्षक." सैतानाने फार चातुर्याने ख्रीस्ताची परीक्षा पाहिली. त्याच्या देवपणाविषयीं त्याने प्रमाण मागितलें. यापेक्षां दुसरी युक्ति कांहीं चालण्याजोगी नव्हती. हा माझा प्रिय पुत्र आहे, असी वाणी ऐकूं आली होती; आणि मग परीक्षक ह्मणाला कीं याविषयीं पकें प्रमाण पटवा. यासाठीं चमत्कार करण्यास कां योग्य नव्हतें? तो रानांत एकटा, गरजवंत, भुकेला, असा पडला असतांहि देवाचा पुत्र होता, तर आपल्या गरजा पुरविण्यासाठीं आणि आपल्या देवपणाविषयींचें प्रमाण पटविण्यासाठीं चमत्कार करायास काय हरकत होती? जर करितो तर सैतानाला मान्य होतो, हें प्रभूला टाऊक होतें, ह्मणून तो मान्य होईना.

४ "मनुष्य केवळ भाकरीने वांचेल असें नाहीं." हें वाक्य

केवळ भाकरीनें वांचेल असें नाहीं, तर जें कांहीं वचन देवाच्या तों-
डांतून निघेल तेणेंकरून वांचेल.

५ मग सैतानानें त्याला पवित्र (१) नगरांत नेलें, आणि देवळा-
च्या कंगोऱ्यावर त्याला उभें केलें.

६ आणि त्याला ह्मटलें, तूं देवाचा पुत्र असलास तर खालीं उडी
टाक, कां कीं असें लिहिलें आहे कीं, (२) तो तुजविषयीं आपल्या

(१) नेहेम्या ११:१. मात्थी २६:५३. (२) गीत ९१:११,१२.

अनु. ८:३. यांत अढळतें. मोशे माझ्याविषयीं बोलून, जीव वांचविण्या-
साठीं भाकरीशिवाय दुसरे पदार्थ आहेत, असें दाखवीत होता. ख्रीस्ताच्या
उत्तरांतील सारांश हा होता कीं तुला मान्य होऊन चमत्कार करावा, एवढें
मला भाकरीचें अगत्य नाहीं. जीव वांचविण्यास ईश्वराला अनेक उपाय
आहेत, तर त्याजवर भरवसा ठेवून त्याच्या आज्ञा पाळणें भाग आहे.

**सूचना** (१)–सैतान आमची गरज पाहून आह्मास वारंवार फाशांत पा-
डावयास पाहतो. गरजवंत, भुकेलेले इत्यादिकांस तो कुरकूर करण्याचे व
चोरी करण्याचे मोह घालितो.

(२)–देवाकडून विशेष आशीर्वाद मिळतांच तो मोहांत पाडावयास
अधिक झटतो.

(३)– त्याचे पापमोह पसंत होण्यासारिखे आहेत. तो देवाच्या गौरवाचें
मिस दाखवितो.

(४)– आह्मी शास्त्रलेख काढून ख्रीस्तासारिखे सैतानाचे पापमोह टा-
ळावे. शास्त्र हें आमच्या आचरणास नेम असें आहे.

५ "पवित्र नगरांत." यरूशलेमांत देऊळ होतें आणि तें भजनाचें मुख्य
स्थान होतें ह्मणून त्याला पवित्र नगर ह्मणत असत. "देवळाच्या कंगो-
ऱ्यावर." हा कंगोरा छावणीचा नसेल असें वाटतें. कारण योसेफस ह्मणून
बखर लिहिणारा हा असें ह्मणतो कीं, छावणी सोनेरी आऱ्यांकडून भरली
होती. हा शलमोनाच्या देवडीचा कंगोरा असेल. देवळासभोंवतीं देवड्या
होत्या. त्यांची रुंदी ५५ फूट आणि उंची ७२ फूट होती. पण दक्षिण
बाजूच्या देवडीची रुंदी ६७ फूट, लांबी १५० फूट होती. त्या देवडीचा
पाया खोऱ्यांत होता आणि त्या पायाच्या तळापासून देवडीची उंची ७००
फूट होती. योसेफस ह्मणतो कीं, त्या देवडीवरून भोंड आल्यावांचून को-
णाच्यानें खालीं पाहवत नसे. ह्या देवडीवर ख्रीस्त होता असें दिसतें.

६, ७ "असें लिहिलें आहे कीं इ०" (गीत ९१:११,१२.) सैतानानें

दुतांस आज्ञा करील, आणि तुझा पाय धोंड्यावर कधीं अपटूं नये
ह्मणून ते तुला हातानी धरतील.
७ येशूने त्याला ह्मटलें, अणखी लिहिलें आहे कीं, प्रभु जो तुझा
देव त्याची प्रचीति पाहूं नको. (१)
८ फिरून सैतानाने त्याला फार उंच डोंगरावर नेलें, आणि जगां-
तील सर्व राज्यें व त्यांचें वैभव हीं त्याला दाखविलीं.
९ मग त्याला ह्मटलें, जर पायां पडून मला भजसील, तर हें सर्व
तुला देईन.

---

(१) अनु. ६:१६.

---

खीस्ताच्या देवपणाविषयीं अणखी प्रमाण मागितलें, आणि त्याने निर्भयपणें आपणाला खालीं टाकावें ह्मणून हा शास्त्रलेख त्याला सांगितला. पण जेणें-कडून असें करणें मना केलें आहे, असा शास्त्रलेख काढून खीस्ताने त्याला उत्तर दिल्हें, "प्रभु जो तुझा देव त्याची प्रचीति पाहूं नको." (अनु. ६:१६.) ह्मणजे देवाच्या आज्ञेवांचून जीव धोक्यांत घालूं नये आणि यासाठीं त्याचें साह्य मागूं नये. असें करणें, हें त्याचें वचन अनाठायीं लावणें असें आहे. जेव्हां देवाचे भक्त त्याच्या आज्ञेवरून धोक्यांत जातात तेव्हां तो त्यांचें साह्य करितो; परंतु त्याच्या आज्ञेवांचून गेले असतां, त्याचें साह्य मागूंच नये.

८ "फार उंच डोंगरावर." नेबो नामक डोंगरावरून बहुतकरून सर्व पालस्तीन देश दृष्टीं पडतो, आणि दुसरेहि उंच डोंगर त्या देशांत आहेत, असें वाटसरू सांगतात. "त्यांचें वैभव." ह्मणजे त्या सुंदर देशांतील गांव, शहरें, डोंगर, द्रव्य, शोभा, इत्यादि.

९ "हें सर्व." सैतानाने त्या राज्यांवर आपली सत्ता आहे, असें दाख-विलें, आणि हें दाखविणें कांहीं प्रकारें खरें होतें. कारण कीं, तीं राष्ट्रें दुष्ट झालीं होतीं. तथापि त्याची सत्ता खरी नव्हती. वास्तविक पाहिलें अ-सतां, तीं खीस्ताचीं होतीं. ह्मणून सैतानाने तीं देऊं करावीं हें योग्य नव्हतें. खीस्ताला फसविण्यासाठीं ही त्याची युक्ति चालली नाहीं. पण याच युक्तीनें त्याने बहुतेकांस फसविलें आहे. हजारों पापी लोक थोडेसें द्रव्य मिळविण्यासाठीं त्याचे दास होऊन सर्वकाळचा नाश पावले आहेत. माणसानी त्याला भजावें असें सैतानाला फार आवड आहे आणि त्याचे भजकहि पुष्कळ आहेत. जे मूर्त्तिपूजा करितात ते ईश्वराचें नव्हे पण सै-तानाचें भजन करितात. (अनु. ३९:१७)

१० तेव्हां येशू त्याला ह्मणाला, अरे सैताना, दूर हो, कां कीं प्रभु तुझा देव त्याचें भजन कर, आणि त्याचीच सेवा कर, (१) असें लिहिलें आहे.

११ मग सैतान त्याला सोडून गेला; तेव्हां पाहा, दूत येऊन त्याची सेवा करूं लागले. (२)

१२ नंतर योहान्न पराधीन झाला हें ऐकून येशू गालीलांत गेला.

---

(१)अनु. ६:१३. १ शमु. ७:३. (२) इब्री. १:६, १४.

---

१० "दूर हो." सैतान अधिक दुर्भाषण करूं लागला, ह्मणून त्याला ख्रीस्तानें निक्षून निषेधिलें, अणखीं शास्त्रलेख काढून त्याची परीक्षा टाळिली. ( अनु. ६:१३. ) एथें केवळ परमेश्वराचें भजन करावें, असी आज्ञा आहे. सैतानानें या आज्ञेचा भंग करावयास सांगितलें; ह्मणून ख्रीस्तानें त्याला आपणापासून घालवून दिल्हें. याप्रमाणें सर्व लोक सैतानाविरुद्ध उभे राहिले तर किती बरें? पण अरेरे, किती लोक त्याच्या स्वाधीन होतात? जीवंत देवाच्या भजनाबद्दल सैतानाचें भजन करणारे असे किती आहेत ?

११ "सैतान त्याला सोडून गेला." सैतानानें त्याला कांहीं वेळ सोडिलें. ( लूका. ४:१३. ) फिरून येऊन ख्रीस्ताला परीक्षेंत घालावें, असें त्याच्या मनांत होतें. "दूत येऊन" इ०. दिव्य दुतांनीं येऊन त्याच्या गरजा पुरविल्या आणि त्याचें समाधान केलें.

**सूचना**—परीक्षा लागणार नाहीं, असा पवित्र कोणी नाहीं. देवाचा पुत्र जो परम पवित्र होता त्याची देखील परीक्षा सैतानानें घेतली. २—जेव्हां ईश्वर आमची परीक्षा होऊं देतो, तेव्हां आह्मी जर त्याचें साह्य मागतों तर तो तिच्याहून पार पडण्याची शक्ति आह्मास देईल. ( कोरिं. १०:१३. ) ३—या गोष्टीवरून परीक्षकाचा धूर्तपणा दिसून येतो. तो अझूनहि धार्मिकपणाचें सोंग धरितो आणि शास्त्रवाक्य काढून अनाठायीं लावितो. ४—त्याची परीक्षा चुकविण्यासाठीं आत्म्याची तरवार असी जी देवाची गोष्ट, ती सर्वांहून चागला उपाय आहे. (एफ. ६:१७. )

१२ "योहान्न पराधीन झाला." योहान्नाला बंदिशाळेंत घालण्याविषयीं मार्थी. १४:१–१३ पाहा. "येशू गालीलांत गेला." (मार्थी. २:२२ ) योहान्नानें त्या प्रांतांत उपदेश केला होता आणि त्याकडे लोकांचें लक्ष लागलें होतें, आणि त्यांस सुधारावें ह्मणून येशू त्या प्रांतांत गेला. अणखी जर यरूशलेमांत अथवा जवळच्या प्रांतांत राहिला असता, तर शास्त्री, परोशी

१३ आणि नाजारेथ सोडून जबुलून व नाफताली यांच्या सीमांत
समुद्राजवळच्या कपरणाहूमांत जाऊन राहिला.
१४ यशाया भविष्यवाद्याने जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें ह्मणून;
तें असें कीं, (१)
१५ विदेश्यांचा गालील देश ह्मणजे यार्देनेच्या पलिकडे समुद्रा-
कडील जबुलून प्रांत व नाफताली प्रांत;
१६ यांतले जे लोक अंधारांत बसले होते (२) त्यांनीं मोठा उजेड
पाहिला, आणि मरणाच्या प्रदेशांत आणि छायेंत जे बसले होते त्यांवर
उजेड उगवला आहे.

---

(१) यशा. ९:१,२. (२) यशा. ४२:६,७. लुका. २:३२.

---

आणि याजक, हे त्याजवर टपून राहिले असते, ह्मणून गालीलांत जाऊन आपलें काम चालवावें हें बरें वाटलें.

१३ "कपरणाहूमांत." हें नगर तिबेरयस समुद्राच्या पश्चिम कांठीं वसलें. तें कांहीं नामांकित असून गालीलांतील राजधानी होतें. जीं तीन वर्षें येशू ख्रीस्त उपदेश करीत गेला त्यांतील बहुत काळ त्याने या नगरांत व याच्या आसपास घालविला. यावरून त्याला ख्रीस्ताचें नगर असें ह्मणत असत. (मात्थी. ९:१.) या नगरांत त्यानें दरबाऱ्याच्या पुत्राला निरोगी केलें, (योहा. ४:४६–५३) पेत्रसाच्या सासूलाहि ( मात्थी, ८:१४, १५ ) शतपतीच्या चाकराला, (मात्थी. ८:५–१३.) आणि अधिकाऱ्याच्या कन्येला ( मात्थी. ९:२३–२५ ) निरोगी केलें.

१४–१६ "तें असें कीं." (यशाया. ९:१,२.) मात्थीने केवळ सारांश घेतला. "विदेश्यांचा गालील देश." वरील आणि खालील असे दोन विभाग गालीलाचे केले होते. वरील विभागास विदेश्यांचा गालील ह्मणत असत, कारण कीं, त्यांत पुष्कळ विदेशी लोक राहत होते. यहूद्यांशिवाय दुसऱ्या सर्व लोकांस विदेशी ह्मणत असत. "जबुलून प्रांत व नाफताली प्रांत." इस्राएल लोकांचीं हीं दोन कुळें खनान देशाच्या या भागांत वस्ती करून राहिलीं. ( उत्प.४९:१३. यहो. १९:३२ ) "जे लोक अंधारांत बसले होते." अंधार हा अज्ञानाची उपमा आहे. अंधारांत वाट दिसत नाहीं. त्याप्रमाणें जे खऱ्या देवाला आणि तारणोपायाला जाणत नाहींत, ते अंधारांत आहेत असें ह्मणावें. जो बोध या अंधकाराला घालवितो त्याला उजेड ह्मणावें, हें योग्य आहे (योहा. ३:१९. १पेत्र. २:९.

१७ तेव्हांपासून येशू उपदेश करीत बोलूं लागला कीं, पश्चात्ताप करा, कां कीं आकाशाचें राज्य जवळ आलें आहे. (१)

१८ नंतर येशू गालीलाच्या समुद्राजवळ चालत असतां, त्यानें दोघे भाऊ, पेत्रस ह्मटलेला शीमोन (२) आणि त्याचा भाऊ आंद्रयास यांस समुद्रांत जाळें टाकितां पाहिलें, कारण कीं ते मासे धरणारे होते.

१९ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, माझ्या मागें या ह्मणजे मी तुह्मास माणसें धरणारे करीन. (३)

२० मग लागलेच जाळीं सोडून (४) देऊन त्याच्या मागें चालले.

---

(१)मात्थी. ३:२. १०:७. (३) लुका. ५:१०. १करिं. ९:२०–२२. २ करिं. १२:१६.
(२) योहा. १:४२. (४) मार्क. १०:२८–३१.

---

१ योहा. १:९.) कधीं कधीं पापाला अंधकाराची उपमा दिल्ही आहे. (१ थेस्स. ५:९. एफ. ५:११. लुका. २२:५३.) "मरणाच्या प्रदेशांत आणि छायेंत." ह्मणजे जेथें मरण व पाप हीं राज्य करितात, अस्या अंधक, उदासीन, व भयंकर प्रदेशांत. (इयोब. १०:२१. १६:१६. ३४:२२. गीत. २३:४. इर्म. २:६.) गालीलांतील लोकांस तें वाक्य लावावें हें योग्य होतें, कारण कीं ते फार आडाणी व दुष्ट होते. पण येशू ख्रीस्त अस्या लोकांला तारायास आला. बहुत राष्ट्रें आजपर्यंत पाप व मृत्युछाया यांच्या आधीन राहत आहेत. त्यांनीं ख्रीस्त, हाच उजेड, हाच खरा तारणारा, असें मानून त्याला आनंदानें अंगीकारावें.

१७. मात्थी. ३:२. यावरील टीका पाहा.

१८. "गालीलाच्या समुद्राजवळ." या समुद्राला तिबेरयसाचा समुद्र, गन्नेसारेत सरोवर, आणि किन्नरोत समुद्र, असें ह्मणत असत. त्याची लांबी सुमारें ७ कोस आणि रुंदी ३–५ कोस आहे. त्याच्या कांठचे प्रदेश अतिशय सुंदर आहेत असें योसेफसानें वर्णन केलें आहे. एथें ख्रीस्तानें आपले पहिले शिष्य पेत्रस व आंद्रयास यांला बोलाविलें.

१९ "माणसें धरणारे." ह्मणजे उपदेशक किंवा सुवार्तिक. लोकांला ख्रीस्ताकडे वळवावें, हें त्यांचें काम आहे.

२० "लागलेच." तेव्हांच. जेव्हां प्रभु येशू ख्रीस्त बोलावितो तेव्हां याप्रमाणेंच सर्वांनीं ऐकावें. "जाळीं सोडून." हीं जाळीं उदर निर्वाहाचीं साधनें होतीं आणि एवढीच काय ती मालमत्ता त्यांजपासीं होती. तथापि ते

२१ आणि त्याने तेथून पुढें जाऊन दुसरे दोघे भाऊ (१) जब-दीचा पुत्र याकोब व त्याचा भाऊ योहान्न यांस यांचा बाप जबदी याच्या बरोबर तारवांत आपलीं जाळीं नीट करितांना पाहिलें, आणि त्यांस बोलाविलें.

२२ मग ते लागलेच तारूं व आपला बाप यांस सोडून त्यांच्या मागें चालले.

---

(१) मार्क. १०:१९, २०)

---

ख्रीस्ताकरितां पाठलाग आणि मरण सोसायास सिद्ध झाले. ते लोक तारण प्राप्त होईल असा मार्ग सांगूं लागले, आणि जगाच्या समाप्तिपर्यंत टिकेल असी मंडळी त्यांनी स्थापली. पुढें आयुष्यांत काय प्राप्त होणार हें त्यांस माहीत नव्हतें. त्याप्रमाणेंच आतांहि जेव्हां आह्मी ख्रीस्ताला अंगीकारितों तेव्हां केवढें दुःख व संकटें प्राप्त होतील हें आह्मास माहीत नाहीं. तथापि सन्मान किंवा अपमान, रोग किंवा आरोग्यता, मरणें किंवा वांचणें इत्यादि कांहींहि येवो, आह्मी आपलें अवघें ख्रीस्ताला सोपून त्याच्या मागें आनंदाने चालावें. "त्याच्या मागें चालले." त्याचे शिष्य होऊन त्याला अनुसरले.

२१, २२ "आपला बाप यांस सोडून." पाहिजे तर, आह्मी आपल्या आईबापांस व सर्व नातलगांसहि सोडावें. (लुका. १४:२६.) जर ते आह्मा-बरोबर येऊन ख्रीस्ताला अंगीकारतील, तर फार बरें आहे. नाहीं तर त्यां-करितां आह्मी राहूंच नये. आह्माला ख्रीस्ताच्या मागें चाललें पाहिजे, आणि त्यांनीहि आह्माबरोबर यावें ह्मणून त्यांस प्रीतीने व ममतेने बोध करावा. परंतु कोणतेंहि दुःख लागलें तरी चिंता नाहीं, तें सोसून देवाला मानावें आ-णि आपलें कारण साधून घ्यावें.

**सूचना**—लोकांस आपल्याकडे वळविण्यासाठीं ईश्वर किती गरीब व नीच मनुष्याचें साह्य घेतो. जगाला सुधारावें, या कामांत त्याने धीवरांस निवडून पाठविलें. ज्ञान्यास लाजविण्यासाठीं तो जगांतील मूर्खांस निवडून घेतो. देव अस्या गरीब माणसांच्या योगेंकडून लोकांचें तारण करितो, याव-रून हा ख्रिस्ती धर्म देवापासून आहे असें प्रमाण पडतें. त्यांच्या वचनाक-डून माणसाचें मन वळतें असें नव्हे, पण ईश्वराच्या शक्तीकडून वळतें असें उघड दिसतें.

२३ तेव्हां येशू संपूर्ण गालीलांत त्याच्या सभास्थानांमध्यें उपदेश करीत, (१) आणि राज्याचें शुभवर्त्तमान (२) गाजवीत, आणि लोकांतले सर्व रोग व सर्व दुखणीं (३) बरीं करीत फिरला.

२४ त्यावर त्याची कीर्ति संपूर्ण सुऱ्या देशांत पसरली; तेव्हां जे दुखणेकरी होते, आणि ज्यांस नाना रोग व वेदना लागल्या होत्या आणि जे भूतग्रस्त व फेंपरेकरी व वातरोगी होते, त्या सर्वांस त्यांनी त्याजवळ आणिलें तेव्हां त्यानें त्यांस बरें केलें.

---

(१) मात्थी. ९:३५. लुका. ४:१५,४४. (३) गीत. १०३:३. मात्थी. ८:१६,१७.
(२) मात्थी. २४:१४. मार्क. १:१४.

---

२३ "संपूर्ण गालिलांत." मात्थी. २:२२. यावरील टीका पाहा. "सभास्थानांमध्यें." भजनस्थानें. असीं चारशें ऐशीं भजनस्थानें यरूशलेमांतच होतीं. "राज्याचें शुभवर्त्तमान." राज्याविषयीं जें चांगलें वर्त्तमान तें. ह्मणजे मशीहाचें येणें व त्याचें राज्य यांविषयींचें वर्तमान.

२४ "त्याची कीर्ति संपूर्ण सुऱ्या देशांत पसरली." त्याच्या चमत्कार करण्याच्या शक्तीवरून त्याचें नाम सर्वांस कळलें आणि लोकांनी बहुत रोग्यांस त्याजकडे आणिलें, यांत कांहीं आश्चर्य नाहीं. "भूतग्रस्त." भूतें माणसांस लागून त्यांच्या मनाची शक्ति आपल्या स्वाधीन करून घेत असत, आणि त्यांस वेड व फेंपें इत्यादि रोग लावीत असत. ख्रीस्तानें त्यांस निषेधिलें आणि स्वस्थ बसण्याची आणि त्यांतून निघण्याची आज्ञा त्यांस दिल्ही. तींहि बोलत, ख्रीस्ताला ओळखीत आणि त्या माणसांतून निघून जात असत. ख्रीस्त, हा सैतानाचें काम नाहींसें करण्यासाठीं आला, आणि असे चमत्कार करण्याकडून त्यानें सैतानावरील आपला अधिकार दाखविला. "फेंपरेकरी." हा कठीण रोग होता. (मार्क. ९:१८-२२. लुका. ९:३९,४०) "वातरोगी." या रोगाचे प्रकार अनेक आहेत. १ अवष्टंभ. हा सर्वांग व्यापितो. २. अर्धांगवात. हा अर्धे अंग व्यापितो. ३ कबंधवात. हा संपूर्ण धड व्यापितो. ४ शरीर विश्रंश. हा रोग भारी कठीण आहे. येणेंकडून शरीरांतील स्नायु अखुडतात. जेव्हां हा रोग लागतो तेव्हां हात लांब केला असतां तो अखडतां येत नाहीं आणि अखडला असतां लांब करितां येत नाहीं, ह्मणून अस्या हाताला वाळलेला हात ह्मणतात. (मात्थी. १२:१०-१३.) ५. पेडग्यावात. हा रोग शतपतीच्या चाकराला लागला होता, असें दिसतें. (मात्थी. ८:६. लुका. ७:२.) या रोगाकडून मरण लवकर येतें. "त्यानें त्यांस बरें केलें."

२५ मग गालील व दकापलीस व यरूशालेम व यहूदा व यार्देने-
च्या पलिकडचा प्रदेश, यांतून मोठे समुदाय (१) त्याच्या मागें
चालले.

## अध्याय ५.

१ तेव्हां त्या समुदायांस पाहून तो डोंगरावर गेला, आणि तो
बसल्यावर त्याचे शिष्य त्याच्या जवळ आले.
२ तेव्हां तो आपलें तोंड उघडून त्यांस उपदेश करूं लागला
कीं; (२)
३ जे आत्म्याने दीन (३) ते धन्य, कारण कीं आकाशाचें राज्य
त्यांचें आहे.

---

(१) लुका. ६:१७,१९. (२) लुका. ६:२०. (३) यशा. ५७:१५. ६६:२. याको. २:५.

---

चमत्कार करण्याने बरें केलें, हें उघड आहे. असा चमत्कार केवळ ईश्वर करूं शकतो. हे रोग अपरिहार्य होते. जेव्हां ख्रीस्ताने शब्देंकडून हे रोग बरे केले तेव्हां, हा ख्रीस्त देवापासून आलेला आणि हा ख्रिस्ती धर्म खरा आहे, असें प्रमाण पटलें.

२५ "दकापलीस." हा देश मनास्से कुळाच्या अमलांत होता. दकापलीस या शब्दाचा अर्थ दाहा शहरें असा ग्रीक भाषेंत आहे.

**सूचना**— ख्रीस्ताने केलेले चमत्कार पाहा. ते दयेचीं कामें असे होते. सूड उगविण्यासाठीं रोग लावणें, कुचेष्टा करणें, आणि व्यर्थ पराक्रम दाखविणें, असे नव्हते. माणसाच्या उद्धारासाठीं ख्रीस्ताने जीं कामें आणि जे चमत्कार केले त्यांत अनंत प्रीतीच दिसून येती.

१, २ "तो डोंगरावर गेला." लोकांनी आपलें बोलणें सहज ऐकावें ह्मणून. एथें जो उपदेश लिहून ठेविला आहे त्याला डोंगरावरील उपदेश ह्मणतात. यांतील सारांश लुकाच्या साहाव्या अध्यायांत लिहिला आहे. ख्रीस्ताने अनेक प्रसंगीं अनेक लोकांस याप्रमाणें उपदेश केला असेल.

३ "आत्म्याने दीन." आह्मी गरीब व पापी आहों असें नम्र लोक मानून देवाच्या कृपेने तरायास पाहतात. देवाच्या इच्छेने राहावें, अथवा जावें, किंवा मरावें यास ते तयार आहेत. आत्म्याने दीन असणें हें गर्व, अभिमान, ईर्षा, या सर्वांसीं विरुद्ध आहे. जे आत्म्याने दीन असतात त्यांस

४ जे शोक करितात (१) ते धन्य; कारण कीं ते शांतवन पावतील. (२)

५ जे नम्र ते धन्य; कारण कीं ते पृथ्वीचें वतन भोगतील. (३)

---

(१) यशा. ६१:३. यहे. ७:१६. (३) गीत. ३७:११.
(२) योहा. १६:२०. २करिं. १:७.

---

आशीर्वाद द्यावा हें ईश्वराला आवडतें, आणि त्यांस तो आपल्या जवळ घेईल. "आकाशाचें राज्य त्यांचें आहे." जे आत्म्याने दीन असतात ते इहलोकीं ख्रीस्तावर दुसऱ्यापेक्षां लवकर विश्वास ठेवून त्याला अनुसरतात, आणि परलोकीं त्यांस आकाशांतील वतन ह्मणजे सर्वकालीक जीवन प्राप्त होईल.

४ "जे शोक करितात इ." आपल्या पापामुळें शोक करितात, ह्मणजे आह्मी पाप करून देवाला रागाविलें असें मानून जे पश्चात्ताप करितात आणि आपल्या पापामुळें रडतात, ते शांतवन पावतील. आपले मेलेले मित्र यांसाठीं जे शोक करितात, त्यानीं शुभवर्त्तमानावरून शांतवन पावावें. कृपाळू ईश्वर, प्रिय तारणारा, आणि आकाशांतील सुखाच्या आशेवरून आनंद, यांकडून दुःखितांचें शांतवन होतें. पण जे पापामुळें रडतात त्यांविषयीं ख्रीस्त एथें बोलला असेल. "देवासंबंधी खेद जीवन परंतु जगसंबंधी खेद मरण घडवितो." जे कष्टी आणि ओझ्याने लादलेले (मात्थी. ११:२८-३०) त्यानीं ख्रीस्ताकडून शांति व समाधान पावावें. आकाशलोकांत सर्व आसवें पुसून टाकलीं जातील, मग शोक व रडणें अणखी होणारच नाहीं. (प्र. २१:४.)

५ "जे नम्र." नम्रता, हा गुण, राग, अकस, सूड उगविणें यांविरुद्ध आहे. जे नम्र ते अन्यायाचें सहन करितात. ख्रीस्त हा नम्रतेचा नमुनाच होता. (मात्थी. ११:२९.) तसा पौलसाहि. त्यापेक्षां दुसऱ्या कोणी माणसाने अधिक नम्रतेने अन्याय सोसला असें दिसत नाहीं. नम्रतेचें फळ शांति असें आहे. हें खऱ्या माहात्म्याचें लक्षण आहे. "ते पृथ्वीचें वतन भोगतील." खनान देशाचें वतन पावावें असा इस्राएल लोकांस आशीर्वाद दिल्हा होता; त्यांचे पूर्वज बहुत वर्षांपासून या वतनाची आशा धरीत आले. (उत्प. १५:७,८. निर्ग. ३२:१३.) हा विशेष आशीर्वाद आहे असें त्यानीं मानिलें, आणि तो देश मिळाला तेव्हां त्यांची आशा पूर्ण झाली. (अनु. १:३८. १६:२०.) यावरून विशेष आशीर्वाद सुचविण्यासाठीं "देशाचें वतन पावणें," असी ह्मण पडून गेली. ख्रीस्त या अर्थांत हें वाक्य बोलला. जे नम्र त्यांस पुष्कळ द्रव्य अथवा मोठमोठीं शेतें मिळतील, असें नव्हे, पण विशेष

६ ज्यांस न्यायीपणाची भूक व तान्ह लागली आहे ते धन्य; कारण कीं ते तृप्त होतील. (१)

७ जे दयाळू ते धन्य; कारण कीं ते दयापात्र होतील. (२)

---

(१) गीत १४५:१२. यशा. ६५:१३. (२) गीत ४१:१,२.

---

आशीर्वाद प्राप्त होईल, असा त्याच्या बोलण्याचा अर्थ होता. खनान देश हा आकाशलोकाची प्रतिमा असा होता. तर पृथ्वीचें वतन म्हणजे आकाश लोकाचें वतन असा अर्थ कधीं कधीं होतो, आणि हाच अर्थ या ठिकाणीं आहे. (प्रग. ११:१.) असें असताहि जे नम्र आहेत ते इहलोकींहि आशीर्वाद पावतात, म्हणजे त्यांचें संसारिक वगैरे काम चांगलें चालतें. जो गर्विष्ठ, रागीट, आणि भांडखोर असतो तो आपल्यास शत्रु उत्पन्न करून घेतो, आणि कज्जा करण्यांत पुष्कळ वेळ व्यर्थ खर्चितो. येणेंकडून त्याला पुष्कळ उपद्रव लागतात आणि त्याचे उपाय निष्फळ होतात. सुभक्ति ही सर्व गोष्टींविषयीं उपयोगी आहे. तिला इहलोकींचें व परलोकींचेंहि वचन आहे. (१ तिम. ४ :८, ६:३–६. १ करिं. ३:२१,२२. २ करिं. ६:१०.)

६ "भूक व तान्ह." या शब्दांकडून मोठी उत्कंठा दाखविली जाती. (गीत. ४२:१,२. यशा. ५५:१,२.) जे आपणास पापी आणि दंडपात्र असें मानून पवित्रतेची उत्कंठा धरितात ते तृप्त होतील. पवित्र होण्याची इच्छा तृप्त करावी हें ईश्वराला बरें वाटतें. पण असी इच्छा वास्तविक धरून ईश्वराचें साह्य मागितलें पाहिजे. पुण्य मिळविण्याविषयीं माणसानीं जे हजारों उपाय योजिले आहेत त्यांवरून केवळ माणसाचें अशक्तपण व मूर्खपण मात्र दिसून येतें. स्नान करणें, उपास करणें, यात्रेस जाणें, जप तप करणें, देह दंडन करणें, इत्यादि सर्व उपाय खोटया धर्मांत योजिले आहेत, पण हे केवळ देहास लागतात. यांकडून मन स्वच्छ होत नाहीं. पवित्रतेची इच्छा अंतःकरणापासून असली पाहिजे, आणि ही इच्छा केवळ ईश्वरच तृप्त करितो.

७ "जे दयाळू ते धन्य." ज्यांस दुसऱ्याची करुणा येती आणि जे त्यांचें दुःख निवारण करायास झटतात ते. दया करण्यांत ईश्वराला विशेष संतोष वाटतो. (निर्ग. ३४:६. यहे. ३३:११. १ तीम. २:४. २ पेत्र. ३:९.) पापी, दोषी, दंडपात्र, असे जे आह्मी, त्या आह्मावर ईश्वराने दया करून आपला पुत्र मरायास दिल्हा आहे. आमचें अंतःकरण पवित्र व नवें करायास तो पवित्र आत्मा पाठवितो. प्रतिघटकेस व प्रतिक्षणीं आह्मी त्याच्या दयेचे भागीदार आहों ह्मणून आह्मी दुसऱ्यावर दया करण्यास बांधले आहों.

८ जे अंतःकरणाने शुद्ध (१) ते धन्य; कारण कीं ते देवाला पाहतील.

९ जे समेट करणारे (२) ते धन्य; कारण कीं त्यांस देवाचे पुत्र ह्मणतील.

(१) गीत २४:३,४. इब्री १२:१४. १ योहा. ३:२,३. (२) गीत ३४:१४.

८ "जे अंतःकरणाने शुद्ध ते धन्य." ह्मणजे ज्यांचे हेतु, भावना व वासना शुद्ध आहेत ते. अंतःकरण शुद्ध असलें पाहिजे. यहूदी हे बाहेरील शुद्धतेचे भेद दाखवीत असत. बाहेरील स्नान करणें, बाहेर शुद्ध असणें, हात-पाय धुणें इत्यादि बाहेरील कर्मांतच त्यांचा काय तो धर्म होता. (मार्क. ७:३.) पण अंतःकरणाच्या शुद्धीसाठीं हे उपाय निष्फळ झाले. त्याप्रमाणेंच आताहि असें बाहेरील शुद्ध करणें निष्फळ आहे. त्याकडून अंग स्वच्छ होतें पण मन स्वच्छ होत नाहीं. ईश्वर अंतःकरणाकडे पाहतो. "देवाला पाहतील." सर्व लोक न्यायकाळीं देवाला पाहतील. (प्रग. १:७.) परंतु जे अंतःकरणांत शुद्ध आहेत त्यांस मात्र तो मित्र असा दिसेल. ईश्वराला शरीर नाहीं, तो आत्मा आहे, ह्मणून तो डोळ्यानीं दिसत नाहीं. तरी जे त्याचें मनन करितात त्यांस अंतःकरणाने व बुद्धीने त्याला पाहतां येतें. परंतु अशुद्ध अंतःकरण त्याला पाहूं शकत नाहीं. जो कोणी पवित्र देवाला पाहावयास इच्छितो तो पवित्र असला पाहिजे. जे अंतःकरणांत शुद्ध आहेत ते देवाला आवडते असून त्याच्या समक्ष राहतील. (२ करिं. ३:१८. १ यो. ३:२.)

९ "समेट करणारे." भांडण, कज्जा, लढाई त्यांचा प्रतिबंध करावयास जे झटतात, ते धन्य. हें खऱ्या ख्रिस्त्याचें लक्षण आहे. सर्व माणसें जन्मस्वभावेंकरून ईश्वराचीं आणि एकमेकांचीं वैरी आहेत. त्यांचा समेट करावा असा शुभवर्त्तमानांतील अभिप्राय आहे, ह्मणून त्याला शांतीचें शुभवर्त्तमान ह्मटलें आहे, आणि हें योग्य आहे. "देवाचे पुत्र." देव शांतीचा कर्त्ता आहे, (१ करिं. १४:३३.) आणि जे समेट करावयास पाहतात ते सर्व त्यासारिखे होतात, आणि ते देवाचे पुत्र ह्मटले जाण्यास योग्य आहेत. ईश्वर त्यांस अंगीकारतो आणि आपले पुत्र असें मानून त्यांजवर प्रीति करितो व आशीर्वाद देतो.

१० न्यायीपणामुळें (१) ज्यांच्या पाठीस लागतात ते धन्य; कारण कीं आकाशाचे राज्य त्यांचें आहे.

११ जेव्हां तुमची निंदा करितील आणि पाठीस लागतील आणि माझ्या करितां तुह्माविरुद्ध सर्व वाईट गोष्टी लबाडी करून बोलतील, तेव्हां तुह्मी धन्य आहां.

१२ आनंद व उल्हास करा, कारण कीं आकाशामध्यें तुह्माक-

---

(१) १ पेत्र. ३:१३,१४.

---

१० "पाठीस लागतात." ह्मणजे धर्मामुळें निंदा व जाचणूक करितात. जे लोक आपल्या मनःसाक्षीप्रमाणें ईश्वराची भक्ति खरेपणाने करायास झटतात, त्यांचा कोणी पाठलाग करावा हें मोठें आश्चर्य आहे. परंतु सत्यता व परमार्थ यांसीं अंतःकरणाचें इतकें वैर आहे कीं जे कोणी ख्रीस्त येशूकडे सुभक्तीने चालायास इच्छितात त्या सर्वांचे पाठलाग होतील. ख्रिस्ती धर्मांत सर्वप्रकारचें पाप निषेधिलें आहे, ह्मणून दुष्ट लोक त्याचा द्वेष आणि विरोध करितात.

"आकाशाचें राज्य त्यांचें आहे." आमचा पाठलाग ख्रीस्ताकरितां कोणीं केला तर यावरून असें चांगलें प्रमाण पटतें कीं आह्मी देवाचे पुत्र आहों आणि तो आह्मास आकाशलोकांत घेईल.

११ "तुमची निंदा करितील." तुह्मी ख्रिस्ती आहां ह्मणून. ख्रीस्तान निंदा सोसिली, आणि चाकर तर धन्यापेक्षां थोर नाहीं. जे ख्रीस्ताला अनुसरून त्याकरितां दुःख सोसितात ते धन्य. (फिलि. १:२९.) "सर्व वाईट गोष्टी लबाडी करून बोलतील." पाहा बरें, या गोष्टी खोटया असाव्या. जर आह्मी निंदेस योग्य नाहीं तर आह्मी सहनतेने सोसावें, आणि आह्मी निर्दोषी आहों असी साक्ष मन देत असतां किती सहन करितां येईल हें दाखवावें. (१ पेत्र. ३:१३–१८.) आह्मी खुनसी होऊं नये व दुसऱ्यास राग आणूं नये परंतु जेव्हां ख्रीस्ताकरितां आमची निंदा होती तेव्हां आह्मी नम्र, सहनशील, आणि लीन होऊन निंदकांस देखील आमचा धर्म खरा आहे असें प्रमाण पटवावें. याप्रमाणें ख्रिस्ती लोकांचें आचरण पाहून बहुत एकांची खातरी झाली आहे. असी नम्रता व सहनता ख्रिस्ती धर्माकडून झाली असें पाहून कित्येक पाठलाग करणाऱ्यानी देखील हाच धर्म अंगीकारला आहे. जे आपल्या धर्मामुळें मारले गेले त्यांचें रक्त याप्रमाणें "मंडळीचें बीज" असें झालें आहे.

१२ "आनंद व उल्हास करा." तुह्मी याप्रमाणें दुःख सोसिलें तर

रितां मोठें फळ ( १ ) आहे, कां तर तुमच्या पूर्वींचे जे भविष्यवादी, त्यांच्या पाठीस तसेच लागत असत.

१३ तुह्मी पृथ्वीचें मीठ ( २ ) आहां; परंतु मिठाचा खारटपणा गेला, तर त्याला खारटपणा कशानें येईल? तें बाहेर टाकून माणसानीं तुडवावें यावांचून पुढें कोणत्याहि कामास उपयोगी नाहीं.

१४ तुह्मी जगाचा उजेड आहां. ( ३ ) डोंगरावर वसलेलें नगर लपत नाहीं.

---

( १ ) १ करिं. ४:१७. ( २ ) मार्क. ९:५० ( ३ ) फिलि. २:१५.

---

आनंदाचें कारण आहे. तुमचें फळ फार आहे. आतां आकाशांतील वतनाचा हक्क व विसार आहे आणि तें लवकर प्राप्त होईल. जे धर्मामुळें मारले जातात त्यांस विशेष तेजस्वी मुगुट मिळेल असें कितीएकांला वाटलें आहे, ह्मणून प्राचीन ख्रिस्त्यानी असें मरण इच्छिलें. ख्रीस्ताकरितां मरण सोसिलें पाहिजे, असें पाहून त्यानी आनंद केला. आह्मी आपल्यावर पाठलाग आणूं नये. परंतु ज्यानी पाठलाग सोसला आहे त्यांच्या आनंदावरून प्रमाण पटतें कीं, जग देऊं शकत नाहीं, असें धैर्य व समाधान हा ख्रिस्ती धर्म अंतःकरणाला देत असतो. ख्रिस्ती लोकांला त्यांच्या धर्मामुळें जाळण्यासाठीं जो अग्नि पेटविला त्याकडून ख्रिस्ती धर्माचें खरेपण व सत्व दिसून आलें आहे. "भविष्यवादी." भविष्यवाद्यांच्या पाठलागाविषयींचें संक्षिप्त वर्णन, इब्री यांस पत्र याच्या ११ व्या अध्यायांत पाहा.

१३ "तुह्मी पृथ्वीचें मीठ आहां." मीठ हें पदार्थांस कुजण्यापासून राखितें. याप्रमाणें खरे ख्रिस्ती हेहि जगानें दुष्कर्माकडून अगदी नासले जाऊं नये ह्मणून त्यास राखितात. त्यांच्या प्रार्थनांकडून ईश्वराचा आशीर्वाद मिळतो आणि त्यांचें वजन व कित्ता यांकडून जग पातकानीं अगदी भरण्यापासून राखिलें जातें. ( उत्प. १८:२३–३२. ) "मिठाचा खारटपणा गेला." जर सत्व जातें तर तें अगदी निरुपयोगी आहे. त्याकडून पदार्थ चांगला राहत नाहीं पण उलटा बिघडतो. असीच खोट्या ख्रिस्त्यांची गोष्ट आहे. त्यांच्याठायीं कांहीं सद्गुण नाहींत. त्यांचा वाईट कित्ता व वजन यांकडून बिघडणूक मात्र होती.

१४ "जगाचा उजेड" उजेड ही उपमा कधीं कधीं धर्मोपदेशकांस देतात. ( मात्थी ४:१६. लुका २:३२. योह. १:४. ८:१२. यशा. ४९:६. ) विशेषेंकरून ख्रीस्ताला दिल्ही आहे. तो सूर्यासारिखा जगाचा उजेड आणि

१५ आणि दिवा लावून कोणी मापाखालीं ठेवीत नाहींत; तर समईवर ठेवितात, मग जे घरांत आहेत त्या सर्वांवर त्याचा प्रकाश पडतो.

१६ माणसांपुढें तुमचा उजेड असा प्रकाशो कीं, त्यांनी तुमचीं चांगलीं कामें पाहावीं, आणि तुमच्या आकाशांतील बापाचें गौरव करावें. (१)

(१) १ पेत्र. २:१२.

नीतिमत्त्वाचा सूर्य असा आहे. ख्रिस्ती लोकहि जगाचा उजेड आहेत. कारण कीं ते आपला बोध व कित्ता यांकडून जीवनाचा मार्ग दाखवितात. "डोंगरावर वसलेलें नगर." डोंगरावर वसलेलीं असीं बहुत नगरें यहूदी देशांत होतीं. ख्रीस्तानें कदाचित् त्यांतील एखाद्या नगराकडे बोट केलें असेल, आणि शिष्यांला सांगितलें कीं तुह्मी त्यासारिखे आहां. जसें तें लपत नाहीं त्याप्रमाणेंच तुमच्यानेंहि आपलें आचरण गुप्तांत लपवून ठेववत नाहीं. जग तुह्माकडे पाहत आहे. तर तुह्मी निर्दोषी व पवित्र व्हा, मग दुसरे तुह्माला पाहून अनुसरतील. ख्रिस्ती लोकांचें आचरण त्यांच्या उपदेशापेक्षां वारंवार सफळ होत असतें.

१५ "आणि दिवा लावून इ." दिवा लावून कोणी झांकीत नाहीं. तसेंच आपल्या धर्माविषयीं. तो मनांत किंवा गुप्तरूपें अंगीकारून झांकून ठेवावा हें योग्य नाहीं. आह्मी सर्वांसमक्ष ख्रीस्ताला अंगीकारावें आणि सदाचरण दाखवून खरा प्रकाश सर्व जगावर पाडावा.

१६ "तुमचा उजेड असा प्रकाशो कीं." आपली पवित्र वर्त्तणूक, शुद्ध संभाषण आणि चांगला बोध हीं सर्वत्र सर्वांस दिसावीं. सर्वदां, सर्व लोकांमध्यें, सर्व कामांत, घरीं दारीं, सुखांत आणि दुःखांत, आह्मी खरे ख्रिस्ती आहों असें दिसण्यांत यावें. आपली स्तुति व्हावी ह्मणून नव्हे पण लोकांचें कल्याण व देवाचें गौरव व्हावें ह्मणून आपलीं चांगलीं कर्मे दाखवावीं.

**सूचना** १— अंतःकरणांत सुभक्ति असली तर ती लपणार नाहीं. ती निश्चयें प्रगट होईलच. २— ख्रीस्तावरील आपला विश्वास आणि आशा गुप्त राखणें हें ख्रीस्ताला नाकारणें असें आहे. ३— जरी आह्माला गरीबीमुळें दान धर्म करितां येणार नाहीं तरी पवित्र आचरणेंकरून लोकांचें कल्याण करितां येईल. कोणी प्रमाणीक व नम्र ख्रिस्ती उगाच राहत नाहीं. उजेडाचें लहानसें किरण अंधारांत उपयोगी पडतें. लहान दिव्याचीं किरणें दूर प्रकाशतात. तसेंच सत्कर्महि या दुष्ट जगांत दूरपर्यंत प्रकाशतें.

१७ नेमशास्त्र (१) किंवा भविष्यशास्त्र (२) रद्द करायास मी आलों असें समजूं नका; मी रद्द करायास नाहीं, तर पूर्ण (३) करायास आलों आहें.

१८ कारण कीं मी तुह्मास खचीत सांगतों, आकाश व पृथ्वी टळून जाई तोंवर सर्व पूर्ण झाल्यावांचून नेमशास्त्रांतील एक काना किंवा एक फांटाहि (४) टळून जाणारच नाहीं.

१९ यास्तव त्या आज्ञांमध्यें ज्या सर्वांहून लहान त्यांतील एकहि जो कोणी मोडील आणि माणसांस तसें शिकवील, त्याला आकाशाच्या राज्यांत सर्वांहून लाहान ह्मणतील; परंतु जो कोणी पाळील आणि तसें शिकवील, त्याला आकाशाच्या राज्यांत मोठा ह्मणतील. (५)

---

(१) मात्थी. ३:१५. (२) यशा. ४२:३२. (३) गीत. ४०:६,८. (४) लुका. १६:१७. (५) १शमु. २:३०.

---

१७ "नेमशास्त्र इ." नुसतें नेमशास्त्र, ह्मणजे मोश्यानें लिहिलेलीं पांच पुस्तकें आणि भविष्यशास्त्र ह्मणजे भविष्यवाद्यानीं लिहिलेलीं पुस्तकें. पण एथें या दोन शब्दांकडून सगळा जुना करार समजावा. "पूर्ण करायास आलों आहें." मशीहाची छायारूप असे बहुत यज्ञविधि नेमशास्त्रांत सांगितले आहेत. (इब्री. ९:) ख्रीस्तानें आपला जीव अर्पून ते विधि पूर्ण केले. भविष्यशास्त्रांतहि मशीहाविषयीं बहुत भविष्य गोष्टी लिहिल्या होत्या, त्या सर्व त्यानें पूर्ण केल्या.

१८ "एक काना किंवा एक फांटाहि." ह्मणजे सर्वांहून सूक्ष्म गोष्ट देखील जाणार नाहीं. आकाश व पृथ्वी जायाचीं आहेत, परंतु देवाच्या नेमशास्त्रांतील एकहि गोष्ट रद्द व्हावयाची नाहीं. एथें नेमशास्त्र ह्मणजे नीतिसंबंधी शास्त्र असें समजावें. यहूदी लोकांच्या नेमशास्त्राचे नीति, क्रिया, आणि व्यवहार, असे तीन भाग होते. क्रिया आणि व्यवहार हे दोन भाग लोकांच्या अवस्थेबरोबर अवश्य बदलले पाहिजेत, परंतु नीति हा भाग देवाच्या गुणासारिखा कधीं बदलत नाहीं. दाहा आज्ञा या प्रकारच्या आहेत. ईश्वरावर आणि एकमेकांवर प्रीति करणें, हा अवश्य धर्म कधीं रद्द व्हावयाचा नाहीं. देवाचें नीतिशास्त्र सर्वकाळ पाळणें भाग आहे. जे मोडतात त्यांसाठीं जो दंड नेमला आहे तोहि सर्वकाळचा आहे.

१९ "सर्वांहून लहान त्यांतील." परोशी लोक देवाच्या आज्ञांमध्यें भेद करून त्यांतील कितीएक लहान आणि कितीएक भारी अश्या मोजीत असत.

२० कारण मी तुह्मास सांगतों कीं, शास्त्री व परोशी यांच्या न्यायीपणापेक्षां (१) तुमचें अधिक झाल्यावांचून तुह्मी आकाशाच्या राज्यांत जाणारच नाहीं.

२१ हत्या करूं नको, आणि जो कोणी हत्या करील तो न्याय-काळीं दंडास योग्य ठरेल, (२) असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें, हें तुह्मी ऐकिलें आहे.

---

(१) मात्थी. २३:२३--२८. फिलि. ३:९. (२) निर्ग. २०:१३. अनु. ५:१७.

---

जे लहान आज्ञा मोडीत त्यांचें पाप हलकें असें ते मानीत असत. (मात्थी. २३:२३) ख्रीस्त ह्मणतो कीं, देवाच्या सर्वच आज्ञा अगत्याच्या आहेत. देवाची कोणतीहि आज्ञा मोडली असतां दंड लागणार नाहीं, असें जो कोणी ह्मणतो तो सर्वांहून लहान असें आकाशाच्या राज्यांत मोजलें जाईल. ह्मणजे त्या राज्यांत त्याला कांहीं जागा मिळणार नाहीं, असा अर्थ समजला पाहिजे, हें विसाव्या ओवीवरून स्पष्ट दिसून येतें. परंतु जो सर्व आज्ञा पाळितो आणि तसें शिकवितो तो सर्वांहून थोर मानला जाईल. ईश्वर त्याला मान देईल.

**सूचना** १--ख्रिस्ती लोकांला देवाच्या संपूर्ण आज्ञा पाळणें भाग आहे. (याको. २:१०) २--देवाच्या सर्व आज्ञा प्रसिद्ध करून चालविल्या पाहिजेत. ३--देवाच्या कित्येक आज्ञा हलक्या आहेत असें जे ह्मणतात ते देवाच्या राज्यास योग्य नाहींत.

२० "न्यायीपणापेक्षां." ह्मणजे जर तुह्मी परोशी व शास्त्री यांपेक्षां अधिक न्यायी व पवित्र नाहीं, तर तुमचें तारण होणार नाहीं. त्यांचें नीतिमत्त्व बाहेरलि आणि व्यर्थ होतें. ज्या पवित्रतेकडून तारण होतें ती अंतःकरणांत राहती. आणि अंतःकरण शुद्ध असल्यास आचरण शुद्ध घडेल. परोशी आणि शास्त्री यांसारिखें जे स्नान, दान, धर्म, उपास, देहदंड इत्यादि बाहेरील क्रिया करितात असे हल्लीं कित्येक आहेत. परंतु शुद्ध न्यायी व प्रमाणिक असणें, इंद्रियदमन करणें, देवाची प्रीति आणि माणसांवर प्रीति करणें यांत पवित्रता आहे असें ख्रीस्तानें शिकविलें. या पवित्रतेवांचून आकाशलोकांत कोणी जाऊं शकणार नाहीं.

२१ "हत्या करूं नको." (निर्ग. २०:१३.) याचा अर्थ अकसानें जिवें मारणें, असें यहूदी लोक समजत होते. परंतु ही गोष्ट ख्रीस्तानें मनाविषयीं लाविली आहे. जो कोणी मनांत द्वेष बाळगितो तो दोषी आहे असें

२२ परंतु मी तुह्मास सांगतों कीं, जो कोणी आपल्या भावावर उगाच रागें भरेल (१) तो न्यायकाळीं दंडास योग्य ठरेल, आणि जो

(१) १ योहा. ३:१५.

त्यानें ठरविलें. "दंडास योग्य." ह्मणजे दोषी ठरेल. जो हत्या करितो तो मारला जावा असा नेम मोशाच्या नेमशास्त्रांत होता. (लेवी. २४:२१. गण. ३५:१६.)

२२ "परंतु मी तुह्मास सांगतों." ख्रीस्त अधिकारानें बोलला. त्यानेंच नेमशास्त्र लावून दिल्हें होतें, ह्मणून तो त्याची व्याख्या करायास समर्थ होता. "आपल्या भावावर." ह्मणजे शेजारी अथवा ज्यांसीं आमची वहिवाट आहे त्यांतील कोणी. आह्मी सर्वांसीं भावाप्रमाणें वागावें, कारण कीं सर्व मनुष्यजातीचा उत्पन्न करणारा एकच आहे, आणि सर्वांला एकच मूळपुरुष आहे. "उगाच रागें." राग हा कधीं कधीं योग्य आहे. (मार्क. ३:५. एफ. ४:२६) परंतु पापाविरुद्ध जो राग त्याविषयीं ख्रीस्त एथें बोलत नाहीं, तो अयोग्य, अविचारी, निरुपयोगी, निष्फळ अस्या रागाविषयीं बोलतो. असा राग साहावी आज्ञा मोडणें आहे असें त्यानें दाखविलें. (१ योहा. ३:१५. "वेडगळ." शिवीगाळ करणें हें मनुष्याच्या भ्रष्टतेचें उघड प्रमाण आहे. असें करणें भयंकर आहे. यावरून ईश्वराला मोठा राग येतो, ह्मणून असें वाईट भाषण बोलूं नये. "मूर्खा." हा शब्द अतिशय दोषांस लावीत असत. मूर्त्तिपूजकांस आणि जे कोणी मोठमोठे अपराध करीत त्यांस लावीत असत. (अनु. ३२:२१. योहा. ७:१९. गीत. १४:१.) "नरकाग्नीच्या." याबद्दल इब्रीभाषेत जो मूळ शब्द आहे त्याचा अर्थ हिन्नोमाग्नी असा आहे. हिन्नोम हा लहानसा खोरा यरूशालेमाच्या दक्षिणेस होता. त्या खोऱ्यांत मूर्त्तिपूजक असे इस्राएल लोक हे मोलख नामक भयंकर मूर्त्तीची पूजा करीत असत. ती मूर्त्ति तांब्याची होती, तिला वासराचें डोकें होतें, आणि आलिंगन करण्याजोगे असे तिचे हात लांब केले होते. त्या मूर्त्तीला अतिशय तापवून ते लोक तिच्या हातांत आपलीं बाळकें देऊन त्यांस जाळीत असत. त्यांचें रडणें ऐकूं न यावें ह्मणून तंबूर वगैरे वाद्यें वाजवीत असत. ह्याप्रमाणें त्या वेळेच्या यहूदी लोकांत मोठी क्रूर मूर्त्तिपूजा चालत होती आणि अझूनहि दुसऱ्या कितीएक लोकांमध्यें तसीच चालत आहे. (इर्म. ७:३१, ३२) यहूदी लोक बाबेलच्या कैदेंतून परत आल्यावर त्यांला त्या खोऱ्याचा फार कंटाळा येऊं लागला ह्मणून ते तेथें नगरांतील सर्व कचरा आणि प्रेतें टाकीत असत. आणि अपराध्यांस वारंवार तेथें फांसीं देत असत. येणें-

कोणी आपल्या भावाला वेडगळ ह्मणेल, तो न्यायसभेंत दंडास योग्य ठरेल, आणि जो कोणी अरे मूर्खा असें ह्मणेल, तो नरकाग्नीच्या दंडास योग्य ठरेल.

२३ यास्तव त्वां आपलें अर्पण (१) वेदीजवळ आणिलें, आणि माझ्या भावाला मजविरुद्ध कांहीं आहे, असें तेथें तुला स्मरण झालें;

२४ तर तेथें वेदीपुढें आपलें अर्पण ठेव आणि निघून जा. पहिल्याने आपल्या भावासीं समेट कर, मग येऊन आपलें अर्पण वाहा.

---

(१) अनु. १६:१६,१७.

---

कडून ती जागा त्रासदायक होती. तेथील हवा फार नाशकारक होती, आणि ती दिसण्यांतहि फार भयंकर होती. त्या हवेकडून शहरांतील हवा बिघडूं नये ह्मणून ते त्या खोऱ्यांत विस्तु पेटवीत असत. मैल, ओंगळपण, नासकेपण, वाईट हवा, आणि रात्रंदिवस जाळणारा अग्नि यांकडून तें ठिकाण अतिशय भयंकर होतें; यहूदी लोक त्याला नरकाग्नि ह्मणत असत. परलोकीं दुष्टांस जो दंड लागणार आहे तो दाखविण्यासाठीं प्रभूनें या स्थलाचा दाखला वारंवार दिल्हा. या वाक्यावरून प्रभू असें शिकवितो कीं ईश्वर अंतःकरणाकडे पाहतो, आणि पापाचें प्रतिफळ निश्चयें प्राप्त होईल. आपल्या सर्व कर्मांचा हिशोब द्यावा लागेल.

२३,२४ "आपलें अर्पण इ." परोशी बाहेरील कामें यांकडे मात्र लक्ष लावीत. हीं केलीं ह्मणजे झालें, मग अंतःकरणांत कितीहि हेवा, द्वेष, अकस असलीं तरी कांहीं चिंता नाहीं, असें त्यांस वाटत असे. परंतु बाहेरील कामापेक्षां अंतःकरणांतील भावना विशेष आहेत असें ख्रिस्तानें शिकविलें. जो कोणी आपल्या अंतःकरणांत अकस, हेवा, द्वेष इत्यादि बाळगून ईश्वराचें भजन करण्यास येतो तो ढोंगी आहे, आणि त्याला ईश्वरी क्रोध हेंच कायतें फळ प्राप्त होईल. "मजविरुद्ध कांहीं आहे." ह्मणजे तूं त्याचा अन्याय केला असें जर त्याला वाटेल. "समेट कर." जर त्याचा अन्याय केला असेल तर कबूल होऊन भरून दे, अथवा क्षमा माग. जर गैरसमजुतीनें त्याला असें वाटतें तर त्याला समजून सांग. समेट होण्याविषयीं होईल तितका प्रयत्न कर.

**सूचना** १— आमची भक्ति ईश्वराला पसंत व्हावी ह्मणून आह्मी दुसऱ्या माणसांसीं नीट वागावें. २— दुसऱ्यांनीं शांतीनें राहण्याविषयीं

२५ तूं आपल्या वाद्याच्या बरोबर वाटेंत आहेस, तोंवर त्यासीं लवकर समेट कर, नाहीं तर कदाचित तो वादी तुला न्यायाधीशाच्या हातीं देईल, (१) आणि न्यायाधीश तुला शिपायाच्या हातीं देईल, आणि तूं बंदिशाळेंत पडसील.

२६ मी तुला खचीत सांगतों, तूं शेवटली दमडी फेडसील तोंपर्यंत तेथून सुटणारच नाहींस.

२७ व्यभिचार करूं नको, असें प्राचीन लोकांस सांगितलें होतें, हें तुह्मी ऐकिलें आहे.

२८ परंतु मी तुह्मास सांगतों कीं, जो कोणी बायकोकडे कामदृष्टीने पाहतो, (२) त्याने आपल्या अंतःकरणाने तिजसीं व्यभिचार केलाच आहे.

---

(१) नीति. २५:८. लुका. १२:५८,५९. (२) इयोब ३१:१. नीति. ६:२५.

---

जर आह्मी प्रयत्न करीत नाहीं तर ईश्वराला आमची भक्ति आवडणार नाहीं. ३—जेव्हां कोणी एकाचा अन्याय झाला आहे तेव्हां त्यासीं समेट करायास झटावें. ४— ईश्वराची भक्ति करूं लागल्यापूर्वी समेट करावा. ५— आह्मी देवाची प्रार्थना करितों तेव्हां वारंवार त्याचे आशीर्वाद मिळत नाहींत, याचें कारण एथें स्पष्ट दिसून येतें. आह्मी अयोग्य भावना बाळगतों ह्मणून तो आशीर्वाद देत नाहीं. (मात्थी. ६:१४,१५.)

२५,२६ "वाटेंत आहेस." भांडण हें साहावी आज्ञा मोडणें आहे, असें ख्रीस्ताने शिकविलें. सर्व पापी देवाचे वैरी आहेत आणि त्यांनी त्यासीं लवकर समेट करावा. त्यांनी उशीर करूं नये. जो अपश्चात्तापी असून मरतो, तो देवाला कधीं पाहणार नाहीं.

२७,२८ "व्यभिचार करूं नको." एथें केवळ बाहेरील कर्म मना केलें, असें परोशयांला वाटलें. पण केवळ बाहेरील कर्म नव्हे तर मनांतील दुष्ट वासना देखील मना केल्या आहेत असें ख्रीस्ताने शिकविलें. जो कोणी मनांत असी इच्छा बाळगतो आणि कामदृष्टीने पाहतो तो देखील व्यभिचार करितो. मनांतील ज्या भावना आणि कल्पना जगाला कधीं कळत नाहींत त्यांकडून देवाला राग येतो आणि आत्म्याचा सर्वकालिक नाश होतो.

२९ आणि तुझ्या उजव्या डोळ्याने तुला अडखळविलें तर तो उपटून आपल्यापासून टाक, कारण कीं तुझ्या अंगांतून एकाचा नाश व्हावा, आणि तुझें संपूर्ण शरीर नरकांत पडूं नये हें तुला बरें आहे. (१)
३० आणि तुझ्या उजव्या हाताने तुला अडखळविलें तर तो तोडून आपल्यापासून टाक; कारण कीं तुझ्या अंगांतून एकाचा नाश व्हावा, आणि तुझें संपूर्ण शरीर नरकांत पडूं नये हें तुला बरें आहे.
३१ जो कोणी आपल्या बायकोस सोडील त्याने तिला सूटपत्र द्यावें, (२) हेंहि सांगितलें होतें.

(१) रोमि. ८:१३. १ करिं. ९:२७. (२) अनु. २४:१. इर्म. ३:१. मार्क. १०:२,९.

२९,३० "तुझ्या उजव्या डोळ्याने इ." शरीराच्या अवयवांकडून कधीं कधीं मनांतील भावना दाखविल्या जातात. (रोमि. ७:२३. ६:१३) दुष्ट दृष्टि ह्मणजे हेवा इत्यादि पाप समजावें. (मार्क. ७:२१,२२) या ठिकाणीं डोळा या शब्दावरून मनांतील दुष्ट वांछा समजाव्या. उजवा डोळा विशेष उपयोगाचा आहे. तर या बोलण्यावरून असें समजतें कीं दुष्ट वांछा कितीहि बळकट व प्रिय असल्या तरी त्या मनांतून घालविल्या पाहिजेत.

'अडखळविलें.' पाप करण्याचे मोह घातले. जेव्हां डोळा कामदृष्टीने स्त्रियेकडे पाहतो तेव्हां असे मोह प्राप्त होतात.

"तोडून आपल्यापासून टाक." पापवासना कितीहि बळकट असल्या तरी त्या दाबल्या पाहिजेत. जेणेंकडून पाप मोह होतात तें कितीहि प्रिय असलें तरी सोडलें पाहिजे. "तुझें संपूर्ण शरीर नरकांत पडूं नये." नरकांत देखील पाप्यांच्या मनांतील वांछा कामदृष्टि इत्यादि दुर्वासना प्रबळ होतील तरी त्या तृप्त करण्याचा उपाय होणार नाहीं. यांपेक्षां अधिक दुर्दशा ती कोणती. "हें तुला बरें आहे." अस्या दुर्दशेंत टाकलें जाण्यापेक्षां आपल्या दुर्वासना आतांच दाबाव्या हें बरें.

३१, ३२ "हेंहि सांगितलें होतें." मोशाने सांगितलें होतें. (अनु. २४: १,२) यहूदी लोकांमध्यें सूटपत्र देण्याची चाल होती. ते हलक्या कारणावरूनहि वारंवार देत असत. प्रभु ह्मणतो, तुमच्या अंतःकरणाच्या कठीणपणामुळें मोशाने अशी आज्ञा दिल्ही होती. परंतु सृष्टीच्या प्रारंभापासून असी आज्ञा नव्हती. (मार्क १०:१–१२) ख्रीस्ताने मूळची आज्ञा पुन्हां काढून त्यांस सांगितलें कीं जो कोणी आपल्या बायकोला व्यभिचाराच्या कारणावांचून सोडितो तो व्यभिचारी मानला जातो. हीच आज्ञा सांप्रत

३२ परंतु मी तुह्मास सांगतों कीं, जो कोणी आपल्या बायकोला व्यभिचाराच्या कारणावांचून सोडील, (१) तो तिजकडून व्यभिचार करवील, आणि जी सोडलेली तिजसीं जो कोणी लग्न करील तो व्यभिचार करील.

३३ अणखी प्राचीन लोकांस सांगितलें होतें कीं, खोटी शपथ वाहूं नको, (२) तर आपल्या शपथा प्रभूपासीं खऱ्या कर, हें तुह्मी ऐकिलें आहे.

३४ परंतु मी तुह्मास सांगतों कीं शपथ वाहूंच नको, (३) आकाशाची नको, कां कीं तें देवाचें आसन आहे;

३५ आणि पृथ्वीचीहि नको, कां कीं ती त्याच्या पायांचें आसन आहे; आणि यरूशलेमाचीहि नको, कां कीं तें मोठ्या राजाचें नगर आहे. (४)

(१) मात्थी. १९:२. १ करिं. ७:१०,११. (३) मात्थी. २३:१६–२२. याको.५:१२.
(२) लेवी.१९:१२.गण.३०:२.अनु २३:२३.(४) प्रग. २१:२,१०.

चालत आहे. ही कोणाच्याने बदलवत नाहीं. कोणतेंहि सरकार देवाच्या आज्ञा रद्द करायास समर्थ नाहीं.

३३ "खोटी शपथ वाहूं नको." एथें ख्रीस्ताने अणखी एक वाईट चाल निषेधली. शपथ वाहण्याचा नेम, लेवी १९:१२. अनु. २३:२३. यांत सांगितला आहे. परंतु जरी यहूदी आपलें नेमशास्त्र बरोबर पाळण्याविषयीं अभिमानी होते, तरी ज्या पाळण्याचें अगत्य नाहीं ह्मणून मानलें अश्या अनेक शपथा ते साधारण बोलण्यांत देखील वाहत असत. ते आपल्या मस्तकाची, देवाची, आकाशाची, पृथ्वीची, शपथ वाहत असत. ही दुष्ट चाल ख्रीस्ताने निषेधली. आकाश देवाचें राज्यासन आहे, पृथ्वी पादासन आहे, आणि उत्पन्न झालेल्यांचें नाम अनादराने घेऊं नये, असें त्याने शिकविलें. एथें ख्रीस्त व्यवहारिक शपथेविषयीं बोलला नाहीं. तो स्वतः अशी शपथ वाहण्याविषयीं नाकबूल झाला नाहीं. (मात्थी २६:६३,६४.) पौलसानेहि आपल्या खरेपणाविषयीं देवाला वारंवार साक्षी ठेविलें. (रोमें. १:९. ९:१. गल.१:२०. इब्री ६:१६.)

३४–३६ "शपथ वाहूं नको." ह्मणजे साधारण बोलण्यामध्यें ही शपथ वाहण्याची चाल अगदी अयोग्य आहे. "तें मोठ्या राजाचें नगर

३६ आणि आपल्या मस्तकाचीहि शपथ वाहूं नको, कां कीं तुझ्याने एक केंस पांढरा किंवा काळा करवत नाहीं.

३७ तर तुमचें बोलणें होय तर होय, नाहीं तर नाहीं, असें असावें, पण याहून जें अधिक तें वाइटापासून होतें. (१)

३८ डोळ्याबद्दल डोळा आणि दांताबद्दल दांत, (२) असें सांगितलें होतें, तें तुम्ही ऐकिलें आहे.

३९ परंतु मी तुम्हास सांगतों, (३) दुष्टाला अडवूं नको, तर जो कोणी तुझ्या उजव्या गालावर तुला मारील (४) त्याकडे दुसराहि फिरीव;

४० आणि जो तुझा वादी होऊन तुझा अंगरखा घ्यायास पाहतो, त्याला तुझें उपवस्त्रहि घेऊं दे;

४१ आणि जो कोणी तुला बळात्कारानें एक कोस नेईल त्याबरोबर दुप्पट चाल.

(१) याको. ५:१२. (३) नीति. २०:२२. २४:२९. रोमे. १२:१७-१९.
(२) निर्ग. २१:२४ (४) यशा. ५०:६.

आहे." म्हणजे ईश्वराचें. इस्राएल लोक ईश्वराला आपला राजा मानीत असत, आणि यरूशालेम त्याची राजधानी असतां तें देवाला मान आणि भजन करण्याचें मुख्य ठिकाण होतें.

३७ "वाईटापासून होतें." साधारण बोलण्यामध्यें असी शपथ वाहण्याची चाल अगदीं वाईट आहे.

**सूचना**— साधारण बोलण्यामध्यें शपथ वाहणें ही चाल भ्रष्ट अंतःकरणाचें आणि नीच व दुष्ट अस्या माणसाचें लक्षण आहे. जो असी शपथ वाहतो त्याला ईश्वर निर्दोष मानणार नाहीं. ईश्वराला सर्व वाईट शब्दांचा कंटाळा येतो, आणि जे असे शब्द बोलतात त्यांला कठीण दंड लवकर लागत नाहीं, यावरून देवाची दया दिसून येते, शेवटीं तर दंड लागेलच.

३८—४१ "डोळ्याबद्दल डोळा" इ० (निर्ग. २१:२४. लेवी. २४:२०. अनु. १९:२१.) हा नेम व्यवहारिक होता, आणि सरकारानें याप्रमाणें इनसाफ चालवूं नये असें ख्रीस्तानें सांगितलें नाहीं, आणि तो नेमहि रद्द केला नाहीं. परंतु यहूदी लोकांनीं एकमेकांसीं वर्तण्याविषयीं व सूड उगविण्याविषयीं तो नेम चालू केला होता, हें मात्र ख्रीस्तानें निषेधलें. हा नेम व्य-

४२ जो तुझ्या जवळ मागतो त्याला दे, आणि जो तुजपासून उसनें घ्यावयास पाहतो त्याला पाठमोरा होऊं नको. (१)

४३ आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर, आणि आपल्या वैऱ्याचा द्वेष कर, (२) असें सांगितलें होतें, हें तुह्मी ऐकिलें आहे.

(१)अनु. १५:७,११ (२)अनु. २३:६.

वहारांतील आहे. खासगत आपल्यास लागत नाहीं. कोणी स्वतः होऊन आपला सूड उगवूंच नये, असें ख्रीस्तानें शिकविलें. आपला किंवा आपल्या मित्राचा जीव धोक्यांत पडला असतां त्याचें रक्षण करायास झटावें, हें योग्य आहे. हें मानवी किंवा ईश्वरी आज्ञांसीं विरुद्ध नाहीं. असें करणें ख्रीस्तानें मना केलें नाहीं. त्यानें सांगितलेल्या उदाहरणावरून त्याचा अभिमाय स्पष्ट दिसून येतो. जेव्हां कोणी आमच्या गालावर चपडाक मारितो, तेव्हां त्याला उलट मारावें किंवा कज्जा करावा यापेक्षां सहनतेनें सोसावें आणि त्याकडे दुसरा गाल करावा. अन्याय करणाऱ्याचे कान उघडावे हें मना केलें नाहीं. (योहा. १८:२३.) तसेंच जेव्हां कोणी वस्त्र अथवा दुसरें कांहीं याविषयीं फिर्याद करितो, तेव्हां त्यासीं वाद करावा यापेक्षां कांहीं नुकसान सोसावें हें बरें. "बलात्कारानें एक कोस नेईल." ही रीत पहिल्यानें इराण देशांत चालू झाली. तेव्हां कांहीं डांक नव्हती आणि राजाचा हुकूम त्वरेनें नेण्यासाठीं राजाच्या चाकरांनीं माणसें, घोडे, होड्या, तारवें, इत्यादि बलात्कारानें चालवावीं असा हुकूम होता. जर सरकारचा दस्तूर असा आहे तर त्यास मान्य असावें. नाकबूल व्हावें यापेक्षां दुप्पट जावें, असा ख्रीस्ताचा अभिमाय आहे.

४२ "जो तुझ्या जवळ मागतो त्याला दे." देण्याची सवय असावी. तथापि आपल्या कुटुंबास पुरवावें हें आमचें अवश्य काम आहे. आह्मी त्याविषयीं हयगय करूं नये. (१ तिम. ५:८) विवेकानें दान धर्म करावा, ज्यांला मेहनत करण्याची शक्ति आहे त्यांला फारकरून देऊं नये. (२ थेस्स. ३:१०.) आळसाला आश्वासन देऊं नका. अशक्त, रोगी, पांगळे इत्यादिकांस विन्मुख जाऊं देऊं नये. (इब्री १३:२. मात्थी २५:३५-४५) तसेंच जर कोणी गरीब मेहनती मित्र उसनें मागतो तर शक्ति असल्यास त्याला द्यावें. परंतु आळसी व उधळे अस्यांस देणें हें दुर्गुणाला आश्वासन देणें आणि आपलें द्रव्य डोहांत टाकणें असें आहे.

४३ "आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर." ही देवाची आज्ञा होती, (लेवी १९:१८.) पण आपल्या वैऱ्याचा द्वेष करावा असें अनुमान यहूदी

४४ परंतु मी तुह्मास सांगतों, तुह्मी आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा. (१) जे तुह्मास शाप देतात त्यांस तुह्मी आशीर्वाद द्या, जे तुमचा द्वेष करितात त्यांचें तुह्मी बरें करा, आणि जे तुह्मास गांजितात आणि तुमच्या पाठीस लागतात त्यांच्या साठीं प्रार्थना करा; (२)

---

(१) रोमे. १२:१४,२० (२) लुका. २३:३४. प्रेषि. ७:६०.

---

लोकांचें होतें. जर आह्मी शेजाऱ्यावर प्रीति करितों तर वैऱ्याचा द्वेष करावा असें त्यांस वाटलें. वैऱ्यावर देखील प्रीति करावी हा शुभवर्त्तमानांतील मुख्य नेम आहे, पण याप्रमाणें ते वागत नसत. शेजारी ह्मणजे जो जवळ राहतो तो. दुसऱ्या अर्थात ज्याचा आमचा कांहीं विशेष संबंध आहे तो. (लुका १०:३६.)

४४ "आपल्या वैऱ्यांवर प्रीति करा." कित्येक सद्गुणी व प्रिय आहेत ह्मणून आह्मी त्यांजवर प्रीति करितों, परंतु अशी प्रीति दुष्ट लोकांवर करितां येत नाहीं. त्यांचें मूर्खपण पाहून त्यांची दया करितां येईल आणि संकटांत साह्य करितां येईल, आणि त्यांच्या तारणाविषयीं काळजी करितां येईल. त्यांजवर प्रीति करावी याचा अभिप्राय हाच आहे असें दिसतें. वैऱ्यांवर प्रीति करणें हा ख्रिस्ती धर्मांतील विशेष नेम आहे, आणि सुभक्तीचें सर्वांहून उत्तम प्रमाण आहे. असें करणें कदाचित् दुसऱ्या सर्व गोष्टींपेक्षां अवघड असेल.

जो आपल्या वैऱ्यासीं प्रीतीनें वागतो, जो आपले गांजणारे व शाप देणारे यांचें बरें पाहतो, आपला अन्याय करणाऱ्यांसाठीं प्रार्थना करितो, आणि आपला नाश करूं इच्छिणाऱ्यांच्या तारणाविषयीं काळजी करितो, तो वास्तविक खरा ख्रिस्ती आहे. तो जीवनाच्या मार्गांत चालत आहे. हें सुभक्तीचें लक्षण आहे. ती अंतराळासारिखी सुंदर, आपल्या उगमासारखी निर्मळ, उत्पन्न कर्त्यासारखी कृपाळू, ज्या भावना आणि शब्द ईश्वराच्या पुत्राच्या मुखांतून निघाले त्यांसारिखी पवित्र, अशी आहे. जो असें करितो त्यानें आपण ख्रिस्ती आहों किंवा नाहीं याविषयीं संशय धरूं नये. तो ख्रिस्तासारिखा झाला आहे आणि त्याला सर्वकालिक जीवन प्राप्त होईल. हा धर्म आणि दुसरे सर्व खोटे धर्म यांची तुलना करून पाहा. पवित्र देवानें कोणता लावून दिल्हा असेल आणि कोणता मार्ग आकाशांत जाईल याविषयीं शोध करा. "आशीर्वाद द्या." उलटून शाप देऊं नका. त्यांचें बरें पाहा. त्यांमध्यें कदाचित् कांहीं सद्गुण आढळतील. आढळल्यास त्यांला आश्वासन द्या, नसल्यास कांहीं बोलूं नका.

४५ ह्मणजे तुह्मी आपल्या आकाशांतील बापाचे पुत्र व्हाल, कां कीं तो वाइटांवर आणि चांगल्यांवरहि आपल्या सूर्याला उगवविता, आणि न्यायींवर आणि अन्यायींवरहि पाऊस पाडिता. (१)

४६ कारण कीं जे तुह्मावर प्रीति करितात त्यांजवर जर तुह्मी प्रीति कराल तर तुह्माला फळ काय? जकातदारहि तसेंच करितात कीं नाहीं?

४७ आणि तुह्मी आपल्या भावांस मात्र सलाम कराल, तर तुह्मी अधिक काय कराल? जकातदारहि तसेंच करितात कीं नाहीं.

४८ यास्तव जसा तुमचा आकाशांतील बाप पूर्ण आहे, तसे तुह्मी पूर्ण व्हा. (२)

---

(१) ईयोब २५:३. (२) उत्प. १७:१. अनु. १८:१३. लुका. ६:३६,४०. कल. १:२८.

---

४५ "आपल्या आकाशांतील बापाचे पुत्र व्हाल." देवाने ख्रिस्ती लोकांस बोलावलें, निवडून घेतलें, आणि दत्तपुत्र असें अंगीकारलें. यांस आपले शिष्य व अनुसरणारे असें करून घेतलें ह्मणून त्यांस देवाचे पुत्र अथवा लेंकरें असें ह्मटलें आहे. ख्रिस्ती लोक आपल्या वैऱ्यांचें हित करण्याकडून ईश्वराला अनुसरतात. तो वाईटांवर व चांगल्यांवरहि आपल्या सूर्याला उगवविता आणि सर्वांवर उपकार करिता.

४६ "तुह्मांला फळ काय?" तुह्मी स्तुतिपात्र व्हावें असें तुह्माजवळ काय आहे? असी प्रीति स्वार्थ बुद्धीची आहे. जकातदार देखील असी प्रीति करितात. यहूदा देश रोमी सरकारच्या अमलांत होता. तो अमल त्यांस बरा वाटला नाहीं आणि ते जकात द्यावयास नाखुष होते, यास्तव ते जकातदारांचा द्वेष करीत. ते जकातदार कंटाळवाणें आणि नावडतें काम करायास तयार होते. त्यांतील बहुतेक जुलमी, लुच्चे आणि दुष्ट होते, तरी ते देखील आपल्या मित्रांवर प्रीति करीत असत. तर असी प्रीति करण्यांत काय विशेष आहे, हा ख्रिस्ताच्या बोलण्यांतील अभिप्राय होता.

४७ "आपल्या भावांस मात्र इ०" ख्रिस्ती लोकांनी यापेक्षां ज्यास्ती करावी. दुष्ट आपल्या मित्रांसीं वर्त्ततात तसें आह्मी आपल्या वैऱ्यांसीं वर्त्तावें. सुभक्ति ही स्वार्थ बुद्धीची नाहीं असें आह्मी दाखवावें.

४८ "तुह्मी पूर्ण व्हा." शुद्ध व पवित्र व्हा. आपल्या मित्रांवर प्रीति करण्याकडून, असें केवळ नव्हे, पण आपल्या वैऱ्यांवरहि प्रीति करण्याकडून आपली सुभक्ति दाखवा. देवाला अनुसरून त्यासारिखे पूर्ण व्हा.

## अध्याय ६.

१ लोकानी पाहावें अशा हेतूने तुह्मी आपला धर्म त्यांच्या समोर करूं नये याविषयीं जपा, नाहीं तर तुमच्या आकाशांतील बापापासून तुह्मास फळ मिळणार नाहीं.

---

**सूचना** १— जे जगांत हलके व नीच मानिले जातात ते धन्य असें ख्रिस्ती शास्त्रांत ह्मटलें आहे. सुख हें ख्यालीखुशाली, द्रव्य, मान, खोटी अब्रू इत्यादिकांतच आहे, असें जगाला वाटतें. पण वास्तविक पाहिलें असतां तें अगदी वेगळ्या गोष्टींत आहे. जे खरे ख्रिस्ती आहेत ते वारंवार दरिद्र, रोग, पाठलाग इत्यादि संकटांमध्यें विशेष सुख पावतात. २—राग हा बहुत दुःखास उगम असा आहे. नम्रता, शांति, आणि उपकारिकपण यांत खरें सुख सांपडतें. ३—सातवी आज्ञा किती सक्तीची आहे हें एथें दिसून येतें. कामदृष्टि, वाईट शब्द, आणि दुष्ट कल्पना यांकडूनहि ती आज्ञा मोडली जाती. यासारिखें नाशकारक असें दुसरें पाप नाहीं. ही आज्ञा मोडल्याकडून दुसरे सद्गुण नाहींसे होतात, असें सर्वांनी समजावें. ज्या लोकांत हें पाप आहे ते अडाणी, लुच्चे, नीच असे सांपडतील. जे हें पाप करितात ते कोणतेंहि पाप करण्यास भिणार नाहींत. शुद्धता अंतःकरणांत राहावी आणि ती चेहेरा, डोळे, बोलणें, चालणें या सर्वांवरून दिसून यावी. सृड उगविणारा देव सर्वदा जवळ आहे. तो मनांतील प्रत्येक दुष्ट वासना जाणतो, आणि ह्या आज्ञेच्या प्रत्येक मोडणाऱ्यासाठीं क्रोध तयार करीत आहे. (नीति ७:२२,२३.५:९. २:१२.) ४— आह्मी वैऱ्यांवर प्रीति करण्यांत बांधले आहों. हा नेम ख्रिस्ती शास्त्रांतच आहे, दुसऱ्या कोणत्याहि धर्मांत हा नेम सांपडत नाहीं. ख्रिस्ती लोकांचें दुसरें कोणतेंहि काम यापेक्षां अवघड नाहीं. दुसऱ्या कस्याकडून देवाची कृपा एवढी सफळ दिसत नाहीं. सुभक्तीविषयीं यापेक्षां दुसरें चांगलें प्रमाण नाहीं.

१ "धर्म." भिकाऱ्यांस दान करणें, गरिबांस देणें, हें आपलें अवश्य काम आहे, असें खरे ख्रिस्ती मानितात. (गल. २:१०. याको. १:२७. लुका १९:८.) "त्यांच्या समोर." लोकानी पाहावें आणि आपली स्तुति करावी ह्मणून. जर कोणी योग्य हेतूने धर्म करितो तर तो लोकांतीं किंवा एकांतीं करो. त्याविषयीं कांहीं चिंता नाहीं. परंतु लोकानी पाहावें या हेतूने जर करितो तर ईश्वर त्याला कांहीं चांगलें फळ देणार नाहीं.

२ यास्तव तूं धर्म करसील तेव्हां जसे ढोंगी आपली कीर्त्ति माणसांकडून व्हावी, ह्मणून सभास्थानांमध्यें व मार्गांमध्यें करणा वाजवितात, तसें तूं आपल्यापुढें वाजवूं नको; मी तुम्हास खचीत सांगतों कीं, त्यांस त्यांचें फळ मिळालेंच आहे.

३ तूं तर धर्म करीत असतां, तुझा उजवा हात काय करितो हें तुझ्या डाव्या हाताला कळूं नये;

४ यासाठीं कीं तुझा धर्म गुप्तांत व्हावा, मग गुप्तांत पाहणार तुझा बाप तुला लौकिकांत फळ देईल. (१)

५ आणि तूं प्रार्थना करसील तेव्हां ढोंग्यासारिखा होऊं नको; कारण कीं आपण माणसांस दिसावें म्हणून सभास्थानांमध्यें व चव्हाठ्यामध्यें उभें राहून प्रार्थना करणें हें त्यांस आवडतें. मी तुह्मास खचीत सांगतों कीं, त्यांस त्यांचें फळ मिळालेंच आहे. (२)

---

(१) लुका ८:१७. १४:१४. (२) नी. १६:५. याको. ४:६.

---

२ "आपल्या पुढें वाजवूं नको." सोंगाडी आपल्यापुढें करणा वाजवीत असत. जे त्यांसारिखे कीर्त्ति मिळविण्यासाठीं लोकांनीं दानधर्म करितात ते सुभक्तीचें सोंग मात्र दाखवितात, आणि सोंगाड्यासारिखें फळ पावतात. ह्मणजे दानधर्म करण्याकडून लोकांमध्यें अब्रू मिळते. परंतु त्यांचें करणें ईश्वराला पसंत होत नाहीं आणि तो कांहीं चांगलें फळ देत नाहीं.

३,४ "तुझा उजवा हात इ०." ही एक म्हण आहे. इचा अर्थ हाच कीं दान धर्म एकांतीं केला पाहिजे. जरी तो गुप्तांत आहे तरी तो ईश्वराच्या लक्षांत येईल, आणि लौकिकांत फळ मिळेल. जरी इहलोकीं फळ मिळालें नाहीं तरी तें परलोकीं निश्चयें मिळेल. परंतु जो गरिबांस देतो तो ईश्वराला उसनें देतो आणि त्याचें प्रतिदान मिळतें. (नी. १९:१७.)

५ "ढोंग्यासारिखा होऊं नको, इ०." ढोंगी आपल्या सर्व धर्मकृत्यांविषयीं एकच हेतु दाखवितात. त्यांला कीर्त्तीची मोठी आवड असते. आणि ती मिळविण्यासाठींच ते आपलीं सर्व कामें करितात. एथें ख्रिस्तानें लोकांनीं प्रार्थना करणें मना केलें असें नाहीं, परंतु तिजविषयीं डामडौल मिरविणें मना केलें आहे. आह्मी फार धार्मिक आहों असा आब्रू मिळविण्यासाठीं यहूदी लोक प्रसिद्ध ठिकाणीं सभांमध्यें आणि मार्गांच्या कोनांमध्यें लांबलचक्या प्रार्थना करीत असत. ख्रिस्तानें केवळ ही चाल मना केली.

६ तूं तर प्रार्थना करसील तेव्हां आपल्या खोलींत जा, आणि आपलें दार लावून तुझा बाप जो गुप्तांत आहे त्याची प्रार्थना कर, मग गुप्तांत पाहणारा (१) तुझा बाप तुला लौकिकांत फळ देईल.

(१) गीत ३४:१५. यशा. ६५:२४.

६ "आपल्या खोलींत जा." प्रत्येक घरांत प्रार्थना करण्यासाठीं एक खोली असावी हें योग्य आहे. जेथें केवळ ईश्वरालाच पाहूं व ऐकूं येतें अश्या ठिकाणीं जाऊन प्रार्थना करावी हें ख्रीस्तानें शिकविलें. ज्यांस प्रार्थना करण्याची आवड आहे ते असें करतील. आमचा तारणारा एकांतीं प्रार्थना करीत असे. तो सकाळीं मोठ्या पाहटेस उठे आणि एकीकडे जाऊन प्रार्थना करी. झाडी, डोंगर, अथवा रान अश्या जागेंत तो जात असे. तो आह्मासाठीं असी प्रार्थना एकांतीं करीत असे, तर आह्मी स्वतः आपल्यासाठीं असी प्रार्थना करूं नये कीं काय? एकांतीं प्रार्थना करणें हें खऱ्या ख्रिस्त्याचें उत्तम लक्षण आहे. ज्याला प्रार्थना करण्याची आवड नाहीं आणि जो प्रभूवर प्रीति करीत नाहीं तो एकांतीं प्रार्थना करणार नाहीं.

**सूचना**-- एकांतीं प्रार्थना दिवसांतून कितीदां केली पाहिजे याविषयीं ख्रीस्तानें कांहीं नेम दिल्हा नाहीं. सक्त नेमानें प्रार्थना केली तर ती मुसलमान लोकांच्या निमाजींप्रमाणें बरबरची होईल. प्रार्थना व दुसरीं कोणतींहि धर्मकृत्यें मनापासून, आनंदानें, व आवडीनें केलीं पाहिजेत. तरी एकांतीं प्रार्थना करण्यासाठीं अमुक वेळ योग्य आहे असें सर्वांस दिसेल. (१) सकाळ देवानें रात्रभर आमचें रक्षण केलें आणि आतां आह्मी दिवसाचें काम सुरू करितों, तर देवाचे उपकार मानावे आणि त्याचें साह्य मागावें हें योग्य आहे. (२) संध्याकाळ आज जें आह्मी केलें त्याजवर देवाचा आशीर्वाद मागावा आणि रात्रीं त्यानें रक्षण करावें ह्मणून प्रार्थना करावी, हें बरें. (३) विशेष दुःख, संकटें, आणि पापमोह लागतात, तेव्हां प्रार्थना करावी. (४) प्रार्थना करावी असी जेव्हां प्रेरणा होती तेव्हां करावी. अश्या वेळेस प्रार्थना करणें हें ख्रिस्ती माणसाचा श्वासोश्वास असें आहे. त्याचें मन नरम, त्याचें अंतःकरण प्रेमळ आहे, ईश्वर जवळ आहे, तारणारा फार प्रिय आहे असें दिसतें, आणि पवित्रतेची फार भूक व ताहन लागती, अश्या वेळेस आह्मी एकांतीं जाऊन प्रार्थना करावी.

७ आणि तुह्मी प्रार्थना करीत असतां विदेश्यांसारिखी व्यर्थ बड-बड (१) करूं नका; कारण कीं आपल्या फार बोलण्यामुळें आपलें मागणें मान्य होईल (२) असें त्यांस वाटतें.

८ यास्तव त्यांसारिखे तुह्मी होऊं नका; कां कीं तुह्मी आपल्या बापापासीं मागितल्या अगोदर जें तुह्मास पाहिजे तें त्याला ठाऊक आहे. (३)

९ यास्तव तुह्मी याप्रकारें प्रार्थना करा, "हे आमच्या आकाशांतील (४)बापा, (५) तुझें नाम (६) पवित्र मानिलें जावो.

---

(१) उप. ५:२.
(२) १ राज. १८:२६.
(३) लुका. १२:३०. योहा. १६:२३–२७.
(४) लुका ११:२.
(५) रोमि. ८:१५. गीत ११५:३.
(६) गीत. १११:९. १३९:२०.

---

७,८ "व्यर्थ बडबड करूं नका." याचें उदाहरण १ राजकथा १८:२६, एथें पाहा. सर्व मूर्त्तिपूजक लोकांमध्यें ही चाल आहे. हिंदु लोक आपल्या देवांचें व देवींचें व्यर्थ नाम घेण्याशिवाय अणखी काय प्रार्थना करितात? किती वेळपर्यंत प्रार्थना करावी याविषयीं ख्रीस्तानें कांहीं नेम सांगितला नाहीं. त्याच्या प्रार्थना अल्पकालिक होत्या. जेव्हां आह्मी प्रार्थना करितों तेव्हां ईश्वर आमच्या तोंडाच्या शब्दांकडे नव्हे पण अंतःकरणांतील भावना व इच्छा यांकडे लक्ष लावितो. ९–१३ एथें प्रार्थनेचा नमुना सांगितला आहे. जे शब्द आह्मी बोलावे त्यांविषयीं नव्हे पण ज्या भावनेनें आह्मी प्रार्थना करावी त्याविषयीं हा नमुना आहे. लुका ११:२–४ यांत पुन्हा लिहिला आहे. यावरून तीच पद्धति धरली पाहिजे असा ख्रीस्ताचा अभिप्राय नव्हता ह्मणून दिसून येतें. ख्रीस्त आणि त्याचा शिष्य वारंवार वेगवेगळ्या शब्दांनी प्रार्थना करीत असत. (मात्थी २६:३९–४२,४४. लुका २२:४२. योहा. १७: प्रेषि. १:२४.)

९ "बापा." ईश्वर उत्पन्न कर्त्ता आहे ह्मणून तो सर्वांचा बाप आहे. तो सर्वांस रक्षितो व त्यांच्या गरजा पुरवितो. ख्रीस्ताच्या खऱ्या अनुसरणाऱ्यांस तो पुत्र असें मानून जीवनाचे वतनदार करितो. (रोम. ८:१४–१७) "तुझें नाम पवित्र मानिलें जावो." मनुष्यें बहुत प्रकारें देवाचा अपमान करितात. (१) ईश्वराचें नाम कल्पिलेल्या देवाला देऊन त्याचा अपमान करितात. (२) लांकूड, दगड वगैरे मूर्त्तीला त्याचें नाम देऊन त्याचा अपमान करितात. (३) त्याचें नाम अमर्यादेनें घेऊन त्याचा अपमान करितात. (४) जो मान केवळ ईश्वरालाच योग्य आहे तो दुसऱ्यास कोण-

१० तुझें राज्य येवो. जसी आकाशांत तसी पृथ्वीवरहि (१) तुझ्या इच्छेप्रमाणें होवो.

११ आमची रोजची भाकर (२) आज आह्मास दे.

१२ आणि जसें आह्मी आपल्या ऋण्यांस सोडितों, तसें तूं आमचीं ऋणें (३) आह्मास सोड.

---

(१) माथ्थी १६:२८. प्रग. ११:१५. गीत १०३:२०,२१. (३) माथ्थी १८:२१-३५.
(२) नी. ३०:८. यशा. ३३:१६. लुका. ७:४०-४८.

---

त्याहि पदार्थांस देण्याकडून त्याचा अपमान करितात. देवाचें नाम पवित्र मानणें ह्मणजे हाच देव असें मानून याला ईश्वरी मान देणें आणि याच्या सर्व आज्ञा पाळणें.

१० "तुझें राज्य येवो." माथ्थी ३:२, यावरील व्याख्या पाहा. ईश्वराचा अधिकार सर्वत्र चालो, त्याला सर्वांनी मान्य व्हावें. संपूर्ण जग ईश्वराच्या गौरवानें भरे तोंपर्यंत त्याचें शुभवर्त्तमान घोषण केलें जावो, आणि सर्व जगांत खरा धर्म पसरो. "तुझ्या इच्छेप्रमाणें होवो." सर्वांनी पवित्र होऊन मला मान्य व्हावें असी ईश्वराची इच्छा आहे. ह्मणून त्याची इच्छा चालावी असी प्रार्थना करणें आणि सर्वांनी त्याला मान्य व्हावें असी प्रार्थना करणें एकसारिखेंच आहे. आकाशलोकांत देवाची इच्छा चालतच आहे. तसी सर्व पृथ्वीवर चालावी असी ख्रिस्ती लोकांची प्रार्थना आहे. जो ही प्रार्थना करितो त्यानें आपल्या अंतःकरणांत व सर्व आचरणावरून देवाची इच्छा चालावी असें अगोदर संभाळावें. मग इतर माणसांमध्यें व सगळ्या पृथ्वीवर चालावी याविषयीं प्रयत्न करावें. देवाचें गौरव आणि राज्य हीं आमच्या गरजांपेक्षां विशेष अगत्याचीं आहेत, ह्मणून आमची पहिली प्रार्थना त्याविषयीं असावी.

११ "आमची रोजची भाकर." आह्मी ईश्वराकडून जगतों आणि तो आमच्या रोजच्या गरजा पुरवितो. जें जें मिळतें तें सर्व त्याचें कृपादान आहे असें मोजलें पाहिजे, आणि जें पाहिजे तें आह्मी त्यापासीं मागावें.

१२ "आमचीं ऋणें आह्मास सोड." ऋणें हा शब्द एथें लाक्षणिक आहे. याचा अर्थ पापें, अन्याय, असा आहे. आह्मी देवाच्या आज्ञा मोडिल्या आणि दंडास पात्र झालों आमच्या अन्यायांची क्षमा करावयास केवळ ईश्वर समर्थ आहे, आणि आह्मी आपल्या अन्याय करणाऱ्यांची जसी क्षमा करितों त्याप्रमाणें ईश्वर आमच्या अन्यायांची क्षमा करील. (गीत १८:२५,२६. माथ्थी १८:२३. मार्क. ११:२५. लुका ११:४.) जर कोणी

१३ आणि आह्मास परीक्षेंत (१) नेऊं नको, तर आह्मास वाइटा-
पासून (२) सोडीव; कारण कीं, राज्य आणि सामर्थ्य आणि गौरव हीं
सर्वकाळ तुझीं आहेत; (३) आमेन."

१४ कारण कीं जर तुह्मी माणसांच्या अपराधांची क्षमा कराल,
तर तुमचा आकाशांतील बाप तुमचीहि क्षमा करील.

१५ परंतु जर तुह्मी माणसांच्या अपराधांची क्षमा करणार नाहीं,
तर तुमचा बाप तुमच्याहि अपराधांची क्षमा करणार नाहीं. (४)

---

(१) मात्थी २६:४१. लुका २२:४०,४६. (३) प्रग. ५:१२,१३.
(२) योहा. १७:१५. (४) एफ. ४:३१. याको. २:१३.

---

अकस व सूड उगविण्याची इच्छा बाळगून ईश्वरापाशीं क्षमा मागतो तर तो त्याचें ऐकणार नाहीं. जर आह्मी दुसऱ्यांची क्षमा मनापासून करीत नाहीं तर ईश्वर आमचीहि क्षमा करणार नाहीं.

१३ "आह्मास परीक्षेंत नेऊं नको." (गीत १४१:४.) ईश्वर कोणीए-काला मोहांत घालीत नाहीं, (याको. १:१३.) परंतु आमची परीक्षा पाहावी ह्मणून तो मोह लागूं देतो. त्याने लागूं न द्यावें ह्मणून त्याची प्रार्थना करणें योग्य आहे. तो पाप मोह निवारण करायास समर्थ आहे. आमची परी-क्षा मोहांकडून किंवा संकटांकडून होती तेव्हां आमची शक्ति स्थिर राखण्यास तो समर्थ आहे. "वाइटापासून सोडीव." ह्मणजे पापापासून, सैतानापासून, दुष्ट हेवा, वांच्छा आणि सर्व प्रकारच्या वाइटापासून सोडीव, असा अभिप्राय आहे. १ योहा. २:१३,१४.३:१२. योहा. १७:१५. "कारण कीं राज्य इ०" तुझा अधिकार सर्वांवर आहे. आह्मी मागतों तें करायास तूं समर्थ आहेस. आह्मी अशक्त आहों. तूं सर्वशक्तिमान आहेस. सर्व गोष्टी तुला साध्य आहेत. "आणि गौरव." आमच्या गरजा पुरविण्यांत तुझें चांगुलपण प्रगट होईल. आपलें राज्य संपूर्ण पृथ्वीवर स्थापण्यांत तुझा पराक्रम आणि गौरव दिसून येईल. याप्रमाणें देवाचें गौरव व्हावें ही आ-मची पहिली इच्छा आणि प्रार्थना असावी. आह्मी आपल्याला विसरून ईश्वराला मान, व गौरव द्यावें. "आमेन." ह्मणजे निश्चयें, खचीत, असें होवो. हा शब्द ऐकणारे बोलले असतील. उपाध्ये जी प्रार्थना करितात तिला आह्मी मान्य आहों हें दाखविण्यासाठीं ते असें बोलत असत. ही चाल ख्रिस्ती लोकांमध्यें चालू झाली असें दिसतें. (१ करिं. १४:१६.)

१४,१५ क्षमाशील बुद्धि बाळगावी असें ख्रिस्ती शास्त्रांत बहुत ठिकाणीं ह्मटलें आहे. आमचा तारणारा ह्मणाला, सातांच्या सत्तर वेळां क्षमा केली

१६ आणि तुम्ही उपास करितां तेव्हां ढोंग्यासारिखे म्लानमुख होऊं नका, कां कीं आपण उपास करीत आहों, असें लोकांस दिसावें, (१) ह्मणून ते आपलें तोंड उतरें असें करितात. मी तुह्मास खचीत सांगतों कीं, त्यास त्यांचें फळ मिळालेंच आहे.

१७ तूं तर उपास करित असतां आपल्या डोक्याला तेल लाव, आणि आपलें तोंड धू.

(१) यशा. ५८:३,५.

पाहिजे. (मात्थी १८:२२.) जेव्हां कोणी क्षमा मागतो तेव्हां ती मनापासून करावी. जर मागत नाहीं तर त्यासीं अकस न बाळगतां प्रीतीने वागावें आणि त्याचें कल्याण पाहावें.

१६ "तुह्मी उपास करितां इ०." उपास हा दुःख व खेद यांचें स्वाभाविक चिन्ह आहे. जेव्हां कोणी फार खिन्न असतो तेव्हां त्याला भूक लागत नाहीं. जेव्हां कोणी आपल्या पापाविषयीं खिन्न होतो तेव्हां उपास करावा हें त्याला योग्य आहे. परंतु जर खरा पश्चात्ताप नाहीं तर तो उपास ढोंगाचा असून निष्फळ आहे. यहूदी लोक पुष्कळ उपास करीत असत. त्यांमध्यें वार्षिक असे चार उपास होते, आणि प्रसंगानुसार तर ते बहुतच करीत असत. परोशी लोक सप्तकांत दोनदां उपास करीत. "म्लानमुख इ०." ते उदास दिसतात. रोजच्या प्रमाणें धूत नाहींत व तेल लावीत नाहींत. ते जटा वळलेल्या मळीण केसांचे, निस्तेज, हिडिसवाणे दिसतात. ते कधीं कधीं आपल्या केसांला व सर्वांगाला राख लावितात आणि भयंकर दिसतात. माणसाला भुलवावें या हेतूने ते असें धार्मिकपणाचें सोंग धरितात. गोसावी आणि बैरागी यांजकडे पाहा. ते याप्रमाणें आपणाला विद्रूप करितात. आणि आह्मी विशेष पुण्यवान आहों असें दाखवितात. लोक त्यांचें हें ढोंग न समजतां त्यांस आपणापासून दूर घालवीत नाहींत, हें आह्मास मोठें आश्चर्य वाटतें. लुच्चेगिरी व ढोंग यांचीं स्पष्ट लक्षणें त्यांच्या तोंडवळ्यावरून दिसून येतात. तर मग लोकांनीं त्यांकडून कां फसावें बरें?

१७ "डोक्याला तेल लाव." यहूदी लोकांमध्यें तेल लावण्याची आणि वारंवार तोंड धुण्याची चाल होती. लोकांस दिसावें ह्मणून कांहीं सोंग दाखवूं नका, हाच या ओवींतील सारांश आहे.

१८ यासाठीं कीं तूं उपास करितोस हें माणसांस नव्हे, तर तुझा बाप जो गुप्तांत आहे त्याला दिसावें, मग गुप्तांत पाहणारा तुझा बाप तुला लौकिकांत फळ देईल.

१९ पृथ्वीवर (१) कसर व कलंक नाश करितात, आणि चोर फोडून चोरी करितात, तेथें आपल्याकरितां संपत्ति सांठवूं नका;

२० तर आकाशामध्यें (२) कसर व कलंक नाश करीत नाहींत, आणि चोर फोडून चोरी करीत नाहींत, तेथें आपल्याकरितां संपत्ति सांठवा.

२१ कारण कीं जेथें तुमची संपत्ति आहे तेथें तुमचें चित्तहि लागेल.

---

(१) नी. २३:४. लुका १८:२४,२५. इब्री १३:५

(२) यशा. ३३:६. लुका १२:३३, ३४. १ तीम. ६:१९.

---

१८ "तुझा बाप जो गुप्तांत आहे इ०." ईश्वर अंतःकरणाकडे पाहतो त्याच्या पुढें ढोंग चालत नाहीं, ह्मणून पापामुळें अंतःकरणांत खेद बाळगला पाहिजे.

१९ "पृथ्वीवर कसर व कलंक." कोणी कोणी उंच वस्त्रें, सोनें, रुपें, मोतीं इत्यादिकांचा संग्रह करून ठेवितात. उंच वस्त्राला कसर लागेल, आणि सोनें रुपें इत्यादिकांस कलंक लागेल अथवा चोर नेतील असें भय आहे. या लोकींचा कोणताहि संग्रह निर्भय नाहीं. एथील संग्रहासाठीं अमर जीवात्मा धोक्यांत घालावा यांत केवढें मूर्खपण आहे.

२० "तर आकाशामध्यें इ०." अनंत काळासाठीं सिद्ध व्हावें ह्मणून काळजी व चिंता करावी. तेथें कोणी नाश करीत नाहीं अथवा कोणी वैरी लुटीत नाहीं. आकाशांत संग्रह सांठवून ठेवणें ह्मणजे देवाचें वतनदार आणि ख्रीस्ताच्या संगतीं वतनदार होणें असें आहे. आकाशामध्यें जे आपणासाठीं संग्रह करितात त्यांस अविनाशी, निर्मळ, व न कोमणारें असें वतन प्राप्त होईल.

२१ "कारण कीं इ०." ज्यांस इहलोकीं विशेष संग्रह आहे त्यांचें चित्त तिकडे लागतें. तसेंच जे खरे ख्रिस्ती आहेत ते आपला विशेष संग्रह आकाशामध्यें आहे असें मानून त्याकडे चित्त लावितील. ते आपल्या संसाराविषयीं थोडी चिंता धरून या गौरवी वतनाविषयीं अधिक मनन व काळजी करतील.

२२ डोळा शरिराचा दिवा आहे; (१) यास्तव तुझा डोळा निर्दोष असला तर तुझें अवघें शरीर उजेडमय होईल.

२३ परंतु तुझा डोळा वाईट असला तर तुझें अवघें शरीर अंधारमय होईल. असें असतां तुझ्यामध्यें जो उजेड तो अंधार असला, तर तो अंधार केवढा!

२४ कोणाच्यानें दोन धन्यांची चाकरी करवत नाहीं; (२) कां कीं तो एकाचा द्वेष करील आणि दुसऱ्यावर प्रीति करील, अथवा एकाचा पक्ष धरील आणि दुसऱ्याची उपेक्षा करील. तुमच्यानें देवाची आणि मामोनाची सेवा करवत नाहीं. (३)

---

(१) लूक ११:३४,३६. (२) लूक १६:१३. (३) गल. १:१०. २ तीम. ४:१०. याको ४:४.

---

२२ "शरीराचा दिवा इ०." जेव्हां डोळे निरोगी आहेत आणि दृष्टि कांहीं पदार्थाकडे लाविली आहे, तेव्हां सर्व स्पष्ट दिसतें; जर रोगी आहेत तर सर्व अंधुक दिसतें. दृष्टि अंगाला जेवावातानें चालविते. लाटांवरून नदीच्या पार जातांना जो दृष्टि नदीच्या पलीकडील एखाद्या झाडाकडे लावितो तो निर्भयतेनें पार जातो, परंतु पाण्याकडे लाविली तर भिऊन पडतो. तसेंच जो आकाशांतील संग्रहांकडे स्थिर चित्त लावून चालतो तो स्थिरतेनें व निर्भयतेनें सुमार्गांत चालतो. जर त्या संग्रहाकडे लक्ष लावीत नाहीं तर लवकर पापांत पडतो.

२३ "तुझ्यामध्यें जो उजेड." ह्मणजे मन किंवा आत्मा जर अंधार असेल तर अंधार केवढा मोठा." प्रत्येक पापाकडून मन अंधारमय होत चालतें, सुधारण्याची सर्व शक्ति जाईपर्यंत मन उत्तरोत्तर पापाकडून बिघडलें जातें. पापाकडून मनुष्याचें मन इतकें भ्रष्ट आणि इतकें अंधळें होतें कीं, तें खऱ्या देवाचें ज्ञान विसरतें, आणि लांकूड, दगड इत्यादिकांच्या मूर्त्ति ज्यांस दिसत नाहीं, ऐकूं येत नाहीं, व चांपसतां येत नाहीं, त्यांच्या पायां पडतात. ते ज्या ज्ञानाचा डौल मिरवितात तें अंधारच आहे.

२४ "कोणाच्यानें दोन धन्यांची चाकरी करवत नाहीं." दोघांवर मुख्य एकसारिखी पुष्कळ प्रीति करितां येत नाहीं, हा नेम उघड आहे. कोणी एकाला देवाची आणि धनाचीहि प्रीति करितां येत नाहीं. तसेंच कोणत्याहि मूर्त्तींची आणि देवाची सेवा एकदम करितां येत नाहीं. मामोन ह्मणजे धन

२५ यास्तव मी तुह्मास सांगतों कीं, आपण काय खावें आणि काय प्यावें असी आपल्या जिवाविषयीं, आणि आपण काय पांघरावें असी आपल्या शरिराविषयीं काळजी (१) करूं नका. अन्नापेक्षां जीव आणि वस्त्रापेक्षां शरीर अधिक आहे कीं नाहीं ?

२६ आकाशांतील पांखरांकडे पाहा, तीं पेरीत नाहींत, कापीत नाहींत, आणि कोठारामध्यें सांठवीत नाहींत, तरी तुमचा आकाशांतील बाप (२) त्यांस खायास देतो; तुह्मी त्यांपेक्षां मोठे आहां कीं नाहीं ?

२७ आणि काळजी करून आपल्या आयुष्याला हातभर वाढवायास तुह्मामध्यें कोण समर्थ आहे.

---

(१) १ करिं. ७:३२. फिलि. ४:६. (२) इयोब ३८:३९. लूक १२:२४.

---

असें समजावें. हिंदूंमध्यें जसी लक्ष्मी धनाची देवी मोजली आहे तसेंच प्राचीन काळचे मूर्तिपूजक मामोन हा धनाचा देव असें मोजीत असत.

२५–३४ "यास्तव मी तुह्मास सांगतों कीं इ०." एथें धनलोभ आणि ऐहिक चिंता बाळगणें याविरुद्ध शिष्यांस बोध आहे. त्यांनी शरीराविषयीं चिंताक्रांत न व्हावें ह्मणून चार कारणें काढून सांगितलीं आहेत. (१) जे उपकार देवाने पूर्वीं केले आहेत ते. "अन्नापेक्षां जीव आणि वस्त्रापेक्षां शरीर अधिक आहे कीं नाहीं?" त्याने जीव हें विशेषदान दिल्हें आहे, तर तो अन्न, वस्त्र इत्यादि सामान्य दानें देणार नाहीं कीं काय? "काळजी करूं नका." आपली गरज पुरविण्यासाठीं मेहनती व उद्योगी व्हावें हें योग्य आहे, (१ तिम. ५:८, २ थेस्स. ३:१०. रोमे. १२:११) परंतु ईश्वरावर भरवसा न ठेवितां चिंताक्रांत व्हावें हें योग्य नाहीं.

२६ एथें ईश्वरावर भरवसा ठेवण्याचें दुसरें एक कारण सांगितलें आहे. जीं पांखरें माणसाच्या उपयोगासाठीं ईश्वराने उत्पन्न केलीं त्यांस तो पोषितो. तर माणसें जीं त्यापेक्षां श्रेष्ठ आहेत त्यांची काळजी तो किती विशेषेंकरून करील ?

२७ एथें तिसरें कारण दाखविलें आहे. तुह्मी अशक्त आणि लाचार आहां. तुह्मी आपलें आयुष्य एक घटका देखील वाढवायास समर्थ नाहीं. तुह्मी कितीहि चिंता केली तरी तुह्मी ईश्वराधीन आहां. केवळ तोच तुमचा जीव वांचवायास समर्थ आहे. तर त्याला मान्य होऊन त्याजवर भरवसा ठेवा.

२८ आणि वस्त्राविषयीं कां काळजी करितां? रानांतील फुलझाडें कशीं वाढतात हें लक्षांत आणा; तीं श्रम करीत नाहींत व कांतीत नाहींत.

२९ तरी मी तुह्मांस सांगतों कीं, शलमोन देखील आपल्या सर्व वैभवांत यांतल्या एकसारिखाहि ल्याला नव्हता.

३० तर अहो अल्पविश्वासी, रानांतील गवत आज आहे आणि उद्यां भट्टींत पडेल, त्याला जर देव असा पोशाख देतो, तर तो तुह्मास विशेषेंकरून देणार नाहीं कीं काय?

३१ यास्तव आपण काय खावें, अथवा काय प्यावें, अथवा काय पांघरावें, असें ह्मणून काळजी करूं नका. (१)

३२ कां कीं या अवघ्यांविषयीं विदेशी काळजी करितात; अगखी या सर्वांची गरज तुह्मास आहे, हें तुमच्या आकाशांतील बापाला ठाऊक आहे.

३३ परंतु तुह्मी पहिल्याने (२) देवाचें राज्य आणि त्याचें न्यायीपण मिळवायास झटा, ह्मणजे तींहि सर्व तुह्मास मिळतील. (३)

३४ यास्तव तुह्मी उद्यांची काळजी करूं नका, कां कीं उद्यांची काळजी उद्यां करील; (४) ज्या दिवसाचें जें दुःख तें त्याला पुरे.

---

(१) गीत ३७:३. ५५:२२. १पेत्र. ५:७. (२) १ तीम. ४:८. (३) लेवी २५:२०,२१. १ राज. ३:१३. गीत ३७:२५. मार्क. १०:३०. (४) अनु. ३३:२५. इब्री १३:५,६.

---

२८–३१ रानांतील फुलझाडांवरून चवथें कारण सुचविलें आहे. तीं श्रम करीत नाहींत तरी ईश्वर त्यांस सुंदर पोशाक देतो. मोठ्या राजापेक्षां तीं शोभेनें अधिक शृंगारलीं आहेत. शलमोन जो इस्राएलांचा सर्वांहून धनवान व छानदार राजा होता तो देखील आपल्याला याप्रमाणें शृंगारीत नव्हता. यास्तव जीं फुलझाडें फार लवकर वाळून जातात त्यांस जर देवाने इतकी शोभा दिल्ही आहे तर तो आपल्या भक्तांची काळजी करणार नाहीं कीं काय? जो ईश्वर खोऱ्यांतल्या पुष्पाला असें शृंगारितो त्याजवर अमर माणसें फुकट भरवसा ठेवितील कीं काय?

३२–३४ "विदेशी काळजी करितात." ज्याला खरा धर्म आणि खरा देव यांविषयीं माहिती नाहीं ते. तुह्मी देवाला ओळखिलें आणि त्याच्या

## अध्याय ७.

१ तुह्मास कोणी दोष लावूं नये ह्मणून तुह्मी दोष लावूं नका; (१)
२ कारण कीं ज्याप्रकारें तुह्मी दोष लावितां त्याप्रकारें तुह्मास
दोष लावितील, आणि ज्या मापानें तुह्मी मोजून देतां (२) त्यानेंच
तुह्मास मोजून देतील.

---

(१) लूका ६:३७. रोमे. २:१. करिं. ४:५. (२) यहूदा १:७.

---

प्रीतीचा अनुभव घेतला आहे. तर तुह्मी परदेशस्थांसारिखें मूर्खपण दाखवाल कीं काय ? तुह्मी आपलीं अवघीं ईश्वराला सोपून द्या. उद्यांची चिंता करण्याकडून आजचा भार वाढवूं नका. आजचें अवश्य काम करून ईश्वरावर भरवसा ठेवा.

**सूचना**— १ दान धर्म करणें आणि एकांतीं व कुटुंबांत प्रार्थना करणें हीं अवश्य कामें आहेत असें एथें सुचविलें आहे. २—आह्मी आपलीं धर्मकृत्यें सालस मनानें आणि प्रमाणिकपणानें करावीं. ढोंगी लोक पुष्कळ आहेत. आह्मी पुण्यवान आहों असी अब्रू मिळविण्याची त्यांला फार आवड आहे. ही अब्रू मिळविण्यासाठीं ते बहुत उपास व देहदंड इत्यादि कठीण उपाय करितात. परंतु ईश्वर अंतःकरण पाहतो, तो फसत नाहीं, ही गोष्ट ते विसरतात. मनुष्याला फसविण्याकडून तरी काय लाभ होतो बरें ? ईश्वराला राग आला असतां मनुष्यकृत स्तुति काय उपयोगाची. ढोंग्यांस जें फळ प्राप्त होणार आहे तें किती भयंकर आहे, पाहा बरें. ३—धनलोभ हें मोठें मूर्खपण आहे. तेणेंकडून पुष्कळ दुर्गुण मात्र लागतात, ईश्वरापासून मन वळविलें जातें; अकस, द्वेष, हेवा इत्यादि दुर्गुण उत्पन्न होतात. कृपणाचें मन अगदीं नीच व हलकें होतें. अमर मनुष्यें अनंत काळांत राहण्यासाठीं उत्पन्न झालीं आहेत, तर या जगांतील नीच संग्रह मिळविण्यासाठीं आपल्या जीवात्म्याचा नाश करून घ्यावा, हें केवढें मूर्खपण आहे ! तर आह्मी देवाचें राज्य, आणि नीतिमत्व, आणि ज्या पवित्रतेवांचून देवाला पाहवत नाहीं, ती पवित्रता, हीं किती आग्रहानें शोधावीं !

१, २ "लावूं नका." शास्त्री आणि परोशी फार दोषारोप आणीत असत. ख्रीस्तानें ही चाल निषेधिली आणि यहूदी लोकांच्या ह्मणींची आठवण त्यांस करून दिल्ही. ती ही, ज्या ठरावानें तुह्मी ठरवितां त्याप्रमाणें तुह्मास ठरवितील. या नेमानें ईश्वरहि आमचा न्याय ठरवील. (२ शमु. २२:२७. मार्क. ४:२४. याको. २:१३.)

३ आणि तूं आपल्या डोळ्यांतलें मुसळ ध्यानांत न आणितां आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ कां पाहतोस?

४ अथवा तूं आपल्या भावाला, तुझ्या डोळ्यांतलें कुसळ मला काढूं दे, असें कसें ह्मणसील? कां तर पाहा, तुझ्या डोळ्यांत मुसळ आहे.

५ अरे ढोंग्या, तूं पहिल्याने आपल्या डोळ्यांतलें मुसळ (१) काढ, ह्मणजे आपल्या भावाच्या डोळ्यांतलें कुसळ काढायास तुला साफ दिसेल.

६ कुत्र्यांस पवित्र पदार्थ देऊं नये, (२) आणि आपलीं मोतीं डुकरांपुढें टाकूं नये, टाकिलीं तर तीं त्यांस पायांखालीं तुडवितील आणि उलटून तुह्मास फाडितील.

---

(१) गल. ६:१. (२)नी. ९:७,८. २३:९.

---

३,४ "आणि तूं आपल्या डोळ्यांतलें इ०." ही ह्मण यहूदी लोकांमध्यें फार रूढींत होती, आणि इजकडून ख्रिस्ताने त्यांची वाईट चाल निषेधिली. सर्व माणसें आपला मोठा दोष एकीकडे ठेवून दुसऱ्याचे क्षुल्लक दोष सहज निषेधितात. आपला दोष हलका आहे असें त्यांस वाटतें, पण दुसऱ्याचे दोष वाढवून ते प्रसिद्धींत आणायास झटतात.

५ "अरे ढोंग्या." तूं आपल्या शेजाऱ्यापेक्षां पवित्र आहेस असें दाखवितोस, तथापि वास्तविक पाहिलें असतां तूं त्यापेक्षां अधिक दोषी आहेस. आह्मी तुजपेक्षां शुद्ध आहों, तूं एकीकडे उभा राहा, आह्मास शिवूं नको, असें जे दुसऱ्यांला ह्मणतात आणि आपणाला पुण्यवान मोजितात ते सर्व तसेच ढोंगी नाहींत कीं काय? त्यानी आपलें अंतःकरण पाहिलें ह्मणजे तें किती ओंगळ आहे हें दिसून येईल, आणि दुसऱ्याचें कुसळ सोडून आपल्या डोळ्यांतलें मुसळ काढणें हें पुरे श्रम आहेत असें त्यांला अढळेल.

६ "पवित्र पदार्थ इ०." ह्मणजे धर्मसंबंधी बोध उपदेश वगैरे. मोतीं हें शिंपांत अढळतें. तें मोलवान आहे ह्मणून कोणत्याहि मोलवान पदार्थास त्याचा दाखला देत असतात. (मग. १७:४. १८:२२. १६. मात्थी १३:४५) या ठिकाणीं मोतीं ह्मणजे शुभवर्त्तमानांतील मुख्य सिद्धांत असें समजलें पाहिजे. कुत्रे ह्मणजे जीं माणसें कुत्र्यांचा स्वभाव दाखवून हे सिद्धांत धिःकारितात तीं. (२ पेत्र २:२२. मग. २२:१९.) डुकरें ह्मणजे

७ मागा ह्मणजे तुह्मास मिळेल, (१) शोधा ह्मणजे तुह्मास सांपडेल, ठोका ह्मणजे तुह्मास उघडेल;

८ कारण कीं जो कोणी मागतो (२) तो पावतो, आणि जो शोधितो (३) त्याला सांपडतें, आणि जो ठोकितो त्यासाठीं उघडतें.

९ आपल्या पुत्राने आपल्या जवळ भाकर मागितली तर त्याला धोंडा देईल;

१० आणि मासा मागितला तर त्याला साप देईल, असा तुह्मामध्यें कोण माणूस आहे?

---

(१) यशा. ५५:६. लुका १८:१. (३) नीति. ८:१७. इर्मि. २९:१२,१३.
(२) गीत ८१:१०,१६. योहा. १४:१३,१४. १६:२३,२४. १ योहा. ३:२२. ५:१४,१५.

---

जीं माणसें हे सिद्धांत हलके मानून आपल्या पायांखालीं तुडवितात तीं. तीं लुच्चीं, दुष्ट, दुर्व्यसनी, विलासी आहेत. डुकरांस जसें मोत्यांचें मोल समजत नाहीं, तसें त्या माणसांस शुभवर्त्तमान व सर्वकालीक जीवन यांचें मोल माहीत नाहीं. या ह्मणीकडून बहुतेक दुर्व्यसनी व लुच्चा माणसाचा स्वभाव दाखविला जातो. जे शुभवर्त्तमान घोषण करितात त्यांचा ते इतका द्वेष करितात कीं त्यांस पायांखालीं पाडावें आणि तुडवावें असी त्यांची इच्छा आहे.

७–११ "मागा ह्मणजे तुह्मास मिळेल इ०." जें ईश्वरापासून पाहिजे तें मिळविण्याचें मागणें, ठोकणें आणि शोधणें, असे तीन उपाय एथें सांगितले आहेत. आग्रहाने मागण्यांत टिकून राहावें, असें यांत दर्शविलें आहे. जें आह्मी मागूं तें मिळेल. असें वचन आहे, परंतु जें योग्य आहे तेंच मागावें. आणि तेंहि नम्रतेने, योग्य मनाने, आणि सालस बुद्धीने मागितलें पाहिजे. ईश्वर कितीएक गोष्टी देण्यास सर्वदा तयार आहे. आमच्या पापांची क्षमा करावी, आह्मास तारावें, संकटांत व मरणसमयीं आमचें शांतवन करावें, आणि आपलें राज्य सर्व पृथ्वीवर स्थापन करावें, ह्मणून तो तयार आहे. यापेक्षां भारी गोष्टी मागतां येत नाहींत, आणि या गोष्टी ईश्वर करावयास तयार आहे. कोणी कधींहि व्यर्थ मागणार नाहीं. तर, पाप्या, "माग," कृपेचें दार ठोक. तूं पापी लाचार आहेस, केवळ ईश्वर तुला तारावयास शक्तिमान आहे. "शोध." तूं आपल्या देवाला सोडून गेला आहेस. आपल्या जीवात्म्याची हानि होण्याचें मोठें भय आहे. तूं पश्चात्ताप करून ईश्वराकडे फिरसील तोपर्यंत तुला शांति आणि तारण प्राप्त होणार नाहीं. "ठोक." आग्रह कर. अनंतकाळ जवळ आला आहे. जर

११ यास्तव तुह्मी वाईट असतां आपल्या लेंकरांस (१) चांगलीं देणगीं द्यायास समजतां, तर तुमच्या आकाशांतील बापाजवळ जे मागतात त्यांस तो किती विशेषेंकरून चांगले पदार्थ देईल.

१२ याकरितां माणसांनी ज्या रीतीने तुह्मासीं वर्त्तावें ह्मणून तुमची इच्छा आहे त्याच रीतीने तुह्मीहि त्यासीं वर्त्ता; (२) कां कीं नेमशास्त्र आणि भविष्यशास्त्र हेंच आहे.

---

(१) लुका ११:११. (२) लेवी १९:१८. रोमि. १३:८-१० गल. ५:१४.

---

तूं अपश्चात्तापी होऊन मरसील तर तूं ईश्वरापाशीं कधीं जाणार नाहींस. जो कोणी मागतो तो पावतो. तर आग्रहाने मागा ह्मणजे तुमचें तारण होईल, असें देवाचें वचन आहे. यास्तव जर कोणी मागणार नाहीं तर त्याचा नाश व्हावा हें योग्य आहे. जें योग्य नाहीं तें मागितलें तर ईश्वर देईल असें समजूं नका. आह्मी मागतों त्याच गोष्टी कधीं कधीं देव देत नाहीं. आईबापें आपल्या लेंकरांच्या मागण्याप्रमाणें सर्वदा त्याला देत नाहींत. जर तीं लेंकरांवर प्रीति करितात तर जेणेंकडून त्यांचें हित होईल तेंच तीं त्याला देतात. ईश्वराने पौलसाच्या मागण्याप्रमाणेंच त्याला दिल्हें नाहीं. पण माझी कृपा तुला पुरे आहे असें त्याने सांगितलें. (२ करिं. १२:७-९) ईश्वर आपल्या लेंकरांवर आईबापांपेक्षां अधिक प्रीति करितो आणि तीं मागतात त्यापेक्षांहि अधिक चांगले पदार्थ देऊन त्यांचें हित करील.

१२ "याकरितां इ०." या नियमाला तारककृत सुवर्ण नेम, असें ह्मटलें आहे. जर सर्व माणसें या नियमाला पत्करतीं आणि याप्रमाणें चालतीं तर भांडण, हेवा, चोरी, चहाडी, व्यभिचार, इत्यादि दुष्ट कर्मे किती लवकर बंद होतीं? सर्व माणसें सुख पावतीं आणि हें जग आकाशलोकासारिखें होतें. ख्रीस्त ह्मणतो कीं नेमशास्त्र आणि भविष्यशास्त्र यांचा सारांश हाच आहे. सर्व प्रसंगीं आचरणाचा पूर्ण नियम हाच आहे. तरी हा अयोग्य कामांत लाविला जाईल असें भय आहे. कदाचित् अपराधी देखील या नियमावरून दंडापासून मोकळीक मागेल, याजक आपल्या शेजाऱ्याची मालमत्ता मागेल, उनाड लेंकरूं खेळण्यासाठीं कदाचित् भयंकर शस्त्र मागेल. परंतु यांतील कोणतेंहि देणें योग्य नाहीं. जे मागतात त्यांची अवस्था व स्वभाव आह्मास प्राप्त झाला असतां आमची इच्छा कशी होईल हें पाहावयास नको. पण आह्मी सुशिक्षित आणि समजदार

१३ अरुंद दरवाजानें आंत जा; (१) कां कीं नाशाकडे जाण्याचा दरवाजा रुंद आणि मार्ग पसरट आहे, आणि त्यास जाणारे बहुत आहेत.
१४ आणि जीवनाकडे जाण्याचा दरवाजा अरुंद आणि मार्ग संकोचित आहे, आणि ज्यांस तो सांपडतो ते थोडकेच आहेत. (२)
१५ आणि खोट्या उपदेशकांविषयीं (३) जपा, ते मेंढरांच्या वेषानें तुह्माकडे येतात, परंतु अंतरीं क्रूर लांडगे आहेत.(४)

---

(१) लुका १३:२४. (३) अनु. १३:१–३. इस. २३:१३–१६ १ योहा. ४.१.
(२) मात्थी २०:१६. २५:१–१२. रोमि. ९:२७,२९. (४) प्रेषि. २०:२९–३१.

---

असतां माणसाचें कल्याण व देवाचें गौरव व्हावें ह्मणून काय इच्छावें हें पाहिलें पाहिजे.

१३, १४ "अरुंद दरवाजानें आंत जा इ०" जीवनाचा मार्ग अरुंद आणि संकोचित आहे. नाशाचा मार्ग रुंद आणि पसरट आहे. जीवनाच्या मार्गांत चालणारे तर थोडकेच आहेत. नाशाच्या मार्गांत मोठा समुदाय आहे. जे सद्गुणी सत्यशील आणि नम्र असून आपलें तारण साधून घेण्यास झटतात, असे थोडकेच आहेत. दुष्कर्माविषयीं मदत करणारा असा मोठा समुदाय आहे. अरुंद मार्ग शोधून त्यांत चालायास प्रयत्न केला पाहिजे. जे आकाशलोकांत जावयास इच्छितात त्यांनी झटलें पाहिजे, (लुका १३:२४.)

नाशाचा मार्ग मोठा जाण,
हजारों त्यांत चालती,
सुमार्ग हा संकोचमान,
व थोडे जन धरिती.

१५ "खोट्या उपदेशकांविषयीं." जे खोटा बोध देतात ते आह्मी जीवनाचा मार्ग दाखवितों असें ते ह्मणतात. पण त्यांस कांहीं खरें ज्ञान नाहीं. ते मेंढरांचा वेष ह्मणजे धार्मिकपणाचें सोंग धरून येतात. पण अंतरीं ते क्रूर लांडगे आहेत. अश्या उपदेशकांकडून जग भरलें आहे. कित्येक फार पुण्याचें नांव मिळवितात पण त्यांचें अंतःकरण भ्रष्ट आहे.

१६ तुह्मी त्यांच्या फळांवरून (१) त्यांस ओळखाल. कांट्यांच्या झाडांवरून द्राक्षें, किंवा रिंगणीच्या झाडांवरून अंजीर काढितात काय?

१७ तर प्रत्येक चांगलें झाड (२) चांगलीं फळें देतें, आणि वाईट झाड वाईट फळें देतें.

१८ चांगल्या झाडाला वाईट फळें येत नाहींत, आणि वाईट झाडाला चांगलीं फळें येत नाहींत.

१९ जें जें झाड (३) चांगलें फळ देत नाहीं, तें तोडून अग्नींत टाकितात.

२० यास्तव त्यांच्या फळांवरून तुह्मी त्यांस ओळखाल.

२१ जो कोणी मला प्रभू (४) ह्मणतो, तो आकाशाच्या राज्यांत जाईल असें नाहीं, तर जो माझ्या आकाशांतील बापाच्या इच्छेप्रमाणें करितो तो जाईल.

२२ त्या दिवशीं मला बहुत ह्मणतील, हे प्रभू प्रभू, आह्मी तुझ्या नामानें भविष्य सांगितलें, (५) आणि तुझ्या नामानें भुतें घालविलीं आणि तुझ्या नामानें बहुत चमत्कार केले नाहींत कीं काय?

---

(१) मात्थी १२:३३.
(२) लुका ६:४३,४५.
(३) मात्थी ३:१०. योहा. १५:२,६.
(४) यशा. ४८:१,२. मात्थी २५:११,१२. लुका ६:४६. १३:२५. रोमि. २:१३.
(५) गण. २४:४. राज. २२:११. इर्म. २३:१३. प्रेषि. १९:१३-१५. १ करिं. १३:२.

---

१६–२० "तुह्मी त्यांच्या फळांवरून त्यांस ओळखाल." हें लक्षण चुकत नाहीं. जसें झाडाविषयीं तसें मनुष्याविषयींहि सहज ठरवितां येतें. त्याचें फळ ह्मणजे आचरण यावरून प्रमाण पटतें. तर जे आपल्याला पुण्यवान ह्मणवितात आणि उपदेश करण्याची सत्ता दाखवितात, परंतु मलीन चिंध्या पांघरून व तोंड म्लान करून आपलें आयुष्य मलिनपणांत घालवितात आणि लोकांच्या कल्याणासाठीं कांहीं करीत नाहींत, त्यांविषयीं आह्मी काय सांगावें? ते कांट्यांच्या झाडांसारिखे आहेत आणि अग्नींत टाकले जाण्यास योग्य आहेत कीं नाहींत?

२१, २२ "जो कोणी इ०." जे योग्य नाहींत असे पुष्कळ लोक न्यायकाळीं आकाशलोकांत येण्याची आशा धरितील. आह्मी आपलें आयुष्य देहदंड तपश्चर्या इत्यादिकांत घालविलें आहे, असें ते ह्मणतील, परंतु त्यांचें ह्मणणें व्यर्थ होईल. जरी त्यांनी चमत्कार केले तरी ते चमत्कार त्यांच्या

२३ त्या वेळेस मी त्यांस उघडें सांगेन कीं, म्या तुह्मास कधींहि
ओळखिलें नाहीं; अहो अन्याय करणाऱ्यानो, मजपासून निघून जा. (१)
२४ यास्तव (२) जो कोणी माझ्या या गोष्टी ऐकून त्यांप्रमाणें
करिल, त्याला मी शहाण्या (३) माणसासारिखें लेखीन; त्यानें आपलें
घर खडकावर बांधिलें.
२५ मग पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला आणि त्या
घरास लागला, तरी तें पडलें नाहीं, कारण कीं त्याचा पाया खडका-
वर घातला होता. (४)
२६ परंतु जो कोणी माझ्या या गोष्टी ऐकून त्याप्रमाणें करीत
नाहीं, तो मूर्ख (५) माणसांसारिखा होईल, त्यानें आपलें घर वाळू-
वर बांधिलें;
२७ मग पाऊस पडला, पूर आला, वाराहि सुटला (६) आणि
त्या घरास लागला, तेव्हां तें पडलें आणि त्याचा मोठा नाश झाला. (७)

(१) गीत ५:५. मात्थी २५:४१. प्रग. २२:१५.
(२) लुका ६:४७.
(३) गीत १११:१०. ११९:९९,१३०.
(४) गीत ९२:१३–१५.
(५) १ शमु. २:३०. इसं. ८:९.
(६) १ करिं. ३:१३.
(७) इब्री १०:२६,१६.

तारणाच्या उपयोगीं पडणार नाहींत. मिस्र देशांतील जादूगीर आणि बलाम यांनी जे चमत्कार केले त्यांवरून त्यांच्या धार्मिकपणाविषयीं कांहीं प्रमाण पटलें नाहीं. आह्मी ईश्वरापासून निरोप घेऊन आलों असें ह्मणून जे फसविण्यानें चमत्कार करून प्रमाण पटवायास झटतात, त्यांस ईश्वर चमत्कार करण्याची शक्ति देईल असें समजायाचें नाहीं, कारण कीं अशी शक्ति दिल्यानें भ्रांति व खोटेपण यांला आश्रय दिल्यासारिखा होईल. परंतु देव कधीं कधीं दुष्ट लोकांकडून आपला पराक्रम दाखवीत असतो यांत कांहीं आश्चर्य नाहीं.

२३ "म्या तुह्मास कधीं ओळखिलें नाहीं." म्या तुह्मास कधींहि आपले मित्र असें अंगीकारलें नाहीं. (गीत १:६–११. तिम. २:१९. १ करिं. ८:३.) तुह्मी माझे खरे शिष्य नव्हतां, खरे ख्रिस्ती असे कधींहि नव्हतां. तुह्मी मजवर खरा विश्वास कधींहि ठेविला नाहीं.

२४–२७ ख्रीस्ताचें ऐकण्याचें आणि त्याला मान देण्याचें अगत्य दाखविण्यासाठीं हा दाखला मनांत ठसण्याजोगा आहे. वाळूवर बांधलेलें घर

२८ तेव्हां असें झालें कीं, येशूनें या गोष्टी संपविल्यावर समुदाय त्याच्या उपदेशावरून थक्क झाले. (१)

२९ कारण कीं शास्त्र्यांसारिखा नाहीं, तर त्यानें अधिकार असल्यासारिखा त्यांस उपदेश केला.

---

(१) इर्म. २३:२९. मार्क. ६:२.

---

जसें पुराने हांसळतें त्याप्रमाणें संकटसमयीं व मरणसमयीं ज्यांची आशा प्रभूवर नाहीं त्यांचा नाश अकस्मात होतो. ईश्वर दुष्टांवर अग्नि, व गंधक, व भयंकर वादळ यांची वृष्टि करील. आतां जोंपर्यंत ख्रिस्त बोलावीत आहे तोंपर्यंत पाप्यांनी त्वरेनें धांवून त्याला शरण जावें.

२८,२९ "ज्यानें अधिकार असल्यासारिखा." परोशी लोक उगीच वादविवाद करण्यांत पुष्कळ वेळ घालवीत असत. ख्रिस्त हा स्पष्ट, उघड आणि मनांत ठसण्याजोगा असा उपदेश करीत असे. त्याचें एकून बहुतेक वरमले. जरी ते त्याच्या उपदेशास मान्य होईनात तरी तो त्यांच्या मनांत ठसला. हा डोंगरावरील उपदेश सर्वांच्या अंतःकरणांत ठसण्याजोगा आहे. ढोंग बाळगण्याचें केवढें भय व केवढें पाप आहे हें एथें स्पष्ट दाखविलें आहे. सर्व लोक आकाशलोकांतील सुखाची आशा बाळगतात आणि तें मिळविण्यासाठीं आपल्या बुद्धीनें हजारों उपाय योजून चालू करितात, परंतु देवानें एकच तारणोपाय प्रसिद्ध केला आहे. ईश्वरी क्षोभाची वृष्टि जगावर येईल तेव्हां कांहीं आश्रय न सांपडावा हें किती भयंकर होईल. पाप्यांनी आतांच येऊन तारण घ्यावें ह्मणून ख्रिस्त बोलावितो. तो जीवनाचा खरा मार्ग दाखवितो. तो स्वतः वाट, आणि खरेपण आणि जीवन आहे. (योहा. १४:६.) त्यावांचून दुसरा कोणी पाया घालायास समर्थ नाहीं. (१ करिं. ३:११.) तो निवडलेला मोलवान असा कोपऱ्याचा मुख्य धोंडा आहे. (१ पेत्र. २:६. एफ. २:२०.) सर्व लोक जर हा डोंगरावरील उपदेश मानते तर हें जग किती पवित्र आणि शांत होतें. सर्व ढोंग नाहींसें होतें. दुर्व्यसन, लुच्चेगिरी, आणि सर्व प्रकारचे दुर्गुण बंद होऊन, सर्वत्र आनंद, शांति, आणि सुख भरतें.

## अध्याय ८.

१ मग तो डोंगरावरून उतरल्यावर मोठे समुदाय त्याच्या मागें चालले.

२ तेव्हां पाहा, एक कोडी (१) माणूस येऊन त्याच्या पायां पडून ह्मणाला, हे प्रभू, मला शुद्ध करायाची तुला इच्छा असली तर शक्ति आहे.

३ तेव्हां येशूने हात लांब करून त्याला स्पर्श केला, आणि ह्मटलें, माझी इच्छा आहे, शुद्ध हो. आणि तेव्हांच त्याचें कोड गेलें आणि तो शुद्ध झाला.

(१) मार्क. १:४०. लुका ५:१२.

१,२ "एक कोडी माणूस येऊन." कोड हा रोग भयंकर आहे. त्याचा एक प्रकार असा आहे कीं, प्रथम अवयवांच्या टोंकांपासून आरंभ होऊन संधि शिथिल होतात आणि हातापायांचीं बोटें गळून पडतात. हा रोग हळूहळू काळिजास लागतो, मग कांहीं उपाय चालत नाहीं. मी उत्तरोत्तर क्षीण होत आहें असें कोड्याला कळतें. हा रोग स्पर्शसंचारी आणि वंशपरंपरेने चालत असतो. या रोगापेक्षां दुसरी कोणतीहि चांगली उपमा पापाला लागत नाहीं. या रोगासारिखा प्रथम पापाला अल्प दुर्गुणापासून आरंभ होतो, मग तें दुर्गुणाप्रमाणें उत्तरोत्तर इतकें वाढतें कीं त्याकडून सर्व चाली बिघडतात, सदसद्विवेक नाहींसा होतो, अंतःकरण बिघडतें आणि शेवटीं जीवाचा नाश होतो. "मला शुद्ध करायाची." कोड हें इतकें त्रासदायक होतें कीं त्यापासून बरें करणें हें शुद्ध करणें असें ह्मणणें योग्य होतें. पापाविषयींहि तसेंच आहे. आमची क्षमा केली पाहिजे इतकेंच केवळ नव्हे, पण पापापासून शुद्ध केलें पाहिजे. "तुला इच्छा असली तर." ख्रीस्त मला बरें करायास समर्थ आहे असा पूर्ण विश्वास कोड्याने दाखविला. तसेंच सर्व पाप्यांनी तारणाऱ्याला शरण जावें. ख्रीस्त मला तारायास समर्थ आहे असें त्यांस समजावें. तरी तारणाविषयीं माझा कांहीं हक्क नाहीं, जर तारण होईल तर ईश्वरी कृपेनेच होईल असेंहि समजावें. अशी भावना बाळगून जो कोणी ख्रीस्ताकडे येतो तो कधींहि घालविला जाणार नाहीं.

३ "स्पर्श केला." कोड्याला स्पर्श केला असतां विटाळ होतो, असें यहूदी लोक मानीत असत. (लेवी १३:३.) परंतु ख्रीस्त पाप्यांस तारा-

४ मग येशूने त्याला ह्मटलें, संभाळ, कोणाला सांगूं नको, (१) तर जा, आपणास याजकाला दाखीव, आणि त्यांस प्रमाण पटावें ह्मणून मोशयानें जें अर्पण नेमिलें तें वाहा. (२)

५ मग येशू कफरणाहूमांत आल्यावर कोणीएका शतपतीनें (३) त्याजवळ येऊन त्यास असी विनंती केली कीं;

६ हे प्रभु, माझा चाकर वातरोगानें भारी पीडा पावून घरांत पडला आहे.

७ मग येशू त्याला ह्मणाला, मी येऊन त्याला बरें करीन.

८ तेव्हां शतपतीनें उत्तर दिल्हें कीं, हे प्रभु, त्वां माझ्या छपराखालीं यावें, असा मी योग्य (४) नाहीं, पण शब्द मात्र बोल, (५) ह्मणजे माझा चाकर बरा होईल.

(१) मात्थी ९:३०. मार्क. १:४३. (४) गीत १०:१७. लुका १५:१९,२१
(२) लेवी १४:२. (३) लुका ७:२. (५) गीत ३३:९. १०७:२०.

याला आला, आणि त्यांचा धिःकार न करितां त्यांला तारण द्यावयास जवळ बोलावितो. "माझी इच्छा आहे, शुद्ध हो." जो सर्वसमर्थ आहे त्याचें हें बोलणें आहे, इच्छेकडून, केवळ शब्देंकडून, तो सर्वांहून वाईट रोग बरा करितो. हा खरा तारणारा आहे असी लोकांची खातरी करण्यासाठीं हा चमत्कार विशेष योग्य आहे.

४ "कोणाला सांगूं नको." याजकांकडे जाऊन मी शुद्ध झालों असें प्रमाण पटवून त्या कोड्याला अर्पण वाहणें भाग होतें. चमत्कार वास्तविक झाला याविषयीं प्रमाण पटविण्याचें अगत्य होतें. "त्यांस प्रमाण पटावें." ह्मणजे लोकांस याजकांची साक्ष हें प्रमाण आहे असें त्यांनी मानिलें. कोड्यानें लोकांत सहवास करण्यापूर्वी त्याच्या शुद्धतेविषयीं याजकांची साक्ष घ्यावी लागली ह्मणून त्यांची साक्ष मिळविण्याचें विशेष अगत्य पडलें.

५ "कफर्णाहूमांत." मात्थी ४:१३. इजवरील व्याख्या पाहा. "शतपतीनें." जो शंभर माणसांच्या टोळीवर होता तो. यहूदा देश रोमी सरकारच्या अमलांत होता; त्या सरकारानें लोकांला आपल्या ताब्यांत राखण्यासाठीं त्या देशांत रखवालदार ठेवले होते. हा शतपति जन्मानें मूर्त्तिपूजक होता असें दिसतें. "वातरोगानें." मात्थी ४:२४. इजवरील व्याख्या पाहा.

८ "मी योग्य नाहीं." असें बोलून त्यानें नम्रता दाखविली. आणि

९ कारण कीं मी हाताखालचा माणूस आहें, तरी माझ्या स्वाधीन शिपाई आहेत, आणि एकाला, जा, असें सांगतों ह्मणजे तो जातो, आणि दुसऱ्याला, ये, ह्मणजे तो येतो, आणि माझ्या चाकराला, अमुक कर, ह्मणजे तो करतो.

१० तेव्हां येशू हें ऐकून आश्चर्य पावला आणि मागें चालणाऱ्यांस ह्मणाला, मी तुम्हास खचीत सांगतों कीं, इस्राएलांतहि एवढा विश्वास (१) मला अढळला नाहीं.

११ अणखी मी तुम्हास सांगतों कीं, (२) पूर्वेकडून व पश्चिमेकडून बहुत माणसें येतील, आणि आब्राहाम व इझाक व याकोब यांसंगतीं आकाशाच्या राज्यांत बसतील.

---

(१) मात्थी १५:२८. (२) यशा. २:२. (३) लुका १३:२९. रोम. ११:१८. एफ. ३:६. प्रग. ७:९.

---

ख्रीस्त हा फार थोर व सर्वशक्तिमान आहे असा विश्वास दाखविला. मी तारण पावण्यास योग्य नाहीं असें प्रत्येक पश्चात्तापी पाप्यास वाटतें.

९ "कारण कीं मी हाताखालचा माणूस आहे." ख्रीस्त सर्वशक्तिमान् आहे असा पूर्ण भरवसा त्यानें दाखविला, केवळ त्याची आज्ञा मागितली. ख्रीस्ताची आज्ञा मात्र सफळ होईल असा विश्वास त्यानें दाखविला.

१० "इस्राएलांतहि एवढा विश्वास." इस्राएल हें नाम याकोबाला दिल्हें होतें. (उत्प. ३२:२८,२९.) कारण कीं त्यानें प्रार्थनेंत टिकून आशीर्वाद मिळविला. तो बारा पूर्वजांतील एक होता आणि हें नाम सर्व यहूदी राष्ट्राला दिल्हें होतें. सर्व यहूदी लोकांतहि मला एवढा विश्वास सांपडला नाहीं असें ख्रीस्त ह्मणतो.

११ "पूर्वेकडून व पश्चिमेकडून." ह्मणजे सर्व पृथ्वीतील. (यशा. ४५: ६. ५९:१९.) मूर्तिपूजक लोकांतील ह्या शतपतीनें प्रथम ख्रीस्तावर विश्वास ठेविला, असें दिसतें. परंतु ख्रीस्तानें तेव्हां सांगितलें कीं राष्ट्रांतील बहुतेक विश्वास धरून तारण पावतील. हें ह्मणणें हल्लीं पूर्ण होत चाललें आहे. ईश्वर सर्व राष्ट्रांला तारण घ्यावयास बोलावितो, आणि बहुत लोक ईश्वराकडे वळून ख्रीस्ताचें शुभवर्तमान अंगीकारीत आहेत. एथें हिंदुस्थानांत देखील खऱ्या ज्ञानाचा आणि खऱ्या धर्माचा प्रकाश पडत चालला आहे. याच्या पुढें खोटे मार्ग नाहींसे होतात. जे आब्राहाम, इझाक, याकोब यांसंगतीं सर्वकालिक जीवनाचे वतनदार होणार आहेत अशा बहुतेकांस ईश्वर आपल्या राज्यांत बोलावून आणीत आहे.

१२ परंतु राज्यांतील (१) पुत्र बाहेरच्या अंधारांत पडतील, तेथें रडणें व दांत खाणें होईल. (२)

१३ मग येशू शतपतीला ह्मणाला, जा, आणि त्वां विश्वास धरल्याप्रमाणें तुला होवो. त्याच घटकेस त्याचा चाकर बरा झाला.

१४ मग येशूने पेत्रसाच्या घरांत जाऊन त्याची सासू (३) तापानें पडली आहे, असें पाहिलें.

१५ तेव्हां तो तिच्या हाताला शिवल्यावर तिचा ताप निघून गेला, मग ती उठून त्यांची सेवा करूं लागली.

(१) माथ्यी ७:२२,२३.(२)माथ्यी १३:४२,५०.(३)मार्क. १:३०,३१. लुका ४:३८,३९.

१२ "परंतु राज्यांतील पुत्र." ह्मणजे यहूदी लोक. आह्मी देवाचे निवडलेले लोक आहों, आणि आह्माला इहलोकीं मोठें राज्य व वैभव प्राप्त होणार आहे असें त्यांस वाटलें. ख्रीस्तानें त्यांस स्पष्ट सांगितलें कीं तुह्मांतील बहुतेक नाश पावतील, परंतु बहुतेक मूर्तिपूजक मजवर विश्वास ठेवून तारण पावतील. "बाहेरच्या अंधारांत." ही उपमा परलोकींच्या दंडाला दिल्ही आहे. ही उपमा रोमी तुरुंगापासून घेतली असेल. त्यांचा तुरुंग तळघरांत होता त्यांत सूर्याचा प्रकाश कधीं पडत नसे ह्मणून तो सर्वदा अंधारमय, ओला व मळीण होता. त्यांत बंदिवान लोक रडत, कण्हत, आणि मोठया शोकांत आपलें आयुष्य घालवीत असत. तसेंच जे अपश्चात्तापी असून मरतात ते उजेड, शांति, आनंद, आशा यांस मुकून उदासीन अंधारांत कोंडले जातील. तेथें रडणें आणि दांत खाणें सर्वदा होईल.

१३ "त्याच घटकेस त्याचा चाकर बरा झाला." हा वास्तवीक चमत्कार असें प्रमाण पटलें. त्याला लोकांस फसविण्याचा प्रसंग नव्हता. त्याने केवळ शब्दाने चाकरास बरें केलें. ही गोष्ट लुका ७:१—१० एथेंहि लिहिली आहे. शतपतीच्या मित्रानेहि त्यासाठीं आग्रह केला असें लुकानें कळविलें आहे.

१४,१५. ही गोष्ट मार्कस १:२९,३१ आणि लुका ४:३८—४१ यांत आहे. मार्कस ह्मणतो कीं शिमोन व अंद्रयास हे एका ठिकाणीं राहत होते आणि याकोब व योहान्न हे त्यांबरोबर त्यांच्या घरीं गेले; आणि ख्रीस्तानें हा चमत्कार केल्यापूर्वीच त्या रोग्याविषयीं ते त्यापासीं बोलले होते. ह्या चमत्काराविषयीं संशय घेण्याची कांहीं जागा नाहीं; ती एकाएकीं बरी झाली. यावरून पेत्रसाला बायको होती असें प्रमाण पटतें. पेत्रस हा

१६ आणि संध्याकाळ झाल्यावर लोकानी बहुत भूतग्रस्तांस (१) त्याच्या जवळ आणिलें, तेव्हां त्याने भुतें शब्दानेच घालविलीं, आणि सर्व दुखणाइतांस बरें केलें.

१७ जें यशाया भविष्यवाद्याने सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें ह्मणून असें झालें, तें असें कीं, त्याने स्वतां आमचे विकार घेतले आणि आमचे रोग वाहिले. (२)

---

(१) मार्क. १:३२. (२) यशा. ५३:४. १ पेत्र.२:२४.

---

मंडळीचा मस्तक व ख्रीस्ताचा प्रतिनिधि आहे आणि सांप्रत त्याच्या बदली पोप आला आहे असें रोमन्‌काथोलिक लोक ह्मणतात. तर उपाध्यांनी बायको करूं नये असें कशावरून ह्मणतात? पेत्रसाला बायको होती असें असतां ख्रीस्ताने त्याला कां नाकारिलें नाहीं? या गोष्टीविषयीं रोमन्‌काथोलिक लोकांत केवढा भ्रम आहे, पाहा. लग्न हें सर्वांस मान्य आहे, असें सांगितलें आहे. (इब्री १३:४.)

१६ "संध्याकाळ झाल्यावर." ही शाब्बाथाची संध्याकाळ होती. (मार्क. १:२१—३२.) यहूदी लोक एका संध्याकाळापासून दुसरी संध्याकाळपर्यंत दिवस मानीत असत. (लेवी २३:३२.) शाब्बाथ दिवसीं ते आपल्या रोगी मनुष्यांस निरोगी करण्याकरितां त्याजवळ आणीत नसत. (लुका १३:१४.) परंतु शाब्बाथ संपूं लागतांच बहुत समुदाय मिळाले. त्यांनी त्याचे चमत्कार ऐकिले होते ह्मणून ते आपआपल्या रोगी नातलगांस बरोबर घेऊन आले. या चमत्कारांवरून ख्रीस्ताचें केवळ देवपण नव्हे पण त्याचें उपकारीकपणहि दिसून येतें. कृष्णाविषयीं ज्या कल्पित गोष्टी आहेत ह्मणजे त्याने बारा गांव अग्नि गिळला, अणखी दुसरीं पुष्कळ चमत्कारिक व लज्जाप्रद कामें केलीं त्यांप्रमाणें जर ख्रीस्ताने केलें असतें तर यावरून त्याचा पराक्रम दिसून आला असता खरा, पण तो निष्पापी तारणारा असा कसा ठरला असता? ख्रीस्ताने जे चमत्कार केले ते निरुपयोगी नव्हते पण परोपकारक होते, आणि त्यांकडून त्याने पापी मनुष्यांवर अनंत प्रीति व दया दाखविली. "भूतग्रस्तांस." मात्थी ४:२४. या ओवीवरील व्याख्या पाहा.

१७. यशा. ५३:४ पाहा. ख्रीस्त, हा आह्माकरितां दुःख सोसील आणि प्रायश्चित्त करील असें भविष्यवाद्याने स्पष्ट सांगितलें होतें. ख्रीस्ताने आमचे विकार आणि रोग वास्तविक वाहिले आहेत. तो पृथ्वीवर होता तेव्हां तो शब्देंकडून रोग दूर करीत असे. त्याला सर्वदां आपल्या लोकांची दया

१८ नंतर येशूने आपल्या सभोंवते बहुत समुदाय आहेत, हें पाहून पलिकडे जायास सांगितलें.

१९ मग कोणी शास्त्री जवळ येऊन त्याला ह्मणाला, हे गुरू, जेथें जेथें तूं जासील तेथें मी तुझ्या मागें येईन. (१)

२० तेव्हां येशूने त्याला ह्मटलें, कोल्हडांस बिळें व आकाशांतील पांखरांस कोटीं आहेत, परंतु मनुष्याच्या पुत्राला डोकें टेंकायास ठिकाण नाहीं.

२१ मग त्याच्या शिष्यांतील अणखी एक त्याला ह्मणाला, हे प्रभू, पहिल्याने माझ्या बापाला पुरायास मला जाऊं दे. (२)

२२ परंतु येशूने त्याला ह्मटलें, तूं माझ्या मागें ये, आणि जे मेलेले त्यांस आपल्या मेलेल्यांस पुरूं दे.

---

(१) लुका ९:५७,५८. (२) १ राज १९:२०.

---

येत असती. त्यांच्या दुःखावस्थेंत तो त्यांचें समाधान व शांतवन करीत असतो. पापामुळें जो दंड योग्य आहे तो त्याने स्वतः आपल्या अंगीं सोसिला. येणेंकडून पाप आणि पापाचें प्रतिफळ सर्व काळपर्यंत दूर करण्याचा उपाय योजिला आहे. तर जसा बचाऱ्या पाप्यांस पाहिजे तसा हा दयाळू तारणार आहे.

१८ "पलिकडे." ह्मणजे तिबेरयस समुद्राच्या पूर्वेकडे.

१९, २० "कोणी शास्त्री इ०." त्याने ख्रीस्ताचे चमत्कार पाहिले असतील, आणि आह्मी त्याच्या मागें जातों तर आह्माला कांहीं लाभ होईल असें त्यास वाटलें असेल. यास्तव ख्रीस्ताने त्यांजला आपलें दरिद्रपण दाखविलें. ख्रीस्त, हा या आपल्या जगांत देखील गरीब फिरस्ती होता. त्याला घर देखील नव्हतें. तसेंच जे त्याच्या मागें जातील त्यांनीहि पृथ्वींतील लाभाकडे दृष्टि देऊं नये. "मनुष्याच्या पुत्राला." ही संज्ञा ख्रीस्त आपल्याला वारंवार देत असे, यावरून समजतें कीं आपलें देवपण दाखविण्यापेक्षां आपलें मनुष्यपण दाखवायास त्याला अगत्य वाटलें. त्याच्या कामावरून त्याचें देवपण दिसून येतें. पण मनुष्यांसीं व आपणासीं फार जवळचा संबंध आहे हें दाखवावें आणि मनुष्यांवर आपली प्रीति व दया फार आहे हें दाखवावें ह्मणून तो आपणाला ही संज्ञा वेळोवेळ देत असे

२१ "शिष्यांतील." ह्मणजे ऐकणाऱ्यांतील.

२२ "जे मेलेले त्यांस आपल्या मेलेल्यांस पुरूं दे," एथें मेलेले या

२३ मग तो तारवावर चढल्यानंतर त्याचे शिष्य त्याच्या मागें गेले.
२४ तेव्हां पाहा, (१) समुद्रांत असें मोठें वादळ उठलें कीं, तारूं लाटांनी झांकून गेलें, परंतु तो झोपेंत होता.

(१) मार्क. ४:३७. पुढें. लूक. ८:२३. पुढें.

शब्दाचे दोन अर्थ आहेत. बहुत लोक धर्माविषयीं मेलेले आहेत. ते आपलें तारण साधून घेण्यास कांहीं प्रयत्न करीत नाहींत. ते जगीक गोष्टी मिळवायास उत्कंठित असतात, परंतु आकाशलोकींच्या सुखाची कांहीं आस्था धरीत नाहींत. ते पापामध्यें मेलेले आहेत. (एफ. २: १.) ख्रीस्त ह्मणतो, अस्यांला मेलेल्यांस संभाळूं दे; पण तूं माझ्या मागें ये. असी आज्ञा करण्याचीं कदाचित् दोन कारणें असतील. हा तरुण वास्तविक विश्वास धरितो किंवा नाहीं हें पाहावें, असें कदाचित् ख्रीस्ताच्या मनांत होतें. जो खरा विश्वास धरितो तो आपल्या नातलगांस संकटांत देखील सोडायास तयार होतो. ( मात्थी १०:३७. लुका १४:२६. ) अणखी हा जर घरीं जातो तर त्याचे नातलग त्याची निंदा करितील आणि त्याला माघारें येऊं देणार नाहींत, असें कदाचित् ख्रीस्ताला वाटलें असेल. सांप्रतहि असेंच घडत असतें. ख्रिस्ती मार्ग खरा अहे असी खातरी धरून लोक ख्रीस्ताला अंगीकारण्याचा निश्चय करितात, परंतु एकाएकीं अंगीकारण्याचें त्यांस धैर्य नसतें. त्यांला आपल्या नातलगांस सोडायास अवघड पडतें. पहिल्याने आह्मी आपल्या नातलगांस समजावूं मग त्यांसुद्धां येऊन ख्रीस्ताला अंगीकारूं, असें ते ह्मणतात. परंतु नातलग ऐकत नाहींत ह्मणून ते पश्चात्ताप करणें व विश्वास धरणें यांविषयीं हयगई व उशीर करून शेवटीं नाश पावतात. आईबाप व नातलग यांजवर प्रीति करावी ह्मणून ख्रिस्ती शास्त्रांत सांगितलें अहे खरें, तथापि या गोष्टीकडून अथवा दुसऱ्या कोणत्याहि गोष्टीकडून तारण साधण्याविषयीं अडथळा न व्हावा.

२३ "तारवावर." ही गोष्ट तिबिरयस समुद्रावर झाली. "त्याचे शिष्य." केवळ त्याचे प्रेषित नव्हे पण दुसरे पुष्कळ ऐकणारे त्याच्या मागें गेले असतील. त्याच्या बरोबर दुसरीं कांहीं तारवें होतीं. ( मार्क. ४:३६. )

२४ "तारूं लाटांनी झांकून गेलें." लाटा तारवावर अस्या उसळल्या कीं तें लवकरच पाण्याने भरून बुडेल असें भय वाटत होतें. ( मार्क. ४:३७.) तेव्हां ख्रीस्त निजला होता. वादळ न उठावें असें करण्यास तो समर्थ होता, पण असें केलें असतें तर आपला पराक्रम दाखविण्याचा हा प्रसंग सांपडला नसता.

२५ तेव्हां त्याचे शिष्य येऊन त्याला जागें करून ह्मणूं लागले, हे प्रभू, आह्मास तार, आह्मी बुडतों.

२६ मग त्याने त्यांस ह्मटलें, अहो अल्पविश्वासी, तुह्मी कां घाब-रलां ? मग त्याने उठून वारा व समुद्र यांस धमकाविलें, (१) आणि मोठी शांति झाली.

२७ तेव्हां तीं माणसें आश्चर्य करून बोललीं, हा कसा मनुष्य आहे, कां कीं वारा व समुद्र हे देखील त्याचें ऐकतात.

---

(१) ईयो. ३८:११. गीत ८९:९. १०७:२९.

---

२५ "आह्मी बुडतों." आह्मी मोठया भयावस्थेंत आहों असें शिष्यांस वाटलें. तेव्हां त्यांनी ख्रीस्ताकडे धावून त्यावरील भरवसा दाखविला. अ-सेंच सर्व पाप्यांनी करावें. आत्म्याचा नाश होण्याचें त्यांला मोठें भय आहे. आणि त्याला तारायास केवळ ख्रीस्तच समर्थ आहे.

२६ "तुह्मी कां घाबरलां ?" देवाचा पुत्र आह्माजवळ आहे, तो आ-ह्माला तारावयास समर्थ आहे, त्याच्या योगाने आह्मी निर्भय आहों, असी आठवण त्यांनी करावयाची होती. त्यांनी ख्रीस्ताचा धांवा केला हें अयोग्य केलें नाहीं, पण भय धरिलें हें अयोग्य केलें. ख्रीस्ताबरोबर असतां आह्मी निर्भय आहों. मरण रोग इत्यादि संकटांत देखील ख्रिस्ती लोकांनी भिऊं नये. "यांस धमकाविलें." ह्मणजे शांत होण्याची आज्ञा केली. "मोठी शांति झाली." लागलाच वारा राहिला. हा केवढा पराक्रम होता! ख्री-स्ताच्या देवपणाविषयीं हें किती चांगलें प्रमाण आहे. तो केवळ शब्देंकरून भयंकर वादळ शांत करितो.

२७ "आश्चर्य करून बोललीं." ते थक्क झाले होते. हा कोण आहे, हा केवढा पराक्रम, असें त्यांस वाटलें. हा बोलतो, आणि वारा व समुद्र हे त्यास मान्य होतात. हा वास्तविक देव आहे, असें समजून ते सर्व वि-स्मित होऊन त्याच्या समोर उभे राहिले. लाटा उसळत होत्या, वारा भणभण सुटला होता, तारूं खालीं वर झोके खात होतें, खलासी लोक भयभीत झाले होते, पण ख्रीस्ताच्या हुकुमाने सर्व शांत झालें. हा पराक्रम थोर आणि भव्य होता. ज्याने याप्रमाणें महाभूतें शमविलीं तो पाप्याचें मनहि शांत करायास समर्थ आहे. पाप्यावर देवाचा क्रोध येण्याजोगा आहे. तो नरकांत बुडविण्यासारिखा आहे. परंतु जेव्हां तो ख्रीस्ताजवळ येऊन दया मागतो, तेव्हां ख्रीस्त त्याचें ऐकतो, आणि त्याचें भय दूर करितो.

२८ मग तो पलिकडे गर्गशांच्या देशांत गेल्यावर, (१) दोन भूतग्रस्त मनुष्य थड्यांमधून निघून त्याला भेटले; ते एवढे विकराळ होते कीं कोणाच्याने त्या वाटेने जाववेना.

२९ तेव्हां पाहा, ते ओरडत बोलले, हे येशू, देवाच्या पुत्रा, आमचा व तुझा काय संबंध? नेमलेल्या वेळेपूर्वी तूं आह्मास पिडायास एथें आलास काय?

---

(१) मार्क ५:१. लूक. ८:२६. पुढें.

---

तेव्हां पापी निर्भय होतो. या आयुष्यांत त्याच्या मनामध्यें शांति व आनंद उत्पन्न होतात, आणि शेवटीं तो आकाशलोकांत सर्वकाळ राहायास जातो. २८–३४. ही गोष्ट मार्कस ५:१–२०. व लुका ८:२६–३८. यांत आहे.

२८ "गर्गशांच्या." मार्क. (५:१.) गादारेकरांच्या ह्मणतो. गर्गश्यांचा देश गादाऱ्याच्या दक्षिणेस सुमारें ६ कोसांवर होता. मात्थी एका शहराचें नाम सांगतो, यावरून तो देश त्यांस माहीत होता पण एका सारिखीच गोष्ट लिहिण्याविषयीं त्यांचा एकोपा नव्हता असें प्रमाण पटतें. "दोन भूतग्रस्त मनुष्य." मार्कस व लुका यानी केवळ एकाविषयीं लिहिलें. मार्क. ५:२. लुका ८:२७. एक दुसऱ्यापेक्षां विक्राळ असेल ह्मणून त्यानी केवळ त्याविषयीं लिहिलें. अणखी तो नगराबाहेर थडयांत राहत होता, असें लुका ह्मणतो. लोकांला त्याची गोष्ट अधिक समजली असेल. "थडयांमधून निघून." यहूदी लोकांचीं थडीं बहुत करून गुहा होत्या आणि त्या फारकरून मोठया असत. रान, झाडी, पर्वत, अस्या ठिकाणीं तीं थडीं होतीं. वेडे व भूतग्रस्त बहुधा अस्या ठिकाणीं राहत असत. कधीं कधीं या भयंकर थडयांमध्यें लुटारूहि राहत असत.

२९ "देवाच्या पुत्रा." त्यांची सुभक्ति आणि दत्तपुत्रपण दाखविण्यासाठीं कधीं कधीं माणसालाहि देवाचा पुत्र अथवा लेंकरूं ह्मणत असत. परंतु ख्रीस्ताला देवाचा पुत्र ह्मटल्यावरून तो भविष्यवाद्यांपेक्षां (इब्री १:१,२.) आणि मोश्यापेक्षां (इब्री ३:६.) श्रेष्ठ आहे असें दाखविलें आहे. आणि या संज्ञेवरून बापासीं त्याचा जवळचा संबंधहि दिसून येतो. हाच संबंध त्याच्या पुन्हा उठण्याकडून, (गीत २:७. प्रेषि. १३:३३.) आणि ईश्वरी शक्तीकडून त्याचें गर्भधारण झालें, (लुका १:३५.) यावरूनहि दाखविला आहे. ख्रीस्ताला देवाचा पुत्र ह्मणणें हें देवासमान ह्मणण्यासारिखें आहे. योहा, १०:३६. "काळाच्या पूर्वी." ह्मणजे न्याय दिवसाच्यापूर्वी

३० तेव्हां बहुत डुकरांचा कळप त्यांजपासून कांहींसा दूर चरत होता.

३१ मग त्या भुतानी त्याला विनंती केली कीं, जर आह्मास काढसील तर आह्मास त्या डुकरांच्या कळपांत जाऊं दे. (१)

३२ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, जा. मग तीं निघून डुकरांच्या कळपांत गेलीं; आणि पाहा, तो डुकरांचा अवघा कळप कड्यावरून समुद्रांत धडक धांवत जाऊन पाण्यामध्यें पडून मेला.

३३ मग चारणारे पळाले आणि नगरांत जाऊन त्यानी सर्व वर्तमान, आणि भूतग्रस्तांच्या गोष्टी सांगितल्या.

---

(१) इयोब १:१०–१२. २:३–६. अनु. १४:८. यशा. ६५:३,४.

---

दुष्ट भुतानी मनुष्यांस मोहांत पाडावें व दुःख द्यावें यासाठीं ईश्वर त्यांला सांप्रत मोकळें राहूं देतो. परंतु न्यायकाळीं तो त्यांस सर्व दुष्ट मनुष्यांबरोबर सर्वकाळचा दंड ठरवील. २ पेत्र. २:४. यहूदा ६. मार्कस व लुका ह्मणतात कीं ख्रीस्ताने एकाचें नाम पुसलें आणि सैन्य असें त्याने उत्तर केलें, कारण कीं भुतें पुष्कळ होतीं. त्यावेळेस रोमी एका सैन्यांत तीन हजार स्वार व तीन हजार पायदळ असत. पण कोणत्याहि मोठ्या संख्येला सैन्य ह्मणत असत.

३० "डुकरांचा कळप." दोन हजार डुकरें होतीं असें मार्कस ह्मणतो. (मार्क. ५:१३.)

३१ "भुतानी त्याला विनंती केली." भुतानी त्याला ओळखून हा देवाचा पुत्र आहे असी साक्षी दिल्ही.

३३ "मग चारणारे पळाले." ख्रीस्ताचें सामर्थ्य पाहून ते विस्मित झाले. यहूदी कायदे (लेवी ११:७.) त्यांस फारकरून माहीत होते आणि आह्मी हीं मना केलेलीं जनावरें पाळितों ह्मणून देवाने हा दंड लावला असें त्यांस वाटलें असेल. ह्मणून तूं आमच्या प्रांतांतून जावें असी त्यानी मूर्खपणाने ख्रीस्ताची विनंती केली. ख्रीस्ताला नाकारावें आणि त्याच्या नांवाची निंदा करावी हें पूर्वीपासून चालत आलें आहे. तरी याशिवाय दुसरा कोणी तारणारा नाहीं. ख्रीस्ताने हा चमत्कार करून कळपाचा नाश केला आणि एका वेळेस अंजिराचें झाड वाळविलें, (मात्थी २१:१८,२०.) पण याशिवाय त्याने कशाचाहि नाश केला नाहीं. रोग आणि दुःखें निवारण करण्या-

३४ तेव्हां पाहा, सर्व नगर येशूला भेटायास निघालें, आणि
त्याला पाहून, त्वां आमच्या प्रांतांतून जावें, (१) असी त्यानीं विनंती
केली.

## अध्याय ९.

१ तेव्हां तो तारवावर चढून पार जाऊन आपल्या नगरास
पोहंचला.

---

(१) इयोब २१:१४. लूक. ५:८. प्रेषि. १६:३९.

---

साठीं व आनंद देण्यासाठीं तो चमत्कार करीत असे. ख्रीस्ताचा देवपणा पटवावा हा त्या चमत्कारांचा अभिप्राय होता. परंतु व्यर्थ पराक्रम दाखवावा, खडक फोडावें, पर्वत नेऊन समुद्रांत टाकावे यापेक्षां त्यानें लोकांच्या उपयोगार्थ चमत्कार करून आपणाविषयीं प्रमाण पटविलें.

३४ "सर्व नगर– निघालें." ख्रीस्तानें हा चमत्कार करून आपल्या देवपणाविषयीं जें प्रमाण पटविलें त्याकडे, अथवा त्या गरीब भूतग्रस्तांवर जी दया केली तिकडे, त्यानीं लक्ष लाविलें नाहीं. कळपाचा नाश झाला यावरून त्यांस वाईट वाटलें. तसेंच सांप्रत बहुत लोक आपल्या तारणापेक्षां द्रव्यादिकांची फार आवड धरितात.

**सूचना**— जे तारले जाण्यास इच्छितात त्यानीं ख्रीस्ताकरितां सर्व सोडावें. त्यानीं जगीक लाभ कांहीं पाहूं नये. १९–२३. ख्रीस्ताला अंगीकारल्यावरून कांहीं जगीक लाभ ह्मणजे द्रव्य वगैरे सामान प्राप्त होईल असें कांहीं वचन नाहीं. आकाशलोकांत फळ मिळेल असें शास्त्रांत सांगितलें आहे. जे आपलें तारण पाहतात त्यानीं सर्व पाप व स्वार्थबुद्धि सोडावी आणि आकाशलोकींच्या सुखाची आवड धरावी, इतकेंच केवळ नव्हे पण त्यानीं पवित्रतेचीहि आवड धरावी. जर कोणी पवित्रतेची आवड धरिली तर पाठलाग, निंदा, मरण, इत्यादि कोणतींहि संकटें प्राप्त होवोत, तरी देवाची इच्छा कळली ह्मणजे तो याप्रमाणें चालेलच चालेल.

१ "आपल्या नगरास पोहंचला." ह्मणजे कपरणाहूमास. (मार्क, २:१.) ख्रीस्त या दुष्ट लोकांच्या विनंतीस मान्य झाला, आणि त्यांस सोडून गेला. जेव्हां लोक ख्रीस्ताला धिक्कारितात आणि त्यानें आपल्यापासून जावें असी त्यापासीं विनंती करितात, तेव्हां त्यानें त्यांस सोडावें आणि नाशास जाऊं द्यावें हें योग्य आहे.

२ मग पाहा, (१) बाजेवर घातलेला कोणीएक वातरोगी त्याज-
कडे आणिला, तेव्हां येशू त्यांचा विश्वास पाहून वातरोग्याला ह्मणा-
ला, मुला, (२) धीर धर, तुझ्या पापांची क्षमा झाली आहे.
३ मग पाहा, शास्त्र्यांमधील कित्येक आपल्यांमध्यें ह्मणाले, हा
दुर्भाषण करितो.

---

(१) मार्क. २:३. लुका. ५:१८. (२) मार्क. ५:३४.

---

२ "वातरोगी." मात्थी ४:२४. या ओवीवरील व्याख्या पाहा.

"तुझ्या पापांची क्षमा झाली आहे." त्याचा रोग दूर केला जावा यासाठींच त्याला खीस्ताजवळ आणिलें होतें. तरी तुझ्या पापांची क्षमा झाली आहे हें खीस्ताचें पहिलें बोलणें होतें, आणि यावरून कदाचित् आश्चर्य वाटेल. तर १ हा रोग त्याला दुष्कर्मं केल्यावरून प्राप्त झाला असेल, आणि खीस्ताने हें समजून आणि त्याचा खेद व पश्चात्ताप पाहून पाहिल्याने त्याची क्षमा केली, यासाठीं कीं त्याच्या रोगाचें मूळ कारण दूर केलें जावें. २. पापांची क्षमा करण्याचा आपल्याला अधिकार आहे हें दाखविण्यास हा चांगला प्रसंग आहे, असें खीस्ताला वाटलें असेल. याविषयीं प्रमाण पटविण्यासाठीं चमत्कार करण्याचा प्रसंग पडला होता, आणि त्याला हा अधिकार आहे असा विश्वास त्याच्या शिष्यांनी देखील त्याने असे चमत्कार केल्यावांचून विश्वास धरिला नसता. तर हा चमत्कार करण्याकडून आपल्याला पापांची क्षमा करण्याचा अधिकार आहे असें खीस्ताने प्रमाण पटविलें. ३. पाप व दुःख यांचा फार जवळ संबंध स्पष्ट करून दाखवावा अशी कदाचित् खीस्ताची इच्छा होती. आपला रोग दूर केला जावा अशी सर्व माणसांची इच्छा असती. पण आपल्या पापांची क्षमा व्हावी याविषयीं त्यांनी विशेषेंकरून किती उत्कंठित असावें बरें.

३ "हा दुर्भाषण करितो." हा ईश्वरी अधिकार आपणावर घेऊन मी ईश्वरासमान आहें असें दाखवितो. पापांची क्षमा करावयास ईश्वराशिवाय दुसरा कोणी समर्थ नाहीं, असें त्यांस वाटलें. आणि हें खरें आहे. असें असतां हा अधिकार खीस्ताने आपणाला घेतला आणि चमत्कार करून प्रमाण पटविलें यावरून त्यानें आपलें देवपण पूर्णपणें स्थापित केलें. (यशा ४३:२५. ४४:२२.)

४ तेव्हां येशू त्यांच्या कल्पना जाणून ह्मणाला, (१) तुह्मी आप-
ल्या अंतःकरणांत वाईट कल्पना कां आणितां ?
५ कारण कीं तुझ्या पापांची क्षमा झाली आहे, हें बोलणें, अथवा
उठून चाल, हें बोलणें, यांतून कोणतें सोपें ?
६ परंतु पृथ्वीवर पापांची क्षमा करायास मनुष्याच्या पुत्राला
अधिकार (२) आहे, हें तुह्मी जाणावें, तेव्हां त्याने वातरोग्याला सां-
गितलें कीं, ऊठ, आपली बाज उचलून घेऊन आपल्या घरीं जा.
७ मग तो उठून आपल्या घरीं गेला.
८ तेव्हां समुदायानी पाहून आश्चर्य केलें आणि देवाने मनुष्यांस
एवढा अधिकार दिल्हा, ह्मणून त्याला ते गौरवूं लागले. (३)
९ मग येशूने तेथून जाऊन (४) मात्थी नामें माणसाला जका-

(१) गीत. १३९:२. योहा. २:२४,२५. इब्री. ४:१२,१३. प्रग. २:२३.
(२) मीखा. ७:१८. (४) मार्क. २:१४. लुका. ५:२७.
(३) प्रेषि. ४:२१. गल. १:२४.

४ "येशू त्यांच्या कल्पना जाणून." माणसाचें अंतःकरण पारखावें आणि त्यांच्या कल्पना जाणाव्या हें सामर्थ्य केवळ ईश्वरालाच आहे. १ कल. २८:९. रोमे. ८:२७. प्रग. २:२३. इर्म. १७:१०. हें सामर्थ्य दाखविल्याव-रून ख्रीस्ताने आपण अंतरसाक्षी आणि सर्वज्ञ आहें, असें प्रमाण पटविलें.

५–७ "यांतून कोणतें सोपें." कोणतें करायास ईश्वरी सामर्थ्य पाहिजे. जो कोणी केवळ शब्देंकडून रोग्याला बरें करायास अथवा मेलेल्यांला उठ-वायास समर्थ आहे त्याला पापांची क्षमा करण्याचाहि अधिकार असावा. जेव्हां ख्रीस्त पृथ्वीवर होता तेव्हां त्याने पापांची क्षमा केली आणि आतांहि पश्चात्तापी पाप्यांची क्षमा तो करितो. तर सर्वांनी त्याला किती आनंदाने शरण जावें.

८ "आश्चर्य केलें इ०." हा मोठा आणि खरोखर चमत्कार पाहून त्यानीं आश्चर्य केलें, आणि देवाची स्तुति केली. समुदायाने स्तुति केली हें योग्य होतें. परंतु शास्त्री व परोशी ज्यानी त्याजवर दुर्भाषणाचा आरोप आणिला होता ते कोठें होते ? आपण अयोग्य आरोप आणिला असें ते कां कबूल झाले नाहींत, आणि त्यानी देवाची स्तुति कां केली नाहीं? अरेरे, ते इत-के अभिमानी होते कीं देवाने स्वतः उतरून चमत्कार करण्याकडून आपलें देव-पण त्यांच्या समक्ष पटविलें असतांहि ते विश्वास धरीनात.

९ "जकातीच्या नाक्यावर." तो जकातदार होता. ज्या मात्थीने शुभ-

तीच्या नाक्यावर बसलेलें पाहिलें, आणि त्याला ह्मटलें, माझ्या मागें ये. तेव्हां तो उठून त्याच्या मागें गेला.

१० नंतर असें झालें कीं, तो घरांत जेवायास बसला तेव्हां पाहा, बहुत जकातदार व पापी येऊन, येशू आणि त्याचे शिष्य यांबरोबर जेवायास बसले.

११ तेव्हां परोशी पाहून त्याच्या शिष्यांस ह्मणाले, जकातदार व पापी यांबरोबर तुमचा गुरु कां जेवितो. (१)

१२ मग येशूनें ऐकून त्यांस ह्मटलें कीं, निरोग्यांस वैद्याची गरज नाहीं, तर दुखणाइतांस आहे.

---

(१) मात्थी. ११:१९. लुका. १५:२. इब्री. ५:२.

---

वर्त्तमान लिहिलें तो हाच आहे. त्याला लेवीहि ह्मणत असत. (मार्क. २:१४. लुका. ५:२७,२८) यहूदी लोक एका मनुष्याला अनेक नामें देत असत. पेत्रासाला, शिमोन व केफाहि ह्मणत. लुका मात्थीविषयीं असें ह्मणतो कीं तो अवघ्यांस सोडून ख्रीस्ताच्या मागें गेला. मात्थी आपणाविषयीं असी कांहीं गोष्ट लिहीत नाहीं. आपली प्रशंसा आपल्या मुखानें करावी ह्मणून त्याला बरें वाटलें नसेल.

१० "जेवायास बसला." लेवी, ह्मणजे मात्थी, यानें ही जेवणावळ केली (लुका. ५:२९) पण मात्थी ही आपली गोष्ट लिहीत नाहीं.

११ "कां जेवितो." परोश्यांला वाटलें कीं हा इतक्या दुष्ट लोकांसंगतीं राहतो तर हाहि त्यांसारिखा असावा. जरी ते हिंदुलोकांप्रमाणें जातिभेद मानीत नसत तरी कनिष्ठ माणसाला हलकें व नीच मानीत असत. ख्रीस्त हा त्यांच्या सहवासेंकरून विटाळला असें त्यांस वाटलें.

१२ "निरोग्यांस वैद्याची गरज नाहीं इ०" येशूनें या जगांत येण्याचा आपला हेतु दाखवून त्यांस उत्तर केलें. वैद्य हा निरोग्यांचा नव्हे पण रोग्यांचा समाचार घ्यावयास जातो. मी आत्म्यांचा थोर वैद्य आहें. तुह्मी परोशी जर आपल्या मताप्रमाणें पवित्र व निष्पापी आहां तर तुह्माला साह्याचें अगत्य नाहीं. मी पाप्यांला तारायास आलों. त्यांसीं माझें काम आहे. हें ख्रीस्ताचें गुणलक्षण समजून पाप्यानी आनंद करावा. तो दोष्यांला तारायास येतो. त्याचें रक्त सर्व पापांपासून शुद्ध करितें. जे अत्यंत दोषी आहेत ते देखील जर पश्चात्ताप करून व विश्वास धरून त्याला शरण येतील तर ते क्षमा व सर्वकालिक जीवन पावतील. देवाची दया अनंत आहे. परंतु जे गर्वानें ख्रीस्ताला अव्हेरितात ते तारण पावणार नाहींत. जे ख्रीस्ता-

१३ परंतु यज्ञापेक्षां मला दया आवडती, (१) याचा अर्थ काय, हें जाऊन शिका; कारण कीं मी पुण्यवंतांस नाहीं, तर पाप्यांस पश्चात्तापासाठीं बोलावण्यास आलों. (२)

१४ त्या वेळेस योहान्नाचे शिष्य त्याच्या जवळ येऊन ह्मणाले, आह्मी व परोशी बहुत उपास करितों, तुझे शिष्य तर उपास कां करीत नाहींत?

१५ तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें, वऱ्हाड्यांच्या बरोबर वर (३) आहे तोंपर्यंत त्यांच्याने शोक करवेल काय? परंतु असे दिवस येतील कीं, वराला त्यांपासून काढून घेतला जाईल, तेव्हां ते उपास करितील. (४)

---

(१) नीति. २१:३. होशे. ६:६. मीखा. ६:८. मात्थी. १२:७.
(२) लुका. २४:४७. प्रेषि. ५:३१. २पेत्र. ३:९. (३) मात्थी. २५:१,१०. योहा. ३:२९. प्रग. २१:२. (४) यशा. २२:१२.

---

च्या नम्र अनुसरणाऱ्यांस अभिमानाने तुच्छ मानितात ते केवढी चूक करितात, पाहा बरें. हे नम्र ख्रिस्ती आतां कितीहि तुच्छ मानिले जातात तरी ते शेवटीं आकाशलोकांत देवाजवळ उंच केले जातील, पण गर्विष्ठ परोशी बाहेरील अंधारांत टाकले जातील.

१३ "जाऊन शिका." तुह्मी इतके गर्विष्ठ आहां कीं, तुह्मी या गरीब माणसांचा सहवास करणार नाहीं. तर ज्या शास्त्राविषयीं तुह्मी इतके अभिमानी आहां त्यांतील अभिप्राय जाऊन शिका. त्यांत देखील देवाने सांगितलें आहे कीं मला यज्ञापेक्षां दया आवडती. (होशे.६:६) दुसऱ्या सर्व बाह्यक्रियांपेक्षां देवाला परोपकारिक कामें आवडतात. तर न्याय आणि दया ह्या भारी गोष्टी सोडून बाह्यक्रियांविषयीं तुह्मी इतकी काळजी कां धरितां? "पुण्यवंतांस." कोणी पुण्यवान नाहीं. (गीत. १४:३. रोमे. १:१८—३२. ३:१०:१८.) आह्मी पुण्यवान आहों असें ढोंग परोशी दाखवीत असत. आणि ह्या ढोंगावरून त्यांच्या तारणाविषयींची आशा कमी झाली. जे आपणाला निरोगी मानितात ते वैद्याला बोलाविणार नाहींत. तसेंच जे आपणाला पुण्यवान मोजितात ते पापाच्या क्षमेसाठीं ख्रीस्ताला शरण जाणार नाहींत, ह्मणून त्यांचें तारण होईल असी आशा नाहीं. "पश्चात्तापासाठीं." मात्थी. ३:२. या ओवींवरील व्याख्या पाहा. ख्रिस्त पश्चात्तापासाठीं बोलावितो. जे ख्रिस्ताला अनुसरायास पाहतात त्यांनी पश्चात्ताप करावा आणि सर्व पाप सोडून शुद्ध आचरण दाखवावें.

१४—१७. "योहान्नाचे शिष्य इ० (मार्क. २:१८—२२. लुका. ५:

१६ आणि कोऱ्या कापडाचें ठिगळ जुन्या वस्त्राला कोणी लावीत नाहीं, कां कीं जें त्या वस्त्राला लाविलें तें त्याला फाडितें, आणि भोंक मोठें होतें.

१७ अणखी नवा द्राक्षारस जुन्या बुधल्यांत घालीत नाहींत, घातला तर बुधले फुटतात (१) आणि द्राक्षारस सांडतो, आणि बुधले नासतात; तर नवा द्राक्षारस नव्या बुधल्यांत घालितात आणि दोन्ही कायम राहतात.

१८ तो त्यांसीं या गोष्टी बोलत असतां, पाहा, (२) कोणी अधिकारी येऊन त्याच्या पायां पडून ह्मणाला, माझी कन्या नुकीच मरण पावली, परंतु तूं येऊन आपला हात तिजवर ठेव ह्मणजे ती वांचेल. (३)

---

(१) इयो. ३२:१९. (२) मार्क. ५:२२. लुका. ८:४१. (३) योहा. ११:२२,२५.

---

३३–३९) योहान्न हा ख्रीस्ताची वाट सिद्ध करणारा आहे असें त्याचे शिष्य समजून, ख्रीस्त आणि त्याचे शिष्य हे आह्मासारिखे उपास करीत नाहींत हें पाहून त्यानी आश्चर्य केलें. तेव्हां ख्रीस्ताने, जें शोभतें तें सर्व गोष्टीमध्यें पाहिलें पाहिजे, असें दाखविण्यासाठीं तीन दाखले दिल्हे. १. पहिला दाखला त्याने लग्नाच्या चालीवरून घेतला. जोंपर्यंत वर त्याजवळ आहे तोंपर्यंत वऱ्हाड उपास करीत नाहीं. अश्या प्रसंगीं शोक करणें शोभत नाहीं. यापेक्षां आनंद करावा. तो त्यांपासून घेतला जाईल तेव्हां त्यानी खेद करावा. तसेंच आतां मी आपल्या शिष्यांबरोबर आहें, ह्मणून त्यानी शोक करूं नये. ही वेळ आनंद करण्याची आहे. पण मी त्यांपासून घेतला जाईन, असे दिवस येणार आहेत. तेव्हां त्यानी उपास व शोक करावा. २. जुन्या वस्त्राचा दाखला दिल्हा. कोऱ्या कापडाचें ठिगळ जुन्या वस्त्रास लाविलें ह्मणजे ठिगळ आखुडलें जाऊन वस्त्र फाटतें. ३. नवा द्राक्षरस जुन्या बुधल्यांत घालूं नये. घातला तर द्राक्षरस फुगेल आणि बुधले फुटतील. नव्या द्राक्षरसासाठीं नवे बुधले पाहिजेत. याप्रमाणें सर्व गोष्टींविषयीं योग्यायोग्य विचार केला पाहिजे. ख्रीस्त येणार आहे असें दर्शविण्यासाठीं जी जुनी व्यवस्था होती तींतील एक भाग उपास करणें असा होता. पण आतां ते उपास व दुसऱ्या बहुत क्रिया यांबद्दल लोकानी शुभवर्त्तमानाप्रमाणें आनंद पावून शुद्ध आचरण करावें. १८–२६. मार्क. ५:२२, ४३. लुका. ८:४१–५६. पाहा.

१८ "कोणी अधिकारी." त्याचें नाम याईरस होतें, असें मार्कस व लुका

१९ तेव्हां येशू उठून त्याच्या मागें गेला, शिष्यहि गेले.

२० तेव्हां पाहा, बारा वर्षें रक्तस्राव लागलेली कोणी बायको त्याच्या मागें येऊन त्याच्या वस्त्राच्या कांठाला शिवली. (१)

२१ कां कीं तिनें आपल्या मनांत ह्मटलें, मी केवळ त्याच्या वस्त्राला शिवलें, तर बरी होईन. (२)

२२ तेव्हां येशू मुरडून व तिला पाहून ह्मणाला, अगे मुली, धीर धर, तुझ्या विश्वासानें तुला तारिलें (३) आहे. आणि ती बायको त्याच घटकेस बरी झाली. (४)

---

(१) मार्क. ५:२५. लुका. ८:४३. (३) लुका. ७:५०. १७:१९. १८:४२. प्रेषि. १४:९.
(२) प्रेषि. १९:१२. (४) योहा. ४:५३.

---

ह्मणतात. "माझी कन्या इ०" ती त्याची एकुलती एक कन्या बारा वर्षांची असें लूका ह्मणतो. जेव्हां अधिकारी तिला सोडून ख्रीस्ताकडे जायास निघाला तेव्हां ती मरायास टेंकली होती असें दिसतें. आणि ख्रीस्तानें येऊन तिला बरें करावें असी तो विनंती करीत आहे इतक्यांत ती मेली असें वर्तमान आलें. "आपला हात तिजवर ठेव." यहूदी भविष्यवादी उपकार करितांना लोकांवर हात ठेवीत असत. ख्रीस्तहि तसेंच करीत असे आणि त्याची ही चाल त्या अधिकाऱ्याला कळली असेल. "ह्मणजे ती वांचेल." या शब्दावरून अधिकाऱ्याचा विश्वास दिसून येतो. त्या वेळेस बरें केलें जावें ह्मणून विश्वास पाहिजे होता. तसाच आतांहि जे ख्रीस्ताला शरण येतात त्यांला विश्वास धरिला पाहिजे. जे विश्वास धरीत नव्हते त्यांस ख्रीस्तानें बरें करावें याचें कारण काय होतें? आतांहि जे पश्चात्ताप करीत नाहींत, आणि विश्वासानें तारण मागत नाहींत त्यांस ख्रीस्तानें कां तारावें बरें? तो तारणार नाहीं. त्या वेळेस जसें आग्रहानें मागत आणि विनंती करीत असत तसें आतांहि केलें पाहिजे. आह्मी दोषी व भयावस्थेंत आहों आणि आह्माला ख्रीस्ताशिवाय दुसरा कोणी तारायास समर्थ नाहीं, असें त्यांच्या मनांत ठसलें पाहिजे.

२०-२२ "रक्तस्राव." हा रोग अशुद्ध व निरुपाय मानीत असत. (लेवी. १५:२५.) ती आपल्या अशुद्ध रोगामुळें ख्रीस्ताजवळ यायास भ्याली असेल, आणि त्याच्या वस्त्राला गुप्तरूपें शिवून आपण बरें केलें जावें असी आशा तिनें धरिली असेल. मार्कस ह्मणतो कीं ती भीत भीत व कांपत ख्रीस्ताजवळ येऊन तिनें आपलें सर्व खरें वर्तमान त्याला सांगितलें. "अगे

२३ मग (१) येशू त्या अधिकाऱ्याच्या घरांत जाऊन आणि (२) पांवा वाजविणाऱ्यांस व गलबला करणाऱ्या समुदायास पाहून त्यांस ह्मणाला;

२४ निघून जा, कां कीं मुलगी मेली (३) नाहीं, ती झोंपेंत आहे. तेव्हां ते त्याला हांसले.

२५ मग समुदायाला बाहेर लाविल्यावर (४) त्याने आंत जाऊन तिचा हात धरिला, तेव्हां ती मुलगी उठली.

---

(१) मार्क. ५:३८. लुका. ८:५१ (३) प्रेषि. २०:१०.
(२) २ काल. ३५:२५. (४) २ राजे. ४:३३. व पुढें.

---

मुली, धीर धर." येशूने तिचें भय दूर केलें, तिच्या विश्वासाची प्रशंसा केली, आणि तिला बरें करून वाटेस लाविलें. याप्रमाणें ख्रीस्ताने त्या वेळेस दया दाखविली आणि आतांहि तो दया करण्यास तयार आहे. पाप्याने ख्रीस्ताजवळ पश्चात्तापाने व नम्रतेने यावें ह्मणजे क्षमा व सर्वकाळचें जीवन प्राप्त होईल.

२३ "घरांत जाऊन." (मार्क. ५:३७–४०) ख्रीस्ताने कन्येचा बाप व आई आणि आपले तीन शिष्य यांस हा चमत्कार पाहण्यासाठीं आंत येऊं दिल्हें. जेव्हां डोंगरावर ख्रीस्ताचें रूप पालटलें त्या वेळेस आणि गेथसेमाने बागांत हेच तिघे शिष्य त्याजबरोबर होते. ते पांवा वाजवीत व आक्रोश करीत होते. यावरून कन्या वास्तविक मेली ह्मणून त्यांस वाटलें.

२४ "मुलगी मेली नाहीं." योहा. ११:११. मेलेले उठतील असें मत धरून ते झोंपेंत आहेत असें त्यांविषयीं नव्या करारांत वारंवार लिहिलें. (२ पेत्र. ३:४. प्रेषि. ६:६०. १ करिं. १५:६,१८. १ थेस्स. ४:१३–१५.) मुलगी गमाविली नाहीं. जरी तिचें शरीर मेलें आहे तरी तिचा आत्मा जीवंत आहे, असा ख्रीस्ताच्या बोलण्याचा अभिप्राय होता. "ते त्याला हांसले." तिचा प्राण गेला नाहीं असा ख्रीस्ताचा अभिप्राय आहे ह्मणून त्यांस वाटलें. पण प्राण गेला असें त्यांस पक्कें समजलें.

२५ "ती मुलगी उठली." ती जीवंत झाली. हें ईश्वरी पराक्रमाचें आणखी एक उदाहरण आहे. मेलेल्यांस उठविण्याची मला शक्ति आहे असें ख्रीस्ताने दाखविलें. अझूनहि ही शक्ति त्यामध्यें आहे, आणि शेवटीं सर्व मेलेल्यांस उठवून तो न्यायास बोलावील.

२६ नंतर ही कीर्ति त्या अवघ्या देशांत पसरली.

२७ मग येशू तेथून पुढें जात असतां दोन अंधळे त्याच्या मागें चालतांना ओरडत बोलले, हे दाविदाच्या पुत्रा, (१) आह्मावर दया कर.

२८ मग तो घरांत गेल्यावर ते अंधळे त्याच्या जवळ आले, तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, हें करायास मी समर्थ आहें, ह्मणून तुह्मी विश्वास धरितां काय? ते त्याला ह्मणाले, होय प्रभू.

२९ तेव्हां तुमच्या विश्वासाप्रमाणें तुह्मास होवो, असें बोलून त्याने त्यांच्या डोळ्यांस हात लाविला.

३० तेव्हां त्यांचे डोळे उघडले; मग येशूने त्यांस निक्षूण सांगितलें कीं, संभाळा, हें कोणाला कळवूं नका. (२)

३१ परंतु ते निघून त्या अवघ्या देशांत त्याची कीर्ति पसरूं लागले.

३२ मग ते निघाल्यावर, पाहा, लोकानी त्याजकडे कोणीएका मुक्या (३) भूतग्रस्त माणसाला आणिलें.

३३ आणि त्याने भूत काढिल्यावर तो मुका बोलूं लागला; (४) तेव्हां समुदाय आश्चर्य करून ह्मणाले कीं, याप्रमाणें इस्राएलामध्यें कधींहि दृष्टीस पडलें नाहीं.

३४ परंतु परोशी बोलले कीं, (५) भुताच्या अधिकाऱ्याच्या योगाने हा भुतें काढितो.

---

(१) मात्थी. १५:२२. २०:३०,३१.
(२) यशा. ४२:२.५२:१३. मात्थी. १२:१६.
(३) मात्थी. १२:२२. लुका. ११:१४.
(४) यशा. ३५:६.
(५) मात्थी १२:२४. मार्क. ३:२२. लुका. ११:१५.

---

२७–३४ "दाविदाच्या पुत्रा." मशीहा हा दाविदाचा पुत्र होणार होता, ह्मणून असी हाक मारण्याकडून, हा खरा मशीहा आहे, असा विश्वास त्यानी दाखविला. "आह्मावर दया कर." ते आपले कांहीं सद्गुण दाखवीत नाहींत पण दयाच मागतात. तसेंच आतांहि सर्व पाप्यानीं करावें. "विश्वास धरितां काय?" विश्वास धरल्यावांचून तारण होत नाहीं. ह्या अंधळ्यांचे डोळे त्यांच्या विश्वासावरून उघडले गेले. त्यानी हा चमत्कार कोणास कळवूं नये असी आज्ञा ख्रीस्ताने केली, पण याचें कारण काय असेल हें कळलें नाहीं. आपण एकांतीं राहावें ह्मणून

३५ आणि (१) येशूने सर्व नगरें व गांव यांमध्यें फिरत असतां त्यांच्या सभास्थानांमध्यें उपदेश केला, आणि राज्याचें शुभवर्त्तमान गाजविलें, आणि लोकांचे सर्व रोग व दुखणीं बरीं केलीं.

३६ आणि समुदायांस पाहून त्यांचा त्याला कळवळा आला, कारण कीं ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं (२) त्यांसारिखे ते कासावीस व पांगलेले होते.

---

(१) मात्थी. ४:२३. (२) गण २७:१७. १ राज. २२:१७. यहे. ३४:५. जखर्या. १०:२.

---

तो समुदायाला सोडून एकीकडे गेला होता. एकांतीं राहावें हें त्याला बरें वाटत असे. लोकांमध्यें आपली कीर्ति वाढावी असी इच्छा तो दाखवात नसे. तो बोलला, मी अंतःकरणांत नम्र व लीन आहें. मात्थी. ११:२९. त्यांनी खीस्ताची आज्ञा मानिली नाहीं, परंतु त्याची कीर्ति वाढविली. जर खीस्ताने आज्ञा दिल्ही नसती तर असें करणें योग्य झालें असतें. सविल तितकें आह्मी खीस्ताचें नाम व सामर्थ्य कळवावें हें योग्य आहे. आह्मी आपला उजेड प्रकाशवावा असी खीस्ताची आज्ञा आहे. "याप्रमाणें इस्राएलामध्यें कधींहि दृष्टीस पडलें नाहीं." समुदायाने चमत्कार पाहिले आणि हा वास्तविक देव आह्मामध्यें आहे असी त्यांची खातरी झाली. पण गर्विष्ठ परोशी अस्या खातरीस कबूल होईनात. आपलीं पापें सोडून खीस्ताला अनुसरावें यापेक्षां हीं दयेचीं कामें भूतांच्या अधिकाऱ्याच्या साह्यानें झालीं, असा आरोप त्याजवर आणावा हें त्यांस बरें वाटलें. आतांहि त्यासारिखे बहुत आहेत. हा खिस्ती मार्ग खरा आहे असें त्यांस ठाऊक असतांहि ते इतके गर्विष्ठ आहेत कीं, ते खीस्ताला अंगीकारणार नाहींत, परंतु पाप करीत जातात आणि शेवटीं नाश पावतात. ३४. मात्थी १२:२४–३१ यावरील व्याख्या पाहा.

३५ "राज्याचें शुभवर्त्तमान." ह्मणजे मशीहाचें येणें याविषयींचें वर्त्तमान. मात्थी. ३:१०.

३६ "ते कासावीस व पांगलेले होते." ते आपल्या पुष्कळ पापांच्या आणि क्रियांच्या ओझ्याने लादलेले आहेत. त्यांचे गुरु त्यांस गैर मार्गांत लावितात. ते आडाणी, पांगलेले, आणि भडकणाऱ्या मेंढरांसारिखे मेंढवाड्यावांचून आहेत, असें खीस्ताने पाहिलें ह्मणून त्याला त्यांची दया आली. त्यांला कोणी तरी शिकवावें आणि खऱ्या मेंढवाड्यांत आणावें असी त्याची इच्छा होती. समुदायानें त्याजवळ येऊन त्याचा उपदेश ऐकला. बहुते-

३७ तेव्हां तो आपल्या शिष्यांस ह्मणाला, पीक फार, परंतु कामकरी थोडे आहेत. (१)

३८ यास्तव पिकाच्या धन्याने आपल्या पिकांत कामकरी पाठवावे ह्मणून तुह्मी त्याची प्रार्थना करा. (२)

## अध्याय १०.

१ तेव्हां त्याने आपल्या बारा शिष्यांस जवळ बोलावून त्यांस असा अधिकार दिल्हा (३) कीं, त्यांनी अशुद्ध आत्म्यांस काढावें आणि सर्व रोग व सर्व दुखणीं बरीं करावीं.

---

(१) लुका. १०:२. योहा. ४:३५. (३) मार्क. ३:१३,१४. ६:७. लुका. ९:१.
(२) गीत. ६८:११.

---

कांनी आश्चर्य केलें आणि कितीएकांनी विश्वास धरिला. पण ते आडाणी असल्यामुळें फारकरून खोटया गुरूच्या युक्तींकडून सहज फसले. सांप्रत लोकांचीहि असीच दशा आहे. बहुतेक लोक शुभवर्त्तमान ऐकतात आणि ख्रीस्ताला अंगीकारण्याच्या लागास येतात, परंतु बहुत खोटे गुरु त्यांस फसवितात. हे गुरु लोकांस शिकवावें आणि त्यांला जीवनाचा मार्ग दाखवावा, या हेतूने नव्हे, पण आपला ऐहिक स्वार्थ साधावा याच हेतूने लोकांस खोटे बोध देतात. अझूनहि फार पीक आहे. त्या वेळेस ख्रीस्ताजवळ बहुत समुदाय येत होते, आणि आपल्या राज्यांत आणण्यासाठीं हें सर्वच पीक आहे असें तो मानीत असे. लोक मशीहाची वाट पाहत होते आणि कांहीं प्रकारें त्यासाठीं तयारहि होते. परंतु कामकरी ह्मणजे उपदेशक थोडके असून थोडक्याच लोकांस जीवनाचा मार्ग कळवीत होते. देवाने आपले कामकरी पाठवावे असी प्रार्थना करण्याचा ख्रीस्ताने आग्रह केला. हल्लींहि पीक फार असून तें नाशाच्या लागास आहे, यास्तव खिस्ती लोकांनी त्याप्रमाणें प्रार्थना करावी हें योग्य आहे.

१ "आपल्या बारा शिष्यांस इ०" मार्क. ४:७-११. लुका. ९:१-६. इस्राएलांचे बारा वंश होते हें लक्षांत आणून ख्रीस्ताने हे बारा शिष्य निवडिले असतील. ह्या बारा शिष्यांनी ख्रीस्ताच्या पुन्हा उठण्याविषयीं साक्षी व्हावें आणि संपूर्ण जगांत शुभवर्त्तमान घोषण करावें ह्मणून ख्रीस्ताने त्यांस निवडिलें. ख्रीस्त उपदेश करूं लागल्यानंतर त्याने त्यांस लवकरच नेमिलें,

२ त्या बारा प्रेषितांचीं नामें (१) तर याप्रमाणें आहेत; पहिला पेत्रस ह्मटलेला शिमोन व त्याचा भाऊ अंद्रयास, जब्दीचा पुत्र याकोब व त्याचा भाऊ योहान्न;

३ फिलिप्पस व बार्थलमी, थोमा व जकातदार मात्थी, अल्फीचा पुत्र याकोब व थाद्दी ह्मटलेला लेब्बी;

---

(१) लुका. ६:१३.

---

यासाठीं कीं त्याने त्यांस शिकवून त्यांच्या कामासाठीं सिद्ध करावें. कोणी साक्षीदार त्यासारखी साक्ष देण्यास योग्य नव्हते. ते विद्वान नव्हते, आणि आपला धर्म प्रवृत्त करायास त्यांजवळ कांहीं युक्ति, अथवा अधिकार अथवा ऐहिक उपाय नव्हते. ते धनवान नव्हते ह्मणून त्यांच्याने आपल्याला अनुसरणाऱ्यांस लांच देववली नाहीं. त्यांजला कांहीं हुद्दा नव्हता ह्मणून त्यांच्याने लोकांस बळाने आपल्या धर्मांत आणवलें नाहीं. ख्रीस्तानें त्यांस चमत्कार करण्याची शक्ति दिल्ही, आणि त्यानी जाऊन आपल्या धन्याच्या नांवाने रोग्यांस निरोगी केलें व भुतांस घालविलें आणि तारण ख्रीस्तावरील विश्वासाने होईल असें घोषण केलें.

२ "बारा प्रेषितांचीं नामें." मार्कस. ३:१३–१८. लुका. ६:१२–१९, "पेत्रस." याच्या मूळ शब्दाचा अर्थ खडक. त्याला केफाहि ह्मणत असत, १ योहा. १:४२. १ करिं. १:१२. ३:२२. १५:५. गल. २:९. याचाहि तोच अर्थ आहे. तो ख्रीस्ताच्या मरणापूर्वी उतावळा व चंचल स्वभावाचा होता, पण त्यानंतर तो स्थिर, अविरोधी, व दृढ निश्चयाचा झाला. तो आपल्या धर्मामुळें रोम शहरांत वधस्तंभीं दिल्हा गेला. ख्रीस्तासारिखें वधस्तंभीं दिल्हें जावें एवढा मान आपल्याला नसावा असें त्याला वाटलें, ह्मणून शत्रूनी त्याच्या इच्छेप्रमाणें त्याचें डोकें खालीं व पाय वरते करून वधस्तंभीं दिल्हें, असें ह्मणतात. "याकोब." ज्या याकोबाला हेरोदाने तरवारीने मारिलें तोच हा. प्रेषि. १२:२. "योहान्न." जो शुभवर्त्तमानाचा कर्त्ता आणि ज्या शिष्यावर येशू फार प्रीति करीत असे तोच हा.

३ "फिलिप्पस." हा आंद्रियास व पेत्रस यांचें नगर जें बेथसाइदा एथील होता. (योहा. १:४५) "बार्थलमी." याला नथानेलहि ह्मणत असत. (योहा. १:४६.) "थोमा." योहा. ११:१६.१४:५,६.२०:२४—२९ पाहा. "मात्थी." ज्याने हें शुभवर्त्तमान लिहिलें तोच. "याकोब." याच्या पवित्र आचरणावरून त्याला नीतिमान ह्मणत असत. ख्रीस्तानंतर सुमारें ६३वर्षांनी

४ शिमोन कनानी आणि त्याला पराधीन करणारा यहूदा इस्कारयोते.

५ या बारा जणांस पाठवितांना येशूने त्यांस असी आज्ञा केली कीं, विदेश्यांकडे तुह्मी जाऊं नका, आणि शोमरोनी याच्या (१) नगरांत जाऊं नका.

---

(१) २ राज. १७:२४. योहा. ४:५,९,२०.

---

यहूदी लोकानी त्याला देवळाच्या उंच जागेवर उभें करून येशू नाजरेथकर हा मशीहा नाहीं, असें बोलायास सांगितलें, पण असें न करितां हा वास्तविक देवाचा पुत्र आणि जगाचा न्यायाधीश आहे, असें त्यानें सांगितलें. यावरून त्यानी त्याला खालीं टाकिलें, आणि तो आपल्या वधणाऱ्यासाठीं प्रार्थना करीत आहे इतक्यांत धोंडमार करून त्याला वधिलें. तो फार विवेकी, धार्मिक, आणि सद्गुणी होता. यहूदी लोकानी त्याला वधिलें यावरून यरूशालेमाचा नाश व देवळाचा नाश इत्यादि पुष्कळ दुःखें त्यांस प्राप्त झालीं, असें मला वाटतें, आणि दुसऱ्याहि बहुत लोकांस वाटलें, असें योसेफस्स ह्मणतो. लेब्बी. याला थादी व यहूदाहि ह्मणत असत. योहा. १४:२२. ज्यानें यहूदाचें पत्र लिहिलें तोच हा.

४ "शिमोन कनानी." कनानी याच्या मूळशब्दाचा अर्थ आवेशी असा आहे. याला कनानी व जेलोतेसहि ह्मणत. हीं नामें त्याच्या आवेशावरून पडलीं असतील. लुका. ६:१५. प्रेषि. १:१३. "यहूदा इस्कारयोते." हें नाम त्याचा जन्मगांव जो कार्योत यावरून पडलें असावें. जो ख्रीस्ताला अनुसरून केवळ आपला ऐहिक लाभच पाहत होता असा एक फितुरी माणूस या लहान मंडळींत होता. जे ऐहिक लाभासाठीं ख्रिस्ती होण्यास मान्य होतात त्या सर्वानी या गोष्टीवरून बोध घ्यावा. ख्रीस्तानें त्यांचें अंतःकरण जाणलें असतांहि त्याला आपल्या शिष्यवर्गांत घेतलें. तसेंच आतांहि जे कधीं तारण पावणार नाहींत असे बहुत ढोंगी ख्रिस्ती मंडळीस मिळत असतात.

५ "विदेश्यांकडे." इस्राएल हे देवाचे निवडलेले लोक होते आणि त्यांच्या वंशांत मशीहा होणार होता, ह्मणून पहिल्यानें त्यांस शुभवर्त्तमान घोषण केलें जावें हें योग्य होतें. यानंतर ख्रीस्तानें शिष्यांला संपूर्ण जगांत जाण्याची आज्ञा केली. (मात्थी. २८:१९) "शोमरोनी यांच्या नगरांत जाऊं नका." शोमरोन लोकानी यरूशालेम व गालील यांमधील जो प्रदेश त्यांत

६ त्यापेक्षां (१) इस्राएलाच्या घरचीं जीं हरपलेलीं मेंढरें (२) त्यांकडे जा.

७ आणि जातांना असा उपदेश करा कीं, (३) आकाशाचें राज्य जवळ आलें आहे.

---

(१) प्रेषि. १३:४६. (३) मात्थी. ३:२. ४:१७. लुका. ९:२. १०:९.
(२) गीत. ११९:१७६. यशा. ५३:६. इर्म. ५०:६,१७. यहे. ३४:५,६,८. १ पेत्र. २:२५.

---

वस्ती केली होती, ह्मणून जवळच्या वाटेनें जातां येतां या प्रदेशांतून जावें लागे. शोमरोनकर या लोकांत पहिल्यानें दाहा वंशांतील कांहीं लोक व दुसरे कांहीं लोक होते. पण जेव्हां हे दाहा वंश पाडाव करून बाबेल देशांत नेले होते तेव्हां आश्शूराच्या राजानें परक्या लोकांला तेथें राहायास पाठविलें. (२ राज. १७:२४. एज्रा. ४:२–११) हे लोक प्रथम आपआपल्या मूर्तीला भजत गेले. पण जेव्हां सिंहांकडून त्यांची मोठी हानी झाली तेव्हां त्यांस वाटलें कीं, आह्मी या देशांतील देवास भजत नाहीं, यावरून असें झालें. असें समजून ते यहूदी धर्म शिकले, मग त्या धर्मांतील कांहीं विधि व आपल्या धर्मांतील कांहीं विधि घेऊन एक नवीन मिश्रित धर्म स्थापिला. (२ राज. १७:२६–२८.) मग बाबेल देशांतून परत आल्यावर यहूदी लोक आपलें देऊळ पुन्हां बांधूं लागले. त्या वेळेस शोमरोनकरानीं त्यांस साह्य देऊं केलें. पण त्यांत आपला स्वार्थ साधावा असा त्यांचा मतलब आहे हें समजून यहूदी लोक त्यांचें साह्य घेईनात. यावरून त्या परस्परामध्यें मोठा द्वेष उत्पन्न झाला. शोमरोनकर त्यांस प्रतिकूळ झाले आणि गरिज्जीम नामक डोंगरावर एक देऊळ बांधून आपण निराळें भजन करूं लागले. तेव्हांपासून त्यांचा द्वेष फारच वाढला. पहिल्यानें शुभवर्त्तमान यहूदी लोकांत गाजविलें जावें, असी प्रभूची आज्ञा होती. मग त्यानें व प्रेषितानींहि शोमरोनकरांस उपदेश केला. (योहा. ४:६–२६. प्रेषि. ८:२५.)

६ "जीं हरपलेलीं मेंढरें त्यांकडे जा." यहूदी हे देवाचे निवडलेले लोक होते. ते बहुत दिवसांपासून मशीहाची वाट पाहत होते, आणि मेंढक्यावांचून जसीं मेंढरें तसे ते बहकलेले व हरपलेले होते. त्यांस पहिल्यानें शुभवर्त्तमान गाजवावें हें योग्य होतें.

७ "आकाशाचें राज्य." मात्थी. ३:२. या ओवीवरील व्याख्या पाहा.

८ रोग्यांस बरें करा, मेलेल्यांस उठवा, कोड्यांस शुद्ध करा, भुतें काढा, फुकट तुह्मास मिळालें आहे, फुकट द्या. (१)

९ सोनें किंवा रुपें किंवा तांबें आपल्या कंबरकस्यांमध्यें घेऊं नका; (२)

१० वाटेसाठीं झोळणा, किंवा दोन अंगरखे, किंवा वाहाणा, किंवा काठी घेऊं नका, कां कीं कामकऱ्याला खायास मिळावें हें योग्य आहे. (३)

११ आणि ज्या नगरांत किंवा गांवांत तुह्मी जाल, त्यांत कोण योग्य आहे, हें पाहा, आणि तुह्मी निघून जाल तोंपर्यंत त्याच्याच एथें राहा.

१२ आणि घरांत जातांना त्याला सलाम करा.

१३ आणि तें कुटुंब योग्य असलें तर तुमचा आशीर्वाद त्याला

---

(१) प्रेषि. ८:१८,२०. (२) लुका. २२:३५. १ करिं. ९:७. (३) लुका. १०:७.

---

८ "फुकट द्या." जसे रोमन काथोलीक उपाध्ये आणि हिंदु गोसावी पैक्यासाठीं रोग्यांस निरोगी करण्याचें व पापाची क्षमा करण्याचें मीस दाखवून त्याला भलते भलते उपाय करायास सांगतात तसें प्रेषितांस करायाचें नव्हतें.

९,१० वाटेसाठीं कांहीं पैसा घेणें अथवा तयारी करणें एथें मना केलें आहे. तयारी करण्यांत कांहीं वेळ खर्चूं नये, पण ईश्वरावर भरवसा ठेवून तसेंच जायाचें होतें. "कामकऱ्याला खायास मिळावें हें योग्य आहे." यावरून ज्या लोकांमध्यें गेले त्यांपासून पोषण मिळायाचें होतें असें दिसतें. आपला स्वार्थ साधावा या हेतूनें उपदेश करूंच नये, तथापि लोकांनी उपदेशकाच्या गरजा पुरवाव्या हें योग्य आहे.

११ "कोण योग्य आहे." तुह्माला अंगीकारील आणि तुमची गोष्ट ऐकेल असा कोण आहे ह्मणून पुसा. "एथें राहा." भिक्षुक आणि भडके यासारिखें फिरावें, आणि एकाचें आतिथ्य टाकून दुसऱ्याकडे जावें, असें करायाचें नव्हतें. आह्मी खरे व प्रमाणीक आहों आणि आमचें काम विशेष अगत्याचें आहे असें दाखविण्याकडून लोकांनी पश्चात्ताप करून विश्वास ठेवावा, असा त्यांला प्रयत्न करायाचा होता.

१२,१३ "त्याला सलाम करा." रीतीप्रमाणें आदर सन्मान करा. मूल शब्दाचा अर्थ, तुह्मास शांति असो, असा आहे. "तें कुटुंब योग्य असलें

प्राप्त होवो; परंतु तें योग्य नसलें तर तुमचा आशीर्वाद तुह्माकडे पर-
त येवो. (१)

१४ आणि जो कोणी तुह्मास स्वीकारणार नाहीं, आणि तुमच्या
गोष्टी ऐकणार नाहीं, त्याच्या घरांतून किंवा नगरांतून निघतांना
तुह्मी आपल्या पायांची धूळ झाडून टाका. (२)

१५ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, न्यायाच्या दिवसीं त्या नग-
रापेक्षां सदोम व गमोरा यांच्या देशाला सोपें पडेल. (३)

१६ पाहा, लांडग्यांमध्यें जसें मेंढरास तसें मी तुह्मांस पाठवितों;
यास्तव तुह्मी सापांसारखे (४) चतुर व कबुत्रासारखे (५) साळसूद व्हा.

---

(१) गीत. ३५:१३. (३) मात्थी. ११:२२,२४. (४) रोम. १६:१९. एफ.५:१५.
(२) गण. ५:१३. प्रेषि. १३:५१. १८:६. (५) फिलि. २:१५.

---

इ०" कुटुंब अनुकूल आणि तुह्माला अंगीकारायास मान्य आहे तर तुह्मी
जो आशीर्वाद त्यासाठीं मागाल तो प्राप्त होईल, आणि जर प्रतिकूळ असेल
तर होणार नाहीं.

१४,१५ "पायांची धूळ झाडून टाका." असें करण्याकडून हे लोक दुष्ट
आणि आमच्या उपदेशास योग्य नाहींत असें त्यांना दाखविलें. (प्रेषि.१३:
५१.१८:६.) सदोम व गमोरा, या नगरांचा नाश त्यांतील राहणाऱ्यांच्या
दुष्टपणावरून अग्नि व गंधक यांच्या योगानें झाला होता. आतां त्या ठिका-
णीं एक समुद्र आहे. दुष्ट लोक दंड चुकविणार नाहींत आणि ईश्वरी गजब
केवढा आहे हीं दाखविण्यासाठीं या नगरांचें उदाहरण वारंवार दिल्हें आहे.
(२ पेत्र २:६. यहूदा. ७.) तथापि त्यांचा सर्वकालिक दंड शुभवर्त्तमान न
अंगीकारणाऱ्यापेक्षां अधिक सवघड होईल. याचें कारण हेंच कीं त्यास
इतका उजेड व ज्ञान प्राप्त झालें नव्हतें. (मात्थी. ९:२३,२४. लुका. १२:
४७,४८.) तर जे ख्रीस्ताला अव्हेरितात त्यांचा दंड किती कठीण होईल.

१६ "लांडग्यांमध्यें जसें मेंढरांस." लोक तुमचा पाठलाग आणि द्वेष
करितील. त्यांस खरेपणाची आवड नाहीं. त्यांस अंधार व भ्रम यांची
आवड आहे. आणि जसजसा तुह्मी त्यांच्या पापाचा निषेध करितां तस-
तसा ते तुमचा अधिक द्वेष करितील.

"सापांसारिखे चतुर." साप हा चतुराईविषयींचें एक चिन्ह आहे. (उत्प.
३:१) बहुत लोक तुमचा द्वेष करून जीव घ्यायास पाहतील आणि तुमच्या

१७ आणि माणसांविषयीं (१) जपा; कारण कीं (२) ते तुह्मास
न्यायसभांच्या स्वाधीन करितील, आणि आपल्या सभास्थानांमध्यें तुह्मा-
ला फटके मारतील. (३)
१८ आणि सुभेदार व राजे यांकडे माझ्याकरितां तुह्मास नेतील,
(४) त्यांस व विदेश्यांस साक्ष पटावी ह्मणून.

---

(१) फिलि. ३:२.
(२) मात्थी २४:९. मार्क. १३:९.
(३) प्रेषि. ५:४०. २ करिं. ११:२४.
(४) प्रेषि. २४:२५.

---

कामास अडथळे घालतील, ह्मणून तुह्माला चतुराईचें व विवेकाचें मोठें अगत्य लागेल. आणि साळसूदहि व्हा, कोणी एकाला राग येण्याचा प्रसंग आणूं नका. लोकांवरील आपली प्रीति दाखवा. जें शुभवर्त्तमान तुह्मी गाजवितां तें खरेंच आहे असें तुह्मी आपल्या पवित्र वर्त्तणुकीवरून पटवा. जे निष्पापी तारणाऱ्याला अनुसरतात त्यानीं निर्दोषी व पवित्र होण्यास झटावें.

१७ "माणसांविषयीं जपा." संभाळा, आणि उगीच तुह्मी आपला जीव धोक्यांत घालूं नका. नम्र खिस्त्यानीं दुष्ट माणसांच्या युक्तीविषयीं सावध असावें यावरून आश्चर्य वाटतें, तरी सावध असलेंच पाहिजे. माणसाचें अंतःकरण पापाकडून इतकें कठीण होतें कीं जे निर्दोषी व पवित्र आहेत ते देखील निर्भय राहूं शकत नाहींत. लोक खोट्या धर्माकडून इतके भ्रमिष्ट होतात कीं ते खरा धर्म आणि त्याचे अनुसरणारे यांचें निर्मूळ करायास इच्छितात. "फटके मारतील." मार देणें ही शिक्षा सामान्य होती. पहिल्यानें छडीनें शिक्षा करीत, मग छडीला वाद्या बांधून करीत असत. नंतर शिक्षा अधिक कठीण व्हावी ह्मणून कधीं कधीं वादीच्या शेवटास लोखंडाचे किंवा शिस्याचे कांटे लावीत असत. या चाबुकाला विंचू ह्मणत असत. (१ राजे. १२:११.) खिस्त्यानीं ख्रीस्ताला नाकारावें यासाठीं त्यांस या चाबुकानें मारीत असत. पौलसानें पांच वेळां ३९ फटके सोसिले. (२ करिं. ११:२४.) आमचा तारणारा देखील वधस्तंभ वाहतां येईना तोंपर्यंत मारला गेला.

१८ "आणि सुभेदार व राजे इ०" हें भविष्य वारंवार पूर्ण झालें. प्रे. ५:२६, १२:१-४. २३:२३. २४:१, २८,३० पेत्रस निरो पादशाहाजवळ, योहान्न हा दोमिश्यन पादशाहाजवळ, आणि दुसरे प्रेषित इतर पादशाहांजवळ नेले होते असें ह्मणतात. ते त्या राजांसमोर ख्रिस्ती धर्माविषयीं साक्षीदार झाले. हें भविष्य पूर्ण झालें, यावरून ख्रीस्त सर्वज्ञ होता असें प्रमाण पटतें.

१९ परंतु (१) तुह्मास पराधीन करितील, तेव्हां कसें काय बोलावें, यांविषयीं काळजी करूं नका, कारण कीं तुह्मी काय बोलावें याची त्याच घटकेस तुह्मास सूचना होईल.

२० कां कीं बोलणारे तुह्मी नव्हां, तर तुमच्या बापाचा आत्मा तोच तुह्मामध्यें बोलणारा आहे.

२१ आणि भाऊ भावाला व बाप लेंकराला जिवें मारण्यास पराधीन करील; अणखी लेंकरें आईबापांवर उठून त्यांस जिवें मारवितील.

२२ आणि माझ्या नामामुळें सर्व तुमचा द्वेष करितील; परंतु शेवटपर्यंत टिकणारा तोच तरेल. (२).

---

(१) मार्क. १३:११. लुका. १२:११. २१:१४,१५. (२) अनु. १२:१२,१३. प्रग. २:१०.

---

१९,२० "काळजी करूं नका." ईश्वर तुह्मांला प्रेरील आणि तुह्मी काय बोलावें हें शिकवील. थोर राजासमोर गरीब धीवराने काय बोलावें ह्मणून चिंता करावी यांत कांहीं आश्चर्य नाहीं. तर ईश्वर सुचवील, हें वचन किती मोलवानसें वाटलें असेल बरें.

२१ "भाऊ भावाला इ० " जर ही गोष्ट घडली नसती तर ती संभव्य आहे असें आह्माला वाटलें नसतें. पण माणसें खरेपणाचा इतका द्वेष करितात कीं बहीण भावंडें, आईबाप व लेंकरें यांमधील जो परस्परांचा जवळचा संबंध आहे त्यावरून निर्दोषी व धार्मिक यांस देखील आश्रय होत नाहीं. दुष्ट माणसें ख्रिस्ती लोकांची फार कठीण जाचणूक करीत आलीं आहेत. तीं यातना करण्यासाठीं नवे नवे उपाय योजीत. त्यानी कित्तीएकांस वधस्तंभीं दिल्हें, कित्तीएकांस तापलेल्या तेलांत टाकिलें, कित्तीएकांस खांबासीं बांधून जाळिलें, कित्तीएकांस निखाऱ्यांवर हळू हळू पोळिलें, कित्तीएकांस शिशयाचा रस करून पाजिला, कित्तीएकांस क्रूर वनपशूपुढें टाकिलें. रक्तपात करणारा निरो बादशाहा तर आपल्या बागांतील रोशनाईसाठीं त्यांच्या अंगाला राळ लावून जाळीत असे. मूर्त्तिपूजक आईबाप तर आपलीं ख्रिस्ती लेंकरें, आणि नवरे आपल्या ख्रिस्ती बायका, यांला अश्या भयंकर मरणासाठीं परस्वाधीन करीत असत. सांप्रत तरी हा रक्तपाती स्वभाव नाहींसा झाला आहे कीं काय? आपल्या लेंकरानीं आणि आपल्या कुटुंबांतील माणसानीं ख्रिस्ती व्हावें यापेक्षां त्यानी मरावें असें इच्छिणारे कित्ती आहेत. पाहा बरें, लोक जन्मस्वभावेंकरून शुभवर्त्तमानाचा कित्ती द्वेष करितात.

२२ "सर्व तुमचा द्वेष करितील." सर्व दुष्ट माणसें आजपर्यंत ख्रिस्ताचा

२३ आणि एका नगरांत तुमच्या पाठीस लागतील तेव्हां दुसऱ्या नगरांत पळून जा; (१) कां कीं मी तुह्मास खचीत सांगतों, मनुष्याचा पुत्र येईल तोंपर्यंत इस्राएलाच्या नगरांत तुमचें फिरणें अटोपणार नाहीं.

२४ गुरूपेक्षां शिष्य थोर नव्हे, आणि धन्यापेक्षां चाकर थोर नव्हे. (२)

२५ शिष्य आपल्या गुरूसारिखा व चाकर आपल्या धन्यासारिखा व्हावा, इतकें पुरे. घरधन्यास बालजबुल ह्मटलें तर त्याच्या घरच्या माणसांस किती विशेषेंकरून ह्मणतील? (३)

२६ यास्तव त्यांस भिऊं नका, कां कीं (४) उघडें होणार नाहीं; असें कांहीं झांकलेलें नाहीं; आणि कळणार नाहीं, असें कांहीं गुप्त नाहीं.

(१) प्रेषि. ८:१. (३) योहा. ८:४८. (४) मार्क ४:२२. लुका. १२:२,३.
(२) लुका. ६:४०. योहा. १३:१६. १५:२०. १ करिं. ४:५.

आणि त्याच्या अनुसरणाऱ्यांचा द्वेष करीत आलीं आहेत. सैतानाचें राज्य ख्रीस्ताच्या राज्यास प्रतिकूळ आहे.

२३ "तुमच्या पाठीस लागतील इ०" ख्रीस्ताला नाकारल्यावांचून आपला जीव राखितां येईल तर राखावा, पण ख्रीस्ताला नाकारावें यापेक्षां जीव द्यावा हें बरें. "मनुष्याचा पुत्र येईल." ह्मणजे यरूशालेमाचा नाश करायास येईल, हाच अभिप्राय असेल. मात्थी २४:३०. मार्क. १३:२६. लुका. २१:२७–३२.

२४,२५ "गुरूपेक्षां शिष्य थोर नव्हे." लोक मजसीं वागले त्यापेक्षां तुह्मासीं अधिक चांगल्या रीतीनें वागतील असी आशा तुह्मी बाळगूं नये. त्यांनी मला भूतांचा अधिकारी ह्मटलें आहे तर ते तुह्मास कां ह्मणणार नाहींत? बालजबूल हा एक्रोनांचा देव होता. (२ राज. १:२.) तो मैलाचा देव, आणि सर्व मूर्तींपेक्षां नीच असें यहूदी लोक मानीत असत. यावरून त्यांना हें नाम देण्याकडून त्याचा अतिशय द्वेष व धिक्कार दाखविला.

२६ "त्यांस भिऊं नका." हें कृपायुक्त अश्वासन आहे. जरी दुष्ट लोक तुह्मास धिक्कारितात आणि तुह्मावर दोषारोप आणितात तरी काय भय? ईश्वर सर्व जाणतो. तुह्मी प्रमाणिक व निर्दोषी आहां असें तो सर्व सृष्टीसमोर उघड करील. हा धैर्य धरण्यास आधार आहे.

२७ जें मी तुह्मास अंधारांत ह्मणतों, तें तुह्मी उजेडांत सांगा, आणि जें तुमच्या कानांत सांगितलें तें धाब्यांवरून गाजवा.

२८ आणि जे शरीराला वधितात पण आत्म्याला वधायास समर्थ नाहींत त्यांस भिऊं नका; (१) तर आत्म्याला व शरीरालाहि नरकांत टाकून नाश करायास जो समर्थ आहे त्याला विशेषेंकरून भ्या.

२९ दोन चिमण्या एका पैस्याला विकतात कीं नाहीं? तथापि तुमच्या बापाच्या आज्ञेवांचून त्यांतून एकहि भूमीवर पडत नाहीं.

३० आणि तुमच्या डोक्यावरले सर्व केंस देखील मोजलेले आहेत. (२)

३१ यास्तव भिऊं नका; बहुत चिमण्यांहून तुमचें मोल अधिक आहे.

३२ कारण कीं जो कोणी माणसांसमोर मला अंगीकारील, त्याला मीहि आपल्या आकाशांतील बापासमोर अंगीकारीन. (३)

३३ पण जो कोणी माणसांसमोर मला नाकारील, (४) त्याला मीहि आपल्या आकाशांतील बापासमोर नाकारीन.

---

(१) यशा. ८:१२,१३. ५१:७,१२. १ पेत्र. ३:१४. (३) प्रग. ३:५.
(२) प्रेषि. २७:३४. (४) तित. २:१२.

---

२७ "जें मी तुह्मास अंधारांत इ०" जें मी एकांतीं सांगतों तें तुह्मी जाऊन लोकांस सांगा. भ्या या कामासाठीं तुह्माला निवडून घेतलें आहे.

२८ "जे शरीराला वधितात." आत्म्यापुढें शरीर अगदी हलकें आहे. आणि माणसाच्यानें आत्म्याला मारवत नाहीं. तर त्यांस भिऊं नये. ते केवळ शरीराला मारतात, पण ईश्वर शरीर व आत्मा या दोघांसहि नरकांत घालायास समर्थ आहे ह्मणून त्याला भ्यावें. ख्रिस्ती लोकांनीं जग, दुःख, दरिद्र, जांचणूक, , अथवा मरण देखिल येवो तरी त्यांस भिऊं नये. त्यांनीं देवाच्या इच्छेस मान्य असावें आणि आपला परिणाम त्यावर सोपून द्यावा.

२९—३२ "चिमण्या." ईश्वर चिमण्यांला संभाळितो, आणि तुमच्या डोक्यावरील केंस मोजितो, तर तो तुमचा सांभाळ करणार नाहीं कीं काय?

३२,३३ "मला अंगीकारील इ०" ख्रीस्त शेवटल्या दिवसीं ज्या नेमानें आमचा न्याय ठरवील तो हाच आहे. जे त्याला अंगीकारून सालस मनानें त्याला अनुसरतात त्यांस तो न्यायदिवसीं अंगीकारील, परंतु जे आतां

३४ मी पृथ्वीवर शांति करायास आलों असें समजूं नका; शांति करायास नाहीं, तर तरवार चालवायास मी आलों आहें. (१)

३५ कां कीं पुत्राला त्याच्या बापापासून (२) व कन्येला तिच्या आईपासून व सुनेला तिच्या सासूपासून फितवायास मी आलों आहें.

३६ आणि माणसाच्या घरांतलींच माणसें त्याचे वैरी (३) होतील.

३७ जो माझ्यापेक्षां (४) बापावंर अथवा आईवर प्रीति करितो तो मला योग्य नाहीं, आणि जो माझ्यापेक्षां पुत्रावर अथवा कन्येवर प्रीति करितो तो मला योग्य नाहीं.

(१) लुका. १२:४९,५३.
(२) मीखा. ७:५,६.
(३) गीत. ४१:९.
(४) लुका. १४:२६.

त्याला नाकारितात त्याला तोहि नाकारील. तर ख्रिस्ताला अव्हेरण्याचा किती दोष व भय आहे!

३४—३६ "मी पृथ्वीवर शांति करायास आलों इ." मीखा. ७:६. फूट करावी अश्या हेतूने ख्रिस्त आला नव्हता. तो वास्तविक शांतीचा अधिपति आहे. यशा. ९:६. ११:६. लुका. २:१४. परंतु त्याच्या येण्यावरून जे ख्रिस्ताचा द्वेष करितात ते त्याच्या सर्व अनुसरणाऱ्याचाहि द्वेष करितील. तथापि हें ख्रिस्ती धर्माचें फळ नाहीं. हें केवळ लोकांच्या दुष्ट स्वभावावरून होतें. आणि सर्व जाति खऱ्या देवाची सेवा करितील तोंपर्यंत असेंच होत जाईल. तेव्हां ख्रिस्ती धर्माकडून सर्वत्र शांति होईल.

३७ "जो माझ्यापेक्षां बापावर अथवा आईवर प्रीति करितो." कुटुंबांतील माणसांच्या संबंधावरून बहुतेकांस ख्रिस्ताला अंगीकारायास अडथळा होतो हा धर्म खरा आहे आणि ख्रिस्ताला अंगीकारलें पाहिजे, नाहीं तर आमचें तारण होणार नाहीं अशी त्यांची खातरी होती. परंतु त्याच्या कुटुंबांतील सर्व माणसें ख्रिस्ताला आणि ख्रिस्ती धर्माला अव्हेरितात. जर आह्मी ख्रिस्ताला अंगीकारितों तर ते आह्मास जातिबाहेर टाकतील आणि भ्रष्ट असें मोजितील, हें त्याला ठाऊक आहे. हा अपमान सोसणें फार कठीण आहे, ह्मणून ते उशीर करितात. पहिल्याने आह्मी आपल्या नातलगांस आपल्या बरोबर येण्याविषयीं मनावूं. मग ख्रिस्ताला अंगिकारूं असें ते मनांत आणितात. परंतु हें सिद्धीस जाण्यापूर्वी ते आपल्या पापांत मरून आपल्या आत्म्याचा नाश करून घेतात. आह्मी दुसऱ्या सर्व गोष्टींपेक्षां ख्रिस्तावर

३८ आणि जो आपला खांब उचलून घेऊन माझ्या मागें येत नाहीं, तो मला योग्य नाहीं.

३९ जो आपल्या जिवाला राखील (१) तो त्याला मुकेल, आणि जो माझ्या करितां आपल्या जिवाला मुकेल तो त्याला मिळवील.

४० जो तुम्हाला अंगीकारील (२) तो मला अंगीकारील, आणि जो मला अंगीकारील तो माझ्या पाठविणाऱ्याला अंगीकारील.

४१ जो भविष्यवाद्याच्या नामाने भविष्यवाद्याला अंगीकारील (३) त्याला भविष्यवाद्याचें वेतन मिळेल; आणि जो न्यायीच्या नामाने न्यायीला अंगीकारील त्याला न्यायीचें वेतन मिळेल.

४२ आणि जर कोणी शिष्याच्या नामाने या लाहानांतील एकाला केवळ थंड पाण्याचा प्याला पाजील, तर मी तुम्हाला खचीत सांगतों, तो आपल्या वेतनाला मुकणारच नाहीं.

---

(१) मात्थी. १६:२५. (३) १ राजे. १७:१०. इब्री. ६:१०.
(२) मात्थी. १८:५.२५:४०,४५. योहा. १२:२४.

---

अधिक प्रीति केली पाहिजे. त्याकरितां सर्व नातलग व दुसऱ्या सर्व गोष्टी सोडायास आम्ही मान्य असावें, नाहीं तर आम्ही त्याचे खरे अनुसरणारे होत नाहीं.

३८ "आपला खांब." ह्मणजे वधस्तंभ. ज्यांस वधस्तंभाचा दंड ठरे त्यांस आपला वधस्तंभ उचलावा लागत असे. अडवा उभा अशा रीतीने लांकडाचे दोन तुकडे बसवून वधस्तंभ करीत असत. सर्व खरे ख्रिस्ती ख्रिस्ताला अनुसरण्यास सिद्ध होतील. ते त्यासारिखें दुःख व निंदा सोसतील, आणि पाहिजे तर ज्या वधस्तंभावर मरण सोसायाचें आहे तोहि उचलून नेतील.

३९ "जो आपल्या जीवाला राखील इ०" जो आपल्या शरीराचा जीव रक्षायास फार चिंता धरितो तो सर्वकाळचें जीवन गमावील. परंतु जो आपला जीव मोलवान न मोजितां ख्रीस्ताकरितां संतोषाने देतो तो सर्वकाळचें जीवन पावेल.

४०,४२ जे ख्रीस्ताकरितां त्याच्या अनुसरणाऱ्यांवर उपकार करितात ते आपलें फळ चुकणार नाहींत, असें दाखविण्यासाठीं एथें तीन दाखले दिल्हे आहेत. कोणी मनुष्य ख्रीस्ताचा शिष्य आहे याच कारणास्तव त्याजवर

## अध्याय ११.

१ मग असें झालें कीं, येशूने आपल्या बारा शिष्यांस आज्ञा करणें संपविल्यावर, तो लोकांच्या नगरांमध्यें शिकवायास व उपदेश करायास तेथून निघाला.

२ नंतर योहान्नाने बंदिशाळेंत ख्रीस्ताचीं कामें ऐकून (१) आपल्या शिष्यांतून दोघांस पाठवून त्याला पुसलें कीं,

---

(१) लुका. ७:१८. इ०.

---

फार लहान उपकार केला ह्मणजे त्याला केवळ थंड पाण्याचा प्याला दिल्हा तरी चांगलें फळ होईल. "लहानांतील." ह्मणजे शिष्यांतील. सांप्रतहि ख्रिस्ती लोक हे जगाच्या मोजण्यांत लहान आहेत, आणि आपल्याहि मोजण्यांत नम्र आहेत. तथापि ते लवकरच ख्रीस्ताबरोबर सर्वकाळीक वतन पावणार आहेत. तर ख्रीस्ताला अनुसरण्याची इच्छा धरणार नाहीं असा कोण आहे? त्याला अव्हेरण्याचा दोष केवढा भयंकर आहे! राजमंदिर अथवा सिंहासन अथवा सोन्याची खाण अव्हेरली तर केवळ अल्प तोटा आहे. परंतु सर्वकाळचें जीवन हें राजमंदिर अथवा सोनें यांसारिखें हलकें नाहीं. हें गमाविलें ह्मणजे सर्व बुडविलें आहे. शुभवर्त्तमान धिक्कारलें ह्मणजे सर्व आशा बुडाली. सर्वांनीं शुभवर्त्तमान खरें मानावें आणि ख्रीस्ताला अंगीकारावें असी देवाची आज्ञा आहे. असें असतां जे जे अंगीकारणार नाहींत त्यांस हाय, हाय! ते ख्रिस्ताला बहुत दिवसपर्यंत अव्हेरूं शकतील, पण न्यायदिवस येणार आहे आणि ते आपलें फळ पावतीलच पावतील. कोणीहि चुकणार नाहीं. पापाचें फळ सदोमाला प्राप्त झालें तसेंच सर्व दुष्टांलाहि प्राप्त होईलच होईल. तर जे ख्रीस्ताला अव्हेरितात त्यांची अवस्था किती भयंकर आहे!

१ "मग असें झालें कीं." ख्रिस्ताने आपल्या शिष्यांस सदरहू आज्ञा कपरणाहूमाजवळ केल्या, मग सभोंवतील नगरांत उपदेश करायास गेला.

२–१९ ही गोष्ट लूका ७:१८–३५. यांत लिहिली आहे. योहान्न बंदिशाळेंत होता. हेरोदाने आपल्या भावाची बायको घेतली होती, मात्थी. १४:३,४. आणि याविषयीं योहान्नाने त्याचा निषेध केला होता, ह्मणून हेरोदाने त्याला बंदिशाळेंत घातलें.

३ जो यायाचा होता तो तूंच आहेस, किंवा आह्मी दुसऱ्याची
वाट पाहूं?
४ मग येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, जें तुह्मी ऐकतां व पाहतां
तें योहान्नाला जाऊन सांगा.
५ अंधळे पाहतात, पांगळे चालतात, कोडी शुद्ध होतात, बहिरे
ऐकतात, मेलेले उठतात, आणि दरिद्र्यांस शुभवर्त्तमान सांगण्यांत येतें;
६ आणि जो कोणी मजविषयीं अडखळत नाहीं तो धन्य आहे.(१)
७ मग ते गेल्यावर येशू समुदायांस योहान्नाविषयीं बोलूं लागला,
तुह्मी काय (२) पाहायास रानांत गेलां? वाऱ्याने (३) हालविलेला
बोरू काय?

(१) यशा. ८:१४,१५. १ करिं. १:२२,२३. १ पेत्र. २:८.
(२) लुका. ७:२४-३०. (३) एफ. ४:१४. याक. १:६.

३ "यायाचा होता." ह्मणजे ख्रीस्त. यहुदी लोक तारणाऱ्याची वाट पाहत होते. उत्प. ४९:१. यशा. १:१-६. ११:१-५. ३५:४-६. ५३. दानी. ९:२४-२७. अनु. १८:१८,१९. यहूदी लोक ख्रिस्ताविषयीं, जो यायाचा तो, असें ह्मणत असत.

४,५ "जें तुह्मी ऐकतां व पाहतां." लुका. ७:२१. पाहा, ख्रीस्त आपणाविषयीं प्रमाण पटविण्यासाठीं त्याला आपलीं कृत्यें दाखवितो. भविष्यवाद्यांनी चमत्कार केले होते, पण त्यांनी ते आपल्या नांवाने आणि आपल्याच अधिकाराने केले, आणि यावरून ख्रीस्त हा खरा मशीहा आहे असें प्रमाण पटलें. योहान्न हें प्रमाण समजेल असें ख्रीस्ताला ठाऊक होतें. दीन अथवा दरिद्री, यशा. ६१:१. लुका. ४:१८. यांस शुभवर्त्तमान सांगणें हेंहि प्रमाण योहान्नाला समजल्यासारिखें होतें. एथें ख्रिस्ती धर्माचें एक विशेष लक्षण दिसून येतें. जे गरीब, दुःखीत, आणि लोकांमध्यें तुच्छ मानिलेले आहेत त्यांतील बहुतेकांस ख्रीस्त निवडितो, उंच करितो, आणि शेवटीं आकाशलोकांत विशेष मान देईल.

६ 'जो कोणी मजविषयीं अडखळत नाहीं.' ह्मणजे माझी लीनता, नम्रता, दारिद्र, यांमुळें मला अव्हेरीत नाहीं, तो धन्य. माझीं कामें मजविषयीं साक्ष देतात, हें लक्षून जो मजवर विश्वास ठेवितो तो धन्य.

७—१० येशूने योहान्नाविषयीं साक्ष द्यायास, आणि जे त्याच्या मागें होते त्यांची परीक्षा पाहायास हा प्रसंग घेतला. बोरू, हा हलका, अस्थिर,

८ तर काय पाहायास गेलां? मऊ वस्त्रें ल्यालेल्या माणसाला
काय? पाहा, मऊ वस्त्र लेणारे राजांच्या घरांत असतात.

९ तर काय पाहायास गेलां? भविष्यवाद्याला काय? होय, मी
तुह्मास सांगतों, अणखी भविष्यवाद्याहून जो मोठा, त्याला.

१० कारण कीं पाहा, मी आपल्या दुताला तुझ्या पुढें पाठवितों,
तो तुझी वाट तुझ्यासमोर तयार करील, असें ज्याविषयीं लिहिलें आहे,
तो हाच आहे. (१)

११ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, बाप्तिस्मा करणारा योहान्न
यापेक्षां बायकांपासून जन्मले त्यांमध्यें (२) कोणी मोठा उपजला नाहीं,
तरी आकाशाच्या राज्यांत जो लहान तो त्याहून मोठा आहे. (३)

१२ अणखी बाप्तिस्मा करणारा योहान्न याच्या दिवसापासून आतां-
पर्यंत आकाशाच्या राज्यावर बलात्कार चालला आहे, आणि बलात्कारी
तें हिरावून घेतात. (४)

(१) यशा. ४०:३. मल. ३:१. लुका. १:७६. (३) योह. १:१५. २७:३,६०.
(२) योह. ५:३५. (४) लुका. १६:१६. एफ. ६:११-१३.

आणि चंचलमति अस्या माणसाचें चिन्ह आहे. योहान्न असा मनुष्य होता ह्मणून तुह्मास वाटतें कीं काय? असें खीस्तानें त्या मनुष्यांस विचारिलें. तुह्मी त्याचा मोलवान सुशोभित पोशाख पाहायास गेला कीं काय? नाहीं, तो शत्यशील, आणि सद्गुणी मनुष्य आहे. तुह्मी त्याला भविष्यवादी असें मोजिलें कीं काय? होय, भविष्यवादी आहे, आणि भविष्यवाद्यापेक्षांहि थोर आहे. भविष्यवादी सद्गुणी व सन्मान्य असे मनुष्य होते. त्यांनी मशीहाच्या येण्याविषयीं भविष्य सांगितलें. परंतु योहान्न मशीहाची वाट सिद्ध करणारा त्याच्या येण्याच्या वेळेस तो जीवंत आहे ह्मणून तो भविष्य-वाद्यांपेक्षां थोर आहे.

११ "आकाशाच्या राज्यांत." मात्थी. ३:२. यावरील व्याख्या पाहा. खीस्तानें आपलें आत्मिक राज्य स्थापण्यासाठीं आपलें साह्य करायास यो-हान्नाला निवडून मोठा मान दिल्हा. तरी जो खीस्तानंतर नवीन व्यवस्थेंत भविष्यवाद किंवा उपदेशक त्याला खीस्त तारणोपाय इत्यादि शुभवर्त्तमानां-तल्या विशेष सिद्धांताविषयीं अधिक ज्ञान व समज होईल ह्मणून तो त्याहून मोठा होईल.

१२ "योहान्न उपदेश करूं लागल्यापासून लोक आपल्या तारणाविषयीं

१३ कारण कीं योहान्नापर्यंत सर्व भविष्यवादी व नेमशास्त्र भविष्य सांगत आले.

१४ आणि जर तुह्मी मान्य कराल तर जो एलीया यायाचा होता तो हाच आहे. (१)

१५ ज्याला ऐकायास कान आहेत तो ऐको. (२)

१६ या पिढीला तर कोणती उपमा देऊं? (३) लेंकरें चवाठ्यां-मध्यें बसून आपल्या सवंगड्यांस हाक मारून ह्मणतात कीं;

१७ आह्मी तुह्माजवळ पांवा वाजविला, तरी तुह्मी नाचलां नाहीं, आह्मी तुह्माजवळ विलाप केला, तरी तुह्मी रडून घेतलें नाहीं, त्यांसारिखी ती आहे.

(१) मला. ४:५. मात्थी १७:१२. (२) प्रग. २:७ पुढें. (३) लुका ७:३१.

चिंता करूं लागले. त्याचें ऐकायास ते उत्कंठेने आणि दाटीने आले. योहान्नाचा उपदेश त्यांच्या मनांत ठसला. जीवात्मा किती मोलवान आहे आणि त्याच्या नाशाविषयीं केवढें भय आहे, हें लोकांस समजतें तर ते आतांहि किती दाटीने व उत्कंठेने शुभवर्त्तमान ऐकायास येते.

१३,१४ "नेमशास्त्र." ह्मणजे मोश्याने लिहिलेलीं पांच पुस्तकें. योहान्नाने नवी व्यवस्था सुरू केली.

"एलीया." हा भविष्यवादी अग्नीच्या रथाने आकाशांत घेतला होता. (२ राज. २:११.) मशीहाची वाट सिद्ध करायास एलीया येईल असें भविष्य सांगितलें होतें. (मला. ४:५,६.) याचा अर्थ एलीया मेलेल्यांमधून उठून येईल, असा नव्हे, पण दुसरा कोणी एलियाच्या आत्म्याने आणि सामर्थ्याने येईल असा आहे. (लुका. १:१७.) तथापि एलीया आणि दुसरे कित्येक भविष्यवादी मेलेल्यांमधून उठतील असें यहूद्यांस वाटत होतें. (मात्थी. १६:१४. १७:१०. योहा. १:२१.) हें यहूद्यांचें मत ख्रीस्ताला ठाऊक होतें ह्मणून तो बोलला कीं, जर तुह्मी स्वीकाराल तर हा एलीया आहे.

१५ ही गोष्ट भारी आहे. तुह्मी लक्ष लावून ऐका. वाट सिद्ध करणारा आला आहे तर मशीहाची वाट पाहा.

१६-१९ ख्रीस्त त्यांची चंचल बुद्धि निषेधी. त्यांनी योहान्नाच्या अल्पाहारत्वाविषयीं कुरकूर केली, पण ख्रीस्त खात पीत आला आणि दुसऱ्या लोकांसारिखा वागला, तरी त्यांनी त्याविषयींहि कुरकूर केली. त्यांला योहा-

१८ कारण कीं योहान्न येऊन खात पीत नसे, आणि ते ह्मणतात, त्याला भूत लागलें. (१)

१९ मनुष्याचा पुत्र येऊन खात पीत असतो (२) आणि ते ह्मणतात, पाहा, हा माणूस खादाड व दारूबाज, जकातदारांचा व पाप्यांचा (३) मित्र. परंतु ज्ञान आपल्या लेंकरांकडून न्यायी ठरतें. (४)

२० तेव्हां (५) ज्या नगरामध्यें फारकरून त्याचे चमत्कार घडले होते त्यानीं पश्चात्ताप केला नाहीं, ह्मणून त्यांजवर तो असा दोष ठेवूं लागला कीं,

२१ हे खोराजिना, तुला हाय हाय; (६) हे बेथसाइदा, तुला हाय हाय; कां कीं तुह्मामध्यें जे चमत्कार घडले, ते सोर व सीदोन यांत घडले असते तर त्यानीं मागेंच तरट व राख अंगावर घेऊन पश्चात्ताप केला असता.

२२ अणखी मी तुह्मास सांगतों कीं, न्यायाच्या दिवसीं सोर व सीदोन यांस तुह्मापेक्षां सोपें पडेल. (७)

२३ आणि हे कपरणाहूमा, जें आकाशापर्यंत उंचावलेलें (८) तें तूं मृतलोकापर्यंत खालीं पाडसील; कां कीं तुजमध्यें जे चमत्कार घडले, ते सदोमांत घडले असते, तर तें आजपर्यंत राहिलें असतें.

२४ अणखी मी तुह्मास सांगतों कीं, न्यायाच्या दिवसीं तुझ्यापेक्षां सदोम देशांत सोपें पडेल.

---

(१) मात्थी. १०:२५. योह. ७:२०.
(२) मात्थी. ९:१०. योह. २:२.
(३) लुका. १५:२. १२,७.
(४) गीत. ९२:५,६. नी. १७:२४.
(५) लुका. १०:१३. पुढें.
(६) योह. १२:२१.
(७) मात्थी १०:१५.
(८) यशा. १४:१३—१५. इर्म. वि.२:१.

---

न्याचा व ख्रीस्ताचा उपदेश आवडला नाहीं ह्मणून त्यानीं ख्रीस्तावर कांहीं दोषारोप आणण्याची संधि पाहिली.

२०—२४ ज्यानीं ख्रीस्ताला अव्हेरिलें त्यांस तो शिक्षा ठरवितो. खोराजीन आणि बेथसाईदा हे गांव कपरणाहूमाजवळ होते. बेथसाईदा हा फिलिप्पस, आंद्रियास, व पेत्रस यांचा जन्मगांव होता. (योहा. १:४४.) सोर व सीदोन हीं नगरें भूमध्यसमुद्राच्या कांठावर वसलीं होतीं. त्यांत पुष्कळ द्रव्य होतें. शलमोनानें सोरापासून देऊळ बांधायास सामान आणिलें

२५ त्या समयीं (१) येशू असें बोलता झाला कीं, हे बापा, आकाशाच्या व पृथ्वीच्या प्रभु, मी तुला स्तवितों, कारण कीं या गोष्टी ज्ञानी व तर्कवान यांपासून लपवून त्वां लेंकरांस प्रगट केल्या आहेत. (२)

२६ होय बापा, कां कीं असेंच तुला बरें वाटलें.

२७ माझ्या बापानें माझ्या हातीं (३) सर्व दिल्हें आहे, आणि बापा-

(१) लुका १०:२१. पुढें.
(२) गीत ८:२. इर्म. १:७,८. १ करिं. १:२७. योह. ३:३५. १७:२. १ करिं. १५:२७.
(३) मार्त्थी २८:१८. लुका १०:२२.

होतें. २ काल.२:११—१६. ख्रिस्ताच्या वेळेस हीं नगरें आबाद व शोभायमान होतीं, पण त्यांतील राहाणारे फार दुष्ट होते. हल्लीं सीदोन हें फार लाहान आहे आणि सोरांत तर केवळ थोडक्या गरीब धीवरांचीं झोंपडीं सांपडतात. त्यांच्या दुष्टपणावरून ईश्वरानें त्यांस शिक्षा लावून त्यांचा नाश केला. "तरट व राख." हीं खेदाचीं व शोकाचीं चिन्हें होतीं.

"कपरणाहूमा." एथें ख्रीस्तानें बहुत दिवस राहून पुष्कळ चमत्कार केले होते. नंतर लढाईकडून या नगराचा एवढा नाश झाला कीं, त्याचें मूळ ठिकाण शोधून काढायास फार अवघड पडलें. केवळ इहलोकींच नव्हे पण परलोकींहि दंड लागेल असें ख्रीस्तानें त्यांस सुचविलें. सदोमाचा नाश त्यांच्या दुष्टाईमुळें झाला. आणि जे या जगांत देखील न राहण्याजोगे असे दुष्ट झाले आहेत त्यांस ईश्वर आकाशलोकांत आपल्या जवळ घेईल कीं काय? कधीं घेणार नाहीं. सदोमांतील दुष्ट लोकांस कांहीं आशा नाहीं. त्यांचा न्याय ठरला आहे. ते आकाशलोकाबाहेर घालविले आहेत. परंतु जे ख्रीस्ताला नाकारितात त्यांचा दंड सदोमांतील राहणाऱ्यांपेक्षां अवघड होईल. दोष व दंड हें लोकांचें ज्ञान व समज यांप्रमाणें होतील.

२५ "ज्ञानी व तर्कवान." ह्मणजे जे अहंकारी असून आपणाला ज्ञानी मोजितात ते. "लेंकरांस." जे लीन व नम्र व सुशील आहेत त्यांस. शिष्य असे होते. सर्व खरे खिस्ती असे आहेत. जे नम्र व पापहीन आहेत त्यांच्याठायीं ईश्वर वस्ती करितो आणि त्यांस आपली इच्छा कळवितो.

२६ जें जें ईश्वराला आवडतें तें सर्व योग्य आहे, असें आह्मांला ठाऊक आहे. बहुत गोष्टींचा परिणाम व कारण आह्मास ठाऊक नाहीं. पण ईश्वराची इच्छा कळली ह्मणजे पुरे. आह्मी ईश्वरावर भरवसा ठेवावा.

२७ "माझ्या हातीं सर्व दिल्हें आहे." योहा. ३:३५. ६:४६. १०:१९.

वांचून पुत्राला कोणी ओळखत नाहीं, आणि पुत्रावांचून व ज्याला प्रगट करायास पुत्राची इच्छा असेल, त्यावांचून बापाला कोणी ओळखत नाहीं. (१)

२८ अहो कष्टकरी (२) आणि ओझ्याने लादलेले, तुह्मी सर्व माझ्याजवळ या, ह्मणजे मी तुह्माला विसावा देईन.

२९ तुह्मी आपल्यांवर माझें जूं घ्या, आणि मजपासून शिका, (३) कां कीं मी अंतःकरणाचा (४) नम्र व लीन आहें; ह्मणजे तुह्मी आपल्या जिवांस विसावा पावाल. (५)

---

(१) योह. १:१८. १ योह. ५:२०. (३) फिलि. २:५—८. १ पेत्र. २:२१.
(२) यशा. ५३:२,३. (४) जख. ९:९. (५) इर्म. ६:१६.

---

कल. १:१६,१७. पाहा. आपल्या लोकांच्या हितासाठीं ख्रिस्ताला सर्व गोष्टींचा अधिकार आहे. त्यास त्यांनें तारावें व आकाशलोकांत पोंहचवावें ह्मणून सृष्टीचा अधिकार त्याच्या स्वाधीन केला आहे. एफ. १:२०—२२. "पुत्राला कोणी ओळखत नाहीं." तो इतका थोर आहे. त्याच्याठायीं देवपण व मनुष्यपण हीं दोन्हीं असणें हें इतकें गूढ आहे कीं, तें कोणी माणूस जाणूं शकत नाहीं. आणि पुत्रावांचून मनुष्य अथवा कोणी दूत ईश्वराला बरोबर जाणूं शकत नाहीं. जो कोणी खरा विश्वास धरितो त्याला ख्रिस्त ईश्वराची इच्छा कळवितो. ईश्वर क्षमाशील आहे असें त्याच्या अनुभवास येतें, आणि त्याच्या सर्व गुणांविषयीं ज्यास्ती समज होतो. तथापि हा समज सर्वकाळपर्यंत वाढत जाईल.

२८ अहो भ्रष्ट आणि लाचार पाप्यांनो, तुह्मी पापानें लादलेले आणि होणार जो क्रोध त्याविषयीं भीत आहां. तुह्मी या, तुह्मावर देखील ईश्वर दया करील. तुह्मी मूर्तिपूजा आणि बहुत प्रकारचें पाप करण्याकडून जन्मापासून देवाचा अपमान करीत आलां आहां. तुह्मी अत्यंत दुष्ट असतां, यात्रा देहदंड इत्यादि बहुत उपाय करीत आलां आहां, पण हे सर्व व्यर्थ आहेत. तर माझ्या जवळ या. मी तुह्मांला विसावा देईन. मी तुमची खंडणी भरून दिल्ही आहे, तर माझ्या जवळ या. मजवर भाव ठेवून तारण घ्या.

२९ "माझें जूं घ्या." पापाचें व सैतानाचें जूं टाका. यात्रा, उपास, देहदंड, इत्यादि उपाय सोडा आणि मजवर भाव ठेवा ह्मणजे तुमचें तारण होईल. माझी सेवा अंगीकारायास भिऊं नका. तुह्मी मजसारिखे व्हा ह्मणजे तुह्मी विसावा व आनंद पावाल.

३० कां कीं माझें जूं सोईचें (१) व माझें ओझें हलकें आहे.

(१) १ योहा. ५:३.

३० "माझें जूं सोईचें." मी निरुपयोगी व दुःखदायक अस्या उपायाचा भार तुह्मावर ठेवीत नाहीं. या, पश्चात्ताप करा आणि मजवर भाव ठेवा, ह्मणजे तारण पावाल. या आयुष्यांत प्रत्येक दुःखामध्यें आनंद, व मरतेवेळेस समाधान आणि आकाशलोकांत सर्व काळपर्यंत विसावा व सुख पावाल.

**सूचना** १ सर्व लोकानी ख्रीस्ताविषयीं समजायास उत्कंठित असावें. योहान्नानेहि त्याविषयीं जाणायास इच्छिलें. यासारिखें दुसरें कोणतेंहि ज्ञान मनुष्यांला अगत्याचें नाहीं. ख्रीस्तासारिखा दुसरा कोणी या जगांत कधीं आला नाहीं. तो जगाचा तारणारा आहे आणि त्यावर जगाची आशा अवलंबून आहे, त्यावर भाव ठेविला पाहिजे, नाहीं तर सर्वकाळचा नाश होईल. २. हा येशू खरा मशीहा होता असें पक्कें प्रमाण आहे. त्यानें अंधळ्यांचे डोळे उघडले, तर तो पाप्यांच्या मनांत प्रकाश पाडूं शकत नाहीं कीं काय? त्यानें बहिऱ्यांस कान दिल्हे, तर बहीर पाप्यानीं ऐकावें आणि जगावें, असें त्याच्यानें करवत नाहीं काय? त्यानें मेलेल्यांस उठविलें, तर जे पापांत मेले आहेत त्यांस तो सर्वकाळच्या जीवनासाठीं उठवायास शक्तिमान आहे. ३. दुष्ट लोक धार्मिक माणसांवर दोषारोप करितात. (१८,१९ ओव्या पाहा.) निष्पापी तारणारा जो या पृथ्वीवर एकच पूर्ण पवित्र व निर्दोषी होता, त्याजवर लोकानी खोटेपणानें दोषारोप करून त्याची निंदा केली. तर त्याच्या अनुसरणाऱ्यानी आपल्यासहि तसेंच केल्यावरून नवल मानूं नये. ४. दुष्टांला दंड लागेलच लागेल. (२१,२२ ओव्या पाहा.) सदोम, सोर सीदोन व कपरणाहूम यांस दंड लागला. कधीं कधीं दंड लावण्यास उशीर होत असतो. पण जे दुष्ट आपल्या पापांत मरतात ते सर्वकाळचा दंड पावतीलच पावतील. ५. या जगांत दुष्ट लोकांस ज्ञान व देवाची इच्छा समजण्यास जे उपाय मिळतात त्या मानानें त्यांचा सर्वकाळचा दंड होईल. (२३,२४ पाहा.) कपरणाहूमास असें झालें, आणि हल्लीं जे पापी आहेत त्यांसहि असेंच होईल. जे ख्रीस्ताविषयीं ऐकून त्याला धिःकारितात त्यांला न्यायकाळीं सदोमांतल्या पाप्यांपेक्षां अधिक कठीण दंड लाविला जाईल. ख्रीस्ताला धिःकारणें हें भयंकर आहे. ६. ख्रीस्ताचें हें बोलावणें किती कृपायुक्त आहे. (२८—३० पाहा) जो पापानें लादलेला व नाश पावण्यासारिखा आहे त्याणें ख्रीस्ताजवळ यावें आणि दया पावावी. ख्रीस्ताची

## अध्याय १२.

१ त्या समयीं (१) येशू शाब्बाथ दिवसीं शेतांमधून जात होता,
तेव्हां त्याच्या शिष्यांस भूक लागली, ह्मणून ते कणसें मोडून खाऊं
लागले. (५)
२ तेव्हां परोशी हें पाहून त्याला ह्मणाले, पाहा, शाब्बाथ दिवसीं
जें करूं नये (२) तें तुझे शिष्य करितात.
३ मग त्याने त्यांस ह्मटलें, जेव्हां दाविदास व त्याच्या बरोबरच्या
माणसांस भूक लागली, तेव्हां त्याने काय केलें (४) हें तुह्मी वाचलें
नाहीं काय?

---

(१) मार्क. २:२३. इ. लुक ६:१. इ. (३) निर्ग. ३१:१५.
(२) अनु. २३:२५. (४) १शम. २१:६.

---

दया अपार आहे. तो सर्व जगाला बोलावितो. जे जे येतील ते सर्व क्षमा व तारण पावतील. पाप्यानी हें बोलावणें किती आनंदाने स्वीकारावें.

१—८ हें वर्णन मार्क. २:२३—२८. लू. ६:१—५. यांत पाहा. परोश्यानी ख्रीस्तावर दोष ठेवण्याचा प्रसंग पाहून हा आपल्या शिष्यांस शाब्बाथ मोडूं देतो असा आरोप आणिला. शेजाऱ्याच्या पिकांत कणसें मोडणें यांत पाप नव्हतें. अनु. २३:२५. परंतु शाब्बाथांत सर्व संसारांतलें काम मना केलें होतें. निर्ग. २०:१०,३५:२,३. गण. १५:३२—३६. यावरून ख्रीस्त आणि शिष्य यानी नेमशास्त्र मोडलें आहे असा दोषारोप परोश्यानी मोठ्या आनंदाने त्यांजवर आणिला.

३ "मग त्याणे त्यांस ह्मटलें इ०" ख्रीस्ताने त्यांच्या शास्त्रांतून एक उदाहरण काढून त्यांस दाखविलें कीं शिष्य असें करून निर्दोषी आहेत. अर्पिलेली भाकर पवित्र होती आणि ती केवळ याजकानी खावी असें होतें, असें असतां जेव्हां दाविद शाउलापासून पळून दमला व भुकेला अहिमेलेख याजकाजवळ आला तेव्हां त्याला हीच अर्पिलेली भाकर मिळाली व त्याने ती मागून खाल्ली. १ शमु. २१:१—७. दाविदाचें हें कृत्य त्यांच्या सर्वांहून कडकडीत उपाध्यानींहि अयोग्य असें ठरविलें नव्हतें. या उदाहरणावरून असें दिसून आलें कीं मोठी गरज लागली असतां जें विधिशास्त्रांत मना केलें आहे, तें केलें तरी पाप नाहीं. दाविदाला फार भूक लागली ह्मणून जी भाकर खाऊं नये ती खाल्ली असतांहि तो निर्दोषी राहिला. तसेंच शिष्यांस भूक लागली ह्मणून शाब्बाथांत कणसें मोडलीं, यावरून पाप झालें असें नाहीं.

४ तो देवाच्या मंदिरांत कसा गेला आणि पुढें ठेवलेल्या ज्या भाकरी त्याने व त्याच्या बरोबरच्या माणसानी खाऊं नयेत, याजकानी मात्र (१) खाव्या, त्या त्याने कशा खाल्ल्या ? (२)

५ किंवा याजक देवळांत (३) शाब्बाथ दिवसीं शाब्बाथ मोडून निर्दोष असतात, हें तुह्मी नेमशास्त्रांत वाचलें नाहीं काय? (४)

६ पण मी तुह्मास सांगतों कीं, देवळापेक्षां एथें कोणी एक मोठा आहे. (५)

७ अणखी यज्ञापेक्षां मला दया आवडती, (६) याचा अर्थ काय हें तुह्मी जाणिलें असतें तर तुह्मी निर्दोषांस दोष लाविला नसता.

(१) निर्ग. २९:३१,३३.
(२) निर्ग. २५:३०.
(३) योहा ७:२२,२३.
(४) गण. २८:९.
(५) २ काल. ६:१८. मल ३:१. मात्थी २३:१७-२१.
(६) योह. ६:६.

४ "तो देवाच्या मंदिरांत." ह्मणजे अहिमेलख याजकाच्या घरांत. त्या वेळेस देऊळ बांधलें नव्हतें, पण मंडप व कराराचा कोश यांसाठीं याजकाचें घरच करीत असत.

५ "शाब्बाथ मोडून" इत्या० जें काम इतर मनुष्यांस शाब्बाथांत मना केलें होतें तें याजकांस योग्य होतें. त्यांस शाब्बाथांत रोजचें काम करावें लागलें, यज्ञपशु मारून सिद्ध करून अर्पावे लागले, आणि जरी शाब्बाथांत विस्तव पेटविणें मना केलें होतें, (निर्ग. ३५:३.) तरी त्यांच्या कामासाठीं विस्तव पेटवावा लागला. रोजच्या पेक्षां देखील शाब्बाथांत दोन कोंकरें अधीक अर्पावीं लागलीं, (गण. २८:९,१०.) यावरून सिद्ध झालें कीं जें शाब्बाथांत दुसऱ्यानी करूं नये तें काम करून याजक निर्दोषी राहिले. त्यानी काम करावें ह्मणून देवाने सांगितलें होतें. हें उदाहरण नेमशास्त्रांतून काढून ख्रिस्ताने यासाठीं दाखविलें कीं शिष्याकडे कांहीं दोष नाहीं असें पटावें. परोश्यानी विनाकारण त्यांजवर दोष ठेविला होता.

६ "देवळापेक्षां एथें कोणीएक मोठा आहे." ख्रीस्त आपणाविषयीं असें बोलला. त्याजकडे सर्वांवरचा अधिकार होता. त्याने यहूदी नेमशास्त्र दिल्हें होतें. तर त्याचा अभिप्राय सांगायास किंवा विधिमोचन करायास तो मुख्त्यार होता. यावरून प्रमाण पटतें कीं येशू ख्रीस्त वास्तविक देव होता, कां कीं देवाशिवाय दुसऱ्या कोणालाहि एवढा अधिकार नाहीं.

७ "अणखी यज्ञापेक्षां" इत्या० हें नेमशास्त्रांतलें वाक्य ख्रीस्ताने अगो-

८ कां कीं मनुष्याचा पुत्र शाब्बाथाचाहि धनी आहे.

९ तेव्हां तो तेथून निघून (१) त्यांच्या सभास्थानामध्यें गेला.

१० आणि पाहा, तेथें एक हात वाळलेला असा माणूस होता; आणि त्यांनी त्यावर दोष ठेवण्याकरितां त्याला विचारिलें कीं शाब्बाथ दिवसीं लोकांस बरें करणें हें योग्य आहे काय ? (२)

११ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, ज्याला एक मेंढरूं आहे आणि तें शाब्बाथ दिवसीं खांचेंत पडलें (३) तर तो त्याला धरून काढणार नाहीं, असा तुह्मामध्यें कोण माणूस आहे.

१२ तर मेंढरापेक्षां माणूस किती मोठा आहे ? यास्तव शाब्बाथ दिवसीं बरें करणें योग्य आहे.

---

(१) मार्क. ३:१. इ. लुक. ६.६. इ. (२) लुक. १४: ३. (३) अनु. २२:४.

---

दर काढून पटविलें होतें. (माथी. ९:१३. यावरील टीका पाहा.) एथें त्यानें फिरून काढून असें दाखविलें कीं विधिशास्त्र जपून पाळणें यापेक्षां परमार्थाचीं व दयेचीं कामें ईश्वराला फार आवडतात. मार्कसांत अणखी आहे. (मार्क. २:२७.) "शाब्बाथ मनुष्यांसाठीं झाला, मनुष्य शाब्बाथासाठीं झाला नाहीं." ह्मणजे मनुष्यांचें अकल्याण नव्हे पण त्यांचें कल्याण व सुख पाहून ईश्वरानें शाब्बाथ नेमिला; यास्तव तो पाळण्यासाठीं अडचण सोसून आपलें अकल्याण करून घ्यावें असें समजायाचें नाहीं.

**सूचना.** खीस्तानें चवथी आज्ञा कधीं रद्द केली नाहीं. शाब्बाथ पाळणें हा यहूदीच नेम आणि पुढें पाळण्याचा नाहीं असें त्यानें परोश्यांस किंवा शिष्यांस कधीं सांगितलें नाहीं. शाब्बाथांत मौज पाहूं नये, ख्यालीखुशाली व संसारांतलें काम अगदीं करूं नये, परंतु जगाच्य समाप्तीपर्यंत तो पवित्र पाळावा, हा मूलार्थ आहे असें त्यानें शिकविलें.

८ या वाक्यांत खीस्तानें आपण देव आहें असें स्पष्ट सांगून दाखविलें. तो "शाब्बाथाचा धनी आहे," तर तो देव असावा.

९–१३ हें वर्णन मार्क. ३:१—५. लु. ६:६—१०. यांत पाहा. मार्कस व लुका यानीं अधिक विस्तारानें लिहून ठेविलें आहे. ते ह्मणतात कीं खीस्तानें हात वाळलेल्या माणसाला मध्यें उभें राहावयास सांगितलें. मग शाब्बाथ दिवसीं चांगलें करणें हें योग्य कीं काय ? असें त्यानें लोकांस विचारिलें. हें योग्य आहे असें त्यांच्या सर्व उपाध्यानीं कबूल केलें होतें, आणि आतां नाहीं असें त्यांच्यानें ह्मणवत नव्हतें. यास्तव ते उगेच राहिले. खीस्तानें

१३ मग त्याने त्या माणसाला सांगितलें कीं, आपला हात लांब कर. तेव्हां तो लांब करितांच दुसऱ्यासारिखा बरा झाला.

१४ नंतर परोश्यांनीं बाहेर जाऊन त्याचा घात कसा करावा ह्मणून त्याविरुद्ध मसलत केली.

१५ परंतु येशू हें समजून तेथून निघाला. तेव्हां बहुत समुदाय त्याच्या मागें चालले; मग त्याने त्या सर्वांस बरें केलें.

१६ आणि त्याने त्यांस निक्षून सांगितलें कीं, मला प्रगट करूं नका.

---

त्यांच्या आचरणावरून देखील प्रमाण पटविलें. एक जनावर खांचेंत पडलें तर त्याला शाब्बाथ दिवसीं बाहेर काढावयास ते अंदेशा करीत नसत. आणि मनुष्य जनावरापेक्षां मोठा नाहीं काय? याप्रमाणें त्यांच्याच वर्तणुकी- वरून ख्रीस्ताने त्यांस कुंठित केलें.

१३ "आपला हात लांब कर." ही विलक्षण आज्ञा होती. हात वाळ- लेला होता तर लांब कसा करावा? परंतु त्या माणसाने असा विचार करून हात लांब करायास कांहीं प्रयत्न केले नसते तर हात बरा झाला नसता. त्याने तेव्हांच ख्रीस्ताला मानिलें, ह्मणून हात बरा झाला. तसेंच प्रत्येक पाप्याने देवाला मानावें. पश्चात्ताप करावा, विश्वास धरावा, अशी ईश्वराची आज्ञा आहे. पाप्याने आतांच मानावें. जर तो मानावयास झटेल तर तेव्हांच ईश्वर साह्य करील, आणि त्याची क्षमा होऊन तो शांति व समा- धान पावेल, होय, तो सर्वकाळच्या जीवनाचा वतनदार होईल. ईश्वरी अधिकार मजकडे आहे असें ख्रीस्ताने ह्मटलें होतें. ही गोष्ट वास्तविक आहे. होय, मी देव आहें, असें प्रमाण त्याने हा चमत्कार करून पटविलें. शाब्बाथ दिवसीं कोणतें काम करावें, हें दोन उदाहरणांवरून दिसून येतें. कणसें मोडणें हें अगत्याचें काम व रोग्यांस बरें करणें हें दयेचें काम होतें. त्या दोन प्रकारांशिवाय शाब्बाथ दिवसीं दुसरें कोणतेंहि काम करूं नये.

१४—२१. हें मार्क. ३:६—१२. यांत पाहा.

१४ "नंतर परोश्यांनीं मसलत केली." मार्कस ह्मणतो, "हेरोदी यांसं- गतीं." हेरोदाचे मित्र ख्रीस्ताचा द्वेष करीत व त्याचा घात करावयास टपत असत.

१५ "परंतु येशू हें समजून तेथून निघाला." येशूने अंतर्ज्ञानाने त्यांची मसलत जाणली, आणि आपला समय पूर्ण झाला नव्हता ह्मणून त्याने तेथून जाऊन आपला जीव वांचविला. मात्थी. १०:२३. यावरील टीका पाहा.

१६ "आणि त्याने त्यांस निक्षून सांगितलें इ०" आपलीं मतें किंवा सिद्धांत

१७ यशाया भविष्यवाद्यानें जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें ह्मणून, तें असें कीं, (१)

१८ पाहा, माझा सेवक, त्याला म्यां निवडिलें आहे; माझा प्रिय, त्याविषयीं माझा जीव संतुष्ट आहे; त्यावर मी आपला आत्मा घालीन; तो विदेश्यांस न्याय कळवील.

१९ तो भांडणार नाहीं व ओरडणार नाहीं व मार्गांमध्यें त्याची वाणी कोणाला ऐकूं येणार नाहीं.

---

(१) यशा. ४२:१.

---

असें नव्हे तर "मला प्रगट करूं नका." ह्मणून ख्रीस्तानें त्यांस सांगितलें. योग्य वेळ येई तोंपर्यंत त्यांची मसलत चुकवून आपल्या जीवाचें रक्षण करावें असी त्याची इच्छा होती.

१७ "यशाया भविष्यवाद्यानें जें सांगितलें इ०" मात्थीनें हें वाक्य काढून त्यांस दाखविलें कीं भविष्यवाद्यानीं मशीयाविषयीं जें सांगितलें त्यावरून हाच ख्रीस्त आहे असें सिद्ध होतें. याचें सर्व आचरण त्यांच्या भविष्यांप्रमाणेंच आहे. तो गादीवर बसेल आणि मोठा व विजयी राजा होईल असी जी आशा यहूदा लोक बाळगतात ती निराधार व खोटी आहे असें त्यानें दाखविलें.

१८ "पाहा, माझा सेवक." तारणोपाय सिद्ध करून जगाला जाहीर करावयास येशू ख्रीस्त सेवकाच्या रूपानें अवतरला. "तो विदेश्यांस न्याय कळवील." ह्मणजे शुभवर्त्तमानांतील ज्या नेमाप्रमाणें शेवटीं सर्वांचा न्याय ठरेल तो नेम कळवील. आह्मीच ईश्वराचे निवडलेले लोक असून आह्मीच तारण पावूं असें यहूद्यांस वाटत असे; परंतु ख्रीस्त येईल तेव्हां तो नवीन व्यवस्था स्थापील आणि विदेशीहि शुभवर्त्तमानांतलें हित व सर्वकाळचें जीवन यांचे भागीदार होतील असें भविष्यवाद्यानें सांगितलें होतें. या प्रसंगीं गालील व यहूदा व यरूशालेम व अदोम व यार्देनेच्या पलिकडचा प्रांत आणि सोर व सिदोन (मार्क. ३:७,८.) यांतून मोठा मेळा ख्रीस्ताकडे येऊन तें भविष्यलेख पूर्ण झालें. हा ख्रीस्त केवळ यहुद्यांचा तारणारा असें नव्हे तर तो सर्व राष्ट्रांचा तारणारा, होय, सगळ्या जगाचा सद्गुरु आहे असें प्रमाण पटलें.

१९ "तो भांडणार नाहीं इ०" तो योध्यासारिखा लोकांमध्यें ओरडून व आपलें मोठेपण दाखवून स्वकीर्त्ति पाहील असें नाहीं. तो गरीब, नम्र व सौम्य स्वभावाचा होईल, असें भविष्यवाद्यानीं दाखविलें होतें.

२० चेपलेला बोरू तो मोडणार नाहीं, आणि धुमसत वात विझविणार नाहीं; जोंपर्यंत न्याय प्रसिद्धीस आणील तोंपर्यंत.

२१ आणि विदेशी त्याच्या नामाची आशा धरतील.

२२ मग (१) कोणी अंधळा व मुका असा भूतग्रस्त त्याजकडे

(१) मार्क. ३:११. लूक ११:१४.

२० "चेपलेला बोरू– धुमसत वात." हीं दुर्बलपणाचीं चिन्हें आहेत. वाक्याचा अर्थ हाच कीं, ख्रीस्त कठोरपणानें नव्हे पण सौम्यतेनें व दयेनें वागेल. जो पापी पश्चात्ताप करून त्याजकडे शरण येतो त्याला तो घालविणार नाहीं परंतु क्षमा करून तारील. "न्याय प्रसिद्धीस आणील तोंपर्यंत." हल्लीं परीक्षाकाळ चालत आहे आणि ईश्वर सर्वांचें सहन करितो, व सर्वांस आमंत्रण करून सर्वकाळचें जीवन देऊं करितो. पण पुढें सर्वांचा निवाडा होईल आणि प्रत्येकाला आपल्या कर्माप्रमाणें प्रतिफळ मिळेल. हल्लीं गहूं व निदन, चांगलें व वाईट, एकत्र वाढतात. कधीं कधीं देवाचे खरे भक्त अडचणींत असून दुःख सोसितात, आणि दुष्ट लोक प्रशस्तपणें राहून सुख भोगितात. यावरून ईश्वर न्यायी आहे असें दिसत नाहीं. खरें व खोटें, चांगलें व वाईट यामध्यें परस्परें मोठें युद्ध चालत आहे, आणि हें सिद्धीस जाई तोंपर्यंत ईश्वराचा न्याय बरोबर प्रगट होणार नाहीं. हा न्याय प्रसिद्धीस आणायासाठीं येशू ख्रीस्त जगांत आला. हें काम तो उत्तरोत्तर सिद्धीस नेत आहे. तो देवाची गोष्ट कळवून पाप्यांच्या मनांत सूचना व प्रेरणा घालितो आणि ओढून सुमार्गावर आणितो, आणि जर थोडेसे सद्गुण कोणाच्याठायीं उत्पन्न झाले तर ते वाढवून त्यांचें साह्य करितो, असें कीं त्यांनी सर्व कुवासना दाबून पाप व सैतान यांजवर जय पावून पूर्ण व्हावें. हें युद्ध अद्यापि चालत आहे, पण देवाचें राज्य पृथ्वीवर स्थापिलें आहे व त्याची मंडळी वाढत चालली आहे, आणि जे ख्रीस्ताकडे आहेत ते शेवटीं विजयी होतील, असा पूर्ण निश्चय आहे. तेव्हां सर्वांचा निवाडा होऊन ईश्वराचा न्याय सूर्यासारिखा प्रकाशयुक्त व तेजस्वी असा सर्वांच्या दिसण्यांत प्रगट होईल.

२१ "आणि विदेशी त्याच्या नामाची आशा धरतील." त्याच्या नामाची आशा धरणें ह्मणजे दुसरे सर्व आश्रय सोडून हाच तारणारा असें मानून त्यालाच शरण जाणें असें आहे. तारण पावण्यासाठीं येशू ख्रीस्त हा माणसांचा एकच आश्रय आहे.

२२–३०. मार्थी. ४:२४ यावरील टीका पहा. व या गोष्टींचा सारांश मार्क. ३:२२–२७. लू. ११:१४–२६ यांत पाहा.

आणिला, आणि त्याने त्याला बरें केलें, ह्मणून तो मुका अंधळा बोलूं पाहूं लागला.

२३ तेव्हां सर्व समुदाय थक्क होऊन ह्मणाले, हा दाविदाचा पुत्र आहे ना?

२४ परंतु परोशी ऐकून बोलले, भुतांचा अधिकारी बालजबूल याच्या योगाने मात्र हा भुतें काढितो.

२५ तेव्हां येशू त्यांच्या कल्पना जाणून (१) त्यांस ह्मणाला, जें जें राज्य आंतल्या आंत विभागलें आहे तें ओसाड होईल, आणि जें जें नगर अथवा घर आंतल्या आंत विभागलें आहे तें टिकणार नाहीं.

२६ आणि जर सैतान सैतानाला काढितो तर तो आपल्यामध्यें विभागला आहे; मग त्याचें राज्य कसें टिकेल?

---

(१) गीत १३९:२. योह. २:२४, २५.

---

२३ "दाविदाचा पुत्र आहेना?" ह्मणजे दाविदाच्या वंशांत जो तारणारा येणार ह्मणून देवाने वचन दिल्हें होतें तो हाच असावा कीं नाहीं? यशाया भविष्यवाद्याने (३५:५.) जें लिहून ठेविलें होतें त्याची आठवण त्यानी केली असेल, आणि हा मोठा चमत्कार पाहून त्यांची खातरी झाली याचें काय आश्चर्य सांगायाचें आहे?

२४ "परंतु परोशी ऐकून बोलले इ०." हा खरा ख्रीस्त आहे अशी लोकांची खातरी होत चालली, असें पाहून परोश्यांस भय व वाईट वाटलें, आणि कांहीं तरी निमित्त सांगणें प्राप्त झालें. कांहीं चमत्कार झाला नाहीं असें त्यांच्याने ह्मणवेना, कारण कीं लोकानी आपण होऊन चमत्कार पाहिले होते, आणि हा वास्तवीक ख्रीस्त आहे असी ते खातरी धरूं लागले. त्यानी ही खातरी धरावी हें योग्य होतें. असा चमत्कार करण्याची शक्ति ईश्वरी असावी, हें उघड होतें. तर परोश्यानी ही खातरी धरून ख्रीस्तावर विश्वास ठेविला नाहीं, याचें कारण काय? अरेरे, त्यांस पापाची फार आवड होती, आणि ख्रीस्ताला अंगीकारण्यापेक्षां ते फार अभिमानी होते. पण लोकांला फसवून समजून देण्यास त्यानी काय युक्ति योजिली! पाहा, चमत्कार झाला नाहीं असें ह्मणवेना, यास्तव ख्रीस्ताने भुतांच्या अधिकाऱ्यासीं एकोपा करून त्यांच्या साह्याने हा चमत्कार केला असें बोलून, लोकानी त्याचा द्वेष व धिक्कार करावा ह्मणून परोश्यानी प्रयत्न केले.

२५, २६ "तेव्हां येशू त्यांच्या कल्पना जाणून इ०" ख्रीस्ताने त्यांच्या

२७ आणि मी बालजबूलाकडून (१) जर भुतें काढितों, तर तुमचे पुत्र कोणाकडून काढितात? याकरितां ते तुमचे न्यायाधीश होतील.

२८ परंतु मी देवाच्या आत्म्याकडून जर भुतें काढितों, तर देवाचें राज्य (२) तुमच्यामध्यें आलें आहे.

२९ अथवा बळकट माणसाला पहिल्याने बांधल्याशिवाय, त्याच्या घरांत शिरून त्याचे जिन्नस (३) कोणाच्याने कसे लुटवतील? बांधिलें तरच त्याचें घर लुटील.

(१) व. २४. (३) यशा. ४९:२४. ५३:१२. प्रग. १२:७-१०. २०:२,३.
(२) दान. २:४४. मात्थी ६:३३. लूक. ११:२०. १७:२१. रोम. १४:१७

कल्पना जाणल्या यावरून प्रमाण पटतें कीं तो अंतर्साक्षी व सर्वज्ञ होता. "जें जें राज्य इ०." हें उत्तर देऊन ख्रीस्ताने त्यांची युक्ति मोडली. तो अंधळा माणूस वास्तवीक भूतग्रस्त होता, अशी त्यांची खात्री होती, आणि त्यांतून भूत वालविण्यास, भुतानें जर ख्रीस्ताचें साह्य केलें तर भूत भुताला घालवितें असें झालें. भुतांचें राज्य आंतल्या आंत फितलें, तर राज्य टिकेल कसें? सैतान इतका बेकूब नाहीं कीं आपण स्वतां उगाच आपला नाश करून घेईल. हें बोलून ख्रीस्ताने स्पष्ट दाखविलें कीं परोशी मजवर जो आरोप आणितात तो असंभाव्य व खोटा आहे.

२७ "तर तुमचे पुत्र कोणाकडून काढितात." तुमचे पुत्र ह्मणजे शिष्य. भूत काढण्याचें निमित्त करीत होते असे कित्तीएक पंचाक्षरी त्यांमध्यें होते. ख्रीस्ताने त्यांस दाखविलें कीं तुह्मी मजवर आरोप आणितां तो खोटा, परंतु जर तुह्मी खरा मानितां तर तुमच्या शिष्यांवरहि हाच आरोप चालेल.

**सूचना.** हे पंचाक्षरी वास्तविक भुतें काढितात असें ख्रीस्ताने सांगितलें नाहीं, केवळ ते काढण्याचें ढोंग दाखवितात ह्मणून त्याने सुचविलें. त्यांनी हें ढोंग दाखवून केवळ लोकांस फसविलें असें दिसतें. १९:१३. पाहा.

२८ "परंतु मी देवाच्या आत्म्याकडून इ०." सैतानाचें राज्य व देवाचें राज्य हीं परस्परें विपरीत आहेत. ईश्वर खचीत सैतानाला काढण्यास समर्थ आहे, आणि जर तो असें करून आपलें राज्य चालवूं लागला तर वास्तविक त्याचें राज्य आलें आहे, असें ओळखून सर्वांना त्याला मान्य व्हावें याचें मोठें अगत्य आहे.

२९ "अथवा बळकट माणसाला इ०" सैतान ख्रीस्ताच्या स्वाधीन आहे. जो दुसऱ्या घरांत शिरून लुटतो तो त्याच्या धन्यापेक्षां बळकट

३० जो मला अनुकूळ नाहीं तो मला प्रतिकूळ आहे, (१) आणि जो माझ्या बरोबर गोळा करीत नाहीं तो विखरितो.

३१ याकरिता मी तुह्मास सांगतों कीं, सर्व (२) पापें व दुर्भाषणें यांची माणसांस क्षमा होईल, परंतु पवित्र आत्म्याविरुद्ध (३) जें दुर्भाषण त्याची माणसांस क्षमा होणार नाहीं.

३२ आणि मनुष्याच्या पुत्राविरुद्ध (४) कोणी कांहीं गोष्ट बोलेल तर त्याची त्याला क्षमा होईल, परंतु जो कोणी पवित्र आत्म्याविरुद्ध बोलेल त्याला या काळीं क्षमा होणार नाहीं, आणि येणाऱ्या काळींहि नाहीं.

---

(१) १ योह. २:१९.
(२) मार्क. ३:२८. लुक. १५:१०.
(३) इब्री १०:२९. १ योह ५:१६.
(४) लुक ७:३४. योह. ७:१२. १ तीम. १:१३.

---

असावा, नाहीं तर तो त्याला कसा बांधील? ख्रिस्ताने त्या भूतग्रस्ताला सैतानाच्या हातांतून सोडविलें. यावरून ख्रीस्ताचा अधिकार व शक्ति सैतानावर चालतात असें प्रमाण पटतें.

३० "जो मला अनुकूळ नाहीं इ०" ख्रीस्त हें उदाहरण व आपल्या बोलण्याचा अर्थ त्यांच्या बुद्धीस व सदसद्विवेकास लागू करितो. तो त्यांस असें सुचवितो कीं, तुह्मी व मी एका मताचे नाहीं, आणि एकच राज्य स्थापावयास पाहतों असें नाहीं. मी सैतानाला काढून त्याचा नाश करितों. यावरून प्रमाण पटतें कीं मी त्याला प्रतिकूळ आहें. तुह्मी मला प्रतिकूळ आहां, ह्मणून सैतान जो माझा मोठा वैरी त्यासीं तुह्मी एकोपा करितां असें दिसून येतें.

३१,३२. त्यांचें पाप केवढें भारी व भयंकर हें ख्रीस्त या वाक्यांत व मार्क. ३:२८—३० यांत सांगून दाखवितो. हा मोठा चमत्कार ख्रीस्ताने देवाच्या आत्म्याकडून नव्हे, पण सैतानासीं एकोपा करून त्याच्या योगाने केला असें ह्मणून त्या परोश्यांनी पवित्र आत्म्याचा तिरस्कार व अपमान करून मोठी दुष्टाई दाखविली आणि क्षमा कधीं व्हावयाची नाहीं असें पाप केल्यासारिखें होतें. "सर्व पापें—क्षमा होईल." ह्मणजे जर माणसें पश्चात्ताप करून विश्वास धरतील तर क्षमा होईल. जर तीं पाप करीत जातात तर क्षमा होणार नाहीं. मार्क १६:१६. रोम. २:६—९. "मनुष्याच्या पुत्राविरुद्ध इ०" यहूदी ख्रीस्ताच्या नम्रतेविषयीं अडखळले, ते त्याला नाजरेथकर व गालिली ह्मणून धिक्कारीत असत. ख्रीस्त ह्मणतो कीं जे असें करितात

३३ झाड चांगलें ह्मणजे त्याचें फळ चांगलें असें समजा; अथवा झाड वाईट ह्मणजे त्याचें फळ वाईट असें समजा; कां कीं फळावरून झाड कळतें. (१)

३४ अहो सापांच्या पिलांनो, (२) तुह्मी वाईट असतां तुह्माला चांगल्या गोष्टी कशा बोलतां येतील? का कीं अंत:करणांत जे भरलें आहे त्याप्रमाणें तोंड बोलतें. (३)

३५ चांगला माणूस अंत:करणाच्या चांगल्या भांडारांतून चांगल्या गोष्टी काढितो, आणि वाईट माणूस वाईट भांडारांतून वाईट गोष्टी काढितो.

३६ अणखी मी तुह्मास सांगतों कीं, जो जो व्यर्थ शब्द माणसें बोलतील त्याचा हिशोब ते न्यायदिवशीं देतील. (४)

---

(१) मार्थ्या ७.१६,१७.
(२) मत्थी ३:७.
(३) लूक ६:४५.
(४) उप. १२:१४. एफ. ५:४,६. यहू. १५.

---

त्यांस पश्चात्ताप केला असतां क्षमा होईल. परंतु माझ्याठायीं देवपणा नाहीं असें जे ह्मणतात, जे चमत्कार मी करितों ते ईश्वरी आत्म्याने व सामर्थ्यानें नव्हेत पण भुतांच्या योगानें होतात, असें दुर्भाषण जे करितात, ते कधींहि क्षमा पावणार नाहींत. ते सर्वकाळचें दुःख व दंड निश्चयें भोगतील

३३ "झाड चांगलें ह्मणजे इ०." आपली अक्कल व विवेक यांविरुद्ध वागूं नका. चांगलें फळ आलें तर झाड वाईट असें तुह्मी समजत नाहीं. तर हाच नेम मजविषयींहि लावा. देवाच्या आत्म्याकडूनच होईल, असें कर्म सैतानाच्या योगानें झालें असें कुबुद्धीनें बोलूं नका. हाच नेम तुह्माविषयींहि खरा आहे. जर तुमचें बोलणें वाईट आहे तर यावरून प्रमाण पटतें कीं तुह्मीं सैतानासीं एकोपा करून त्याकडचेच झालां आहां.

३४,३५ "अहो सापांच्या पिलांनो इ०." ख्रीस्त आपला तीक्ष्ण वाद परोश्यांस लागू करितो. ते दुष्ट सापांसारिखे विषयुक्त असे होते. वाईट झाडासारखे असून चांगलें फळ देऊं शकत नव्हते. त्यांच्या वाईट बोलण्याचालण्यावरून पुरावा झाला कीं त्यांचें अंतःकरण दुष्ट होतें. अंतःकरणाच्या उतापासून तोंड बोलतें. यास्तव त्यांच्या दुर्भाषणावरून प्रमाण पटतें कीं त्यांच्या अंतर्यामीं केवळ दुष्टाईच होती. (उत्प. ३:१५.)

३६ त्या परोश्यांचा असा कठीण निषेध केल्यावर ख्रीस्तानें त्यांस सांगितलें कीं न्यायकाळ येणार आहे. तेव्हां आपल्या प्रत्येक व्यर्थ शब्दा-

३७ कां कीं तूं आपल्या बोलण्यावरून (१) न्यायी ठरसील आणि आपल्या बोलण्यावरून अन्यायी ठरसील.

३८ तेव्हां शास्त्री व परोशी यांतून कोणी उत्तर दिल्हें कीं, हे गुरू, आपला कांहीं चमत्कार (२) पाहावा, असें वाटतें.

३९ मग त्यानें त्यांस उत्तर दिल्हें कीं, वाईट व व्यभिचारी पिढी (३) चमत्कार मागती, परंतु योना भविष्यवादी याच्या चमत्कारांवांचून तिला चमत्कार मिळणार नाहीं.

४० कारण कीं जसा योना (४) तीन दिवस व तीन रात्री मोठ्या

---

(१) नोति १३:३.
(२) मात्थी १६:१. १ करिं. १:२२.
(३) यशा. ५७:३.
(४) योह. १:१७.

---

चा हिशोब द्यावा लागेल. तेव्हां अश्या दुर्भाषणाबद्दल किती कठीण दंड लागेल?

३७ "कां कीं तूं आपल्या बोलण्यावरून इ०." बोलणें जर खरें व चांगलें तर अंतःकरण चांगलें असें दाखवितें. बोलणें जर खोटें व वाईट तर अंतःकरण वाईट असें दाखवितें. न्यायकाळीं केवळ बोलणें मोजण्यांत येईल असें नाहीं. अंतःकरणांतल्या कल्पना व विचार यांचाहि हिशोब द्यावा लागेल. परंतु बोलणें अंतःकरणाप्रमाणें असतें ह्मणून त्यावरून न्याय ठरेल.

३८–४२ "कांहीं चमत्कार पाहावा इ०." लू. ११:१६,२९–३२. पाहा. ख्रीस्तानें जो चमत्कार केला होता तो जर त्यांनीं पाहिला तर त्यापेक्षां मोठा चमत्कार त्यांनी कां मागावा? यावरून स्पष्ट दिसतें कीं ख्रीस्ताची परीक्षा पाहावी हाच त्यांचा हेतु होता. लू. ११:१६.

३९ "वाईट व व्यभिचारी पिढी इ०." ख्रीस्त त्यांचा योग्य निषेध करितो. यहूदी वाईट व देवाच्या आज्ञा मोडणारे असें पटलें होतें. ख्रीस्तानें मोठा चमत्कार करून आपण खरा मशीया असें पुरतें प्रमाण दाखविलें होतें. ह्मणून त्यांनीं मागितल्यावरून तो अणखी चमत्कार करीना. परंतु त्यांनीं त्यांस सुचविलें कीं जसें योनाविषयीं प्रमाण पटलें तसें मी मेलल्यांमधून तिसऱ्या दिवसीं उठून आपणाविषयीं प्रमाण पटवीन.

४० "कारण कीं जसा योना इ०." योना, १:१६. ख्रीस्त मेल्यावर तिसऱ्या दिवसीं उठलाच आणि असें करून त्यानें हें भविष्य बोलणें पूर्ण केलें, आणि आपल्या देवपणाविषयीं जगाची खातरी होण्याजोगें दृढ प्रमाण पटविलें.

माशाच्या पोटांत होता, तसा मनुष्याचा पुत्र तीन दिवस व तीन रात्री पृथ्वीच्या पोटांत राहील.

४१ नीनव्यांतील माणसें न्यायकाळीं या पिढीच्या संगतीं उभीं राहून इला अन्यायी (१) ठरवितील; कां कीं त्यांनी योनाच्या उपदेशावरून (२) पश्चात्ताप केला, आणि पाहा, एथें योनापेक्षां कोणी मोठा आहे.

---

(१) रोम. २:२७. (२) योना ३:५.

---

४१ "नीनव्यांतील माणसें न्यायकाळीं इ०." नीनवे हीं अशूर्या अधिराज्याची राजधानी होती. आश्शूराने तें शहर बाबेलाच्या पूर्वोत्तरेस तैग्रीस नदीच्या कांठावर बांधून स्थापिलें. उत्प. १०:११. तें मोठें व अति दुष्ट शहर होतें. त्याचा घेर ४८ मैल, गांवकुसूं १०० फुट उंच व १० फुट रुंद, आणि २०० फुट उंच असे १५०० बुरूज होते. योनाच्या वेळेस त्यांत ६००००० वस्ती होती. ते लोक अति दुष्ट होते, आणि चाळीस दिवसांनी तुमचा नाश होणार असें योनाने त्यांस सांगितलें. हें ऐकून त्यांनी पश्चात्ताप केला ह्मणून आणखी दोनशें वर्षांपर्यंत देवाने त्यांस जगूं दिल्हें. मग ख्रिस्ताच्या येण्यापूर्वीं सुमारें साहाशें वर्षांनी बाबेलकऱ्यांनी त्याजवर स्वारी करून त्यांचा नाश केला, ते शहराला वेढा घालून टपत होते इतक्यांत तैग्रीस नदीला पूर येऊन त्यामुळें त्याचें गांवकुसूं पडलें आणि बाबेलकऱ्यांनी आंत शिरून सगळें शहर लुटून ओसाड केलें. या गोष्टीपूर्वीं ११५ वर्षें नहूम भविष्यवाद्याने त्याचा या रीतीने नाश होईल ह्मणून सांगितलें होतें. (नहूम १:८. व २:६.) निनव्याचा असा नाश व ओसाडी झाली कीं बहुत वर्षेपर्यंत त्याचें ठिकाण देखील सांपडलें नाहीं. यावरून नास्तिक लोक बहुत गलबला व आनंद करून बोलूं लागले कीं, "पाहा, ख्रिस्ती शास्त्राला कांहीं आधार नाहीं. कारण त्यांत सांगितलेल्या एका शहराचें ठिकाण पृथ्वीवर कोठें लागत नाहीं." बाकीच्या सर्व गोष्टी खऱ्या पटल्या असतांहि केवळ या एका गोष्टीवरून ते ख्रिस्ती शास्त्रावर दोष ठेवूं लागले. परंतु हल्लीं निनव्याचा शोध लागला आहे, आणि ख्रिस्ती शास्त्रांत त्याविषयीं जें लिहिलें तें खरें पटलें आहे, इतकेंच केवळ नाहीं, तर त्याचा पाया खणण्याकडून प्राचीन काळचीं भांडीं वगैरे मोलवान जिन्नस सांपडले, आणि विशेषेंकरून तेथें बहुत मोठे दगडी पाट सांपडले त्यांवर बहुत गोष्टी कोरून ठेवल्या आहेत. त्यांतील मजकूर ख्रिस्ती शास्त्राशीं

४२ दक्षिणेची राणी (१) न्यायकाळीं या पिढीच्या संगतीं उभी राहून इला अन्यायी ठरवील; कां कीं ती शलमोनाचें ज्ञान ऐकायास पृथ्वीच्या शेवटापासून (२) आली; आणि पाहा, एथें शलमोनापेक्षां कोणी मोठा आहे.

४३ जेव्हां अशुद्ध आत्मा (३) माणसांतून निघतो तेव्हां तो कोरड्या जाग्यांमध्यें फिरतांना (४) विसांवा घ्यायास पाहतो, परंतु त्याला मिळत नाहीं.

४४ तेव्हां तो ह्मणतो, ज्या आपल्या घरांतून मी निघालों त्यांत परत जाईन. मग आल्यावर तें रिकामें व झाडलेलें व सुंदर केलेलें आहे असें तो पाहतो.

४५ नंतर तो जाऊन आपल्याहून वाईट असे दुसरे सात आत्मे आपल्या संगतीं घेतो, आणि ते आंत जाऊन तेथें राहतात, मग त्या

(१) लूक ११:३१. इ. (३) लूक ११:२४.
(२) १ काल. ९:१. (४) इयो. १:७. १ पेत्र. ५:८.

मिळतो. अनेक राजांचीं नांवें व त्यांच्या कार्किर्दीत ज्या गोष्टी झाल्या ह्मणून शास्त्रांत सांगितलें त्या सर्व कोरून ठेविल्या आहेत. यावरून ख्रिस्ती शास्त्र खरें असा पूर्ण पुरावा मिळतो. तर ह्या एका गोष्टीवरून ख्रिस्ती शास्त्रावर जे दोष ठेवूं लागले ते अगदीं कुंठित झाले कीं नाहींत? "इला अन्यायी ठरवील." ह्मणजे नीनव्यांतील माणसांनीं योनाचा उपदेश ऐकून पश्चात्ताप केला ह्मणून देवानें त्यांस माफ करून वांचविलें. तुमच्या दुष्टाई-बद्दल तर देवाच्या पुत्रानें आपण होऊन तुह्मास सर्वकाळचा दंड होणार असें सांगितलें असतांहि तुह्मी पश्चात्ताप करीत नाहीं. तर न्यायकाळीं त्यांपेक्षां तुह्मास कठीण दंड लागेलच.

४२ "दक्षिणेची राणी." ह्मणजे अरबस्थानांतील शबाची राणी. १ राजे १०:१ "पृथ्वीच्या शेवटांपासून." ह्मणजे दूरून. यासारिखें वाक्य अनु २८:४९. यांत पाहा. शलमोनाचें ज्ञान ऐकायास ती लांबून आली, परंतु जो शलमोनापेक्षां थोर तो त्यांमध्येंच असतांहि ते त्याचें ऐकेनात. तर त्या राणीचें आचरण त्यांच्यापेक्षां चांगलें होतें.

४३–४५ "जेव्हां अशुद्ध आत्मा इ०." त्यांनीं चिन्ह मागितलें होतें. ख्रिस्त उत्तर देऊन सुचवितो कीं, ग्यां चिन्ह दिल्हें असतां व तुमची खातरी

माणसाची शेवटली दशा (१) पहिल्याहून वाईट होती; तसेंच या वाईट पिढीला होईल.

४६ तो समुदायांशीं बोलत असतांना पाहा, त्याची (२) आई व भाऊ त्यासीं बोलायाकरितां बाहेर उभे राहिले.(३)

४७ तेव्हां कोणी त्याला सांगितलें, पाहा, तुझी आई व तुझे भाऊ तुजसीं बोलायाकरितां बाहेर उभे राहिले आहेत.

४८ तेव्हां त्याने सांगणाऱ्याला उत्तर दिल्हें कीं, माझी आई कोण? व माझे भाऊ कोण?

४९ मग तो आपल्या शिष्यांकडे आपला हात लांब करून बोलला, पाहा, माझी आई व माझे भाऊ;

---

(१) इब्री ६:४. १०,२६. २ पेत्र २:२०,२२. (२) मार्क. ३:३१. इ. लूक. ८:१९. इ. (३) माथी १३:५५.

---

होऊन तुम्ही कांहीं वेळपर्यंत विश्वास धरिला असतांहि तुमचें अंतःकरण इतकें दुष्ट व हट्टी आहे कीं तुम्ही लवकर अविश्वासी होऊन पहिल्यापेक्षां वाईट व्हाल. यहूदी लोकांविषयीं हें खरें पटलें. भविष्यवाद्यांनी त्यांस बोध दिल्हा, ख्रीस्ताने व शिष्यांनी त्यांस उपदेश करून त्यांच्या देखतां मोठे चमत्कार केले आणि कधीं कधीं कांहीं खातरी धरून ते सुधरूं लागले. परंतु त्या अशुद्ध आत्म्यासारिखी त्यांची दुष्ट बुद्धि लवकर परतली जाऊन ते पूर्वीपेक्षां अधिक दुष्ट होत चालले. त्यांणी देवाचे सेवक नाकारिले, ख्रीस्ताला वधस्तंभीं देऊन मारिलें, आणि शेवटीं ईश्वरी दंड त्यांस प्राप्त झाला. देवाने त्यांचें सुंदर देऊळ, राजधानी व सगळें राज्य रोमी सैन्याच्या हातीं देऊन त्यांचा मोठा नाश केला.

४६—५० मार्क. ३:३१–३५. लु. ८:१९—२१. समरक्त संबंध मानूं नयेत असें कधीं ख्रीस्ताने शिकविलें नाहीं. परंतु खऱ्या ख्रिस्त्यांमध्यें सद्गुणानी व देवाच्या कृपेने जी बंधुनीति व जवळचे संबंध उत्पन्न होतात तीं अधिक प्रिय व बळकट आहेत असें त्याणे दाखविलें. माथी, १०:३६. ख्रीस्त आपल्या आईचा सन्मान करीत व तिजवर फार प्रीति करीत असे. लू. २:५१. यो. १९:२५—२७ तथापि आई व भाऊ यांसीं जरी त्याचा संबंध फार प्रिय व प्रेमयुक्त होता तरी शिष्यांला जो त्याचा संबंध होता तो अधिक प्रेमाचा व पवित्र होता. सर्व खऱ्या विश्वासणाऱ्यांवर ख्रीस्ताची

५० कां कीं जो कोणी माझ्या आकाशांतील बापाच्या इच्छे-
प्रमाणें (१) करील, तोच माझा भाऊ व बहीण व आई होय.

(१) मात्थी ७:२०. योह. १५:१४. गल. ५:६. इब्री २:११. १ योह. २:१७.

केवढी प्रीति आहे! आह्मी त्याचे शिष्य होण्यास आईबापें, सोयरे धायरे, घरें दारें, शेतें भातें, वगैरे अवघें सोडून त्याला अनुसरावें असी जी आज्ञा त्याणे दिल्ही तिचें किती चांगलें उदाहरण त्याणे स्वतां दाखविलें.

**सूचना.** एका ठिकाणीं शुभवर्त्तमान धिक्कारल्यावरून तें दुसऱ्या ठिकाणीं घोषण केलें जाईल. ओ. १५. तें कोणी धिक्कारून आपला नाश करून घेतला असतां इतर माणसांस कळतें, आणि तीं त्याला स्वीकारितात व आपलें तारण साधितात. दुष्टांच्याने हें खरें शास्त्र जगांतून घालवत नाहीं. ते धिक्कारून नाश पावतात इतक्यांत दुसरे ऐकून सर्वकाळचें जीवन पावतात. शुभवर्त्तमान धिक्कारणें हें सुंदर नदीला बांध घालून आपल्या देशांत येऊं न देतां शेजारच्या देशांत वळविण्यासारिखें आहे. या नदीचें गोड पाणी सुखून टाकणें किंवा बंद करणें हें होतच नाहीं. तें वाहत जाईलच. आणि तें जे पितात ते धन्य आहेत. शुभवर्त्तमान धिक्कारण्यासारिखें माणसांकडून दुसरें कोणतेंहि मूर्खपण व दुष्टाई कधीं होत नाहीं. जो उजेडाचा द्वेष करितो त्याणे गुहेंत किंवा अंधारकोठडींत जाऊन राहावें हें साध्य आहे. परंतु सूर्य प्रकाशेलच आणि तेणेंकरून इतर हजारों माणसांस आशीर्वाद प्राप्त होईल. तसेंच शुभवर्त्तमानाविषयीं आहे.

२ ख्रीस्त सौम्य, शांत व गरीब (ओ. १९.) होता. गोंधळ व गडबड ही कांहीं देवभक्ति नाहीं. पण नीति, भीड, सभ्यता, व पवित्रता ह्या देवभक्ति असें आहे. आणि हींच खऱ्या ख्रिस्त्याचीं लक्षणें आहेत. ३. जे अशक्त त्यांनीं ख्रीस्तावर भरवसा ठेवावा. (ओ. २०.) लेंकराने, अडाणी माणसाने, गरीबाने कोणीहि ख्रीस्ताला शरण यावें आणि तो त्याला घालविणार नाहीं. आपण अशक्त व लाचार आहों असें जेव्हां वाटतें, तेव्हां ख्रीस्त आमचें साह्य करावयास तयार आहे. नम्र व पश्चात्तापी असा कोणी पापी त्याची कृपा कधीं व्यर्थ मागणार नाहीं. ४. दुर्भाषण फार भयकारक आहे. (ओ. ३१, ३२.) पवित्र आत्म्याला कांहीं अवाज्ञा दाखविणें किंवा खेद देणें हें पाप नाशकारक आहे. पश्चात्ताप करून ख्रीस्तावर विश्वास ठेवावा असें जेव्हां पवित्र आत्मा प्रेरितो तेव्हां त्याविरुद्ध उभें राहणें हें मोठें भयकारक आहे. जो आपल्या मनाची खातरी अव्हेरून मी देवाला मान्य होणार

## अध्याय १३.

१ आणि त्याच दिवशीं येशू घरांतून निघून समुद्राजवळ जाऊन
बसला.
२ तेव्हां बहुत समुदाय त्याजवळ मिळाले, ह्मणून तो तारवावर
चढून बसला, (१) आणि सर्व समुदाय तडीवर उभा राहिला.
३ तेव्हां तो दाखले देऊन त्यांस बहुत गोष्टी सांगूं लागला कीं,
पाहा, (२) कोणी पेरणारा पेरायास बाहेर गेला.

---

(१) लूक. ५:३. (२) मार्क ४:२. लूक ८:५.

---

नाहीं असा निश्चय करितो तो खचीत आपला नाश करून घेतो. ज्याने एकदां धिक्कारलें त्याला पवित्र आत्म्याने फिरून कां प्रेरणा करावी? धिक्कारल्यावर जर त्याचा नाश झाला तर दोष कोणावर राहील? ज्याचा दोष त्याच्या माथ्यावर राहील कीं नाहीं? ५. ख्रीस्ताला धिक्कारणें हें किती भयकारक आहे ह्मणून दिसतें. (ओ. ३८–४२.) जर आह्मी ख्रीस्तावर विश्वास ठेवीत नाहीं, तर त्याच्या येण्यापूर्वीं जे होते ह्मणजे मूर्ख व सुज्ञ, दुष्ट व चांगले, ते सर्व न्यायकाळीं उभे राहून आह्मास अन्यायी ठरवितील. जे ख्रीस्ताविषयीं ऐकून त्याला धिक्कारून नरकास जातात त्यांसारिखे दोषी असें दुसरे कोणी कधीं होणार नाहींत. देवाने अनंत कृपेने हा तारणोपाय सिद्ध केला असतां, जो अव्हेरितो त्याचा दोष आणि शेवटला दंड फारच वाढेल.

१,२ "समुद्राजवळ." हा तिबेरयसाचा समुद्र होता. त्याचें ऐकायास बहुत समुदाय जमले ह्मणून अधिक सोईने त्यांस उपदेश करायास तो तारवावर चढून बसला.

३—९ "दाखले देऊन." लोकांचें लक्ष्य लागावें आणि आपला उपदेश अधिक ठसण्याजोगा व्हावा ह्मणून ख्रीस्त दाखले देऊन उपदेश करीत असे. जसा नाथानाने दाविदाला दाखल्यानीं तीव्र निषेध केला तसा ख्रीस्त वारंवार दाखल्यांचा उपयोग करीत असे. "कोणी पेरणारा पेरायास बाहेर गेला." जें काम सर्वांस माहीत आहे त्यापासून हा दाखला घेतला; ह्मणून तो सर्वांस अधिक समजण्यासारिखा आणि उपदेश करण्याच्या कामास बरोबर लागतो.

४ आणि तो पेरीत असतां कांहीं बियें वाटेवर पडलीं; आणि पांखरानी येऊन तीं खाऊन टाकलीं.

५ आणि फारसी माती नव्हती अशा खडकाळीवर कांहीं पडलीं; आणि माती खोल नव्हती ह्मणून तीं लवकर उगवलीं.

६ परंतु सूर्य उगवल्यानंतर तीं करपलीं, आणि त्यांस मूळ नव्हतें यास्तव वाळून गेलीं.

७ आणि कांहीं कांट्यांच्या झाडांमध्यें पडलीं; मग कांट्यांच्या झाडानी वाढून त्यांस गुदमारिलें.

८ परंतु चांगल्या भूमीवर कांहीं पडलीं, मग कोठें शंभरपट, कोठें साठपट, कोठें तीसपट, असें पीक आलें.

९ ज्याला ऐकायास कान आहेत तो ऐको. (१)

१० मग शिष्य येऊन त्याला ह्मणाले, त्यांसीं दाखले देऊन कां बोलतोस ?

११ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, आकाशांतील राज्याच्या गुप्त गोष्टी जाणणें (२) हें तुह्मास दिल्हें आहे, परंतु त्यांस दिल्हें नाहीं.

---

(१) मात्थी ११:१५. (२) मात्थी ११:२६. मार्क. ४:११. १करिं. २:१०,१४. एफ. १:९,१८. ३:९. कल. १:२६,२७. १ योहा. २:२७.

---

४ "वाटेवर." तेथील जमीन बियें रुजायास फार कठीण होती.

५,६. "खडकाळीवर." एथील माती थोडीच ह्मणून बियें अधिक लवकर रुजलीं परंतु चांगलीं मुळें नव्हतीं ह्मणून तीं लवकर वाळून गेलीं.

७ "कांटयांच्या झाडांमध्यें." हीं पिकामध्यें वाढलीं असतां त्याला दाटी करितात आणि सावली पाडण्याकडून व मातीचा कस घालवून त्यांस गुदमारितात.

८ "चांगल्या भूमीवर." सुपीक भूमीवर.

९ मात्थी. ११:१५. यावरील टीका पाहा.

१०—१७ ख्रीस्त एथें दाखल्यानी उपदेश करण्याचें एक कारण सांगतो. मार्क ४:१०—१२. लू. ८:१०. एथेंहि पाहा.

११ "आकाशांतील राज्याच्या गुप्त गोष्टी." ह्मणजे शुभवर्त्तमान सर्वांस गाजविणें व ख्रीस्ताचें राज्य स्थापणें याविषयींच्या गोष्टी. शुभवर्त्तमान

१२ कां कीं ज्या कोणाजवळ (१) आहे, त्याला मिळेल, आणि त्याला फार होईल; परंतु ज्या कोणाजवळ नाहीं त्याचें जें असेल तें देखिल त्यापासून काढून घेतील.

१३ यासाठीं मी त्यांसीं दाखले देऊन बोलतों, कां कीं ते पाहत असतां त्यांस दिसत नाहीं, आणि ऐकत असतां ऐकत नाहींत आणि समजतहि नाहींत.

---

(१) मात्थी २५:२९. लूक ८:१८.

---

परदेशस्थांस गाजविलें जाणार, यहूदी व्यवस्थेचा शेवट होणार, ख्रीस्ताला मरावें लागणार इत्यादि गोष्टी यहूद्यांस समजल्या नाहींत. रोम १६:२५. ११:२५. एफ. ३:३,४,९. पाहा. ह्या गोष्टी जाणणें हें शिष्यांस दिल्हें होतें. ते बहुत देशांत शुभवर्त्तमान गाजविणार होते ह्मणून ह्या गोष्टी जाणण्याचें त्यांस अगत्य होतें. परंतु ह्या गोष्टी जाणणें हें इतर माणसांस तेव्हां दिल्हें नव्हतें.

१२. "कां कीं ज्या कोणाजवळ आहे इ." उजेड, ज्ञान व बुद्धि असून त्यांचा योग्य उपयोग जो कोणी करितो त्याला तीं ज्यास्ती मिळतील. जो चांगल्या कामास लावीत नाहीं त्यापासून तीं काढून घ्यावीं हें ठीक आहे. देवाने यहूदी लोकांस विशेष उपकार व आशीर्वाद दिल्हे होते. परंतु त्यांनी त्यांचा बरोबर उपयोग केला नव्हता ह्मणून देवाने ते काढून घ्यावे हें योग्य होतें, असें असतांहि ईश्वर मोठ्या कृपेनें सर्वांस शुभवर्त्तमान कळवून सर्वकाळचें जीवन देऊं करितो. जे धिक्कारितात त्यांपासून त्याने काढून घ्यावें हें योग्य आहे, आणि यहूद्यांसारिखे जे धिक्कारितात त्यांपासून तो काढून घेईलच, यांत काय संशय ?

१३ "ते पाहत असतां त्यांस दिसत नाहीं." ह्मणजे ते दाखले समजतात, पण त्यांतील धर्मसंबंधी अर्थ व बोध ध्यानांत आणीत नाहींत. मार्कस (४:१२.) व लूका. (८:१०.) यांत ह्मटलें आहे कीं त्यानी न समजावें या हेतूने ख्रीस्त दाखल्यानीं बोलत असे. हे फार दुष्ट, अविश्वासी, व हट्टी आहेत, असें पाहून कांहीं विशेष ईश्वरी सामर्थ्य लावून त्यांस वळवावें ह्मणून इच्छा नव्हती. त्याने जे दाखले दिल्हे ते समजण्यासारिखे व त्यांतील धर्मसंबंधी अर्थ ध्यानांत ठसण्याजोगा असें होतें. तथापि ते समजले नाहींत. ते आत्मसंतोषाने अज्ञानी व मतिमंद होते. ख्रीस्ताने उत्तम रीतीने उपदेश केला आणि जर लोक समजले नाहींत तर दोष लोकांकडेच

१४ आणि यशायाचें भविष्यवाक्य (१) त्यांविषयीं पूर्ण झालें आहे, तें असें कीं, तुह्मी ऐकालच ऐकाल, (२) परंतु समजणार नाहीं आणि पाहालच पाहाल परंतु तुह्मास दिसणार नाहीं.

१५ कां तर डोळ्यानी पाहूं नये आणि कानानी ऐकूं नये आणि अंतःकरणाने समजूं नये, आणि त्यानी फिरूं नये, आणि मी त्यांस बरें करूं नये म्हणून या लोकांचें अंतःकरण जड झालें आहे, आणि ते कानानी मंद ऐकतात, (३) आणि आपले डोळे त्यानी मिटले आहेत.

१६ परंतु तुमचे डोळे धन्य आहेत, (४) कां कीं त्यांस दिसतें; आणि तुमचे कान धन्य, कां कीं ते ऐकतात.

१७ कारण मी तुम्हास खचीत सांगतों कीं, तुम्ही जें पाहतां तें बहुत भविष्यवादी (५) व न्यायी पाहायास इच्छीत होते परंतु त्यानी पाहिलें नाहीं; आणि तुम्ही जें ऐकतां तें ऐकायास ते इच्छीत होते परंतु त्यानी ऐकिलें नाहीं.

---

(१) यशा ६:९. (४) मात्थी १६:१७. लूक १०:२३,२४. योह. २०:२९. २करिं.४:६.
(२) यहेज्क. १२:२. योह. १२:४०. प्रेषि. २८:२६,२७. रोम. ११:८. २करिं. ३:१४,१५
(३) इब्री ५:११. (५) एफ. ३:५,६. इब्री. ११:१३. १ पेत्र. १:१०,११.

---

आहे. ईश्वर कोणीएकाला तारायास बांधला नाहीं, आणि जे हट्टी व अविश्वासी होत जातात त्यांस तो तारणार नाहींच.

१४,१५ "आणि यशायाचें भविष्यवाक्य इ०" याचा सारांश, यश. ६:९,२०. यांत पाहा. यशायाच्या दिवसांत जे देवाची गोष्ट अव्हेरीत असत त्यांचीं व खीस्ताच्या ऐकणाऱ्यांचीं लक्षणें सारिखींच होतीं. त्यानी ईश्वरी बोधाला डोळे मिटून धिक्कारिलें. ते इतके विलासी, मतिमंद व मूर्ख होते कीं शुभवर्त्तमानांतील पवित्र व आत्मसंबंधी उपदेश ते समजून घेईनात. त्यानीं खीस्ताला नाकारून आपला नाश करून घेतला, तर त्यांविषयीं यशायाचें भविष्यवाक्य पूर्ण झालें.

१६ "परंतु तुमचे डोळे धन्य आहेत." तुह्मी माझ्या बोधाचा पवित्र अर्थ कांहींसा समजून घेतां ह्मणून तुह्मी धन्य आहां.

१७ "बहुत भविष्यवादी इ." ते खीस्ताची वाट पाहून त्याला पाहायास फार इच्छीत होते. तो आला ह्मणजे लोकांचें तारण होऊन जगाची आशा

१८ यास्तव तुह्मी पेरणाऱ्याचा दाखला ऐकून ध्या; (१)

१९ राज्याचें वचन (२) कोणीएक ऐकतो पण समजत नाहीं, तेव्हां तो दुष्ट (३) येतो, आणि त्याच्या अंतःकरणांत पेरलेलें तें हिरावून घेतो; वाटेवर पेरलेला तो हाच आहे.

२० आणि खडकाळीवर पेरलेला, तो हाच आहे कीं वचन ऐकतो आणि तेव्हांच तें आनंदाने घेतो. (४)

२१ तथापि त्याच्या मध्यें मूळ नाहीं, ह्मणून तो क्षणिक आहे, आणि वचनामुळें संकट किंवा पाठलाग झाला ह्मणजे लागलाच अडखळतो. (५)

२२ आणि कांट्यांच्या झाडांमध्यें जो पेरलेला, तो हाच आहे

(१) मार्क. ४:१४. इ. लुक. ८:११. इ. (२) मात्थी. ४:२३. (३) योह. २:१३, १४. ३:१२.
(४) यशा. ५८:२. यहेज्क. ३३:३१, ३२. योह. ५:३२. गल. ४:१५.
(५) मात्थी. २४:१०. २६:३१. २ तीम. ४:१६.

पूर्ण होईल असें त्यांस वाटत असे. यो. ८:५६. १ पेत्र. १:१०—१२. इब्री. ११:१३. पाहा. आब्राहाम, यशाया आणि देवाचे सर्व प्राचीन भक्त ख्रीस्ताची वाट पाहून फार प्रतीक्षा करीत असत. तसेच आतां ख्रीस्ताच्या राज्याचें येणें व वृद्धि यांची फार प्रतीक्षा देवाचे सर्व भक्त करीत असतात.

१८—२३. मार्क. ४:१३—२०. लु. ८:११—१५ पाहा.

१९ "राज्याचें वचन इ." बियें ह्मणजे देवाचें वचन. शास्त्र, उपदेश, ईश्वरी सूत्र व पवित्र आत्म्याची प्रेरणा या सर्वांवरून देवाची गोष्ट कळून येती. "तो दुष्ट." ह्मणजे सैतान. जीं पांखरें येऊन बियें वेंचून खातात त्यांची उपमा त्याला लागती. हट्टी पाप्यांस शुभवर्त्तमान गाजविलें आहे, परंतु त्यांच्या कठीण अंतःकरणांत तें ठसत नाहीं. वाटेवरील कठीण भूमीवर पडलेल्या बियांसारिखें तें आहे. तें रुजत नाहीं आणि तें काढून घेणें सुलभ आहे.

२०—२२ "आणि खडकाळीवर पेरलेला इ." कितीएक लोक शुभवर्त्तमान ऐकून हें कांहीं नवें आहे किंवा यावरून कांहीं ऐहिक लाभ होईल असें मानितात. मग हें खरें आहे असें कबूल होऊन कांहीं वेळपर्यंत मोठा आवेश दाखवितात; परंतु ते खरे ख्रिस्ती नाहींत, त्यांत नवें अंतःकरण मिळालें नाहीं; यास्तव जेव्हां त्यांची निंदा व पाठलाग होतो तेव्हां मूळ नसल्यामुळें ते अडखळून लाजून जातात. शेवटपर्यंत टिकून राहण्यास निश्चय व सद्गुण नाहींत. कांटयांचीं झाडें ह्मणजे संसारांतील काळजी व

कीं वचन ऐकतो, परंतु या जगाची चिंता (१) व द्रव्याची भूल, हीं वचनाला गुदमारितात, ( ) ह्मणून त्याला फळ येत नाहीं.

२३ आणि चांगल्या भूमीवर पेरलेला तो हाच आहे कीं, वचन ऐकून समजतो, तो फळ देतोच, (३) ह्मणजे कोणी शंभरपट, कोणी साठपट, कोणी तीसपट देतो.

२४ त्याने त्यांस दुसरा (४) दाखला दिल्हा कीं आकाशाचें राज्य एका माणसासारिखें आहे; त्याने आपल्या शेतांत चांगलें बीं पेरलें; (५)

२५ परंतु माणसें झोंपेंत असतांना त्यांचा वैरी आला, आणि गव्हांमध्यें निदण पेरून गेला.

---

(१) लुक. १४:१६—२४. (२) मार्क. १०:२३. १ तीम. ६:९. २ तीम. ४:१०.
(३) योह. ३५:५.
(४) यशा. २८:१०,१३. (५) १ पेत्र. १:२३.

---

फसविणारीं दुर्व्यसनें यांकडून मनुष्य भुलला जाऊन आकाशलोकाचें वतन हें या सगळ्या जगापेक्षां अधिक मोलवान व आगत्याचें आहे त्याविषयीं तो विसरतो. कपट, लबाडी, ठकविणें इत्यादि करून थोडा लाभ मिळण्याचा मोह हा देवाच्या वचनाला अडवून जीवात्म्याचा नाश करितो. १ तीम. ६: ७—११ यांत पाहा. अरेरे, असा मूर्खपणा करण्याकडून किती माणसें नाशांत व निरुपायांत बुडालीं आहेत!

२३ "आणि चांगल्या भूमीवर इ." जे देवाच्या कृपेने त्याचें वचन नम्रतेने अंगीकारायास सिद्ध झाले आहेत त्यांच्या अंतःकरणांत तें ठसतें आणि ते ऐकून मान्य होतात. अशा अंतःकरणांत पडलेल्या देवाच्या वचनावरून पवित्र वर्तणुकीचें चांगलें फळ येतें.

२४—३० "आकाशाचें राज्य इ." या दाखल्याचा अर्थ उघड आहे. शेत ह्मणजे हें जग आणि चांगलें बीं ह्मणजे ख्रीस्ताने व त्याच्या शिष्यांनी जी सत्यता घोषण केली ती.

२५ "परंतु माणसें झोंपेंत असतांना इ." सैतान खोटे सिद्धांत अंधारांत पेरितो. शेत हें जग आहे. सैतानाने त्यांत निदणाचें बीं प्रारंभीं पेरलें, त्याने आमच्या मूळ पुरुषास भुलविलें, आणि सर्व माणसें भ्रष्ट झालीं. कित्येक देवाच्या कृपेने नवा जन्म पावून सद्गुणी होतात, आणि उजेडाचीं लेंकरें व आकाशलोकाचे वतनदार असीं होतात. दुसरे कित्येक लोक निदणासारखे आहेत. ते या जगांत चांगल्या लोकांची छळणूक व पाठलाग करितात

२६ मग जेव्हां पाला फुटला आणि त्याला फळ आलें तेव्हां निदणहि दिसूं लागलें.

२७ मग वरधन्याच्या चाकरानी येऊन त्याला ह्मटलें, महाराज, आपण आपल्या शेतामध्यें चांगलें बीं पेरिलें ना ? तर त्यांत निदण कोठून आलें.

२८ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, हें काम कोणी वैऱ्याचें आहे. मग चाकरानी त्याला ह्मटले, तर आह्मी जाऊन तें जमा करावें अशी आपली आज्ञा आहे काय ?

२९ तेव्हां तो ह्मणाला, नका, तुह्मी निदण जमा करितांना त्याबरोबर कदाचित् गहूंहि उपटाल.

३० कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढूं द्या, मग कापणीच्या वेळेस (१) मी कापणाऱ्यांस सांगेन कीं, पहिल्याने निदण जमा करा, आणि

(१) तीम. ६:२४.

आणि मरणानंतर ते निदणासारिखे अग्नींत टाकायाचे आहेत. ख्रिस्ती मंडळींतल्या ढोंग्यांसहि निदणाचा दाखला बरोबर लागतो. निदण कांहीं प्रकारें गव्हांसारिखें आहे. तसेच ढोंगी हे बहुत प्रकारें खऱ्या ख्रिस्त्यांसारिखे आहेत आणि न्यायकाळ येईपर्यंत ते कळत नाहींत. सैतान ख्रिस्ती मंडळींत निदण पेरायास पाहतो, आणि या कामांत बहुत यश पावतो. बारा शिष्यांमध्यें देखील एक परस्वाधीन करणारा होता, आणि तेव्हांपासूनच खोटे व ढोंगी असे ख्रिस्ती मंडळीमध्यें सांपडत आले आहेत. परंतु निवाडा करण्याचा दिवस जवळ आला आहे.

२६ "तेव्हां निदणहि दिसूं लागलें इ." निदण गव्हांमध्यें वाढत असतां त्यांमध्यें फेर इतका असतो कीं फळ येऊं लागेपर्यंत तें ओळखतां येत नाहीं. तसेंच जे ख्रिस्ती ह्मटले आहेत, ते खरे कीं खोटे हें पानें व फुलें यांवरून नव्हे, पण फळावरून कळतें.

२७—२९ त्यांमध्यें एवढा सारखेपणा असतो कीं निदण निवडून काढायास अवघड पडतें, अणखी गहूं तुडविण्याचें व उपटण्याचें भय वाटतें. निवाडा करण्याचा समय हा कापणीचा समय आहे. ईश्वर दुष्टांस या जगांत राहूं देतो, यावरून कोणी त्यावर दोष ठेवूं नये. न्यायकाळ येणार आहे, त्या वेळेस योग्य निवाडा होईल.

३० "कापणीपर्यंत दोन्ही बरोबर वाढूं द्या इ." ख्रिस्त एथें शिकवितो कीं या जगांत दुष्ट व ख्रिस्ती मंडळींत ढोंगी असतील, आणि त्यांस आतां

जाळण्यासाठीं (१) त्यांच्या पेंढ्या बांधा, मग गहूं (२) माझ्या कोठारांत सांठवा.

३१ त्याने त्यांस अणखी एक दाखला दिल्हा कीं आकाशाचें राज्य मोहरीच्या दाण्यासारिखें (३) आहे; तो एका माणसाने घेऊन आपल्या शेतांत पेरिला.

३२ तो सर्व दाण्यांमध्यें बारीक आहे, परंतु वाढल्यावर भाज्यांमध्यें मोठें असतें आणि इतकें मोठें झाड (४) होतें कीं आकाशांतील पांखरें येऊन त्याच्या फांद्यांवर बसतात.

३३ त्याने त्यांस अणखी एक दाखला देऊन सांगितलें कीं आकाशाचें राज्य खमिरासारिखें आहे, तें एका बायकोने घेऊन तीन शेर पिठामध्यें लपवून ठेविलें, सर्व फुगून गेलें तोंपर्यंत.

३४ ह्या सर्व गोष्टी येशूने दाखले (५) देऊन समुदायांस सांगितल्या आणि दाखल्यावांचून तो त्यांसीं बोलला नाहीं;

---

(१) मल. ४:१. (२) लूक. ३:१७. (३) मार्क. ४:३०. (४) यहेज्क. १७:२३. (५) मार्क. ४:३३.

---

काढणें हें बरें नाहीं परंतु योग्य समयीं तो त्यांस काढून वेगळें करील. तेव्हां दुष्ट व ढोंगी यांस निदण व भूस यांसारिखें मोजून तो न विझणाऱ्या अग्नींत टाकील. मात्थी. ३:१२.

३१,३२ मार्क. ४:३०,३२. पाहा. "आकाशाचें राज्य." मात्थी. ३:२. यावरलि व्याख्या पाहा. खिस्ती मंडळीची वृद्धि या दाखल्याप्रमाणें होती. जेव्हां कोणी नवा जन्म पावून खिस्ती होतो तेव्हां त्याचा विश्वास व सर्व सद्गुण अल्प व अशक्त असतात. नंतर ते वाढून दृढ व बळकट होतात. तसें ख्रीस्ताच्या वेळेस त्याचे शिष्य केवळ बारा व दुसरे सर्व अनुसरणारे थोडेच होते. तथापि खिस्ती मंडळी वाढून संपूर्ण जगांत पसरत चालली आहे. ज्यांत शुभवर्त्तमान गाजविलें नाहीं असा कोणी मोठा देश सांप्रत काळीं पृथ्वीवर कोठेंहि नाहीं, आणि तें सर्व राष्ट्रांस व प्रत्येक जणास अंगिकारण्याजोगें आहे. "मोहरीच्या दाण्यासारिखें आहे." हें सर्वांहून लहान बीं असतांहि यहूदी देशांत त्याचें झाड लवकर वाढून मोठें होत असे यास्तव अंतःकरणांतल्या सद्गुणांस व खिस्ती मंडळीसहि ही चांगली उपमा आहे.

३३ "त्याने त्यांस अणखी एक दाखला इ." सदरहू दाखल्याचा व याचाहि अभिप्राय सारखाच आहे. खिस्ती माणसाच्या अंतःकरणांत सद्गुण

३५ भविष्यवाद्याने जें सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें ह्मणून, तें असें कीं, (१) मी आपलें तोंड दाखले देण्यास उघडीन, जगाच्या मांडण्यापासून जें लपविलेलें (२) तें प्रगट करीन.

३६ नंतर येशू समुदायांस निरोप देऊन घरांत गेला. मग त्याचे शिष्य त्याच्या जवळ येऊन ह्मणाले, शेतांतल्या निदणाचा दाखला आह्मास फोडून सांग.

३७ तेव्हां त्याने त्यास उत्तर दिल्हें कीं, चांगलें बीं पेरणारा हा मनुष्याचा पुत्र आहे;

३८ आणि शेत हें जग (३) आहे; आणि चांगलें बीं हे राज्यांतील (४) पुत्र आहेत, आणि निदण हें त्या दुष्टाचे (५) पुत्र आहेत.

३९ आणि पेरणारा वैरी हा सैतान आहे; आणि कापणी ही काळाची समाप्ती (६) आहे; आणि कापणारे हे दूत (७) आहेत.

४० तर जसें निदण जमा करून अग्नींत (८) जाळतात, तसें या काळाच्या समाप्तीस होईल.

४१ मनुष्याचा पुत्र आपल्या दुतांस पाठवील, आणि सर्व अडखळविणाऱ्यांस व अन्याय करणाऱ्यांस (९) ते त्याच्या राज्यांतून जमा करून,

४२ त्यांस अग्नीच्या भट्टींत (१०) टाकितील; तेथें (११) रडणें व दांत खाणें होईल.

---

(१) गीत. ७८:२. (२) लुक. १०:१४ रोम. १६:२५,२६. कल. १.२६.
(३) रोम. १०:१८. कल. १:६. (४) १ पेत्र. १:२३. (५) योह. ८:४४. प्रेषि. १३:१०. १ योह. ३:८. (६) योएल. ३:१३. प्रग. १४:१५. (७) प्रग. १४:१८-१९.
(८) मात्थी १३:३०. (९) लुक. १३:२७.
(१०) मात्थी ३:१२. प्रग. १९:२०. २०:१०. (११) मात्थी. १३:५०. ८:१२.

---

कसे वाढतात हें दाखविलें आहे. ते गुप्त, निवांत व स्थिर असून वाढत जातात. पवित्र आत्मा मोठी गडबड करून आपलें काम चालवितो असें नाहीं. पिठामध्यें घातलेल्या खमिरासारखी देवाची गोष्ट वाढत जाती तेणेंकरून शेवटीं जगाची सुधारणा होईल.

३५ "भविष्यवाद्याने जें सांगितलें इ." याचा सारांश गीतें ७८:२,३. यांत आहे. त्याने एसाफ भविष्यवाद्यासारिखें शिकविलें.

३६—४२ "नंतर येशू इ." ख्रीस्ताने निदणाचा दाखला अगदी समज-

४३ तेव्हां न्यायी आपल्या बापाच्या राज्यांत सूर्यासारिखे प्रकाश-
तील. (१) ज्याला ऐकावयास कान आहेत तो ऐको.

४४ अणखी आकाशाचें राज्य शेतांत लपविलेल्या (२) ठेवीसारिखें
आहे; ती कोणी माणसाला सांपडली ह्मणजे तो लपवून ठेवितो.
मग त्या गोष्टींच्या आनंदामुळें तो जाऊन आपलें सर्व विकतो, (३)
नंतर तें शेत विकत घेतो. (४)

४५ अणखी आकाशाचें राज्य चांगल्या मोत्यांचा शोध कर-
णाऱ्या व्यापारी माणसासारिखें आहे;

४६ त्याने एक मोलवान मोतीं (५) पाहून ठेवल्यावर जाऊन आ-
पलें सर्व विकलें, मग तें विकत घेतलें.

---

(१) दान. १२:३. १करिं. १५:४९. (२) नीति. २:४,५. (३) फिलि ३:७,८.
(४) यशा ५५:१. प्रग. ३:१८. (५) नीति. ३:१४,१५. ८:११.

---

ण्यासारिखा फोडून सांगितला. प्रभू येशू चांगलें बीं पेरिता, ह्मणजे शुभवर्त्तमान गाजवितो. त्यानें आपण होऊन गाजविलें, आणि हल्लीं आपले उपदेशक, ईश्वरीसूत्र व पवित्र आत्मा यांकडून तो गाजवीत असतो. हें बीं सगळ्या जगावर पेरायाचें आहे, यापासून राज्यांतलीं लेंकरें ह्मणजे खरे ख्रिस्ती उत्पन्न होतात. यासाठीं ख्रीस्त श्रम घेऊन मरण पावला. हें त्याच्या मेहनतीचें फळ आहे. असें असतांहि यामध्यें निदण, ह्मणजे दुष्टाचीं लेंकरें सांपडतात आणि शेवटपर्यंत त्यांबरोबर राहिलें पाहिजे. मग ख्रीस्त त्यांस वेगळें करून दुष्टांस अग्नीच्या भट्टींत टाकील आणि सर्व खऱ्या ख्रिस्त्यांस आकाशलोकींचें वैभव व सुख यांत आपल्याजवळ घेईल.

४४ "अणखी आकाशाचें राज्य इ." ह्मणजे आकाशलोकांतलें वतन हा सर्वांहून मोलवान निधि आहे. गीतें १९:१०. नीति ३:१३—१५. माणसें कांहीं ऐहिक लाभ मिळविण्यास प्रयत्न करितात, यापेक्षां अधिक काळजीनें व आस्थेनें त्यांनी हें दिव्य धन मिळविण्यास झटून प्रयत्न करावे. ही ठेव आपली करून घेण्यासाठीं जो कोणी आपलें सर्वस्व देतो, होय प्राण देखील सोडितो, तो सुज्ञ आहे.

४५,४६ "ही भारी गोष्ट लोकांच्या मनांत ठसून राहावी ह्मणून ख्रीस्तानें याच अर्थाचा हा अणखी एक दाखला दिल्हा. ही आकाशलोकांतली ठेव एका अमोल्य मोत्यासारिखी आहे. तें व्यापाऱ्यास सांपडलें ह्मणजे तो मोठा हर्ष करितो आणि तें आपलें असें करून घेण्यासाठीं तो आयुष्यभर श्रम घेण्यास व आपलें बाकीचें सर्वस्व सोडून देण्यास कबूल आहे.

४७ अणखी आकाशाचें राज्य समुद्रामध्यें टाकलेल्या ज्या जाळ्यांत सर्व प्रकारचे जीव एकत्र सांपडतात (१) त्यासारिखें आहे;

४८ तें भरल्यावर कांठास ओढितात, आणि बसून चांगल्यांस भांड्यांमध्यें भरितात, आणि वाइटांस फेंकून देतात.

४९ तसें काळाच्या समाप्तीस होईल; दूत येऊन न्यायींपासून वाइटांस वेगळें करितील; (२)

५० आणि त्यांस अग्नीच्या भट्टींत टाकितील, (३) तेथें रडणें व दांत खाणें होईल.

५१ येशू त्यांस ह्मणाला, तुह्मी या गोष्टी समजलां काय? ते त्याला ह्मणाले, होय प्रभू.

५२ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, तर आकाशाच्या राज्याविषयीं प्रत्येक शिकलेला शास्त्री हा कोणी घरधनी आपल्या भांडारांतून (४) नवे व जुने पदार्थ काढितो, यासारिखा आहे.

५३ आणि असें झालें कीं, हे दाखले संपविल्यावर येशू तेथून गेला.

---

(१) मात्थी २२:१०.
(२) मात्थी २५:३२. (३) मात्थी १३:४२. (४) नानि १०:२१.१५:७.१८:४.

---

ही उपमा किती सुंदर व योग्य आहे! आकाशलोकांतली सर्वकाळची ठेव यासारखी मोलवान असी दुसरी ठेव कोणती? ही ठेव मिळविण्यास इतर सर्व धन व निधि, होय, प्राणहि सोडून द्यावयास कबूल नाहीं, असा कोण आहे!

४७—५० "अणखी आकाशाचें राज्य इ०" निदणाच्या दाखल्याचा बोध अधिक ठसावा यासाठीं ख्रीस्ताने हा जाळ्याचा दाखला दिल्हा. शुभवर्त्तमान हें चांगलें व वाईट यांस एकत्र गोळा करितें. परंतु जगाच्या समाप्तीस ख्रीस्त त्यांस वेगळें करून चांगल्यांस आपल्याजवळ सौख्य लोकांत नेईल, आणि वाइटांस अग्नीच्या भट्टींत टाकील. लोकांनी पश्चात्ताप करून तारण पावण्यास झटावें या हेतूने ख्रीस्त वरचेवर न्यायकाळाविषयीं बोलून आकाशलोकांतलें सुख व वैभव आणि नरकांतील दुःख व यातनाहि त्यांच्या लक्षांत आणावयास पाहतो.

५१—५३ शिष्यांनी या गोष्टी समजाव्या आणि उपदेश करून इतर मा-

५४ आणि आपल्या देशांत जाऊन (१) त्याने त्यांच्या सभास्थाना-
मध्यें त्यांस असा उपदेश केला कीं ते थक्क होऊन बोलले, हें ज्ञान व
हे चमत्कार याला काठून ?
५५ हा सुताराचा पुत्र नव्हे ना ? याच्या आईला मारया ह्मण-
तातना? आणि याकोब व योसे व शिमोन व यहुदा, हे त्याचे भाऊ
आहेत ना ?
५६ आणि त्याच्या सर्व बहिणी आमच्या मध्यें नाहींत काय ? तर
या सर्व गोष्टी याला कोठून ?
५७ असें ते त्याजविषयीं अडखळले. (२) तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें,

(१) मार्क. ६:१. इ. लुक. ४:१६. इ.
(२) यशा. ४९:७.५३:३. योह. ६:४२.

णसांची खातरी करावी आणि त्यांस तारायास झटावें असी ख्रीस्ताची इच्छा होती.

५४ "आणि आपल्या देशांत इ०" ह्मणजे नाजारेथांत. मार्क. ६:१–६ पाहा. लोकांस उपदेश करण्यासाठीं ख्रीस्त वारंवार सभास्थानांत जात असे.

५५,५६ "हा सुताराचा पुत्र नव्हेना?" आमच्या तारणाऱ्याने आपल्या आयुष्याचा मोठा भाग उद्योगांत घालविला. हा सुताराचा पुत्र व स्वतां सुतार आहे, असें लोकानी त्याला ओळखिलें. जें मोठें काम करायास तो जगांत आला होता, तें त्याने आपल्या वयास तीस वर्षें होतपर्यंत प्रसिद्धपणें केलें नाहीं. तोंपर्यंत त्याने चांगल्या उद्योगाचा कित्ता दाखविला. यांत ख्रीस्ताची मोठी लीनता व विनय दिसून येतात. ज्याने जग उत्पन्न केलें त्याने तीस वर्षेंपर्यंत सुताराचें काम चालवून लोकांमध्यें वहिवाट करावी याविषयीं नास्तिक हसून निंदा करितात. तथापि महान पेत्रस नामें जो रूस देशाचा एक बादशाहा होता, त्याने आरमार बांधण्यासाठीं आपलें राज्य व थोरपण एकीकडे ठेवून इंग्लिश लोकांची चाकरी पत्करली, आणि आपल्या हातानी श्रम घेऊन जाहाज बांधण्याचें काम समजून घेतलें. याकरितां तेच नास्तिक त्याची मोठी प्रशंसा व वाहवा करितात. परंतु ख्रीस्ताचा हेतु त्या बादशाच्यापेक्षां अधिक मोठा व पवित्र होता कीं नाहीं? ज्या कामावर ख्रीस्त जगांत आला त्या कामापुढें पेत्रस बादशाहाचें काम व हेतु अगदी हलकीं व तुच्छ दिसतात.

५७ "असें ते त्याजविषयीं अडखळले." ख्रीस्ताचा उपदेश ऐकून व मोठे चमत्कार पाहून ते विस्मित झाले असतांहि त्याच्या नीच अवस्थेतल्या जन्मा-

भविष्यवादी आपला देश व आपलें घर यांत मात्र सन्मान पावत नाहीं.
५८ आणि तेथें त्यांच्या अविश्वासामुळें त्यानें बहुत चमत्कार
केले नाहींत.

## अध्याय १४.

१ त्या वेळेस (१) हेरोद राजानें येशूची कीर्त्ति ऐकिली;

(१) मार्क. ६:१४.लुक. ९:७. इ.

---

विषयीं अडखळले, आणि हा खरा मशिया आहे असा विश्वास धरितात. "भविष्यवादी इ०" ही एक ह्मण आहे, आणि बहुतकरून खरी आहे. हे लोक ख्रीस्ताच्या ओळखीचे व शेजारी होते, आणि त्याच्या ज्ञानाचा हेवा करून ते त्यापासून शिकून घेण्यापेक्षां अधिक अभिमानी होते. कोलम्बसाविषयीं ही ह्मण खरी झाली. एका नव्या महाद्वीपाचा शोध काढावा असें जेव्हां त्यानें मनांत आणिलें तेव्हां त्याचे देशस्थ त्याजवर कांहीं भरवसा ठेवि-नात. हा अप्रसिद्ध व कीर्त्तिहीन मनुष्य जो आपण बाकीच्या सगळ्या जगापेक्षां अधिक शाहाणा ह्मणवितो तो कोण असेल, असें बोलून त्यांनीं त्याला धिक्कारिलें, आणि कोलम्बसाला परदेशांत जाऊन मदत मागणें प्राप्त झालें. शेवटीं स्पेन देशांतल्या राणीनें त्याची विनंती ऐकून त्याला मदत दिल्ही ह्मणून त्या नामांकित शोधावरून जी मोठी प्राप्ति व कीर्त्ति ती स्पेन राजास मिळाली.

५८ "आणि तेथें त्यांच्या अविश्वासामुळें." त्यांच्या अविश्वासामुळें ख्रीस्ताचें सामर्थ्य आवरलें अथवा बंद झालें असें नाहीं, परंतु हे इतके हट्टी व दुष्ट होते कीं, चमत्कार पाहिले असतांहि ते खातरी धरणार नाहींत असें पाहून ख्रीस्त मोतीं डुकरांपुढें टाकिना. त्यानें थोडींसीं कृपेचीं कृत्यें करून आपल्या देवपणाविषयीं पुरतीं प्रमाणें दाखविलीं मग त्यांस सोडिलें. आह्मी विश्वास धरावा असें ईश्वर सांगतो. जेव्हां आह्मी विश्वासानें प्रार्थना करितों, तेव्हां मात्र तो ऐकतो. येशू ख्रीस्त हा जगाचा एकच तारणारा असीं पुरतीं प्रमाणें देवानें दिल्हीं आहेत. आणि आतां जे हीं प्रमाणें पाहून विश्वास ठेवणारच नाहींत त्यांस तो सर्वकाळच्या नाशास जाऊं देतो, आणि जाऊं द्यावें हें योग्य आहे.

१ "त्या वेळेस हेरोद राजानें इ०" मार्क. ६:१४–१६. लू. ९:३–९. पाहा. हा हेरोद महान हेरोदाचा पुत्र होता. ख्रीस्त जन्मल्यावर एका वर्षानें महान हेरोद आपलें राज्य आपल्या तिघां पुत्रांस देऊन मरण पावला. त्या तिघांतील हा हेरोद अंतिपास एक होता. हा गालील व पिरीय प्रांतांवर अधिकार करीत असे.

२ आणि आपल्या चाकरांस ह्मटलें कीं, बाप्तिस्मा करणारा योहान्न हाच आहे; तो मेलेल्यांमधून उठला आहे, ह्मणून त्याकडून हे चमत्कार घडतात.

३ कां कीं हेरोदानें आपला भाऊ फिलिप्पस याची बायको हेरोदियस इजकरितां योहान्नाला धरून त्याला बांधून बंदिशाळेंत घातलें होतें;

४ कारण कीं योहान्नाने त्याला ह्मटलें होतें, हिला ठेवावें हें तुला योग्य नाहीं. (१)

५ मग तो त्याचा घात करायास पाहत असतां समुदायास भ्याला, कां कीं ते त्याला भविष्यवादी असें मानीत असत. (२)

---

(१) लेवी. १८:१६ २०:२१. (२) मात्थी २१:२६. लूक २०:६.

---

२ "बाप्तिस्मा करणारा योहान्न हाच आहे." हेरोदाचें मन त्याच्या अपराधामुळें त्याला खात होतें. त्याने दुष्टाईनें योहान्नाचें शिर छेदिलें होतें. आणि या कृत्याच्या आठवणीवरून त्याला भय वाटलें. योहान्न खरा भविष्यवादी आहे हें त्याला माहीत होतें, आणि आतां ख्रीस्तकृत मोठया चमत्कारांविषयीं ऐकून हाच मेलेल्यांमधून उठलेला योहान्न असावा, असें त्याच्या मनानें सुचविलें. इतरांस वाटलें कीं, हा मोठा चमत्कार करणारा जो एलीया यावयाचा होता तोच असेल नाहीं तर मेलेल्यांतून उठलेला कोणी पुरातन भविष्यवादी असावा. मार्क ६:१९.

३—५ "कां कीं हेरोदानें आपला भाऊ इ०" मार्क. ६:१७–२०. लुक. ३: १९,२०. ही हेरोदियस महान हेरोदाची नात होती. ती हेरोद फिलिप्पस याची बायको झाली आणि तिला सलोमे नामक कन्या झाली. हा हेरोद अंतिपास एक वेळ रोम शहराकडे जात असतां आपल्या भावाच्या एथें उतरला, आणि ह्या हेरोदियस नामें भावाच्या बायकोला पाहून रंजून गेला. त्याची लग्नाची बायको अरबी पेत्रीय या देशांतील आंतियस नामक राजाची कन्या होती, परंतु तिला दूर करायास तो कबूल झाला. मग हेरोदियस आपला नवरा सोडून त्याच्या संगतीं नांदायास आली. तीं दोघें व्यभिचार करीत असतां योहान्नाने आपला जीव हातांत घेऊन त्यांचा निषेध केला. आंतियस राजा हेरोदानें माझी कन्या दूर केली असें ऐकतांच त्यासीं लढाई करूं लागला, आणि हेरोदाच्या फौजेचा नाश झाला असतां लोकांस वाटलें कीं हेरोदानें योहान्नाचा घात केला ह्मणून हा ईश्वरी क्षोभ त्याला प्राप्त झाला आहे. योसेफस ग्रंथ १८:७ पाहा.

६ नंतर हेरोदाच्या जन्म दिवसाची मेजवानी होत असतां हेरोदियसीच्या कन्येने मध्यें नाचून हेरोदाला संतुष्ट केलें.

७ त्यावरून त्याने शपथ वाहून करार केला कीं, जें कांहीं तूं सांगसील तें मी तुला देईन.

८ मग ती आपल्या आईने पूर्वी शिकविल्याप्रमाणें ह्मणाली, बाप्तिस्मा करणारा योहान्न याचें शिर (१) तबकांत घालून एथें मला आणून दे.

९ तेव्हां राजा खिन्न झाला (२) तथापि शपथांमुळें (३) व संगतीं बसणाऱ्यांमुळें, त्याने द्यायास सांगितलें;

(१) नीति २३:१०. (२) न्याय. ११:३१,३५. दान. ६:१४-१६. (३) न्याय. २१:१.१ शमु. १४:२८.२५:२२. उपद. ५:२.

६—१३ "नंतर हेरोदाच्या जन्म दिवसाची इ०" मार्कस (६:२१-२९) ह्मणतो कीं हेरोदाने आपले प्रधान, सरदार आणि बडे लोक यांस जेवणावळ करून ह्या दिवसाचा उत्साह केला तेव्हां "हेरोदियसीच्या कन्येने इ०." ही कन्या सलोमे होती. हें नाचणें अगदीं अमर्याद व निर्लज्ज होतें. कोणी लाजाळू कन्येने दरबारांत असा नाच कधीं केला नसता. ह्मणून ती आपल्या आईसारिखी असावी असें बोलणें संभवतें!

७ "त्यावरून त्याने शपथ वाहून इ०" ही शपथ मूर्खपणाची व दुष्ट होती. ती वाहायाची नव्हती आणि वाहिली असतांहि मोडण्याजोगी होती.

८ मागण्यापूर्वी तिने आपल्या आईची दुष्ट मसलत घेतली. योहान्नाने तिचा निषेध केला होता याची आठवण राखून तिने त्याचा सूड उगविण्याचा हा प्रसंग हर्षाने साधिला. या पवित्र माणसाचा घात करण्यांत तिची केवढी दुष्टाई दिसून येती!

९ "तेव्हां राजा खिन्न झाला." हेरोद योहान्नाची भीड व भय धरीत असे. हा न्यायी व पवित्र मनुष्य आहे असें त्याने जाणिलें. मार्क. ६:२०. हा योहान्न खरा भविष्यवादी असें बहुत लोक मानितात ह्मणूनहि त्याला कळलें यास्तव त्याचा घात केला तर ते बंड उठवितील, असें भय त्याला वाटलें असेल. यावरून तो खिन्न झाला. परंतु शपथ वाहिली व ती पाळणें भाग आहे, पाळली नाहीं तर सर्व प्रधान व दरबारांतलीं माणसें मला भितरा ह्मणून माझा उपहास करितील असें भय वाटलें. पण ही मोठी चूक होती. आदीं शपथ वाहणें योग्य नव्हतें, तशांत वाहिली तर ती पाळावी यापेक्षां देवाची आज्ञा पाळणें भाग होतें. न्यायी माणसाचा घात करणें हें कोणत्याहि शपथा वाहिल्यावरून योग्य असें होत नाहीं.

१० आणि बंदिशाळेंत पाठवून योहान्नाचें शिर तोडिलें.

११ आणि त्याचें शिर तबकांत घालून त्या मुलगीला आणून दिल्हें, मग तिने आपल्या आईजवळ नेलें.

१२ नंतर त्याच्या शिष्यानी येऊन शरीर उचलून नेलें आणि तें पुरलें; (१) मग जाऊन येशूला वर्त्तमान सांगितलें.

१३ मग येशू हें ऐकून तेथून निघून (२) तारवांतून रानांतल्या जाग्यांत एकीकडे गेला; तरी समुदाय ऐकून नगरामधून त्याच्या मागें पायीं चालले.

१४ मग येशूने बाहेर येऊन मोठा समुदाय पाहिला; (३) तेव्हां त्यांविषयीं तो कळवळला, (४) आणि त्यांतील दुखणेकऱ्यांस त्याने बरें केलें.

१५ मग संध्याकाळ झाल्यावर त्याचे शिष्य त्याकडे येऊन ह्मणाले, ही रानांतली जागा आहे, आणि वेळ होऊन गेली आहे; त्यानी गांवांमध्यें जाऊन आपल्याकरितां खायास विकत घ्यावें ह्मणून समुदायांस निरोप दे.

---

(१) प्रेषि. ८:२. (२) मात्थी १०:२३.१२:१५. मार्क ६:३२. इ. लूक. ९:१०. इ. योह. ६:१.२. इ. (३) मार्था ९:३६,१५:३२. इ. (४) इब्री. ४:१५.

---

१०,११ "आणि बंदिशाळेंत पाठवून इ०" आपल्या शपथांमुळें व दुष्ट दरबारामुळें हेरोदाने त्या निर्दोषी माणसाचें शिर तोडून त्या दुष्ट स्त्रीला आणून देवविलें. योसिफस तिजविषयीं ह्मणतो कीं ती फार गर्विष्ठ व अकर्मी स्त्री होती आणि राजावर तिचें वजन इतकें होतें कीं राजाने आपल्या खुशीने कधीं केल्या नसत्या अशा बहुत गोष्टी तिने त्याच्या हातून करविल्या.

१२ "नंतर त्याच्या शिष्यानी येऊन शरीर इ०" त्याच्या शिष्यानी त्याचें शरीर ममतेने व दुःखाने पुरून ख्रीस्ताला ती गोष्ट सांगितली आणि त्यापासून बोध व समाधान पावले. तसेंच आह्मीहि सर्व दुःखांत समाधान पावण्यासाठीं ख्रीस्ताकडे जावें.

१४ "मग येशूने बाहेर येऊन मोठा समुदाय पाहिला." हे अज्ञानी व निराश्रित असें पाहून तो कळवळला. मार्कस ह्मणतो, ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं त्यांसारिखे होते. कोणी उपदेशक त्यांस नव्हते. शास्त्री व परोशी हे अभिमानी व गर्विष्ठ असून साधारण लोकांची काळजी बाळगीत नसत,

१६ परंतु येशू त्यांस ह्मणाला, त्यांस जाण्याची गरज नाहीं, तुह्मी त्यांस खायास द्या.

१७ तेव्हां ते त्याला ह्मणाले, पांच भाकरी व दोन मासे यांखेरीज आह्माजवळ एथें कांहीं नाहीं.

१८ तेव्हां तो ह्मणाला, तीं इकडे मजजवळ आणा.

१९ मग त्याने समुदायास गवतावर बसायाला सांगितलें, आणि त्या पांच भाकरी व ते दोन मासे घेऊन त्याने वर आकाशाकडे पाहून आशीर्वाद मागितला; नंतर भाकरी मोडून शिष्यांस दिल्ह्या व शिष्यांनी समुदायांस दिल्ह्या.

२० तेव्हां ते सर्व जेवून तृप्त झाले; नंतर उरलेल्या तुकड्यानी बारा टोपल्या भरून त्यानी उचलून नेल्या. (१)

(१) २ राजे. ४:१–७.

आणि कांहीं बोध दिल्हा तरी गैरमार्गास लावीत असत. ख्रीस्त जो खरा मेंढपाळ (यो. १०:१४) तो त्यांविषयीं कळवळला आणि आकाशलोकाचा खरा मार्ग त्याने त्यांस शिकविण्याचा मयत्न केला.

१६ "परंतु येशू त्यांस ह्मणाला इ०" योहान्न ह्मणतो कीं, यांस खायाला भाकरी कोठून विकत आणूं असें येशूने आदीं फिलिप्पसाला विचारिलें; आपल्यावर त्यांचा विश्वास आहे कीं नाहीं हें पाहण्याकरितां त्याने विचारिलें. किती रुपयांच्या भाकरी लागतील याचा हिशोब फिलिप्पस करूं लागला, आणि पुरत्या भाकरी विकत घेण्याची शक्ति नाहीं असें मनांत आणून शिष्यांनी लोकांस गांवांत पाठविण्याची आज्ञा मागितली. ख्रीस्ताने सर्व जाणून सांगितलें कीं त्यांस खायाला द्या.

१७,१८ "पांच भाकरी व दोन मासे इ०" हीं एका तरुणाजवळ होतीं. योह. ६:९.

१९ "त्याने वर आकाशाकडे पाहून इ०" ख्रीस्त सर्वदां आपल्या अन्नावर आशीर्वाद मागत असे. याविषयीं त्याने आह्मास कित्ता दाखविला आहे. देवापासून आशीर्वाद मागावा हें योग्य आहे. तो आमची गरज पुरवितो आणि आह्मी त्याचे आभार मानावे.

२० "तेव्हां ते सर्व जेवून तृप्त झाले इ०" हा प्रसिद्ध व मोठा चमत्कार होता. एवढा मोठा समुदाय तृप्त करण्यास त्या भाकरी फार वाढविण्याचें अगत्य पडलें. जो असें वाढविण्यास समर्थ होता त्याच्याठायीं उत्पन्न करण्याची शक्ति असावी.

२१ आणि खाणारे पुरुष हे बायका व लेंकरें खेरीज करून सुमारें पांच हजार होते.

२२ तेव्हांच आपण समुदायांस निरोप देत आहे इतक्यांत येशूनें आपल्या शिष्यांस तारवावर चढून आपल्यापुढें पलीकडे जायास सांगितलें.

२३ मग समुदायास निरोप दिल्यावर तो प्रार्थना करायास एकीकडे डोंगरावर गेला; (१) आणि रात्र झाली तेव्हां तो तेथें एकटाच होता.

२४ परंतु त्या काळीं तारूं समुद्राच्या मध्यभागीं असतां लाटांनी डळमळत होतें, कारण कीं वारा तोंडचा होता.

२५ मग रात्रीच्या चवथ्या प्रहरीं येशू समुद्रावर चालत त्यांजकडे गेला.

---

(१) मार्क. ६:४६.

---

२१–२३ "सुमारें पांच हजार होते." हा आश्चर्यकारक चमत्कार व फार दयेचें काम असें होतें. हें पाहून लोकांची खातरी झाली कीं जो भविष्यवादी जगांत यायाचा होता ह्मणजे मशीया तो निश्चयें हाच आहे, (यो. ६:१४) आणि असी खातरी धरून त्यानी त्याला बळानें धरून राजा करावें असें मनांत आणिलें. हें टाळावें ह्मणून ख्रीस्त त्यांस सोडून एकटाच निघून डोंगरावर गेला. पाहा, ऐहिक मान व पदवी ख्रीस्ताला देऊं केली असतां तो प्रार्थना करायाला एकांतीं गेला. सर्व ख्रिस्ती लोकांस हा कित्ता चांगला आहे, आपण नम्र राहावें ह्मणून एकांतीं जाऊन जग व जगाचा मान व मोह दूर करून देवाजवळ प्रार्थना करावी, यापेक्षां दुसरा चांगला उपाय नाहीं.

२४ "परंतु त्या काळीं तारूं समुद्राच्या मध्यभागीं इ०" हा तिबेरयस समुद्र पांच कोसांपेक्षां अधिक रुंद नाहीं, त्याच्या मध्यभागीं ते आले होते.

२५ "मग रात्रीच्या चवथ्या प्रहरीं इ०" यहूदी लोक रात्रीचे तीन प्रहर असा विभाग करीत असत. पण रोमी लोक दिवसाचे आठ प्रहर मोजीत असत. रात्रीचे चार प्रहर, ह्मणजे दिवस मावळल्यापासून तीन वाजेपर्यंत (इंग्लिश साहांपासून नऊ वाजेपर्यंत) पहिला प्रहर, तिहींपासून सहांपर्यंत (इंग्लिश नऊपासून बारा वाजेपर्यंत) दुसरा प्रहर. इत्यादि. तर चवथा

२६ तेव्हां शिष्य त्याला समुद्रावर चालतां (१) पाहून घाबरे (२)
होऊन ह्मणाले, भूत आहे; आणि ते सर्व भिऊन ओरडले.

२७ परंतु तेव्हांच येशू त्यांस ह्मणाला, धीर धरा, (३) मी आहें,
भिऊं नका.

२८ तेव्हां पेत्रसाने त्याला उत्तर दिल्हें, हे प्रभू, तूं असलास (४)
तर पाण्यावरून तुजकडे यायास मला सांग.

२९ मग त्याने सांगितलें, ये; तेव्हां पेत्रस येशूकडे जायास तारवा-
वरून उतरून पाण्यावर चालला.

३० परंतु वारा मोठा असें पाहून तो भ्याला, आणि बुडूं लाग-
ल्यावर ओरडत बोलला कीं, हे प्रभू, मला तार. (५)

३१ तेव्हांच (६) येशूने हात लांबवून त्याला धरिलें, आणि त्याला
ह्मटलें, हे अल्पविश्वासी, त्वा संशय कां धरिला? (७)

---

(१) इयो. ९:८. योहा. ६:१९.
(२) लूक २४:३७.
(३) प्रेषि. २३:११.
(४) फिलि. ४:१३.
(५) गीत ६९:१,२. विलाप. ३:५७.
(६) यशा. ६३:१२.
(७) याक. १:६.

---

प्रहर ह्मणजे नवांपासून बारांपर्यंत (इंग्लिश तीनपासून साहा वाजेपर्यंत)
सकाळीं असा होता. ख्रिस्त चवथ्या प्रहरीं येऊन शिष्यांस दिसला, याव-
रून तो सारी रात्र एकांतीं प्रार्थना करीत होता असें दिसतें. "समुद्रावर
चालत इ." हा मोठा चमत्कार असें उघड दिसतें. वारा सुटलेला व
समुद्र खवळलेला, व फार अंधार असतां ख्रिस्त आपल्या शिष्यांकडे समुद्रावर
चालत आला.

२६ "तेव्हां शिष्य त्याला समुद्रावर चालतां इ." शिष्य भ्याले. अंधा-
रांत खवळणाऱ्या लाटांवर एक मनुष्यरूप प्राण्याला चालतां पाहून ते घाब-
रून ओरडले. त्यांस भय वाटलें यांत आश्चर्य नाहीं.

२७ "मी आहें, भिऊं नका." ख्रिस्ताची वाणी व बोलणें त्यांच्या काना-
वर पडलें. तें किती प्रिय व आवडीचें वाटलें असेल? ख्रिस्त आहे तेथें
भय धरण्याचें कारण नाहीं. त्याच्या बोलण्यानें खवळणारा समुद्र शांत
झाला, तर चिंताग्रस्त मनहि शांत असावें कीं नाहीं?

२८—३१ "तेव्हां पेत्रसाने इ." उतावळा पेत्रस, त्याला वाटलें एवढा
त्याचा विश्वास नव्हता. तो साहसी व प्रमादी होता, पण लवकर भ्याला

३२ मग ते तारवांत बसल्यानंतर वारा राहिला. (१)

३३ तेव्हां तारवांतलीं माणसें येऊन त्याच्या पायां पडून ह्मणालीं, तूं देवाचा पुत्र आहेस खरा. (२)

३४ नंतर ते पार जाऊन (३) गन्नेसारेत देशांत पोहंचले.

३५ आणि त्या जाग्यांतल्या माणसांनी त्याला ओळखून त्या चहुंकडल्या अवघ्या प्रांतांत पाठवून सर्व दुखणाईतांस त्याजकडे आणिलें.

३६ आणि केवळ तुझ्या वस्त्राच्या कांठाला (४) आह्मी शिवावें असी त्यानी त्याजवळ विनंती केली, आणि जितके शिवले तितके बरे झाले. (५)

---

(१) गोत १०७:२९. (४) गण. १५:३८. मात्थी ९:२०. मार्क. ३:१०. लूक ६:१९. प्रेषि. १९:१२.
(२) दानी. ३:२५. लूक ४:४१. योह. १:४९. ६:६९. ११:२७. प्रेषि. ८:३७. रोम. १:४.
(३) मार्क. ६:५३. (५) योह. ६:३७.

---

आणि लाटांमध्यें बुडतांना त्याने ओरडून साह्य मागितलें. याप्रमाणें ख्रीस्ताने त्याला त्याचे गुण व अशक्तता समजाविली.

३२ "मग ते तारवांत बसल्यावर वारा राहिला." ख्रीस्ताच्या ईश्वरी सामर्थ्याविषयीं हें नवें प्रमाण होतें. वारा व लाटा यांवर ज्याला अधिकार आहे, तो सर्वसमर्थ असावा. योहान्नांत लिहिलें (६:२१.) कीं जेथें जायाचें होतें तेथें तारूं लागलेंच पोहंचलें. हें अणखी प्रमाण होतें कीं हा ख्रीस्त देवाचा पुत्र आहे, असें समजून त्यानी पायां पडून त्याचें भजन केलें.

३४—३६ "नंतर ते पार जाऊन गन्नेसारेत देशांत इ." हा देश तिबेरयसाच्या पश्चिमेस गालिल प्रांतांत होता. शिष्यांस तेथें जायाला ख्रीस्ताने सांगितलें होतें.

**सूचना** १ मनसाक्षी केवढा प्रबळ आहे हें हेरोद राजाच्या गोष्टीवरून दिसून येतें. ओ. १–४. आपण दोषी व अपराधी आहों, असें त्यास माहीत होतें, ह्मणूनच हाच मेलेल्यांमधून उठलेला योहान्न असावा, असें त्याला वाटलें. दुष्टाचें मन लवकर नाहीं तर शेवटीं तरी त्याला खाईल.

२ विश्वासू असण्याचा धर्म. योहान्नाने आपला जीव हातांत घेऊन हेरोदाचा निषेध केला यामुळें त्याने जीव गमावला. परंतु देवाचें व आपल्या सदसद्विवेकाचें अनुमोदन मिळालें. तसेंच जे योग्य करितात त्या सर्वांस मिळेल. मनुष्यें किती जरी थोर व गर्विष्ठ व दुष्ट असलीं तरी त्यांचें भय धरूं नये. केवळ देवाला भ्यावें. ३ दुष्ट नीतिमानाची भीड धरतील. हेरोद

राजा दुष्ट मनुष्य होता, तथापि तो योहान्नाची भीड व भय धरीत असे. दुष्ट हे ख्रिस्ती मार्ग धिक्कारितात परंतु त्यांचें मन वरचेवर साक्ष देतें कीं हा मार्ग खरा आहे, आणि मरणास टेंकतात तेव्हां ख्रीस्तावरील आशेनें जें समाधान तें पावण्याची त्यांस उत्कंठा होती. ४ वचन देणें व विशेषेंकरून शपथ वाहणें याविषयीं माणसांनी संभाळावें. हेरोदानें दुष्ट शपथ वाहून मूर्खपणाचें वचन दिल्हें. ओ० ९. वचन पूर्ण करायास योग्य आहे, असें जाणल्याशिवाय तें देऊंच नये. कोर्टांत साक्ष देतांना कधीं कधीं शपथ वाहणें भाग आहे परंतु या प्रसंगाखेरीज अन्य प्रसंगीं शपथ कधीं वाहूंच नये. ५ तमाशा व ख्याली खुशाली करणें वाईट आहे. ओ ६—११. एका रंगेल्या व दुराचारी मुलीच्या नाचण्याकडून त्या पवित्र मनुष्याचा जीव गेला. ख्याली खुशाली करण्यांत वेळ उगीच जातो, देवाचा विसर पडतो आणि ऐहिक हांव व दुर्व्यसनें वाढतात. अशानें मरणाची सिद्धता कसी होईल ? ६ एकांतीं प्रार्थना करण्याचें अगत्य. आपण एकटयानेंच देवाजवळ प्रार्थना करावी, ह्मणून ख्रीस्तानें लोकांस पुढें धाडून दिल्हें. तसेंच ख्रिस्त्यानीं प्रार्थनेंत बहुत वेळ घालवावा. ख्रीस्ताला प्रार्थना करण्याचें अगत्य होतें, तर विशेषेंकरून त्याच्या लोकांस किती अगत्य असावें ? ७ भयाच्या व संकटाच्या समयीं ख्रीस्त जवळ असून आपल्या भक्तांस आश्रय होईल. ओ. २५,२६. आपण त्याला कधीं भिऊं नये. कठिण दुःखें व संकटें लागलीं असतांहि आपण त्याकडे पाहावें, आणि त्याची वाणी ऐकून समाधान पावावें. ८ ख्रीस्ताची आज्ञा पाळण्यासाठीं कांहींच अवघड नाहीं. ओ. २९. ख्रीस्तानें आज्ञा दिल्ही असतां पेत्रस समुद्राच्या लाटांवर चालायाला समर्थ झाला. तथापि तो आपल्या शक्तीनें चालला नाहीं. तो स्वतः अगदीं अशक्त होता, हें उघड झालें. आह्माला प्रत्येक क्षणीं ख्रीस्ताचें साह्य पाहिजे. तें मिळालें नाहीं तर आह्मी बुडून नाश पावूं. आह्मी ख्रीस्ताकडे पाहावें. पेत्रस ख्रीस्तावरून दृष्टि काढून वारा व लाटा यांकडे पाहूं लागतांच तो बुडूं लागला. आपणावर नव्हे, परंतु ख्रीस्त जो सर्वसमर्थ मित्र व तारणारा याजवर भरवसा ठेवणें हें खरें धैर्य आहे. ९ कधीं कधीं ईश्वर आमची प्रार्थना ऐकून लागलेंच उत्तर देतो. ओ. ३१. ख्रीस्तानें तेव्हांच पेत्रसाची प्रार्थना ऐकून त्याला बचाविलें. जेव्हां अकस्मात संकट येतें, तेव्हां प्रार्थना विश्वासानें केली ह्मणजे देवाचें साह्य तेव्हांच मिळेल असा भरवसा धरावा. १० भंगाचा पुढारी गर्व आहे. पेत्रस अभिमानी व स्वमतनिष्ठ होता, ह्मणून तो पडला. त्याचा अभिमान व अहंता येणेंकडून त्याचा अल्प विश्वास दिसून आला. ११ ख्रीस्त हा वास्तविक देव आहे असें मानून त्याचें भजन करावें हें योग्य आहे. ओ. ३३.—१२ सर्वांनी ख्रीस्ताकडे शरण येऊन व त्याजवर भाव

## अध्याय १५.

१ तेव्हां यरूशालेमांतील शास्त्री व परोशी येशूकडे येऊन ह्म-
णाले, (१)

२ तुझे शिष्य वाडवडिलांचा संप्रदाय कां उल्लंघितात ? कां कीं
भाकर खाण्याच्या वेळेस ते आपले हात धूत नाहींत.

---

(१) मार्क. ७:१ इ०.

---

ठेवून तारण पावावें, असी आमची इच्छा असावी, आणि याविषयीं आह्मी प्रयत्न करावे. पापापासून व पापाला जो योग्य दंड त्यापासून केवळ ख्रिस्त आह्माला तारायास समर्थ आहे. तो केवळ शब्द बोलण्याकडून बरें करी आणि तोच आमच्या आत्म्यास तारूं शकतो. त्याने दया करून आह्मास व आमच्या मित्रांस तारावें ह्मणून आह्मी किती आग्रहाने त्याजपासीं विनंती करावी.

१–९ "तेव्हां यरुशालेमांतील शास्त्री इ०." मार्क. ७:१–९ पाहा. त्यांनी शिष्यांस न धुतलेल्या हातांनी भाकरी खातां पाहिलें. ख्रिस्ताच्या शिष्यांच्या वर्त्तणुकींत कांहीं दोष सांपडेना ह्मणून शास्त्री व परोशी यांनी या हलक्या गोष्टीविषयीं दोष ठेविला.

२ "वाडवडिलांचा संप्रदाय." यहूदी ह्मणतात कीं जेव्हां मोशे डोंगरावर देवापासीं होता, तेव्हां देवाने जुन्या करारांत लिहिलेल्या आज्ञा त्याला मांडून दिल्ह्या, असें केवळ नव्हे, परंतु त्यांशिवाय देवाने मोश्याला तोंडाने अनेक आज्ञा व विधि सांगितले. मग मोश्याने हे विधि यहोशवाला सांगितले, यहोशवाने न्यायाधिशांला व त्यांनी भविष्यवाद्यांस सांगितले, आणि शेवटीं ते विधि तात्मूद ग्रंथांत लिहून ठेविले होते. हे तात्मुदांतले विधि बहुत व अगदीं हलके आहेत, आणि त्यांस कांहींच प्रमाण नाहीं, असें ह्मणायास नको. तथापि हे विशेष व भारी आहेत असें मानून यहूदी जपून पाळीत असत. परोशी व सर्व यहूदी हात नीट धुतल्यावांचून खात नाहींत मार्क.७:३. ते खाण्यापूर्वी हात धूत असत, असें केवळ नव्हे, पण चव्हाटयांतून आल्यावर धूत असत, आणि आपल्या घागरी, भांडीं, पलंग वगैरे सामानाची देखील जलशुद्धि करीत असत. शुचिर्भूतपणा राखावा असा त्यांचा हेतु असला तर बरें होतें. परंतु असा नव्हता. ही धर्मसंबंधी विशेष क्रिया असें मानून ते करीत असत. आणि ही बाह्यात्कारी क्रिया अंतःकरण शुद्ध होण्यापेक्षां अधिक अगत्याची असें मानून त्यांनी मोठी चूक

३ मग त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुम्हीहि आपल्या सांप्रदायें-करून देवाची आज्ञा कां उलंधितां ? (१)

४ कारण देवाने असी आज्ञा केली कीं, तूं आपल्या आईबापांचा सन्मान कर, (२) आणि जो बापाची किंवा आईची निंदा करितो (३) त्याला ठार मारावें.

५ परंतु तुम्ही ह्मणतां, जेणेंकरून तुझें हित मजकडून व्हायाचें तें अर्पण, असें जो कोणी बापाला किंवा आईला ह्मणेल,

---

(१) कल.२:८,२३. तित. १:१४. (३) निर्ग. २१:१७. लेवी.२०:९.
(२) निर्ग. २०:१२. अनु. ५:१६.

---

केली. अणखी किती पाणी लावावें, व तें कोणत्या रीतीने लावावें, व कितीदां बदलावें, व एक वेळेस किती माणसानी धुवावें, या सर्वांविषयीं ते बहुत हलके नेम पाळीत असत. निरर्थक विधि पाळणें ख्रीस्ताला बरें वाटलें नाहीं ह्मणून त्यानी त्याजवर दोष ठेविला. तसेच निरर्थक विधि व क्रिया हिंदु लोकांमध्यें चालत आहेत कीं नाहींत? मन स्वच्छ करून नीतीने चालणें याचें अगत्य न बाळगून ते स्नान करितात, जप तप, उपास, देहदंड, तीर्थ-यात्रा इत्यादि वाडवडिलांचे सांप्रदाय जपून पाळितात, परंतु देवाचें राज्य व त्याचें नीतिमत्व हीं शोधीत नाहींत.

३ "मग त्याने त्यांस उत्तर दिल्हें." ते सांप्रदाय मनुष्यकृतच आहेत आणि पाळायाचे नाहींत हें ख्रीस्ताला ठाऊक होतें. देवाच्या लिहिलेल्या आज्ञांस विपरीत असा त्यांचा एक सांप्रदाय तो त्यांस काढून दाखवितो.

४—६ "कारण कीं देवाने असी आज्ञा केली इ." आज्ञा पांचवी, निर्ग. २०:१२. व २१:१७. पाहा. ही आज्ञा मोडण्याचा अपराध इतका मोठा होता कीं याला यहूद्यानी मरण दंड ठरविला होता.

५ "तें अर्पण." ह्मणजे देवाला अर्पिलेलें यास्तव दुसऱ्या कामास लावायाचें नाहीं. यहूदी असें अर्पण करीत असत, आणि केल्यावर नवस पाळणें भाग आहे असें मोजीत असत. परमेश्वर जो देव त्याच्याजवळ नवस करा व फेडा. गीतें. ७६:११. अनु. २३:२१. देवाची आज्ञा होती कीं, पुत्राने आपल्या आईबापांचा सन्मान करावा, आणि हें करण्यासाठीं तीं ह्मातारीं व अशक्त झालीं असतां, त्यांचें पालन पोषण करणें भाग आहे. परंतु तें देवाला अर्पण असें ह्मटलें ह्मणजे आईबापांस पोसायासाठीं खर्चण्याचें अगत्य नाहीं, असा त्यांचा सांप्रदाय होता. जरी रागाने ह्मटलें तरी चिंता

६ त्याने आपल्या बापाचा व आपल्या आईचा सन्मान करूं नये;
(१) याप्रकारें तुह्मी आपल्या सांप्रदायाने देवाची आज्ञा रद्द केली
आहे.

७ अहो ढोंगी, तुह्माविषयीं यशायाने भविष्य ठीक सांगितलें कीं;

८ हे लोक आपल्या तोंडाने माझ्या जवळ येतात, (२) आणि
ओंठानी माझा सन्मान करितात, परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून
दूर आहे.

९ आणि ते माणसांच्या आज्ञा (३) शास्त्र ह्मणून शिकवितांना
मला व्यर्थ भजतात.

---

(१) अनु. २७:१६. (२) यशा. २९:१३. (३) कल. २:२२.

---

नाहीं, तें अर्पण असें ह्मणून दुष्ट पुत्राने आपल्या आईबापांस अडचणीच्या वेळेस सोडून सर्व मालमत्ता आपल्यासाठीं ठेविली किंवा खर्चेली तरी या सांप्रदायाप्रमाणें दोष नाहीं, असें होतें. ख्रीस्त ह्मणाला, अशा सांप्रदायानें देवाची आज्ञा रद्द होती, ह्मणून तो पाळायाचा नाहीं. देवाला अर्पण देणें किंवा धर्मार्थ देणें ख्रीस्ताने निषेधलें असें नाहीं. ज्या दरद्री विधवेने आपली सर्व उपजीविका भांडारांत टाकली, तिला देखील त्याने शिफारस केली. मार्क. १२:४–४४. देवाला अर्पिलेलीं असें निमित्त करून आईबापांचें पालन पोषण न करितां त्यांस सोडणें हीच वाईट व क्रूर चाल त्याने निषेधली.

७ "अहो ढोंगी." वाईट रीत अथवा सांप्रदाय धार्मिकपणाच्या सोंगाने लपवून चालविणें हें ढोंग आहे. हें एक उघड उदाहरण होतें. ते आपल्या आईबापांचें जें लागत होतें तें त्यानी धार्मिकपणाच्या सोंगाने अगदी टाकिलें. तुमचें राष्ट्र लबाड व ढोंगी असें यशायाने वर्णिलें, (यशा. २९:१३) आणि तें तुह्माविषयीं अद्यापि खरें पटतें.

८ "लोक आपल्या तोंडाने इ." हे आपले सर्व सांप्रदाय व बाह्यकृत्यें जपून पाळितात, परंतु अंतःकरणाने देवाला भजत नाहींत. ईश्वर अंतःकरण मागतो. त्यासमोर ढोंग चालत नाहीं.

९ "मला व्यर्थ भजतात." माणसांच्या आज्ञा शिकवून ढोंगाने भजणें व्यर्थ आहे. असें भजन देवाला पसंत नाहीं. देवाचें नांव व्यर्थ घेणें, जप तप, उपास, देहदंड वगैरे करणें व सर्व प्रकारची साकार भक्ति करणें हें देवाला पसंत आहे असें ज्यांस वाटतें ते केवढे भ्रांत आहेत. साकार-

१० तेव्हां त्याने समुदायाला बोलावून ह्मटलें, ऐका व समजून घ्या;

११ जें तोंडांत जातें (१) तें माणसाला विटाळवीत नाहीं, तर जें तोंडांतून निघतें तेंच माणसाला विटाळवितें.

१२ नंतर त्याचे शिष्य येऊन त्याला ह्मणाले, परोशी ही गोष्ट ऐकून अडखळले. हें तुला कळलें काय ?

१३ त्यावर त्याने उत्तर दिल्हें कीं, जें कांहीं रोप (२) माझ्या आकाशांतील बापाने लाविलें नाहीं, तें उपटून टाकतील.

---

(१) प्रेषि. १०:१५. रोम. १४:१४,२०. १ तीम. ४:४. तित. १:१५. (२) योह. १५:२,६.

---

भक्ति देवाला मान्य नाहीं. जे सालस मनाने व पूर्ण अंतःकरणाने भजतात अशांस तो शोधितो.

१० "तेव्हां त्याने समुदायाला बोलावून इ." परोश्यांसारिखे बाह्यविधि पाळायास न शिकवितां ख्रिस्ताने लोकांस समजाविलें कीं दुष्टाईचा उगम अंतःकरण आहे, यास्तव तें शुद्ध असलें पाहिजे.

११ "जें तोंडांत जातें इ." हात धुतल्यावांचून खातात असा दोष परोश्यानी शिष्यांवर ठेविला होता. तेव्हां ख्रिस्ताने उत्तर केलें कीं अन्न विटाळवीत नाहीं, पण मनांतील विचार व कल्पना आणि तोंडांतले शब्द हे माणसाला विटाळवितात. जे समजतात कीं इतर जातींतल्यांस शिवल्याने अथवा त्यांच्या पंक्तीस बसून जेवल्याने अथवा त्यानी सिद्ध केलेलें अन्न खाल्ल्याने विटाळ होतो ते मोठी चूक करितात. ईश्वर अंतःकरणाकडे पाहतो, आणि तें शुद्ध असल्यास शुद्ध आचरण घडेल, आणि हें देवाला पसंत होईल.

१२ "परोशी ही गोष्ट ऐकून अडखळले." ते आपल्या सांप्रदायांविषयीं इतके आवेशी होते कीं, ख्रिस्ताने ते विपरीत व व्यर्थ असें दाखविल्यावरून त्यांस राग आला.

१३ "जें कांहीं रोप इ." रोपाचा दाखला धर्मसंबंधी उपदेशाला बरोबर लागतो. करिं. ३:६—८. तो अंतःकरणास लाविला आहे, यासाठीं कीं फळ ह्मणजे चांगलें आचरण यावें. ख्रिस्ताने दाखविलें कीं देवापासून नाहीं, असें प्रत्येक मत उपटलें जाईल. सर्व ते रद्द होतील. परोश्यांचें मत विपरीत व देवाला नापसंत असें होतें ह्मणून त्यांस निषेधणें ख्रिस्ताला प्राप्त झालें.

१४ त्यांस असूं द्या, ते अंधळ्यांचे अंधळे वाटाडे (१) आहेत, आणि अंधळा अंधळ्याला नेऊं लागला तर दोघेहि खांचेंत पडतील.
१५ तेव्हां पेत्रसाने त्याला उत्तर दिल्हें, हा दाखला आह्मास फोडून सांग.
१६ मग येशू बोलला, अझून तुह्मीहि अज्ञानी आहां काय ?
१७ जें तोंडांत जातें तें अवघें पोटांत मावतें. (२) आणि बाहेर शौचकुपांत पडतें, हें तुह्मी अझून समजत नाहीं काय ?

---

(१) मात्थी २३:१६. लूक ६:३९. (२) लूक ६:४५. याक. ३:६.

---

१४ "त्यांस असूं द्या इ." त्यांचा राग पाहून चिंताक्रांत होऊं नका. "ते अंधळे." त्यांस बहुत दिवस असा मतिभ्रम झाला आहे कीं, ते खरें काय व खोटें काय हें समजत नाहींत. ह्मणून त्यांस राग येतो, यावरून आश्चर्य मानूं नका. ते अंधळ्यांचे अंधळे वाटाडेहि आहेत ह्मणून त्यांनी आपली अब्रू व वचन यांविषयीं आवेशी असलेंच पाहिजे. तर ते रागें भरून आडवे येतील असें समजून आश्चर्य मानायाचें नाहीं. "अंधळा अंधळ्याला नेऊं लागला इ." असा परिणाम होईल हें सिद्धच आहे. तसेंच खोट्या उपदेशकांची गोष्ट. परोशी भ्रमिष्ट असून कांहीं खरा उपदेश करूं शकत नाहींत. ते आपण आणि त्यांच्या नादीं जे लागतात तेहि भलतेंच आचरून नाश पावतात. ह्मणून लोकांचें तारण व्हावें या हेतूनें त्यांची भ्रांति व खोटेपणा काढून प्रसिद्धीस आणिला पाहिजे. १५–२०, मार्क.७:१७—२३ पाहा.

१६ "तुह्मीहि अज्ञानी आहां काय?" वडिलांचे सांप्रदाय खोटे असून पाळायाचे नाहींत असें ख्रिस्ताच्या उपदेशावरून व आपल्या बुद्धीवरून शिष्यांस समजलें नव्हतें; हें पाहून त्यानें आश्चर्य केलें.

१७ "जें तोंडांत जातें इ." जें खातात तें मनाला लागत नाहीं आणि तेणेंकरून विटाळ होत नाहीं. हात धुतल्याशिवाय खाल्लें असतां विटाळ होतो ही गोष्ट खरी नाहीं. ही देहसंबंधी गोष्ट आहे. अंतःकरणाला लागत नाहीं. अंतःकरण हें दुष्टाईचा उगम आहे. तर शुद्ध व्हावें असी इच्छा असल्यास हात धुवून किंवा दुसऱ्या बाह्य गोष्टी पाळून ही इच्छा सिद्धीस जाईल असें नाहीं. तर अंतःकरण शुद्ध केलें पाहिजे. तें वाईट आहे तोंपर्यंत सगळा मनुष्य अशुद्ध आहे.

१८ परंतु जें तोंडांतून निघतें तें अंतःकरणांतून निघतें, आणि तेंच माणसाला विटाळवितें.

१९ कां कीं अंतःकरणांतून (१) वाईट विचार, हत्या, व्यभिचार, शिंदळक्या, चोऱ्या, खोट्या साक्षी, दुर्भाषणें, हीं निघतात;

२० माणसाला विटाळविणारीं हींच आहेत, परंतु न धुतलेल्या हातानीं खाणें, हें माणसाला विटाळवीत नाहीं.

---

(१) उत्प. ६:५. ८:२१. नीति ६:१४. २४:९. इर्म. १७:२. रोम. ३:१०—१९. गल. ५:१९—२१. एफ. २:३. तित. ३:३.

---

१८—२० ज्या गोष्टी माणसाला विटाळवितात त्या एथें ख्रीस्त सांगतो. १ "वाईट विचार." हे सर्व प्रकारचे अन्याय व दुष्टाई यांचें मूळ व उगम आहेत. आचरण विचाराप्रमाणें घडतें ह्मणून वाईट विचार आह्मास विटाळवितात. २ "हत्या." अकसानें जीव घेणें. अकस अंतःकरणांत आहे तर हत्या अंतःकरणांतून निघती. १ यो. ३:१५. ३ "व्यभिचार, शिंदळक्या" मात्थी. ५:२८ पाहा. ४ "चोऱ्या." पहिल्यानें अंतःकरणांत लोभ उत्पन्न होतो, मग चोरी करतात. तर चोरी करून देवाच्या दोन आज्ञा मोडितात. विचारानें दाहावी व कृत्यानें आठवी आज्ञा मोडितात. ५ "खोटया साक्षी." यानें नववी आज्ञा मोडती. मनुष्याची आब्रू किंवा माल हरण करावा अथवा त्यांत कांहीं तरी अन्याय करावा या इच्छेनें खोटी साक्ष होती. तर ती अंतःकरणांतून निघती. ६ "दुर्भाषणें." मात्थी. ९:३ पाहा. देवाचा व ईश्वरी गुणांचा द्वेष करून व कोणी देव नको असी इच्छा धरून दुर्भाषण होतें. (रोम. ८:७) हेंहि अंतःकरणांतून निघतें. गीतें. १४:१. मार्कस तर अणखी बहुत सांगतो तीं येणेंप्रमाणें. ७ "लोभ." हाहि अंतःकरणांत उत्पन्न होतो. ८ "मत्सर—अकस." ह्मणजे दुसऱ्याचें वाईट पाहणें. रोम. १:२९. ९ "कपट." ठकाविणें. देण्या घेण्याची दगलबाजी, ही स्वार्थ बुद्धीवरून होती. १० "कामातुरपणा." बदफैली व सर्व प्रकारच्या दुर्वासना. ११ "दुष्टदृष्टि." ह्मणजे द्वेष, मत्सर करणारा व वाईट पाहणारा स्वभाव. मात्थी ६,२८. २०:१५. २ पेत्र. २:१४. १२ "गर्व." ह्मणजे अभिमान, अहंपणा. हें वाईट अंतःकरणाचें फळ आहे. १३ "मूर्खपणा." ह्मणजे निर्बुद्धि नव्हे पण वेडेपणा. जें चांगलें तें सोडून वाईट उपायानीं वाईट परिणाम साधणें व सर्व प्रकारचें पाप आचरणें हा विशेष मूर्खपणा आहे. देवाच्या आज्ञा मोडून नरकांत जाणें हा विशेष मूर्खपणा आहे. माणसाच्या अंतःकरणांतून किती वाईट

२१ नंतर येशू तेथून निघून (१) सोर व सीदोन यांच्या प्रांतांत गेला.

२२ तेव्हां पाहा, त्या प्रांतांतून कोणी एक कनानी बायको येऊन त्याला ओरडत ह्मणाली, हे प्रभू, दाविदाच्या पुत्रा, मजवर दया कर; (२) माझी कन्या भुतापासून भारी पीडा पावत आहे.

२३ परंतु त्याने तिला कांहींच उत्तर दिल्हें नाहीं; (३) तेव्हां त्याच्या शिष्यांनी जवळ येऊन त्याला विनंती केली कीं, ती आमच्या मागें ओरडती, यास्तव तिला निरोप दे.

२४ मग त्यान उत्तर दिल्हें कीं, (४) मला केवळ इस्राएलाच्या घराण्याच्या हरपलेल्या मेंढरांकडे पाठविलें आहे.

---

(१) मार्क. ७:२४. (२) लुक १८,३८,३९. (३) गीत २८:१. विल. ३:८. (४) मात्थी १०:५,६. प्रेषि. ३:२६.

---

गोष्टी निघतात. तो अगदी भ्रष्ट आहे, याला किती मबळ प्रमाणें आहेत, पाहा. ह्या गोष्टी त्याला विटाळवितात.

२१—२८ याचें वर्णन मार्कस ७:२४—३०. यांत पाहा. "सोर व सीदोन." हीं शहरें भूमध्यसमुद्राच्या कांठावर होतीं. मार्क. ७:२४. त्या सर्व प्रांताला कनान ह्मणत असत. महान अलेक्षांदर याच्या समयीं ग्रीक लोकांनी तो प्रांत हस्तगत केला होता, आणि ख्रीस्ताच्या वेळेस सोर व सीदोन हीं ग्रीक सरकारच्या अमलांत होतीं. तर ती बायको ग्रीक अमलांतली व परदेशी होती, आणि सदरहू नाम तिला बरोबर लाविलें असें दिसतें.

२२ "भुतापासून भारी पीडा पावत आहे." मात्थी. ४:२४. यावरील टीका पाहा. तिने मोठा आग्रह दाखविला. ती ओरडून त्याच्या पायां पडली. मार्क. ७:२५.

२३ "परंतु त्याने तिला कांहींच उत्तर दिल्हें नाहीं." तिचा विश्वास पाहावा, ह्मणून तो तिचें ऐकून साह्य करायास नाकबूल नव्हता, परंतु तिचा विश्वास पारखावा हें योग्य होतें.

२४ "मग त्याने उत्तर दिल्हें कीं इ." देवाने यहूद्यांस वचन दिल्हें होतें कीं, तुमच्या वंशांतला तारणार येईल. तो पहिल्याने त्यांमध्यें आला आणि शुभवर्तमान पहिल्याने केवळ त्यांस गाजविलें गेलें, परतु मागून देवाच्या

२५ तेव्हां ती येऊन त्याच्या पायां पडून बोलली, हे प्रभू, माझें सहाय कर.

२६ परंतु त्याने उत्तर दिल्हें कीं, लेंकरांची भाकर घेऊन कुत्र्यांस घालणें, हें ठीक नव्हे.(१)

२७ मग तिने ह्मटलें, खरें प्रभू; तरी कुत्रेहि आपल्या धन्यांच्या मेजावरून पडलेला चूर खातात.

२८ तेव्हां येशूने तिला उत्तर दिल्हें कीं, (२) बाई, तुझा विश्वास मोठा, तुझ्या इच्छेप्रमाणें तुला होवो; (३) आणि त्याच घटकेस तिची कन्या बरी झाली. (४)

२९ तेव्हां येशू तेथून निघून (५) गालीलाच्या समुद्राजवळ गेला, आणि डोंगरावर चढून तेथें बसला.

---

(१) माथी ७:६. प्रग. २२:१५.
(२) इयो. १३:१५. २३:१०. विल. ३:३२.
(३) गीत १४५:१९.
(४) योह. ४:५०—५३.
(५) मार्क. ७:३१.

---

आज्ञेवरून तें परदेश्यांस गाजविलें, आणि आतां ख्रीस्ताकडून सर्वांस तारणं देऊं केलें आहे.

२५ "हे प्रभू, माझें सहाय कर." प्रत्येक पाप्याला ख्रीस्ताचें साह्य पाहिजे ह्मणून असी प्रार्थना प्रत्येकाला शोभती.

२६ "लेंकरांची भाकर घेऊन इ०" आपण देवाचे निवडलेले लोक असें मनांत आणून यहूदी इतर लोकांस तुच्छ मानण्याकरितां कुत्रें वगैरे संज्ञा देत असत. असें करणें योग्य आहे हें दाखवायास ख्रीस्ताने इच्छिलें असें नव्हे, पण तिचा विश्वास पारखावा ह्मणून तो असें बोलला.

२७ "मग तिने ह्मटलें, खरें प्रभू; इ०" तूं बोललास तें खरें, तुझे विशेष आशीर्वाद यहूद्यांस भोगूं दे, परंतु आह्मा परदेशस्थांस जरी कुत्र्यांसारिखें मानिलें तरी कांहीं चूर आह्मास मिळूं दे. तूं यहूद्यांवर अपार दया करितोस तरी माझी जरासी दया येऊं दे आणि पिडलेली कन्या बरी कर.

२८ "तुझा विश्वास मोठा इ०" तिने आग्रहाने मागत जाऊन मोठा विश्वास दाखविला, हें पाहून ख्रीस्ताने तिची कन्या बरी केली. विश्वासाचें केवढें अगत्य आहे हें ख्रीस्ताने हमेशा समजाविलें. आतां तरी विश्वासच पाहिजे. जो विश्वास धरितो तो तारण पावेल.

२९—३१ "गालीलाच्या समुद्राजवळ इ०" या समुद्राला कधीं कधीं

३० नंतर बहुत समुदाय लंगड्यांस अंधळ्यांस मुक्यांस व्यं-
गांस व दुसऱ्या बहुतांस आपल्याबरोबर घेऊन त्याच्या जवळ आले,
आणि त्यानी त्यांस येशूच्या पायांजवळ टाकिलें, आणि त्याने त्यांस
असें बरें केलें कीं, (१)

३१ मुके बोलतात, व्यंग धड होतात, लंगडे चालतात, व अंधळे
पाहतात, हें समुदायानी पाहून आश्चर्य केलें, आणि इस्राएलाच्या
देवाला गौरवूं लागले.

३२ मग येशूने आपल्या शिष्यांस बोलावून ह्मटलें, (२) मला
समुदायाचा कळवळा येतो, कारण कीं ते आज तीन दिवस माझ्या-
जवळ राहिले आहेत, आणि त्यांपासीं खायाला कांहीं नाहीं, आणि
त्यांस उपासीं निरोप द्यावा, असें माझ्या मनांत नाहीं, कां कीं कदा-
चित ते वाटेंत कासाविस होतील.

३३ नंतर त्याचे शिष्य त्याला ह्मणाले, (३) एवढा समुदाय तृप्त
व्हावा, इतक्या भाकरी रानांत आह्माजवळ कोठून ?

३४ तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें, तुह्माजवळ किती भाकरी आहेत;
मग त्यानी ह्मटलें, सात, व कांहीं मासोळ्या.

३५ मग त्याने समुदायांस भूमीवर बसायास सांगितलें. (४)

३६ नंतर त्याने त्या सात भाकरी व मासोळ्या घेऊन आशीर्वाद
मागितल्यावर (५) त्या मोडिल्या आणि आपल्या शिष्यांस दिल्ह्या,
मग शिष्यानी समुदायाला दिल्ह्या.

---

(१) गीत. १०३:३. यशा. ३५:५,६.
(२) मार्क. ८:१. इ.
(३) २ राजे. ४:४३,४४.
(४) मात्थी. १४:१९. इ.
(५) १ शमु. ९:१३.
लुक २२:१९. २४:३०.

---

गेन्नेसारेत सरोवर असें ह्मटलें आहे. हे बहुत रोग दूर करायास वास्त-
विक ईश्वरी सामर्थ्य पाहिजे असें सिद्ध होतें. तर लोकानी आश्चर्य मानून
देवाला गौरविलें हें बरें केलें.

३२—३९ हा चमत्कार गालीलाच्या समुद्राजवळ एका डोंगरावर घडला
याचें वर्णन मार्कस. ८:१–१० यांतहि पाहा. जो चमत्कार मात्थी १४:
१४—२१, यांत वर्णिला आहे त्यासारिखा हा आहे. या चमत्कारावरून

३७ तेव्हां ते सर्व जेवून तृप्त झाले, मग उरलेल्या तुकड्यांनी सात पाट्या भरून त्यांनी उचलून नेल्या.

३८ आणि खाणारे, बायका व लेंकरें यांखेरीज चार हजार पुरुष होते.

३९ मग समुदायांस निरोप दिल्यावर तो तारवांतून मागदाल्याच्या प्रांतांत गेला. (१)

---

(१) मार्क. ८:१०.

---

ख्रीस्ताचें ईश्वरी सामर्थ्य उघड होतें. "मागदाल्याच्या प्रांतांत गेला." मार्कस ह्मणतो कीं तो दाल्मानुथा एथें गेला. हे प्रांत गालीलाच्या समुद्राच्या पूर्वेस होते. यांचीं अनेक नावें होतीं.

**सूचना.** १ लोकांस देवाच्या शास्त्रापेक्षां मनुष्यकृत नेम व कथा वारंवार अधिक आवडतात. ओ. १–६. दुष्ट माणसांस पवित्र शास्त्र गोड वाटत नाहीं. आपण योजिलेले उपाय अधिक बरे असें त्यांस वाटतें. ख्रिस्तावर भाव ठेवून देवापासून क्षमा व तारण साधून घ्यावें, हें त्यांस विशेषेंकरून आवडत नाहीं. गंगेंत स्नान करावें, यात्रेस जावें, देहदंडन करावें इत्यादि हजारों उपाय करून आपल्या पुण्यानें तरावें असें ते पाहतात. परंतु हे सर्व उपाय व्यर्थ आहेत. देवाचें शास्त्र हा आचरणाचा एकच नेम आहे, आणि तें उल्लंघिलें असतां मनुष्य पापी व दंडास पात्र झाला, तर केवळ ख्रीस्तच त्याला तारण्यास समर्थ आहे. २ ढोंग उघडकीस आणावें. जो उपदेश ढोंग्यांच्या मनांत ठसून त्यांचें अंतःकरण किती धूर्त व अशुद्ध आहे हें दाखवितो, तो उपदेश चांगला होय. सर्वांनी ढोंगाविषयीं संभाळावें. तें देवाला त्रासदायक आहे. खरी प्रीति, वास्तविक धार्मिकपण, अंतःकरणपूर्वक भक्ति, यांवांचून देवाला कांहींच पसंत होत नाहीं. ३ आईबापांस मानणें भाग आहे. जर ते देवाच्या आज्ञांविरुद्ध कांहीं करायास सांगतात तर करूं नये. प्रेषि. ५:२९. परंतु त्यांच्या योग्य आज्ञा पाळाव्या. त्यांस मान द्यावा. दरिद्री असल्यास त्यांच्या अडचणी पार पाडाव्या, असा धर्म होय. आईबापानीं जें केलें त्याची उतराई लेंकरांच्यानें करवत नाहीं. ४ प्रत्येक खोटा सिद्धांत शास्त्रावरून व सत्य वादावरून अडविला पाहिजे. ओ. १३. ५ दुष्टाईचा उगम हें अंतःकरण आहे. ओ. १९,२०. जगास बाधक असे हे सर्व वाईट विचार व अपराध अंतःकरणापासून आहेत. यास्तव केवळ बाह्याचरण

## अध्याय १६.

तेव्हां परोशी व सदोकी यानी येऊन येशूची परीक्षा पाहण्या-
करितां त्याजवळ मागितलें कीं, आह्मास आकाशांतील चमत्कार
(१) दाखवावा.

२ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, संध्याकाळीं तुह्मी ह्मणतां,
उघाड होईल कां कीं आभाळ तांबूस आहे;

---

(१) मात्थी. १२:३८. इ. मार्क. ८:११. इ. लूक. ११:१६. १२:५४–५६. १ करिं. १:२२.

---

व बाहेरील सुधारणूक हीं व्यर्थ आहेत. झरा शुद्ध केला पाहिजे, मग ओहोळ शुद्ध होईल. अंतःकरण शुद्ध असलें पाहिजे ह्मणजे पवित्र आचरण घडेल. ६ आपण सर्व दुःखें व संकटें यांत येशूकडे जावें. सोयरे-धायरे रोगी पडले तर त्यांस बरें करण्याचे उपाय चालवावे हें योग्य, परंतु केवळ ईश्वर जीव व आरोग्यता देण्यास समर्थ आहे. ओ. २२. या गरीब बायकोच्या गोष्टीवरून प्रार्थना करायास आश्वासन होतें. जें आह्मी मागतों तें योग्य असल्यास आह्मी मागतांना मागत नाहीं तर तो देईलच. ७ ख्रीस्त आपल्या अनुसरणाऱ्यांचा संभाळ करील. ओ. ३२–३८. सात भाकरींकडून सात हजार माणसांला तृप्त करायास जो समर्थ होता तो आमच्या सर्व गरजा पुरवायास समर्थ आहे. ऐहिक गोष्टी-साठीं व सर्वकाळच्या तारणासाठींहि त्याजवर भरवसा ठेवायास पूर्ण आधार आहे.

१–४ मार्क. ८:११,१२ यांत ही गोष्ट पाहा. "परोशी व सदोकी." मात्थी ३:७ यावरील व्याख्या पाहा. "परीक्षा पाहण्याकरितां." हा खरा मशीहा आहे ह्मणून प्रमाण पाहण्याची इच्छा आहे असें मीस दाख-विलें. परंतु तो करणार नाहीं असा चमत्कार मागून त्याजवर दोष ठेवून त्याची आब्रू घ्यावी असी त्यांची वास्तविक इच्छा होती. "आकाशांतील चमत्कार" ह्म. चिन्ह. १ शमु. १२:१६–१८. यशा. ३८:८ ख्रीस्त त्यांचा वाईट हेतु पाहून चमत्कार करीना, तथापि तो मरते वेळेस मोटमोठे उत्पात व चमत्कार आकाशांत दिसून आले आणि पृथ्वींतहि घडले.

२,३ "तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें." हवा कसी होणार हें समज-ण्याचीं अमुक लक्षणें आहेत. तीं लक्षणें पाहून ते हवा जाणत असत. तसीं माझ्या येण्याविषयीं लक्षणें आहेत असें ख्रीस्ताने शिकविलें. जे चम-त्कार व ज्या गोष्टी त्यांच्या देखत घडल्या होत्या त्या पाहून हा खरा मशीहा आला आहे, असें त्यानी समजायाचें होतें.

३ आणि सकाळीं, आज झड लागेल कां कीं आभाळ तांबूस व गडद आहे. अहो ढोंग्यानो, आभाळाचीं लक्षणें जाणायाला तुह्मास येतें खरें, पण कालाचीं लक्षणें तुह्मास समजत नाहींत काय ?

४ वाईट व व्यभिचारी पिढी चमत्कार मागती, परंतु योना भविष्यवादी (१) याच्या चमत्कारावांचून तिला चमत्कार मिळणार नाहीं. तेव्हां तो त्यांस सोडून गेला.

५ नंतर त्याचे शिष्य पलिकडे गेले, भाकरी तर बरोबर घ्यावयास विसरले होते.

६ तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, परोशी व सदोकी यांच्या खमिराविषयीं संभाळा व जपा. (२)

७ तेव्हां ते आपल्यामध्यें विचार करून ह्मणूं लागले, आह्मी भाकरी घेतल्या नाहींत, ह्मणून हा असें बोलतो.

८ परंतु येशू हें जाणून त्यांस ह्मणाला, (३) अहो अल्पविश्वासी, तुह्मी भाकरी घेतल्या नाहींत ह्मणून असा विचार तुह्मी आपल्यांमध्यें कां करितां ?

९ तुह्मी अझून समजलां नाहीं काय ? आणि पांच हजारांच्या पांच भाकरी, (४) आणि तुह्मी किती टोपल्या उचलिल्या ;

१० अणखी चार हजारांच्या सात भाकरी, (५) आणि किती पांट्या उचलिल्या, याची तुह्माला आठवण नाहीं काय ?

---

(१) योना. १:१७. (४) मात्थी. १४:१९.इ.
(२) लुक. १२:१. १ करिं. ५:६–८. गल. ५.९. २ तीम. २:१६,१७.
(३) मात्थी. ६:३०. ८:२६. १४:३१. (५) मात्थी. १५:३४.इ.

---

४ "वाईट व व्यभिचारी पिढी." मात्थी १२:३८–४०, याजवरील टीका पाहा. मार्कस (८:१२.) ह्मणतो कीं त्यांची हट्टबुद्धि व भ्रष्टपणा पाहून तो अंतःकरणांत कण्हला.

५–१२ हें वर्णन मार्क. ८:१३–२१, यांत पाहा. एकच भाकरी बरोबर घेतली होती. मार्क. ८:१४. "यांच्या खमिराविषयीं." खमीर पिठामध्यें घातलें असतां गुप्तरूपें व निवांत फुगतें. तसेंच परोशांच्या मतांविषयीं. तीं लाघवी तोंडावर गोड फुसलावीं असीं आहेत. ह्मणून त्यां-

११ परोशी व सदोकी यांच्या खमिराविषयीं जपा, असें भाकरीविषयीं म्या तुह्मास सांगितलें नाहीं, तें तुह्मी कां समजत नाहीं ?

१२ तेव्हां ते समजले कीं, त्यानें भाकरीच्या खमिराविषयीं नाहीं, तर परोशी व सदोकी यांच्या उपदेशाविषयीं जपायास सांगितलें. (१)

१३ नंतर फिलिप्पसाच्या काइसारिकडल्या प्रांतांत गेल्यावर येशूनें आपल्या शिष्यांस विचारिलें कीं, मनुष्याचा पुत्र जो मी त्या मला लोक कोण ह्मणून ह्मणतात ? (२)

१४ तेव्हां ते बोलले, कित्येक बाप्तिस्मा करणारा योहान्न, (३)

---

(१) मात्थी १५:१-९ (२) मार्क. ८:२७. लूक. ९:१८इ. (३) मात्थी. २४:२. लूक. ९:७-९.

---

विषयीं जपावें असा बोध ख्रीस्तानें आपल्या शिष्यांस दिल्हा. "विचार करून." ख्रीस्त मताविषयीं बोलतो असें त्यांस समजलें नाहीं. यहूदी लोकांस खमिराविषयीं अमुक नेम होते. परदेशानी केलेली भाकर खाऊं नये, असें बहुतेक ह्मणत. तर परोशी व सदोकी यांचें खमीर घेऊंच नये ह्मणून ख्रीस्ताचा अभिप्राय असें शिष्यांस वाटलें. "अहो अल्पविश्वासी." शिष्यांचें मन संसारांतच गुंतलें असें पाहून ख्रीस्तानें त्यांस निषेधलें, त्यांचें मन आत्मिक गोष्टींकडे असतें तर त्याच्या बोलण्याचा अभिप्राय ते लवकर समजले असते.

१२ "तेव्हां ते समजले." परोशांचीं खोटीं मतें खमिरासारखीं होतात. तीं मनांत शिरून मनोवृत्ति, वासना, भावना, हीं सर्व वश करून बिघडवितात ह्मणून त्यांविषयीं जपायास सांगितलें.

१३–२० मार्क. ८:२७–२९ लुक. ९:१८–२० पाहा. "फिलिप्पसाच्या काइसारिकडल्या." काइसारि या नांवाचीं यहुद्यांत दोन नगरें होतीं. एक भूमध्य समुद्राच्या कांठावर होतें. परंतु हें लबानोन डोंगराजवळ होतें. हेरोद उर्फ फिलिप्पस यानें तें नगर सुशोभित केलें ह्मणून त्याचें नांव त्याला दिल्हें होतें.

१४ "तेव्हां ते बोलले इ." मात्थी. ११:१४, टीका पाहा. जसें हेरोदास तसें दुसऱ्या कितीएकांस वाटलें कीं हा मेलेल्यांमधून उठलेला योहान्न आहे. ख्रीस्त चमत्कार व उपदेश करण्याकडून योहान्नासारिखा होता.

आणि कित्येक एलीया, आणि कित्येक इर्मया किंवा भविष्यवाद्यांतील एक, असें ह्मणतात.

१५ तो त्यांस ह्मणाला, तुह्मी तर मला कोण ह्मणून ह्मणतां?

१६ तेव्हां शिमोन पेत्रसाने उत्तर दिल्हें कीं, तूं जिवंत देवाचा पुत्र ख्रीस्त आहेस. (१)

१७ मग येशूने त्याला उत्तर दिल्हें कीं, शिमोन बार्योना, तूं धन्य आहेस, कारण कीं (२) मांस व रक्त यानीं नाहीं, तर माझ्या आकाशांतील बापाने (३) हें तुला कळविलें आहे.

---

(१) योन २:७. मात्थ. १४:३३. योह. १:४९. प्रेषि. ८:३०. इब्री १:२,५.
(२) १ करिं. २:१०. गल. १:१६. एफ. २:८. (३) १ योह. ४:१५. ५:२०.

---

१६ "तेव्हां शिमोन इ." पेत्रस आपल्या स्वभावाप्रमाणें पुढें होऊन शिष्यांकरितां बोलून खातरी करूं लागला. "तूं जीवंत देवाचा पुत्र." मूर्त्ति निर्जीव आहेत. त्यांस डोळे असूनहि दिसत नाहीं. कान असतां कांहीं ऐकूं येत नाहीं, आणि त्यांच्याने कांहीं बोलवत नाहीं. परंतु जो खरा देव तो जीवाचा व सर्वकाळच्या जीवनाचा उगम व कर्त्ता आहे. तो मूर्त्तींपासून अगदी वेगळा आहे, आणि हें दाखविण्यास तो जीवंत देव असें शास्त्रांत वारंवार ह्मटलें आहे. यहोश. ३:१०. १ शमु. १७:२६,३६. इर्म. १०:९,१० पुढें. ख्रीस्ताचा थोरपणा व देव जो बाप त्यासीं संबंध दाखविण्यासाठीं त्याला पुत्र असें नांव दिल्हें आहे. या नांवावरून त्याचा देवपणा दाखविला आहे. यो. १०:२९—३६. जो खरा मशीहा जगांत यायाचा तो हाच आहे, असी पेत्रसाने आपली व इतर शिष्यांची खातरी दाखविली. दुसऱ्यांचें वेगवेगळें मत होतें, पण प्रेषितांची पूर्ण खातरी झाली, आणि ते ख्रीस्ताला अंगीकारायास लाजले नाहींत.

१७ "मग येशूने इ." तूं धन्य ह्मणजे सुखी आहेस. ही गोष्ट थोडके जाणतात. तुह्मी जाणून खातरी धरिली व मजवर विश्वास ठेविला याचें फळ सर्वकाळचें जीवन असें होईल. "मांस व रक्त." ह्मणजे मनुष्य. गल. १:१६. एफ. ६:१२. माणसानें तुला हें कळविलें नाहीं, आणि मनुष्यरूपावरून कळलें नाहीं. पण देवाने आपल्या पवित्र आत्म्याकडून कळविलें आहे. जे चमत्कार ख्रीस्ताने केले त्यांवरून पुरतें प्रमाण पटलें कीं हा खरा मशीहा आहे. तथापि हजारों ते चमत्कार पाहून विश्वास धरीनात. असें असतां शिष्यानीं तींच प्रमाणें पाहून विश्वास धरिला, यावरून पवित्र आत्म्याकडून

१८ आणखी मी तुला सांगतों कीं, तूं पेत्रस (१) ह्मणजे खडक आहेस, आणि या खडकावर (२) मी आपली मंडळी रचीन आणि तिजवर मृतलोकाच्या दरवाज्यांचें (३) बळ चालणार नाहीं. (४)

१९ आणि मी तुला आकाशाच्या राज्याच्या किल्ल्या देईन; मग पृथ्वीवर जें कांहीं तूं (५) बंद करसील तें आकाशांत बंद होईल; आणि पृथ्वीवर जें कांहीं तूं मोकळें करसील तें आकाशांत मोकळें होईल.

---

(१) योह. १:४२. (४) यशा. ५४:१७.
(२) एफ. २:२०, प्रग. २१:१४. (५) मात्थी १८:१८.
(३) गीत. ९:१३.

---

त्यांची खातरी झाली असें सिद्ध होतें. सर्वांहून पक्कें प्रमाण कठीण अंतःकरणाला अडवितां येतें.

१८ "तूं पेत्रस ह्मणजे खडक इ." केफा याचाहि तोच अर्थ आहे. जेव्हां ख्रीस्तानें शिमोनाला शिष्य होण्यास बोलाविलें, तेव्हां त्यानें त्याला पेत्रस हें नांव दिल्हें. यो. १:४२. पेत्रसानें ख्रीस्ताला देवाचा पुत्र ह्मणून त्याचें गुणदर्शक असें नांव दिल्हें होतें. तसें नांव ख्रीस्तानें त्याला लाविलें. "आणि या खडकावर इ." याविषयीं अनेक व्याख्या आहेत. कित्येकांस वाटतें कीं खडक ह्मणजे जें सत्य पेत्रसानें पत्करलें होतें तें, आणि त्याजवर मंडळी रचायाची होती, आणि ती गोष्ट पत्करणें ख्रिस्ती होण्याचें प्रमाण असें व्हायाचें होतें. दुसऱ्यांस वाटतें कीं खडक ह्मणजे ख्रीस्त, आणि असें बोलून ख्रीस्तानें आपल्याकडे बोट करून शिष्यांस समजाविलें कीं तुमची खातरी योग्य आहे. मी खरा मशीहा आहें आणि या मज खडकावर मंडळी रचीन. ख्रीस्ताला खडक असें शास्त्रांत ह्मटलें आहे. यशा. २८:१६. १ पेत्र २:४,५. दुसरे कित्येक ह्मणतात कीं खडक ह्मणजे पेत्रस आणि बोलण्याचा अभिप्राय हाच कीं तूं खडक आहेस, मला अंगीकारून तूं दृढ निश्चयाचा व मंडळीचा पाया घालण्याजोगा, असें आपणाला दाखविलें आहेस, तर पुढारी होऊन यहुद्यांस व परदेशस्थांसहि शुभवर्त्तमान पहिल्यानें गाजवावें हा मान तुला मिळेल. पेत्रसानें असें केलें. प्रेषि. २: १४—३६ व १० अध्या. ख्रिस्ती मंडळ्यांचा पाया घालण्याचें विशेष साह्य पेत्रसानें केलें. परंतु ख्रीस्तानें त्याला मंडळीवर कांहीं विशेष अधिकार दिल्हा या मताला कांहींच आधार नाहीं. प्राचीन मंडळींत एका वेळेस पेत्रसाची नव्हे पण याकोबाची मसलत चालली. प्रेषि. १५. पौलसानें

२० तेव्हां त्याने आपल्या शिष्यांस निक्षूण सांगितलें कीं, (१) येशू जो ख्रीस्त तो मी आहें, हें कोणाला सांगू नका.

२१ तेव्हांपासून (२) येशू आपल्या शिष्यांस कळवूं लागला कीं,

---

(१) मार्क. ८:३०. (२) लूक ९:२२. १८:३१.२४:६,७. १ करिं. १५:३,४.

---

एका वेळेस पेत्रसाला प्रत्यक्ष अडविलें कां कीं तो दोषी होता. गल. २:११. "मंडळी" हा शब्द कधीं कधीं एका सभेस लाविला आहे. प्रेषि. १९:३२. ७:३८. कधीं कधीं सर्व जे खरे ख्रिस्ती त्यांस लाविला आहे. एफ. १:२२. १ करिं. १०:३२. हाच अर्थ एथें समजावा. "मृतलोकाच्या दरवाज्यांचें बळ इ." ह्मणजे सैतानाकडल्या सर्व शत्रूंचे बेत, योजना, एकोपा वगैरे युक्ति तिजविरुद्ध कधीं चालणार नाहींत. ते तिला कधीं जिंकणार नाहींत, हें वचन आजपर्यंत चमत्कारिक प्रकारें पूर्ण झालें व होत चाललें आहे.

१९ "आणि मी—किल्ल्या देईन." किल्ली ही अध्यक्षता व अधिकार यांची खूण आहे. यशा. २२:२२. प्रग. १:१८. ३:७. जेव्हां यहूदी कोणीएकाला आचार्य करीत तेव्हां देवळाची किल्ली त्याला देत असत. "आकाशाच्या राज्याच्या." ह्मणजे मंडळीच्या किल्ल्या. मात्थी. ३:२ टीका पाहा. असें बोलून ख्रीस्ताने पेत्रसाला समजाविलें कीं तुह्मी प्रथम यहुद्यांस व परदेशस्थांस शुभवर्त्तमान गाजवून त्यांसाठीं ख्रिस्ती मंडळीचा दरवाजा उघडाल. "जें कांहीं तूं बंद करसील." बंद करणें ह्मणजे मना करणें, मोकळें करणें ह्मणजे सुरू करणें. याप्रमाणें ख्रीस्ताने आपल्या शिष्यांस मंडळीचे नेम व रीती स्थापण्याचा अधिकार दिल्हा. हा अधिकार मनुष्यांविषयीं नव्हे पण विधि व रीति यांविषयीं होता. शिष्यानी स्थापिल्या ह्मणजे आकाशांत ईश्वर पसंत करील, असें ख्रीस्ताने समजाविलें. या अधिकारावरून शिष्यानी मूर्त्तीचें अमंगलपण मना केलें आणि सुंता करणें जरूर नाहीं असें ठरविलें. प्रेषि. १५:२०. मंडळीचे नेम व विधि बरोबर स्थापण्यास शिष्यांला ख्रीस्ताने शिकविलें व पवित्र आत्म्याची प्रेरणाहि होती.

२० "निक्षूण सांगितलें." ख्रीस्ताला माहीत होतें कीं मी खरा मशीहा असें माझे शिष्य जाहीर करूं लागले तर यहूदी अधिक अकस. राग व द्वेष करून लवकर माझा जीव घेतील. परंतु जीव देण्यास योग्य समय आला नव्हता, ह्मणून त्याने हें सांगितलें.

२१—२३ मार्क. ८:३१—३३. लुक. ९:२२. "तेव्हांपासून." हीच पहिली सूचना कीं अशा नीच व क्रूर प्रकारें जीव द्यायाचा आहे. शिष्य

ग्या यरूशालेमास जाऊन वडील व मुख्य याजक व शास्त्री यांकडून बहुत दु:खें सोसावीं, आणि मला जिवें मारावें, आणि तिसऱ्या दिवशीं ग्या पुन्हां उठावें, याचें अगत्य आहे.

२२ तेव्हां पेत्रस त्याला जवळ घेऊन त्याला धमकावूं लागला कीं हे प्रभू, तुजवर दया असो; हें तुला होणारच नाहीं.

२३ परंतु तो मुरडून पेत्रसाला ह्मणाला, अरे सैताना, (१) माझ्या मागें हो; तूं मला अडखळा आहेस, (२) कारण कीं तूं देवाच्या गोष्टींकडे लक्ष लावीत नाहींस, माणसांच्या गोष्टींकडे लावितोस.

२४ तेव्हां येशूने आपल्या शिष्यांस ह्मटलें, (३) जर कोणी माझ्या मागें यायास इच्छितो, तर त्याने आपणाला नाकारावें, आणि आपला खांब उचलून घेऊन माझ्या मागें यावें.

---

(१) २ शमु. १९:२२. (२) रोमे. १४:१३.
(३) मात्थी १०:३८. मार्क. ८:३४. लूक. ९:२३. १४:२७. प्रेषि. १४:२२. १ थेस. ३:३.

---

आदीं ख्रीस्ताच्या मागें जाऊं लागले तेव्हां ते कांहीं ऐहिक लाभ पाहत होते असें दिसतें. हा मोठा राजा होऊन गादीवर बसेल असें वाटलें. मी वास्तविक खरा मशीहा आहें असी ख्रीस्ताने प्रथम त्यांची खातरी करून दिल्हीं. मग आपलें काम, गुण लक्षण व जीव देण्याचा प्रकार यांविषयीं त्यांस विवेकाने समजाविलें.

२२ "तेव्हां पेत्रस—धमकावूं लागला इ." ख्रीस्तावर पेत्रसाची दृढ प्रीति बसली होती. हा खरा मशीहा आणि विजयी होणार आहे असी आशा त्याने धरिली होती. यास्तव ख्रीस्ताला जीव देण्याचें अगत्य आहे, असें ऐकून त्याला वाईट वाटलें. आणि तो निषेध करूं लागला. हें ठीक नव्हतें. प्रभूची इच्छा काय हें समजून मान्यच व्हायाचें होतें.

२३ "अरे सैताना इ." सैतान माणसांचा मोठा वैरी आहे. सैतानाच्या प्रेरणेने पेत्रसाचें बोलणें झालें ह्मणून ख्रीस्ताने हा संज्ञा त्याला दिल्ही. "तूं मला अडखळा आहेस." तुझी मसलत व इच्छा मला आडवी येनात. मी तुला मान्य झालों तर माझें काम कधीं सिद्धीस जाणार नाहीं. मी जगासाठीं आपला जीव द्यावा या देवाच्या इच्छेस तूं मान्य नाहींस. मनुष्यांमध्यें जो मान त्याकडे तूं लक्ष लावितोस.

२४—२८ मार्क. ८:३४—३८ ९:१०. लूक. ८:२३—२७. "आपल्याला नाकारावें." त्याने आपली इच्छा, मन, भावना, शरीर, आत्मा, हीं

२५ कां कीं जो कोणी (१) आपला जीव राखावयास इच्छितो तो त्याला मुकेल; परंतु जो कोणी मजकरितां आपल्या जिवाला मुकेल, तो त्याला मिळवील.

२६ कारण कीं माणूस सगळें जग मिळवील आणि आपल्या जिवाची हानि पावेल तर त्याला काय लाभ होईल; अथवा माणूस आपल्या जिवाच्या बदल काय देईल ! (२)

२७ कां कीं मनुष्याचा पुत्र (३) आपल्या बापाच्या गौरवानें आपल्या दुतांसुद्धां येणार आहे, आणि त्यावेळेस (४) तो प्रत्येकाला ज्याच्या त्याच्या कामाप्रमाणें देईल.

२८ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, एथें उभें राहणाऱ्यांतील

---

(१) योह. १२:२५. एसे. ४.१४.
(२) गोत ४९:७,८.
(३) दानी. ७:९,१०. जख. १४:५. यहू. १४.
(४) प्रग. २२:१२.

---

सर्व देवाच्या इच्छेस मान्य करावीं. आपला स्वार्थ पाहूं नये पण ख्रीस्त व त्याचें राज्य यांकरितां जीव देखील देण्यास मान्य असावें. "आपला खांब" मात्थी. १०:३८, यावरील टीका पाहा.

२५:२६. मात्थी. १०:३९. टीका पाहा. जग मिळविणें ह्मणजे त्यांतील द्रव्य, मान व सुख मिळविणें. जिवाची हानि पावणें ह्मणजे आकाशलोकाबाहेर घालविलें जाणें व नरकवास भोगणें. जे जग मिळविण्यास प्रयत्न करितात आणि ख्रीस्ताकरितां अवघें सोडायास मान्य नाहींत ते आपल्या जिवाचा नाश पावतील. मग जिवाच्याबद्दल काय चालेल? नरकलोकांत कांहीं तारणोपाय चालणार नाहीं.

२७ "कां कीं मनुष्याचा पुत्र इ." प्रभु येशू ख्रीस्त जगाचा न्याय ठरविण्यास फिरून येईल. त्याबरोबर दिव्य दूत येतील; आणि देवाला योग्य अशा वैभवानें तो येईल. तेव्हां सर्वांचा न्याय करून तो प्रत्येकाला त्याच्या त्याच्या कर्माप्रमाणें प्रतिफळ देईल. जे त्याजवर विश्वास ठेवितात त्यांस आकाशांत सर्वकाळचें सुख, आणि जे त्याजवर विश्वास ठेवीत नाहींत त्यांस नरकांत सर्वकाळचें दुःख, असें फळ तो देईल. तर आपणाला नाकारून व अवघें सोडून ख्रीस्ताला अनुसरावें हें बरें कीं नाहीं? आतां जरी निंदा, नुकसान व अनेक दुःखें सोसावीं लागतात, तरी तो आपल्या अनुसरणाऱ्यांस जवळ घेऊन सर्वकाळचें सुख व जीवन असें फळ देईल. परंतु जे आतां लाजून त्याला नाकारितात त्यांस तो न्यायकाळीं नाकारील.

२८ "राज्यांत येतांना पाहतील." शिष्यांस आश्वासन देण्याकरितां त्यानें

कोणी असे आहेत कीं, (१) मनुष्याच्या पुत्राला त्याच्या राज्यांत येतांना पाहतील, तोंपर्यंत त्यांस मरणाचा अनुभव होणारच नाहीं. (२)

(१) मार्क ९:१. (२) इब्री. २:९.

हें सांगितलें. न्यायकाळीं येणें याविषयीं नव्हे, पण मंडळी वाढविणें याविषयीं बोलला. त्या वेळेस जरी ख्रीस्ताचें राज्य ह्मणजे मंडळी फार लाहान होती तरी तींतील कित्येकाला मरण येण्यापूर्वी ती एवढी वाढवायाची होती कीं, तिच्या वृद्धीवरून त्याचें सदरहू बोलणें खरें असें प्रमाण पटावें. या अर्थात मार्कस ह्मणतो, (मार्क. ९:१.) देवाचें राज्य पराक्रमानें आलें असें पाहतील इ. आणि लूका, (लूक. ९:२७.) ते देवाचें राज्य पाहतील इ. ह्मणजे ख्रिस्ती मंडळी जरी लाहान लाचार व उपहासास्पद आहे तरी ती फार वाढली असें पाहतील, तोंपर्यंत त्यांतील कित्येक मरण पावायाचें नव्हतें आणि तसें झालें. सर्व प्रेषितानी पन्नासाव्या दिवसाचीं महाकर्मे पाहिलीं आणि कित्येकानी तर यहूदी राष्ट्रांची फांकाफांक, देवळाचा नाश, आणि आशीया, रोम, ग्रीस वगैरे देशांत ख्रिस्ती मंडळांची स्थापना, हीं पाहिलीं.

**सूचना** १ काळाचीं चिन्हें पाहावीं. ओ. ३. ख्रीस्ताच्या येण्याची वाट पाहणें भाग होतें. आतांहि त्याचें राज्य येण्याचीं चिन्हें पाहावीं. तीं उघड आहेत. शुभवर्तमान गाजवितात, खरा उजेड प्रकाशतो, ज्ञान वाढतें, ख्रिस्ती मंडळी वाढत चालती, लोकांचें मन चेतत आहे, आणि तेजस्वी दिवस जगावर लवकर उगवणार आहे. लोकांनी हीं चिन्हें पाहून सिद्ध असावें. २ ख्रीस्ताविषयीं बरोबर समजावें याचें मोठें अगत्य आहे. ओ. १३—१६. हाच खरा व सर्व समर्थ तारणारा असा विश्वास धरून त्याला शरण गेलें पाहिजे. माणसांसमोरहि त्याला अंगीकारलें पाहिजे. त्याविषयीं कधीं लाजूं नये. आह्मी त्याला अंगीकारल्यावरून जगाचा धिःकार झाला तर होवो. ईश्वर आह्मास मान देउन धन्य ह्मणेल. ३ ख्रिस्ती मंडळी निर्भय आहे. ओ. १८. जरी ती लहान व अशक्त आणि तिचे शत्रु पुष्कळ व प्रबळ आहेत तरी ती निर्भय आहे. तिचा पाया खडकावर घातला आहे, आणि शत्रु तिजवर कधीं जय पावणार नाहींत. ख्रीस्तानें असें वचन दिल्हें, आणि आजपर्यंत तो तें पूर्ण करीत आला आहे. जग तिला हासतें, अडवितें, पाठलाग करितें, तरी ती देवाच्या आश्रयानें अद्याप आहे, आणि अलीकडे फार वाढत चालली आहे. ४ खऱ्या मार्गानें चालून आपणाला नाकारावें लागतें. ओ. २४. दारिद्र, रोग, दुःख, पाठ-

## अध्याय १७.

१ मग साहा दिवसांनंतर (१) येशूने पेत्रस व याकोब व त्याचा भाऊ योहान्न यांस बरोबर घेऊन त्यांस उंच डोंगरावर एकीकडे नेलें.

(१) मार्क ९:२. इ. लूक. ९:२८. इ.

लाग, मरण देखील आलें तर येवो. आह्मी वधस्तंभ उचलून ख्रिस्ताला अनुसरावें. ख्रीस्ताने दुःख सोसिलें व जीव दिल्हा. प्रेषितांनी व धर्मामुळें वधलेल्यांनी तसेंच केलें. आह्मी त्यांस अनुसरावें.

५ हें जग मिळविण्यासाठीं श्रम घ्यावे हें किती मूर्खपण आहे? तें कितीहि अश्रुपात, चिंता व श्रम करून मिळविलें तरी तेणेंकरून मन तृप्त होत नाहीं, आत्म्याचें तारण होत नाहीं, आणि लवकरच सोडावें लागेल. जीवात्म्याची हानि झाली ह्मणजे जगांतील द्रव्य किंवा मनुष्य किंवा दूत यांकडून त्याचा उद्धार होत नाहीं. सांप्रत लोकांनी आपल्या जीवात्म्याचें तारण शोधून घेण्यास किती आग्रहानें प्रयत्न करावे. ६ ख्रीस्त फिरून येणार आहे. ओं. २७ ही गोष्ट ख्रिस्ती लोकांस आनंदकारक आहे, कां कीं तो त्यांस आकाशलोकांत घेऊन सर्वकाळचें फळ द्यायास येतो. परंतु दुष्टांनी भ्यावें. कारण कीं ज्याला त्यांनीं धिक्कारिलें तोच न्यायाधीश असून त्यांस त्यांच्या पापाचें योग्य फळ भरून देईल. तें फळ त्यांच्याने चुकवणार नाहीं. प्रग. १:७. अहो पाप्यानो, ख्रीस्त तारायास तयार आहे इतक्यांत भिऊन त्याकडे शरण जा.

१—९ मार्क. ९:२—१०. लुक. ९:२८—३६. पाहा. "मग साहा दिवसांनंतर इ." ह्मणजे मागील अध्यायांत जें संभाषण वर्णिलें तें झाल्यानंतर. लूका. (९:२८.) तो दिवस व रूप पालटण्याचा दिवस धरून, सुमारें आठ दिवसांनी, असें ह्मणतो. मात्थी व मार्कस मधले सहा दिवस मोजतात असें दिसतें. "पेत्रस व याकोब. योहान्न." हे तिघे शिष्य गेथ्सेमाने बगामध्येंहि त्याबरोबर होते. मार्क. १४:३३. आपलें मोठें गौरव व आपलें दुःख सोसण्याची सहनशीलता हीं दाखवून त्यांस त्यांच्या कामासाठीं सिद्ध करावें असा ख्रीस्ताचा हेतु होता. "उंच डोंगरावर इ." तेथें प्रार्थना करण्यास गेला. लुका. ९:२८. ख्रीस्त बहुत वेळ प्रार्थना करीत असे. यासाठीं तो रानांत व डोंगरावर निवांत जागा निवडीत असे.

२ तेव्हां त्याचें रूप त्यांच्या देखतां पालटलें, आणि त्याचें तोंड सूर्यासारिखें तेजस्वी झालें, (१) आणि त्याचीं वस्त्रें उजेडासारिखीं पांढरीं झालीं.

३ तेव्हां पाहा, मोशे व एलीया हे त्यासीं संभाषण करितात असें त्यानी पाहिलें.

४ मग पेत्रस येशूला ह्मणाला, हे प्रभू, आह्मी एथें असावें हें बरें आहे; तुला बरें वाटलें तर आह्मी एथें तीन मंडप करूं, तुझ्यासाठीं एक व मोश्यासाठीं एक व एलीयासाठीं एक.

---

(१) प्रग. १:१६.

---

२ "त्याचें रूप. . .पालटलें इ." हा पालट वर्णिला आहे. त्याच्या तोंडावर सूर्यासारिखें विशेष तेज आलें; मोशे डोंगरावरून उतरला तेव्हां त्याच्या तोंडावर असें तेज दिसलें. निर्ग. ३४:२९,३०. २. त्याचीं वस्त्रें उजेडासारखीं किंवा बर्फासारखीं (मार्क) झालीं. मोश्याच्या तोंडाचें तेज मुखवस्त्राने झांकतां येई, असें होतें. पण ख्रीस्ताचें शरिर इतकें गौरवयुक्त होतें कीं त्याचीं वस्त्रेंहि प्रकाशलीं. देवपणाचें जें पूर्णपण ख्रीस्ताच्याठायीं शरिररूपें राहत होतें तें फार प्रकाशलें, असें कीं शिष्यांस त्याच्या देवपणाविषयीं प्रमाण पटलें, आणि मेलेल्यांतून उठल्यावर कसा गौरवयुक्त देह प्राप्त होईल याविषयीं कांहींसें प्रगट झालें.

३ "तेव्हां पाहा इ." मोशे हा नेमशास्त्र देणारा होता. तो पिस्गा नामें डोंगरावर मेला. अनु. ३४. एलीया हा नामांकित भविष्यवादी होता, आणि मरण पावल्यावांचून वर नेला गेला. २ राजे. २:११. तर जे मरून गेले होते त्यांतून पुनः उठण्याचें एक उदाहरण एथें आहे. आणि देहासुद्धां पार नेला होता असा एक येऊन त्यांस दिसला. "संभाषण करितात." कसें संभाषण झालें हें लूकाने कळविलें. लूक. ९:३१. ख्रीस्ताला कसें मरण सोसायाचें याविषयीं उद्धारलेल्या माणसाचें व दिव्य दूतांचें मन फार लागलें असेल. लूक (९:३२) ह्मणतो कीं, पेत्रस व त्याचे सोबती झोंपेने जड झाले होते. रात्र झाली असेल आणि प्रभु प्रार्थना करीत होता, तेव्हां त्याने शिष्यांस विसावा घेऊं दिल्हा असेल, आणि त्या मोठ्या तेजाने ते जागे झाले असतील, असें दिसतें.

४ "तीन मंडप इ." पेत्रस ती गोष्ट पाहून आनंद पावला आणि तेथें

५ तो बोलत असतां पाहा, तेजस्वी ढगानें त्यांवर सावली केली;
आणि पाहा, त्या ढगांतून असी वाणी (१) निघाली कीं, हा माझा
प्रिय पुत्र आहे, याविषयीं (२) मी संतुष्ट आहें, याचें तुह्मी ऐका. (३)
६ तेव्हां शिष्य हें ऐकून पालथे पडले व फार भ्याले.
७ परंतु येशूनें येऊन त्यांस हात लाविला (४) व ह्मटलें, उठा,
भिऊं नका.
८ तेव्हां त्यानी आपले डोळे वर करून कोणाला पाहिलें नाहीं,
येशूला मात्र पाहिलें.
९ नंतर ते डोंगरावरून उतरत असतां येशूनें त्यांस आज्ञा केली
कीं, मनुष्याचा पुत्र मेलेल्यांमधून उठेल तोंपर्यंत तुह्मी हा साक्षात्कार
कोणाला सांगूं नका.

(१) मात्थी ३:१७. मार्क. १:११. लुक ३:२२. २ पेत्र. २:१७. (२) यशा. ४२:१,२१. (३) अनु. १८:१५,१९. प्रेषि. ३:२२,२३. इब्री १:१-३. (४) दानी. १०:१०,१८. प्रग. १:१७.

राहावें हें त्याला बरें वाटलें. ते घाबरले, असें मार्कस (९:६.) ह्मणतो. ते भय, आश्चर्य आणि हर्षहि पावले.

५ "तेजस्वी ढगानें इ." ढग हें ईश्वर जवळ असण्याचें चिन्ह होतें. निर्ग. १४:१९,२०. २४:१५—१७. १ राजे. ८:१०,११. यहेज्क. १:४. १०:४. "हा माझा प्रिय पुत्र आहे." ही ईश्वराची वाणी होती आणि याप्रमाणें देवानें दुसऱ्या वेळेस अशा वाणीकडून ख्रीस्ताच्या देवपणाविषयीं साक्ष दिल्ही. मात्थी ३:१७. पाहा. शिष्यांची पूर्ण खातरी करून त्यांचा विश्वास बळवावा आणि त्यांस दुःख व निंदा सोसण्यास सिद्ध करावें असा देवाचा हेतु होता. ख्रीस्ताचें हें गौरव पाहिल्यावर व ही वाणी ऐकिल्यावर त्यानी त्याच्या देवपणाविषयीं संशय कसा धरावा? २ पेत्र. १:१७,१८.

६—८ "पालथे पडले इ." ढगानें त्यांस झांकलें, लूका. ९:३४. आणि ते फार भ्याले. जीवंत असून कोणी देवाला पाहूं शकत नाहीं. देवाचें जें गौरव येशू ख्रीस्ताच्या योगानें प्रकाशतें तें मात्र आह्मी देहांत पाहूं शकतों. २ करिं. ४:६.

९ "हा साक्षात्कार कोणाला सांगूं नका." हा खरा मशीहा आहे असा शिष्यानी दृढ विश्वास धरावा हा या साक्षात्कारांत विशेष अभिप्राय होता. यास्तव ख्रीस्त शिष्यांबरोबर राहत होता तोंपर्यंत सांगण्याचें अगत्य नव्हतें.

१० मग त्याच्या शिष्यानी त्याला पुसलें कीं, एलीया अगोदर आला पाहिजे, असें तर शास्त्री कां ह्मणतात ? (१)

११ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, एलीया अगोदर येतो खरें, आणि सर्व नीट करून ठेवील;

१२ परंतु मी तुह्मास सांगतों कीं, एलीया आलाच आहे, आणि लोकानी त्याला ओळखिलें नाहीं, परंतु त्यांस वाटलें त्याप्रमाणें त्याविषयीं केलें; तसें मनुष्याचा पुत्राहि यांकडून सोसणार आहे. (२)

१३ तेव्हां बाप्तिस्मा करणाऱ्या योहान्नाविषयीं तो आह्मास बोलतो, असें शिष्य समजले.

---

(१) मल. ४:५,६. मात्थी ११:१४. (२) मात्थी १६:२१.

---

ख्रीस्ताच्या देवपणाविषयीं त्या साक्षात्कारावरून उघड प्रमाण पटलें आणि त्याला सर्कारी नेमाप्रमाणें तीन साक्षी होते. तेव्हां सांगितलें असतें तर यहुद्यानी रागें भरून ख्रीस्ताचा जीव घेण्यास अधिक प्रयत्न केले असते आणि त्याचा समय तर अद्याप आला नव्हता. परंतु ख्रीस्त वधस्तंभीं दिल्यावर त्यानी सांगावा व साक्ष द्यावी असें होतें. ख्रीस्त जीव देणार व मेलेल्यांमधून उठणार हें शिष्यांस अद्याप समजलें नव्हतें असें दिसतें. (मार्क. ९:१०) ते त्या वेळेस समजण्यास मंद होते.

१०—१३ मार्क. ९:११–१३ पाहा. "एलीया अगोदर आला पाहिजे इ." ख्रीस्ताचें रूप पालटल्यावरून त्याच्या देवपणाविषयीं शिष्यांस पुरें प्रमाण पटलें असें दिसतें. परंतु एलीया अगोदर आला पाहिजे हें यहूदी लोकांचें मत त्यांचेंहि असेल आणि तें योहान्नाकडून खरें पटलें असें न समजतां तें मत खोटें असेल ह्मणून मनांत आणून त्याविषयीं ख्रीस्ताला विचारिलें.

११—१३ "एलीया अगोदर येतो खरें, इ." ख्रीस्त त्यांस समजावितो कीं तें मत बरोबर आहे आणि खरें पटलें आहे. बाप्तिस्मा करणारा योहान्न एलीयाच्या आत्म्यानें व सामर्थ्यानें आलाच आहे, ( लूक. १:१७ ) आणि त्यानें माझी वाट सिद्ध केली आहे. "लोकानी त्याला ओळखिलें नाहीं." योहान्नाच्या मागें बहुत समुदाय गेले. त्यानी त्याचा उपदेश ऐकिला, त्यापासून बाप्तिस्मा घेतला, आणि हा मशीहा आहे, असेंहि कित्येकांस वाटलें, परंतु यहुद्यानी त्याला अंगिकारलें नाहीं. ख्रीस्तानें त्यांस योहान्नाविषयीं समजाविलें. मग सुचविलें कीं, आपणाला त्यासारिखें सोसायाचें

१४ नंतर ते समुदायाजवळ आल्यावर, (१) कोणीएक माणूस त्याजवळ येऊन त्यापुढें गुडघे टेंकून बोलला,

१५ हे प्रभू, माझ्या पुत्रावर दया कर, कां कीं तो फेंपरेकरी आहे व फार पीडा पावतो; कारण कीं तो कधीं अग्नींत व कधीं पाण्यांत पडतो.

१६ आणि म्या त्याला तुझ्या शिष्यांजवळ आणिलें परंतु त्यांच्याने त्याला बरें करवेना.

---

(१) मार्क. ९:१४. इ. लूक ९:३७. इ.

---

आहे. आपण बहुत सोसावें व तुच्छ व्हावें असें त्याने सांगितलें. (मार्क. ९:१२.) हें भविष्यवचन यशा. ५३ यांत लिहिलें आहे, आणि ख्रीस्ताविषयीं बरोबरच पूर्ण झालें. लूक. २३:११ पाहा.

१४—२२. मार्क ९:१४—२९. लूक. ९:३७—४३. "नंतर ते समुदायाजवळ आल्यावर, इ." रूप पालटल्यावर दुसऱ्या दिवशीं हें झालें. (लूक. ९:३७.) या समुदायांतील बहुतेकांनी ख्रीस्तावर विश्वास ठेविला असेल, आणि संवाद करणारे असे कित्येक शास्त्रीहि होते. (मार्क. ९:१४.) ख्रीस्ताचा जन्म, वंश, चाल, बोध वगैरे हीं सर्व यहुद्यांस जसें वाटलें त्याच्या विपरीत होतीं, आणि यांविषयीं फारकरून संवाद करीत होते. यावरून हा खरा मशीहा आहे असें शास्त्री मानीनात; तथापि बहुत साधारण लोकांनी खातरी धरून त्याजवर विश्वास ठेविला. हे त्याला डोंगरावरून उतरतां पाहून शास्त्र्यांस सोडून भेटायास धांवले. (मार्क. ९:१५.) ख्रीस्ताने शास्त्र्यांस पाहून त्यांचें धोरण व युक्ति जाणून निषेधलें. (मार्क. ९:१६.)

१५ "माझ्या पुत्रावर दया कर इ." हा एकुलता एक पुत्र होता. (लूक. ९:३८.) त्याला भूत लागलें होतें, आणि केवळ ईश्वरी सामर्थ्यच काढूं शकतें असें भारी दुःख झालें असतां बापाने ख्रीस्ताचें साह्य मागावें हें योग्य होतें.

१६ "तुझ्या शिष्यांजवळ आणिलें इ." येशूच्या शिष्यांजवळ चमत्कार करण्याचें सामर्थ्य आहे असें त्याने ऐकिलें. "त्यांच्याने त्याला बरें करवेना." त्यांनी चमत्कार करायास प्रयत्न केले परंतु त्यांचे प्रयत्न निष्फळ झाले. मार्क. ९:३८ पाहा. याचें कारण पुढें सांगितलें आहे.

१७ तेव्हां येशूने उत्तर दिल्हें कीं, अहा ! अविश्वासी व विपरीत पिढी, मी कोठवर तुह्मांबरोबर राहूं ? कोठवर तुमचें सोसूं ? त्याला एथें मजकडे आणा.

१८ नंतर येशूने भुताला धमकाविलें; तेव्हां तें त्यांतून निघालें, आणि त्याच घटकेस तो मुलगा बरा झाला.

१९ नंतर शिष्य एकांतीं येशूजवळ येऊन ह्मणाले, आमच्याने त्याला कां काढवलें नाहीं ?

२० तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें कीं, तुमच्या अविश्वासामुळें; (१)कारण कीं मी तुह्मास खचीत सांगतों, मोहरीच्या दाण्याएवढा विश्वास तुह्मास असला (२) तर या डोंगराला, एथून तिकडे सर, असें तुह्मी ह्मटलें ह्मणजे तो सरेल; आणि तुमच्याने होणार नाहीं असें कांहीं नाहीं.

---

(१) इब्री ३:१९. (२) मात्थी २१:२१. मार्क. ११:२३. लुक १७:६. १ करिं. १३:२.

---

१७ "अविश्वासी व विपरीत पिढी." इ. विपरीत ह्मणजे ज्यांचें आचरण वाईट व मतें खोटीं ते. त्यांनी एवढे चमत्कार पाहिले असतांहि योग्य विश्वास धरला नाहीं. यामुळें ख्रीस्ताने त्यांचा हा कठीण निषेध केला. मार्क. (९:२०–२२) ह्मणतो कीं पुत्राला ख्रीस्ताजवळ आणिलें, तेव्हां भुतानें त्याला पिळून टाकिलें, आणि हें बाळपणापासून चालत आलें होतें. तर त्याची गोष्ट विशेष भारी व अवघड असें दिसतें. त्याचें बरें होणें हें ख्रीस्ताने त्याच्या बापाच्या विश्वासावर ठेविलें. (मार्क. ९:२३.) बापाला विश्वास असल्यावरून ख्रीस्ताने त्याच्या पुत्राला बरें करावें हें योग्य होतें. बापाला विश्वास होता, आणि ख्रीस्ताने तो वाढवावा, असी विनंती त्याने केली.

१८ "भुताला धमकाविलें." ह्मणजे त्या मुलाला पिळल्यामुळें भुताला निषेधलें आणि निघायास सांगितलें. जे शब्द ख्रीस्त बोलला ते मार्क. ९:२९ यांत पाहा. तेव्हां भूत मोठ्याने ओरडून आणि त्याला मेल्यासारिखें करून निघाला. मग ख्रीस्ताने पुत्राचा हात धरून त्याला उठविलें, (मार्क. ९:२७.) आणि बापाजवळ दिल्हें. (लुक. ९:४२.)

१९ "नंतर शिष्य इ." घरांत गेल्यावर शिष्यांनी हें विचारिलें. त्यांचा विश्वास कमी होता ह्मणून त्यांस तें भूत काढतां येईना.

२० "मोहरीच्या दाण्या एवढा." मात्थी. १३:३१,३२ यावरील व्याख्या पाहा. हा दाणा जरी बारीक तरी त्यापासून मोठें झाड येतें. ख्रीस्ताने शिकविलें कीं तसाच विश्वास दृढ व सफळ असावा, असा

२१ परंतु प्रार्थना व उपास यांवांचून असली जात निघत नाहीं.
२२ आणि ते गालीलांत (१) फिरत असतां येशू त्यांस ह्मणाला,
मनुष्याचा पुत्र लोकांच्या हातीं पडणार आहे;
२३ आणि ते त्याला जिवें मारितील, आणि तो तिसऱ्या दिवशीं
उठेल. तेव्हां ते फार खिन्न झाले.
२४ नंतर ते कपरणाहूमांत आल्यावर पट्टी घेणारे पेत्रसाकडे
येऊन बोलले, तुमचा गुरु पट्टी देतो कीं नाहीं?
२५ त्याने ह्मटलें, देतो. मग तो घरांत आल्यावर येशू त्याच्या
आगोदर बोलला, शिमोना, तुला कसें वाटतें? देशाचे राजे कोणापा-
सून जकात व पट्टी घेतात ? आपल्या पुत्रांपासून किंवा परक्यांपासून ?
२६ पेत्रस त्याला ह्मणाला; परक्यांपासून. येशूने त्याला ह्मटलें,
तर पुत्र मोकळे आहेत.

---

(१) मात्थी १६:२१. २०:१७. मार्क. ८:३१. ९:३०,३१. १०:३३.
लुक ९:२२,४४. १८:३१. २४:६,२६,४६.

---

कीं त्यापासून मोठा परिणाम व्हावा. खरा विश्वास किती समर्थ आहे, हें दाखविण्यासाठीं त्याने डोंगर इत्यादिकांस बोट लावून त्याला हलविण्यासारिखें सामर्थ्य विश्वासाने पडेल असें सांगितलें.

२१ "परंतु इ." हें बोलून ख्रीस्तानें त्यांस शिकविलें कीं, असे मोठे व अवघड चमत्कार करायास देवाजवळ प्रार्थना करून विश्वास बळावला पाहिजे.

२२,२३ मार्क. ९:३०,३२. लूक. ९:४३—४५. "ते त्याला जिवें मारितील." मात्थी. १२:४० पाहा. मार्कस व लूका ह्मणतात कीं, शिष्य ही गोष्ट समजले नाहींत, आणि त्याला विचारायास ते भ्याले. याचें कारण हेंच असेल कीं, त्याने असें क्रूर मरण सोसावें, यावरून ते खिन्न झाले. अणखी हा खरा मशीहा आहे तर तो मोठा राजा असून गादीवर बसेल आणि इस्राएलाकडे राज्य आणील असें वाटलें. प्रे. १:६. तो पराधीन होऊन मरण पावला तर आमची आशा बुडेल, असें वाटलें. तो खरा मशीहा असेल तर मरण कसें पावेल? असें मनांत आणून तो मेलेल्यांमधून उठला तोंपर्यंत ते ही गोष्ट बरोबर समजले नव्हते.

२४–२७ "नंतर ते इ." मात्थी. ३:१३. टीका पाहा. ही पट्टी सर्कारासाठीं नव्हे पण देवळाच्या सेवेसाठीं खुशीने देत असत. जें देणें तें सुमारें

२७ तथापि आह्मी त्यांस अडखळवूं नये, (१) ह्मणून तूं जाऊन समुद्रांत गळ टाक; आणि जो पहिला मासा वर येईल तो धर, मग त्याचें तोंड उघड, ह्मणजे तुला रुपया सांपडेल, तो घेऊन मजसाठीं व तुजसाठीं त्यांस दे.

(१) रोम. १४:२१. १५:१–३. २ करिं. ६:३.

१० आणे असें होतें. पट्टी घेणाऱ्यांसीं पेत्रसाचें संभाषण झालें, तेव्हा ख्रीस्त जवळ नव्हता, तथापि तें संभाषण त्याला कळलें यावरून तो सर्वज्ञ आहे असें त्याने दाखविलें. "परक्यांपासून." ह्मणजे जे आपल्या कुटुंबांतले नाहींत त्यांपासून. ख्रीस्ताचा अभिप्राय हाच कीं, राजे आपल्या पुत्रांपासून पट्टी घेत नाहींत. ही पट्टी देवळाची सेवा ह्मणजे माझ्या बापाची सेवा यासाठीं आहे. तर मी देवाचा पुत्र असता, मजपासून पट्टी घेऊं नये. " तथापि इ." आह्मी देवळांतली सेवा हलकी मोजतों असें त्यांस न वाटावें ह्मणून द्यावी हें बरें. "रुपया सांपडेल इ." पहिल्या माशाच्या तोंडांत रुपया होईल असें ख्रीस्ताला कळलें. तर तो सर्वज्ञ असें प्रमाण पटतें. जर त्याने तो रुपया तेव्हांच उत्पन्न केला तर तो सर्वसमर्थ असें पटतें. यांतून कोणतेंहि घेतलें तरी ख्रीस्ताच्या देवपणाविषयीं प्रमाण पटतें.

सूचना. १ एकांतीं देवाची प्रार्थना करण्याचें अगत्य आहे. जर हें अगत्य ख्रीस्ताला होतें, तर पापी माणसाला किती विशेषेंकरून असावें ? रोज रोज देवासीं एकांतीं संभाषण करायास प्रत्येक माणसाला जागा पाहिजे. प्रार्थना करून विशेष आशीर्वाद प्राप्त होत असतो. ख्रीस्ताला अश्या वेळेस विशेष ईश्वरी अनुग्रह मिळत असे. अश्या प्रसंगीं त्याचें रूप पालटलें, आणि त्याचें गौरव पृथ्वीवर प्रकाशलें. तसेंच एकांतीं प्रार्थना करून आह्मास देवाची उत्कृष्ट प्रीति व गौरव प्रगट होतात. २ ख्रीस्ताचें गौरव केवढें हें आह्मास बरोबर समजत नाहीं. त्याचें रूप पालटलें तेव्हां मोशे व एलीया यानी त्याला कसें मानिलें, आणि देवाने कसा मान दिल्हा, हें दिसून येतें. परंतु उद्धारलेलीं माणसें व दिव्य दूत हीं सर्व मिळून त्याला मान देतील तेव्हां त्याचें अनंत गौरव दिसून येईल. तेव्हां ख्रीस्ताविषयीं कोणीहि लाजणार नाहीं. ३ ख्रीस्ताचें मरण याविषयीं उद्धारलेले मोठी आस्था धरितात. मोशे व एलीया यानी याविषयीं संभाषण केलें. लुक ९:३१. दुतानी ती गोष्ट समजायास इच्छिलें. १ पेत्र१:१२. त्या मरणाकडून तारण होतें, आणि देवाची उत्कृष्ट प्रीति व न्याय दूतांस व सर्व सृष्टीस दिसून येतात.

## अध्याय १८.

१ त्या वेळेस (१) शिष्य येशूकडे येऊन ह्मणाले, आकाशाच्या रा-
ज्यांत मोठा कोण ?

---

(१) मार्क. ९:३३. इ. लूक. ९:४६, इ. २२:२४. इ.

---

४ जेथें ईश्वर आपलें गौरव प्रगट करीत असतो, तेथें असणें ख्रिस्ती लोकांस गोड वाटावें. ओ. ४. पेत्रसाच्या भावना योग्य होत्या. जेथें ख्रीस्त आपल्या लोकांस भेटून विशेष आशीर्वाद देतो, तें प्रार्थनेचें स्थान मोलवान असें मोजावें. ५ ख्रीस्त आह्माबरोबर आहे ह्मणून भय धरण्याचें कारण नाहीं. ख्रीस्त नाहीं तर वास्तविक भय आहे. ख्रीस्तावांचून देव भस्म करणारा अग्नि असा आहे. इब्री. १२:२९. परंतु येशू आमचा मित्र असतांना आह्मी हर्षानें मरून त्याजकडे हिशोब देण्यास जावें आणि त्याच्या गौरवाच्या तेजामध्यें सर्वकाळ राहावें. ६ देवाचे खरे भक्त मरते वेळेस सुखांत जातात. ओ. ३. मोशे व एलीया तेव्हां नवे उत्पन्न झाले असें नाहीं. तर ते सौख्य लोकांत असून तेथून आले आणि फिरून तेथें परत गेले. माणसें मरण पावल्यावर सुखांत किंवा दुःखांत जाऊन राहतात. ७ जे उद्धार पावून सौख्य लोकांत राहिले आहेत त्यांस इहलोकीं काय घडतें तें कळत असतें असें समजायाला आधार आहे. ख्रीस्त यरूशालेमास जीव देणार हें मोशे व एलीया यांस ठाऊक होतें. ८ आईबापानीं आपल्या लेंकरांसाठीं प्रार्थना करावी. ओ. १५. आतां असे चमत्कार घडत नाहींत, परंतु उपाय देवाच्या आशीर्वादाकडूनच सफळ होतात. तर रोगी लेंकरें व मित्र यांस देवानें बरें करावें, ह्मणून त्यापाशीं प्रार्थना करावी, हें योग्य आहे. या मुलाचें रक्षण बापाच्या विश्वासामुळें झालें. तसें आता जर आईबाप विश्वास धरून लेंकरांस बोध देतात, व शुद्ध कित्ता दाखवितात, आणि त्यांसाठीं प्रार्थना करितात, तर येणेंकडून बहुदां लेंकरांच्या जीवात्म्याचें तारण होतें. आह्मी विश्वास धरावा, असें देवानें सांगितलें आहे, आणि मागितलें तर तो आमचा विश्वास वाढवायास तयार आहे. ९ ख्रीस्ताच्या मरणावरून खिन्न असावें, हें योग्य आहे. ओ. २३. पण आमच्या पापामुळें त्याला मरण सोसावें लागलें यावरून विशेष शोक करावा. तथापि तो आपला जीव देऊन आह्मास खंडून घ्यायास मान्य झाला, आणि मरण सोसून त्यानें मेलेल्यांमधून उठून जीवन व अमरत्व प्रगट केलें आहे, यावरून आह्मी आनंदहि करावा.

१—६ मार्क ९:३३—३१ लू. ९:४६—५० पाहा. "आकाशाच्या रा-

२ तेव्हां येशूनें एक बाळक बोलावून त्याला त्यांच्यामध्यें ठेविलें, आणि ह्मटलें कीं,

३ मी तुह्मास खचीत सांगतों, जर तुह्मी पालटून (१) बालकांसारिखे (२) होणार नाहीं तर तुह्मी आकाशाच्या राज्यांत जाणारच नाहीं.

४ यास्तव जो कोणी आपणाला या बाळकासारिखा लीन करितो (३) तोच आकाशाच्या राज्यांत मोठा होय.

५ आणि कोणी माझ्या नामानें अशा बाळकाला अंगीकारिलें (४) तर तो मला अंगीकारितो.

६ परंतु हे लहान मजवर विश्वास ठेवणारे यांतील एकाला जो

(१) गीत ५१: १०-१३. योह. ३:३. (२) १करिं. १४:२०. १पेत्र. २:२. (३) लुक. १४:११. याक. ४:१०. (४) मात्थी. २०:४२.

ज्यांत मोठा कोण." यहूदी लोकांच्या मताप्रमाणें ख्रीस्त गादीवर बसून मोठें ऐहिक राज्य स्थापणार आहे, असें शिष्यांस वाटलें. त्यांत दिवाण वगैरे मोठमोठे हुद्देदार होतील असें वाटलें, ह्मणून ते मोठी आशा धरीत असत. ते याविषयीं वारंवार विचारीत आणि विवाद करीत. (मार्क. ९:३४) यावरून दिसतें कीं, ख्रीस्ताचें राज्य कसें हें त्यांस समजलें नाहीं आणि त्यांचें अंतःकरण देवाच्या दिसण्यांत नीट नव्हतें.

२,३ "जर तुह्मी पालटून इ०" जर तुह्मी मजविषयीं व माझ्या राज्याविषयीं आपलीं मतें बदलून आणि गर्व व ऐहिक लाभाची आशा सोडून बालकासारिखें होत नाहीं तर माझ्या राज्यांतली कांहीं जागा तुह्मास मिळणार नाहीं. पहिला व्हावा असें जर कोणाच्या मनांत असेल तर त्यानें सर्वांच्या शेवटलें व सर्वांचा चाकर व्हावें. मार्क. ९:३५. ह्मणजे जो सर्वांहून नम्र व लीन आहे तो उत्तम ख्रिस्ती भक्त होईल. जो गर्विष्ठ तो नीच असा आहे.

"आणि कोणी माझ्या नामानें इ०" ह्मणजे अमुक मनुष्य माझा शिष्य व खरा ख्रिस्ती आहे यामुळें कोणी त्याला अंगीकारिलें, तर तो मजवरहि प्रीति दाखवितो. अंगीकारिलें ह्मणजे हा ख्रिस्ती भाऊ आहे असें पाहून त्याजवर प्रीति केली, आणि पाहिजे तर त्याची गरज पुरविली. मात्थी. २५:३५—४० पाहा. (मार्क ९:३८. व लूका ९:४९.)

६ "जो कोणी अडखळवील, इ०" ह्मणजे पापांत पाडील, अथवा कसें करून त्याच्या सद्गुणांच्या वृद्धीला अडथळा घालील. "जात्याची तळी, इ०"

कोणी अडखळवील, (१) त्याच्या गळ्यांत जात्याची तळी बांधून त्याला समुद्राच्या खोल पाण्यांत बुडवावें हें बरें आहे.

७ अडखळ्यांमुळें जगाला हाय हाय, कारण कीं (२) अडखळे होण्याचें अगत्य आहे, परंतु ज्या माणसाकडून अडखळा होईल त्याला हाय हाय. (३)

८ आणि तुझ्या हाताने किंवा तुझ्या पायानें (४) तुला अडखळविलें तर तो तोडून आपल्यापासून टाक; दोन हात किंवा पाय असून सर्वकाळच्या अग्नींत पडावें यापेक्षां लंगडें किंवा व्यंग होऊन जीवनांत जावें हें तुला बरें आहे.

९ आणि तुझ्या डोळ्याने तुला अडखळविलें तर तो उपटून आपल्यापासून टाक; दोन डोळे असून नरकाग्नींत (५) पडावें यापेक्षां एक डोळा असून जीवनांत (६) जावें हें तुला बरें आहे.

---

(१) मार्क ९:४२. लूक १७:१,२. (२) १ करिं. ११.१९. यहूदा. ४. (३) यहूदा ११. (४) मात्थी. ५:२९,३०. मार्क. ९:४३,४५. (५) लूक. १२:२५. (६) इब्री. ४:११.

---

ग्रीक, रोमी वगैरे कित्येक लोकांमध्यें ही अपराध्यांस एका प्रकारची शिक्षा होती. अर्थ हाच कीं, ख्रिस्त्यांस तारण पावण्याविषयीं अडखळविणें हा मोठा अपराध आहे. सांगितलेली शिक्षा तिजपेक्षां फार कठीण दंड अशा अपराध्यास ईश्वर ठरवील.

७ "अडखळ्यांमुळें जगाला हाय हाय." माणसें इतकीं भ्रष्ट आहेत कीं, पाप मोह वगैरे अडखळे येतीलच, परंतु ज्यांकडून येतात त्यांचा दोष मोठा आहे. दुसऱ्याचें मत अशुद्ध करून त्याच्या आत्म्याचा नाश करावा, यापेक्षां दुसरी मोठी दुष्टता नाहीं. तरी पाठलाग, धमकाविणें, इत्यादि युक्तिकरून ख्रिस्ती लोकांस विश्वासापासून हटवायास पापांत पाडायास जे कोणी प्रयत्न करितात असे बहुतेक पहिल्यापासून आहेतच.

८,९ "आणि तुझ्या हाताने इ०" मात्थी. ५:२९,३० यावरील टीका पाहा. या सर्वांचा अभिप्राय हाच कीं, पाप मोह, संबंध, सोबती, उद्योग इत्यादि ज्या गोष्टी पापाकडे ओढितात त्या सर्व सोडल्या पाहिजेत, नाहीं तर जीवात्म्याची हानि होईल. मेलेल्यांमधून पुनः उठल्यावर शरीर व्यंग होईल, असा अर्थ नाहीं. तेव्हां तें पूर्ण होईल. १ करिं. १५:४२—४४. परंतु आपलें एक अंग गमवावें हें जरी दुःखकारक आहे, तरी जीव गमविण्या-

१० संभाळा, या लहानांतील एकाचाहि धिक्कार करूं नका, कारण मी तुह्मास सांगतों कीं, आकाशांत त्यांचे दूत (१) माझ्या आकाशांतील बापाचें तोंड निरंतर पाहातात. (२)

११ आणखी जें हरपलेलें त्याला तारायास (३) मनुष्याचा पुत्र आला आहे.

१२ तुह्मास कसें वाटतें? कोणीएका माणसाला (४) शंभर मेंढरें असलीं त्यांतून एखादें भटकलें, तर तीं नव्याण्णव सोडून तो डोंगरावर जाऊन भटकलेल्याला हुडकील कीं नाहीं?

१३ आणि तें त्याला सांपडलें तर मी तुह्मास खचीत सांगतों कीं, जीं नव्याण्णव भटकलीं नाहींत त्यांपेक्षां तो त्यावरून अधिक आनंद पावतो.

१४ तसें या लहानांतील एकाचा (५) नाश व्हावा, असी तुमच्या आकाशांतील बापाची इच्छा नाहीं.

---

(१) प्रेषि. १२:१५. (२) गीत. १७:१५. (३) मात्थी. १:२१. लुक. ९:५६.१९:१०. योह. ३:१७.१०:१०.१२:४७. १तीम.१:१५. (४) लुक. १५:४. इ. (५)२पेत्र.३:९.

---

पेक्षां बरें आहे. तसेंच जें ऐहिक सुख सर्वांहून आवडतें आहे तें जर पापाकडे ओढितें तर तें नाकारावें. हें आत्महानि सोसण्यापेक्षां बरें आहे. नरक आहे, आणि त्यांत दुष्ट लोक सर्वकाळचें शासन पावतील, असें खीस्तानें शिकविलें. मार्क. ९:४४,४६,४८.

१० "संभाळा इ०" ईश्वर आपल्या लेंकराचा संभाळ प्रीतीनें करितो. तर माणसानीं त्यास धिक्कारूं नये. "त्यांचे दूत." यावरून प्रत्येक खिस्ती मनुष्याला दूत आहेत असें कित्येकांस वाटतें. पवित्र दूत खिस्त्याचें सहाय करितात, असें दिसतें. इब्री. १:१४. "बापाचें तोंड पाहतात." राजाच्या समक्ष राहावें यांत मोठा मान. १ राजे. १०:८ एस्तेर. १:१४.

११ "जें हरपलेलें इ०" सर्व माणसें भ्रष्ट व देवापासून भटकून गेलेलीं असीं आहेत. त्यांस खंडून तारावें, ह्मणून खीस्तानें येऊन आपला जीव दिल्हा. हें गौरवयुक्त शुभवर्त्तमान आहे. अरे पाप्या, खीस्ताकडे शरण जा ह्मणजे तुजसाठीं आशा आहे.

१२—१४ देवाच्या भक्तास धिक्कारण्याचा दोष व भय केवढें हें दाख-

१५ आणि तुझ्या भावाने (१) तुझा अन्याय केला तर जा, आणि तूं व तो एकांतीं असतां त्याचा दोष त्याला सांग; त्याने तुझें ऐकिलें (२) तर त्वां आपल्या भावाला आपलेंसें केलें.

१६ परंतु त्याने न ऐकिलें, तर तूं अगखी एका दोघांस आपल्या बरोबर घे; दोन किंवा तीन (३) साक्ष्यांच्या तोंडाने प्रत्येक गोष्ट ठरावी ह्मणून.

१७ आणि त्याने त्यांचें न ऐकिलें तर मंडळीला कळीव, आणि त्याने मंडळीचेंहि न ऐकिलें तर (४) मूर्तिपूजक किंवा जकातदार यांसारिखें त्याला मान.

---

(१) लेवी १९:१७. लुक. १७:३. (३) अनु. १९:१५.
(२) याक. ५:२०. (४) रोम. १६:१७. १ करिं. ५:३–५. २ थेस. ३:६.१४.

---

विण्यास ख्रीस्ताने हा दाखला सांगितला. भटकलेलें मेंढरूं सांपडल्यावरून जसा मेंढक्यास आनंद होतो, तसेंच जेव्हां एक पापी पश्चात्ताप करून देवाकडे परत येतो तेव्हां आनंद होतो. जर ईश्वर आपल्या लोकांवर असी प्रीति व आनंद करितो तर माणसाने त्यांस धिक्कारूं नये.

१५— २० "आणि तुझ्या भावाने इ०" ह्मणजे ख्रिस्ती भाऊ. जे तारण पावणारे ते एका कुटुंबांतले आहेत. त्यांस एक बाप व एक तारणारा व एकच आशा आहे, ह्मणून त्यांस भाऊ असें ह्मटलें आहे. "तर जा," लेवी. १९:१७ पाहा. जाऊन एकांतीं त्यासीं बोला. असें करण्याचें कारण (१) याने समजून घ्यावें ह्मणून. असें केलें तर बहुदां सर्व गैरसमजूत जाऊन समेट होईल. (२) त्याला कबूल करण्याचा व उतराई करण्याचा प्रसंग व्हावा ह्मणून. लोकांस त्यांचा अन्याय प्रसिद्धीस न आणितां, असा प्रसंग दिल्हा तर त्यांला बहुदां कबूल करण्यास हर्ष वाटेल. (३) तो अन्याय प्रसिद्धीस आणला असतां, फारकरून ख्रिस्ती धर्माला व मंडळीला बट्टा लागतो व शत्रु हर्ष करून निंदा करितात.

१६ "परंतु त्याने न ऐकिलें, इ." जर तो धिक्कारून सुधारत नाहीं तर मंडळींतले जे वजनदार किंवा अधिकारी असतील त्यांस घेऊन त्याकडे जा. कदाचित तो त्यांचें ऐकेल, नाहीं तर त्याची हट्टबुद्धि व अपराध यांविषयीं साक्ष होईल.

१७ "मंडळीला कळीव इ०" मात्थी. १६:१८ टीका पाहा. सर्व मंडळीने त्यास बोध, निषेध व विनंती करून, जर होईल तर सुधारावें, ह्म-

१८ मी तुह्मास खचींत सांगतों कीं, (१) जें कांहीं तुह्मी पृथ्वीवर बंद कराल, तें आकाशामध्यें बंद होईल; आणि जें कांहीं तुह्मी पृथ्वीवर मोकळें कराल, तें आकाशामध्यें मोकळें होईल.

१९ अणखी तुह्मास सांगतों कीं, पृथ्वीवर तुह्मामधील दोघानी कांहींएका गोष्टीविषयीं एकमताचें होऊन ती मागितली, तर ती माझ्या आकाशांतील बापाकडून त्यांच्यासाठीं घडेल. (२)

२० कारण कीं जेथें दोघे तिघे माझ्या नामानें (३) जमले आहेत तेथें त्यांच्यामध्यें मी आहें.

---

(१) मात्थ. १६:१९. योह. २०:२३. प्रेषि. १५:२३–३१. २करिं. २:१०.
(२) मार्क. ११:२४. योह. १६:२४. १ योह. ५:१४. (३) योह. २०:११. १ करिं. ५:४.

---

णून हा उपाय करायाचा आहे. हीं सर्व करण्याचा हेतु हाच कीं, ज्या भावानें अन्याय केला, त्याला सुधारावें.

"आणि त्यानें मंडळीचेंहि न ऐकिलें. इ." तर हा हट्टी दुराचारी व दोषी आहे, असें मानून त्यासीं खिस्ती संबंध ठेवूं नये. जर रोगी अथवा संकटांत पडला तर त्यावर दया व साह्य करूं नये, असें नाहीं, पण खिस्ती भावाप्रमाणें मोजूं नये. असा ठराव करण्यापूर्वीं त्याला सुधारण्यास सदरहू तीन उपाय केले पाहिजेत. ख्रीस्तानें जो नेम एथें स्थापिला तो मंडळी शांत व शुद्ध राखण्यास अगत्याचा उपाय आहे.

१८ "जें कांहीं तुह्मी पृथ्वीवर बंद कराल इ." मात्थी. १६:१९ टीका पाहा. ख्रीस्त हे शब्द पेत्रसास बोलला होता, परंतु एथें सर्व प्रेषितांस बोलला. तर त्यानें पेत्रसाला कांहीं विशेष अधिकार दिल्हा नाहीं, पण सर्व प्रेषितांस सारिखाच अधिकार दिल्हा. या ओवीचा अर्थ हाच कीं, मंडळींतल्यांस शिक्षा करण्याविषयीं जें प्रेषितानीं ठरविलें तें ईश्वर पसंत करील.

१९ "अणखी तुह्मास सांगतों इ०" मंडळींतील स्थापना, नेम व शिक्षा हीं ख्रीस्तानें सर्व शिष्यांस सोपून दिल्हीं होतीं. परंतु त्यांत तो ह्मणतो कीं, दोघानी कांहीं गोष्टींविषयीं एकमत धरून देवाचें साह्य मागितलें तर मिळेल. प्रेषि. १:१४—२६. १९:१—२.९

२० "माझ्या नामानें इ०" माझ्या अधिकारानें व मजसाठीं मंडळींत काम करितांना. योह. १०:२५. १६:२३. "त्यांच्यामध्यें मी आहें." असें बोलून मी सर्वत्र सर्व ठिकाणीं असण्यास समर्थ आहें, असें ख्रीस्तानें दाखविलें. दर दिवसीं, होय, दर घटकेस देशोदेशीं फारकरून पृथ्वींतील सर्व प्रांतांत खिस्ती जमून

२१ तेव्हां पेत्रस त्याजवळ येऊन ह्मणाला, हे प्रभू, माझ्या भावाने माझा अन्याय किती वेळां केला असतां मी त्याला क्षमा करूं ? (१) सात वेळां काय ?

२२ येशूने त्याला म्हटलें, सात वेळां असें मी तुला ह्मणत नाहीं, तर सातांच्या सत्तर वेळां.

२३ यास्तव आकाशाचें राज्य कोणी एका राजासारिखें आहे, त्याला आपल्या चाकरांचा हिशोब (२) घ्यावा असें वाटलें.

२४ आणि तो घेऊं लागल्यावर एक कोटि रुपयांच्या देणेदाराला त्याकडे आणिलें.

---

(१) मार्क. ११:२५. लूक १७:४. कल. ३:१३. (२) रोम. १४:१२.

---

प्रार्थना करीत आहेत, आणि त्या सर्वांमध्यें ख्रीस्त आहे. वेगवेगळ्या ठिकाणीं लक्षावधि लोक त्याच्या नांवाने प्रार्थना करितात आणि या वचनाप्रमाणें फळ पावतात.जर ख्रीस्त देव नाहीं तर त्याने या सर्व ठिकाणीं एक वेळेस असावें, हें कसें साध्य होतें?

२१,२२ "तेव्हां पेत्रस, इ०" समेटाने मिळून क्षमा करावी, असें ख्रीस्ताने शिकविलें होतें. (ओ. १५.) यावरून पेत्रसाने विचारिलें, किती वेळां क्षमा करावी? तीन वेळां करावी पण चवथे वेळेस करूं नये, असें यहुदी शिकवीत असत. सात वेळां केली ह्मणजे फार असें पेत्रसाला वाटलें. परंतु ख्रीस्ताने शिकविलें कीं, सातांच्या सत्तर वेळां, ह्मणजे तो पश्चात्ताप करून क्षमा मागेल, तितकेदां क्षमा केली पाहिजे. क्षमा मागणें हा त्याचा धर्म आहे; त्याने मागितलें नाहीं तर आह्मी सूड उगविण्यास व द्वेष करण्यास मोकळे आहों, असें नाहीं. जरी क्षमा करण्याचा प्रसंग मिळत नाहीं तरी आह्मी कृपाळूपणाने वागून त्याचें हित पाहावें.

२३ "यास्तव आकाशाचें राज्य इ०" ह्मणजे ख्रिस्ती मंडळी. कोणी राजा आपल्या चाकरांसीं जसा वागला, तसा ईश्वर आपल्या लोकांसीं करील. क्षमा करणें हा विशेष धर्म आहे, हें दाखविण्यासाठीं ख्रीस्ताने हा दाखला सांगितला.

२४ "एक कोटि रुपयांच्या इ०" दाहा हजार तालंट असे मूळ शब्द आहेत. तालंट ह्मणजे रुप्याचे किंवा सोन्याचे तीन हजार शेकल. रुप्याच्या शेकलाचें मोल सुमारें एक रुपया. रुप्याच्या तालंटाचें मोल तर सुमारें तीन हजार रुपये, असें होतें. सोन्याच्या तालंटाचें मोल सुमारें ४८६१९६

२५ परंतु फेडायास त्यांजवळ कांहीं नसतां, त्याच्या धन्याने आज्ञा दिल्ही कीं, त्याला व त्याच्या बायकोला व लेंकरांस व त्याचें कांहीं असेल तें विकून (१) कर्ज फेडून घ्यावें.

२६ त्यावर त्या चाकराने त्याच्या पायां पडून मागितलें, महाराज, मला वागवून घे, ह्मणजे मी तुझें सर्व फेडीन.

२७ तेव्हां त्या चाकराच्या धन्याला कळवळा (२) आला आणि त्याने त्याला मोकळें केलें, व त्याला तें कर्ज सोडिलें.

२८ परंतु तोच चाकर बाहेर गेल्यावर त्याचा एक सोबती चाकर ज्यावर पंचवीस रुपये घेणें होतें तो अढळला, तेव्हां तो त्याला धरून नरडी आवळून बोलला, तुजवर माझें घेणें आहे तें फेडून टाक.

२९ त्यावरून त्याचा सोबती चाकर त्याच्या पायां पडून त्याला विनंती करून ह्मणाला, (३) मला वागवून घे, ह्मणजे मी तुझें सर्व फेडीन.

(१) २ राजे. ४:१. यशा. ५०:१. (२) गीत. ७८:३८. (३) मात्थ. १८:२६.

रुपये, असें होतें. भारी कर्ज होतें असें दाखविलें. तसेंच माणसाचीं पापें असंख्यात व भारी आहेत, आणि त्यांच्या बदल देण्यास कांहींच पुण्य नाहीं आणि प्रायश्चित्त करण्यास पाप्यांला कांहीं सामर्थ्य नाहीं.

२५ "तें विकून इ०" हें यहूदी नेमशास्त्राप्रमाणें योग्य होतें. २ राजे. ४: १ लेवी २५:३९—४६ आम. ८:६.

२६,२७ चाकराने दया व अवकाश मागितला, ह्मणून धन्याने दया करून त्याला कर्ज सोडिलें, तसें सर्व माणसें देवाच्या आज्ञा मोडून फार ऋणी झालीं. त्यांच्या पापांबदल त्यांच्याने कांहीं फेडवत नाहीं. त्यांच्या पापाबदल सर्वकाळचें मरण हा योग्य दंड आहे. तीं अगदीं लाचार व निरुपायी आहेत. असें असतांहि जर पश्चात्ताप करून ख्रीस्ताच्या नांवाने क्षमा मागतील तर देव दया व क्षमा करायास तयार आहे.

२८,२९ "पंचवीस रुपये." त्याचें जें कर्ज धन्याने सोडिलें त्यापुढें हें कर्ज अगदीं हलकें होतें. देवाविरुद्ध जें आमचें पाप त्यापुढें सोबती लोक आमचे जे अन्याय करितात ते फार हलके आहेत. देवाने आमचें भारी

३० पण तो ऐकेना; तर जाऊन तो तें कर्ज फेडी तोंपर्यंत त्याने त्याला बंदीशाळेंत घातलें.

३१ तेव्हां झालेल्या गोष्टी पाहून त्याचे सोबती चाकर फार खिन्न झाले, आणि त्यानी येऊन सर्व वर्तमान आपल्या धन्याला उघड सांगितलें.

३२ तेव्हां त्याच्या धन्याने त्याला बोलावून ह्मटलें, अरे वाईट चाकर, (१) त्वां मला विनंती केली ह्मणून म्या तें सर्व कर्ज तुला सोडिलें.

३३ जसी म्या तुजवर दया केली तसी तूंही आपल्या सोबती चाकरावर दया करायाची नव्हती काय ?

३४ तेव्हां त्याच्या धन्याने त्यावर रागें भरून, तो आपलें सर्व देणें फेडी तोंपर्यंत त्याला दंड करणाऱ्याच्या हातीं दिल्हें.

३५ तसें (२) माझा आकाशातील बापहि तुह्माविषयीं करील, जर तुह्मी आपल्या अंःकरणापासून आपल्या भावांच्या अपराधांची क्षमा करणार नाहीं, तर.

---

(१) लूक. १९:२२. (२) नीति. २१:१३. माथ. ६:१२. याक. २:१३.

---

कर्ज सोडिलें असतां आह्मी किती विशेषेंकरून एकमेकांचे व खिस्ती भावांचे अन्याय सोडावे ?

"पण तो ऐकेना." जे दया कारितात त्यांजवर ईश्वर दया करील. जर आह्मी ईश्वरी दयेची आशा धरितों तर आह्मी आपल्या सोबत्यांवर दया करावी.

३१—३५ अक्षमी स्वभावाचें पाप व दोष हीं या दाखल्यावरून स्पष्ट दाखविलीं आहेत. धनी त्यावर रागें भरला हें योग्य असें सर्वांस वाटलें. तसेंच ईश्वर पाप्यांस दंड लावील तेव्हां त्याचा न्याय व पाप्यांचा दोष हीं सृष्टीपुढें उघड होतील.

## तात्पर्य.

१ आमचीं पापें असंख्य व भारी आहेत. २ आह्मी पश्चात्ताप करून व विश्वास धरून क्षमा मागितली तर ईश्वर खीस्ताकरितां फुकट करितो. ३

ख्रिस्ती भाऊ आमचे जे अन्याय करितात ते हलके आहेत. ४ तर त्यांची क्षमा आह्मी खुशीने करावी. ५ जर असें करीत नाहीं तर ईश्वर आह्मावर रागें भरून शिक्षा करीलच.

**सूचना** १ ख्रिस्ती कधीं कधीं महत्वेछु आहेत. ओ. १. ख्रीस्ताला अनुसरलें असतां मान व हुद्दे मिळतील असें पहिल्याने शिष्यांस वाटलें, आणि तेव्हांपासूनहि ज्यांनी ऐहिक लाभ पाहून आपणास ख्रिस्ती ह्मणविलें, असे हजारों आहेत. शिष्य अज्ञानी होते, आणि हा ऐहिक राज्य स्थापणार आहे, असें त्यांस वाटत होतें. आह्मास माहीत आहे कीं, ख्रीस्ताचें राज्य या जगाचें नव्हे, ह्मणून ऐहिक लाभ पाहून त्याला अनुसरलें तर दोष व दंड भयंकर होईल. २ जो कोणी लीन नाहीं, तो ख्रिस्ती नाहींच. ओ. २. नम्रता हा आवडता गुण आहे. ती हलकेपणा नाहीं, ती भितरेपणा नाहीं. आपण वास्तविक आहों तसें मोजणें, आणि आमच्या वास्तविक गुणांप्रमाणें देवाने व सर्व माणसानी आह्मास मोजावें ह्मणून मान्य होणें, ही नम्रता आहे. गर्व हा किती मूर्ख व दुष्ट आहे. आपण इतर माणसांपेक्षां चांगले व थोर असें मानून थोरपण मिरवावें हें दुष्टपण व ढोंग आहे. नम्रता हें खऱ्या ख्रिस्ती असण्याचें चांगलें प्रमाण आहे. जो सर्वांहून नम्र तो आकाशाच्या राज्यांतला सर्वांहून थोर आहे. ३ खऱ्या ख्रिस्त्यांस धिःकारण्याने किंवा अपाय करण्याने भय व दोष दिसून येतात. कोणी ख्रिस्ती कितीहि लहान असला तरी ईश्वर त्यावर प्रीति करितो व त्याचा संभाळ करील. जो त्याचे अन्याय करायास पाहतो तो देवाचाहि अन्याय करायास पाहतो. ४ माणसानी दुसऱ्यांस पाप मोह न घालावे ह्मणून फार जपावें. ओ. ७. ईश्वर या पापाबदल भारी शिक्षा करील. ५ आह्मी सर्वांहून आवडतीं पापें सोडलीं पाहिजेत, नाहीं तर सर्वकाळच्या अग्नींत जावें लागेल, (ओ. ८,९.) यांत संशय नाहीं. दयाळू तारणारा असें बोलला, आणि त्याचें प्रत्येक वचन पूर्ण होईल. ६ ख्रिस्ती निर्भय आहेत. ओ. १०–१४. दिव्य दूत हे त्यांस मित्र व संभाळणारे असे आहेत. त्यांस तारायास ख्रीस्त आला. त्यांच्या तारणाविषयीं ईश्वर आनंद करितो, तर त्यांस त्यांच्या हातांतून कोणी हिसकून घेणार नाहीं. योह. १०:२७,२८. ७ जेव्हां ख्रिस्ती भाऊ आमचा अन्याय करितो, तेव्हां त्यास सांगणें हा आमचा धर्म होय. ओ. १६. त्याला सांगतो तोंपर्यंत दुसऱ्या कोणास सांगूं नये. ओ. १५—१७. यांत ख्रीस्ताने जो नेम दिल्हा आहे तो कधीं बदलायाचा नाहीं. भावाची क्षमा करण्यांत दमूं नये. ओ. २२. हमेश हर्षाने करावी, हा आमचा धर्म असें केवळ नव्हे, तर यांत आमचेंहि हित आहे. ओ. २४ ईश्वर सूड उगविणारा आहे, आणि जर आह्मी क्षमा करीत नाहीं तर योग्य समयीं आमची

## अध्याय १९.

१ आणि असें झालें कीं, येशूने या गोष्टी संपविल्यावर तो गालीलाहून (१) निघून यार्देनेच्या पलिकडे यहूद्यांच्या प्रांतांत गेला.

२ तेव्हां बहुत समुदाय त्याच्या मागें चालले, आणि त्याने त्यांस तेथें बरें केलें.

३ नंतर परोशी त्याजकडे येऊन त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्याला ह्मणाले, पुरुषाने आपल्या बायकोला कोणत्याहि कारणावरून टाकावें हें त्याला योग्य आहे काय ?

४ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुह्मी वाचिलें नाहीं काय ? कीं ज्याने प्रारंभीं मनुष्यांस उत्पन्न केलें, (२) त्याने पुरुष व स्त्री असीं तीं उत्पन्न केलीं.

५ आणि ह्मटलें, याकरितां (३) पुरुष आईबापांस सोडून आपल्या बायकोसीं जडून राहील, आणि तीं दोघें एक शरीर होतील.

६ ह्मणून तीं पुढें दोन नव्हत, तर एक शरीर आहेत; याकरितां देवाने जें (४) जोडिलें आहे तें माणसाने तोडूं नये.

(१) मार्क. १०:१. योह. १०:४०. (३) उत्प. २:२४. एफ. ५:३१.
(२) उत्प. १:२७. ५:२. मल. २:१५. (४) १ करिं. ७:१०.

झडती होईल. ८ प्रार्थना करायास किती आश्वासन व उत्तेजन आहे. ओ. २०. आपण पापी लाचार व नाश पावण्यास योग्य आहों. केवळ ईश्वर आह्मास तारूं शकतो. आमच्याने पापाबदल प्रायश्चित्त कधीं करवणार नाहीं. ख्रीस्ताने प्रायश्चित्त केलें आहे. आह्मी मोकळे व्हावें ह्मणून त्याने आमचें कर्ज फेडून दिल्हें. तर त्याकडे आह्मी किती आग्रहाने शरण जावें? असें करूनच माणसाला आशा होती. त्याने प्रार्थना केली पाहिजे. त्याने ख्रीस्ताकडून दया व क्षमा मागितली पाहिजे, नाहींतर तो नाश पावेल. ईश्वर क्षमा करायास सिद्ध आहे यांत केवढी दया ! ९ हिशोबाचा दिवस येणार आहेच. ओ. २३. ईश्वर सर्व माणसांची झडती घेईलच. हा शेवटला न्याय कोणी चुकणार नाहीं. प्रत्येक वाईट कर्म व कुकल्पना उघडकीस येतीलच.

१—१२ मार्क. १०:१–१२ पाहा. सूटपत्र देण्याविषयीं यहूदी लोकांचीं मतें वेगवेगळीं होतीं. द्वेष किंवा दुसरें कोणतेंहि कारण यावरून बायकोला

७ ते त्याला ह्मणाले, तर सूटपत्र देऊन तिला टाकावें, असी आज्ञा मोश्याने कां दिल्ही? (१)

८ त्याने त्यांस ह्मटलें, तुमच्या अंतःकरणाच्या कठीणपणामुळें मोश्याने तुह्मास आपल्या बायका सोडूं दिल्ह्या, परंतु पहिल्यापासून असें नव्हतें.

---

(१) अनु. २४:१. यशा. ५०:१.

---

टाकावें, असें हिलेलाचें मत होतें. या मतास कित्येक लोक अनुसरले होते. व्यभिचारावांचून तिचा त्याग करूं नये, असें शामायाचें मत होतें. कित्येक या मतास अनुसरले होते. आतां या दोहोंतून कोणतेंहि एक मत ख्रीस्ताने पत्करलें असतां दुसऱ्या मताभिमानी पक्षास वाईट वाटून तो येशूचा द्वेष करील, असें परोश्यांस वाटलें. परंतु ख्रीस्ताने त्यांतून एकहि मत न धरितां मोश्याने जें सांगितलें व ईश्वराचा जो मूळ उद्देश आहे, त्याकडे मन लाविलें उत्प. १:२७. २:२१,२२,२४. देवाने आदीं एकच पुरुष व एकच स्त्री असीं उत्पन्न केलीं. तर पुरुषाला एकच स्त्री व स्त्रीला एकच नवरा असावा, असा ईश्वरी उद्देश स्पष्ट दिसून येतो. नवरा व बायको यांमधील जो संबंध तो सर्वांहून जवळचा आहे. ओ. ५. त्यांची ममता, भावना, हित हीं एकसारिखींच असतात. त्यांचा संबंध इतका जवळचा आहे कीं तीं दोघें एकशरीर होतात, आणि देवाने एकच पुरुष व एकच स्त्री असीं उत्पन्न केलीं. तर देवाच्या आज्ञेशिवाय त्यांनी वेगळें होऊं नये, असें ख्रीस्ताने शिकविलें. त्याने हिलेलाचें किंवा शामायाचें मत नव्हे, पण मोश्याने जें लिहून ठेविलें होतें तें काढून त्यांस कुंठित केलें.

७ मोश्याने सूटपत्र होऊं दिल्हें, ( अनु. २४:१ ) असी हरकत परोशी कां सांगतात बरें? आपलें वाईट मत व आचरण यांस शास्त्राधार मिळविण्यास लोकांला बरें वाटतें, आणि याकरितां ते वारंवार शास्त्रलेख उलट्या अर्थात काढून सांगतात.

८ "तुमच्या अंतःकरणाच्या कठीणपणामुळें." ख्रीस्त ह्मणतो कीं माणसांच्या दुष्टाईमुळें मोश्याने सूटपत्र होऊं दिल्हें. लोक हटबुद्धि व दुष्ट असे त्याला सांपडले. ते वरचेवर सूटपत्र देत असत. ते इतके बिघडले होते कीं त्यांची एकाएकीं सुधारणूक होत नाहीं, उत्तरोत्तर, हळू हळू केली पाहिजे, असें पाहून मोश्याने नेम केले. त्याने रागांत सूटपत्र देणें मना केलें, आणि द्यायाचें तर लिहून द्यावें असा नेम केला, यासाठीं कीं विचार करायास अवकाश करून त्यांनी समेट करावा.

९ आणि मी तुह्मास सांगतों कीं, जो कोणी (१) आपल्या बाय-
कोला व्यभिचाराच्या कारणावांचून टाकून दुसरी करील, तो व्यभि-
चार करील, आणि टाकलेल्या बायकोशीं जो कोणी लग्न करील तो
व्यभिचार करील.

१० त्याचे शिष्य त्याला ह्मणाले, बायकोविषयीं पुरुषाची दशा
असी असली तर लग्न करणें बरें नाहीं. (२)

११ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, ज्यांस शक्ति मिळाली त्यांवांचून
कोणाच्यानें ही गोष्ट घेववत नाहीं.

१२ कारण कीं आईच्या पोटापासून तसेच जन्मले असे कित्येक
नपुंसक आहेत, आणि माणसानी केले असे कित्येक नपुंसक आहेत,
आणि आकाशाच्या राज्यासाठीं (३) आपणास नपुंसक करून घेतलें
असे कित्येक नपुंसक आहेत. ज्याच्याने हें घेववतें तो घेवो.

---

(१) मात्थी ५:३२. लूक १६:१८. (२) नीति १२:१३. २१:२,१९ (३) १ करिं. ७:३२.

---

९ सूटपत्र देण्याचा नेम ख्रीस्ताने एथें स्पष्ट करून सांगितला. जरी मोश्याला त्यांच्या अंतःकरणाच्या कठीणपणाला मान्य व्हावें लागलें, तरी ख्रीस्ताने मूळचा नेम फिरून स्थापिला. सूटपत्र देण्यास एकच कारण चालतें, हा देवाचा नेम आहे. आणि सर्कारीला दुसऱ्या कोणत्याहि कारणावरून सूटपत्र होऊं देण्याचा अधिकार नाहीं. जो नेम ख्रीस्ताने एथें स्थापिला, तो सर्व ठिकाणीं चालावा. पुरुष व बायको यांतून ज्याने दुसऱ्याला या कारणावांचून टाकिलें त्याकडे दोष आहे. ह्मणून जर कोणी खिस्ती झाल्यामुळें दुसऱ्याने त्याला टाकिलें तर दोष टाकणाऱ्याकडे आहे. १ करिं. ७:१५.

१० यहूदी मतें शिष्यांच्या मनांत भरलीं होतीं. बायको टाकण्याची मोकळीक असावी, नाहीं तर लग्न करणें बरें नाहीं असें त्यांस वाटलें.

११ "ही गोष्ट." ह्मणजे लग्न करणें बरें नाहीं. पाठलाग व संकटें यांच्यासमयीं अथवा शुभवर्त्तमान सांगण्यास अडथळा न व्हावा याकारितां बायको न करावी, पण प्रेषितांतील कित्येकांसारिखें एकटेंच राहावें हें बरें. परंतु सर्वांस असें कृपादान नाहीं. १ करिं. ७:१,७,९. लग्न करणें किंवा न करणें प्रसंगानुसार उचित आहे. १ करिं. ७:२६. इब्री. १३. ४ ज्यांच्याने ही गोष्ट घेववती ते कोण कोण आहेत हें एथें सांगितलें आहे.

१३ नंतर त्याजवळ बाळकें आणिलीं, त्याने त्यांवर हात ठेवून प्रार्थना करावी ह्मणून, परंतु शिष्यानी आणणाऱ्यांस धमकाविलें.

१४ तेव्हां येशूने ह्मटलें, बाळकांस (१) असूं द्या आणि मजकडे येण्यास मना करूं नका, कारण कीं आकाशाचें राज्य असल्यांचें आहे. (२)

१५ मग तो त्यांजवर हात ठेवून तेथून गेला.

१६ नंतर पाहा, कोणीएक येऊन त्याला ह्मणाला, हे उत्तम गुरू, मला सर्वकाळचें जीवन मिळावें ह्मणून म्या कोणतें चांगलें काम करावें ? (३)

---

(१) मार्क. १०:१४. लूक १८:१६. इ. (२) मात्थी १८:३.
(३) मार्क. १०:१७. लूक १०:२५. १८:१८.

---

१३ "नंतर त्याजवळ बाळकें आणिलीं इ." मार्क. १०:१३–१६. लूक १८:१५—१७. ज्यानी त्यास आणिलें, त्यांनी आपल्याला, असें केवळ नव्हे, परंतु आपल्या लेंकरांलाहि आशीर्वाद मिळावा ह्मणून इच्छिलें. माणसांच्या डोक्यावर हात ठेवून त्यांसाठीं प्रार्थना करावी, असी यहूदी चाल होती. उत्प. ४८:१४. मात्थी. ९:१८. धार्मिक माणसांच्या प्रार्थना सफळ होतील, असा भरवसा होता. गण. २२:६. लूक. २:२८. "परंतु शिष्यानी—धमकाविलें." ख्रीस्ताला त्रास होईल असें त्यांस वाटलें असेल.

१४ "बाळकांस असूं द्या इ." मार्कस ह्मणतो कीं, शिष्यानीं धमकाविलें हें येशूला वाईट वाटलें. "आकाशाचें राज्य असल्यांचें आहे इ." ह्मणजे बाळकांसारिखे सालस, नम्र, व निष्कपट तसल्यांचें देवाचें राज्य आहे. मार्कस व लूका ह्मणतात कीं ख्रीस्त अणखी बोलला, जो कोणी देवाचें राज्य बाळकासारिखें घेणार नाहीं, तो त्यांत जाणारच नाहीं. ख्रीस्ताने बाळकांचा निर्दोष व निष्कपट स्वभाव याची प्रशंसा एथें केली. सर्व बाळकें आकाशलोकांत जातील, असें या वाक्यांत सांगितलें नाहीं. तथापि त्यांतील कोणीच जाणार नाहीं, असें कोठेंहि ख्रिस्ती शास्त्रांत सांगितलें नाहीं. ख्रिस्ती आईबापानी आपलीं लेंकरें आणून मंडळींतल्या नेमलेल्या संस्कारेंकरून देवाला अर्पून द्यावीं, या चालीला एथें चांगला आधार आहे.

१५ "हात ठेवून इ." त्यांस आशीर्वाद दिल्हा. मार्क. पाहा.

१६—३० मार्क. १०:१७—३१. लूक. १८:१८—३०. "कोणीएक येऊन." हा तरुण होता (ओ. २०.) व अधिकारी होता, (लू.) मोठ्या

१७ तेव्हां त्याने त्याला ह्मटलें, मला उत्तम कां ह्मणतोस ? एक जो देव त्यावांचून कोणी उत्तम नाहींत; परंतु जीवनांत जायाचें असलें तर आज्ञा पाळ.

१८ तो त्याला ह्मणाला, कोणत्या ? तेव्हां येशूने ह्मटलें कीं, पाप करूं नको, (१) व्यभिचार करूं नको, चोरी करूं नको, खोटी साक्ष देऊं नको;

१९ आपल्या आईबापांचा सन्मान कर, आणि जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर. (२)

---

(१) निर्ग. २०:१३. अनु. ५:१७. इ. (२) लेवी १९:१८.

---

सभेंतला सभासद होता असें दिसतें. त्याने धावत ( मार्क ) येऊन मोठा आग्रह व आस्था दाखविली. त्याने येशूला मोठा मान देऊन त्यापुढें गुडगे टेंकिले. ( मार्क. ) "कोणतें चांगलें काम करावें इ." माणसें आपल्या सुकृताने व पुण्याने तरतील, असें त्याला शिकविलें होतें, ह्मणून तो देवाच्या आज्ञा पाळायास फार झटला होता, आणि त्याचें बाह्य आचरण निर्दोष होतें. असें असताहि त्याचें मन शांत नव्हतें. परलोकवास होणार असें जाणून तो त्यांत सुख मिळवायास उत्कंठित होता.

१७ "मला उत्तम कां ह्मणतोस." मी मनुष्यच असें जर तूं मानितोस तर जी संज्ञा केवळ देवाला योग्य ती मला कां देतोस ? माझ्याठायीं देवपण नाहीं, असें ख्रीस्ताने सांगितलें नाहीं. हा आर्जवाने मला ही संज्ञा देतो, असें त्याने पाहिलें ह्मणून त्याला निषेधलें.

"आज्ञा पाळ." पाळिल्या असें तरुणाला वाटलें, आणि तारणासाठीं या आपल्या सुकृतावर भरवसा ठेवीत होता. तो पापी होता, आणि हें त्याला समजाविण्यास ख्रीस्त याप्रमाणें बोलला. देवाच्या आज्ञा कोणी कधीं बरोबर पाळीत नाहीं. पूर्णपणें पाळिल्या तर तेणेंकरून तारण मिळतें. ख्रीस्ताने पाहिलें कीं हा तरुण तारणासाठीं आपल्या पुण्यावर भरवसा ठेवितो, यास्तव या प्रकारें त्याचें पाप व तारणाऱ्याचें अगत्य त्याला समजाविलें.

१८,१९. ख्रीस्ताने ६,७,८,९ व ५ या आज्ञा काढल्या. ( निर्ग. २०: १२-१६ ) "आपल्या आईबापांचा सन्मान कर." त्यांस मान्य होऊन त्यांजवर प्रीति कर, आणि रोगी किंवा ह्मातारीं झालीं तर त्यांचें पालन पोषण कर. अणखी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर. याचा अर्थ, १ आह्मी शेजा-

२० तो तरुण त्याला ह्मणाला, म्या आपल्या लहानपणापासून हें अवघें पाळिलें आहे, तर आतां माझ्या ठायीं काय उणें आहे ?

२१ येशूनें त्याला ह्मटलें, पूर्ण व्हायाचें असलें तर जा, आपली मालमत्ता विकून दरिद्र्यांस दे, (१) ह्मणजे आकाशांत तुला संपत्ति मिळेल; चल, माझ्या मागें ये. (२)

२२ परंतु तो तरुण ही गोष्ट ऐकून खिन्न होऊन निघाला, कां कीं त्याची बहुत मालमत्ता होती.

---

(१) लूक १२:३३. १६:९. प्रेषि. २:४५. ४:३४,३५. १ तीम. ६:१८,१९.
(२) योह. १२:२६.

---

त्यांचें शरीर, माल किंवा आब्रू, यांविषयीं अन्याय करूं नये. २ आह्मी आपलाच स्वार्थ पाहूं नये, पण शेजाऱ्याचें हित पाहावें.

२० "हें अवघें इ." ह्मणजे ह्या आज्ञा मानीत आलों. तर काय उणें ! तूं कांहीं नवीन आज्ञा शिकवितोस काय ?

२१ "पूर्ण व्हायाचें असलें तर इ." आज्ञा बरोबर पाळून अगदीं पूर्ण असें मोजलें जावें ह्मणून इच्छा असली तर जा इ०. मार्कस ह्मणतो कीं येशूनें त्याकडे पाहून त्याजवर प्रीति केली. त्याचे कित्येक गुण चांगले व प्रियकर होते, तथापि तो उणा होता. म्या सर्व आज्ञा पाळिल्या असें तो तरुण ह्मणाला, परंतु त्यानें देवावर व शेजाऱ्यावर योग्य प्रीति केली नव्हती हें उघड दिसून आलें. केली असती तर, देवाच्या सेवेसाठीं व माणसाच्या कल्याणासाठीं त्यानें आपली मालमत्ता खुशीनें दिल्ही असती. त्यानें दिल्ही नाहीं यावरून उघड झालें कीं हा पूर्ण नाहीं. हा आज्ञा मोडून पापी झाला होता. तर ख्रीस्ताच्या पुण्याकडून क्षमा असण्याचें अगत्य होतें. "आकाशांत . . . .संपत्ति." मात्थी. ६:२०. यावरील टीका पाहा.

२२ "त्याची बहुत मालमत्ता होती." तो माणसावर किंवा देवावर द्रव्यापेक्षां अधिक प्रीति करीत नसे. माणसाचें कल्याण व देवाची सेवा करावी, यापेक्षां आपलें द्रव्य गच्च धरून त्यानें ख्रीस्त व सर्वकाळीक जीवन यांविषयींचा विचार सोडला. तर वास्तविक पाहिलें असतां आपण देवाच्या आज्ञा मोडल्या आणि फार उणा आहें असें त्यानें पाहिलें, यास्तव तो खिन्न होऊन निघाला. मी स्वार्थी आहें असी त्याच्याच मनानें साक्ष दिल्ही. परंतु त्याला तारणापेक्षां द्रव्याची आवड अधिक होती. अरेरे, त्यासारिखें वागून आपल्या जीवात्म्याची हानि पावतात, असे किती आहेत ?

२३ तेव्हां येशूने आपल्या शिष्यांस ह्मटलें, मी तुह्मांस खचीत सांगतों कीं, धनवानाला आकाशाच्या राज्यांत जायास कठीण आहे. (१)

२४ अणखी तुह्मास सांगतों, धनवानाला देवाच्या राज्यांत जाणें यापेक्षां उंटाला सुईच्या नाकांतून जाणें सोपें आहे.

२५ तेव्हां त्याचे शिष्य ऐकून फार थक्क होऊन ह्मणाले, तर तारण कोण पावेल?

२६ मग येशूने त्यांकडे पाहून ह्मटलें, माणसांच्याने हें होत नाहीं, परंतु देवाच्याने सर्व होतें. (२)

२७ तेव्हां पेत्रसाने त्याला उत्तर दिल्हें कीं, (३) पाहा, आह्मी सर्व सोडून तुझ्या मागें आलों, (४) तर आह्मास काय मिळेल?

---

(१) १तीम. ६:९,१०. (३) मार्क. १०:२८. लूक १८:२८.
(२) योब ४२:२. यिर्म. ३२:१७. जख. ८:६. (४) फिलि. ३:८.

---

२३—२६ "धनवान." ह्मणजे ज्याला द्रव्याची फार आवड आहे, व जो द्रव्यावरच फार भरवसा ठेवितो तो. (मार्क.) जो देवापेक्षां द्रव्यावर अधिक प्रीति करितो, तो ख्रिस्ती होत नाहीं. द्रव्यावरून जे साधारण अनर्थ होतात ते येणेंप्रमाणें, १ अंतःकरण द्रव्याकडे फार लागतें. २ त्यापासून गर्व उत्पन्न होतो. ३ तें संपादन व रक्षण करण्याच्या खटपटींत मन गुंतलें जाऊन बहुत विचार, चिंता, श्रम इत्यादि उत्पन्न होतात, व बहुत कालक्षेप होतो, असा कीं देवाच्या सेवेसाठीं अवकाश मिळत नाहीं व त्याकडे मन लागत नाहीं. ४ विषयसुखाची आवड व अनेक दुर्व्यसनें जडतात. ५ द्रव्य मिळविण्याची फार इच्छा बाळगण्याकडून स्वार्थबुद्धि, दगलबाजी, जुलूम वगैरे घडतात. १ तीम. ६:९,१०,१७. याक. ५:१–५. लूक. १२:१६–२१. १६:१९–३१. धनवानानें आपल्या द्रव्यावरील भरवसा टाकून नम्र होणें व पश्चात्ताप करून ख्रीस्ताच्या पुण्यावर भरवसा ठेवून तारण पावणें हें देवाच्याने होतें.

२७ "आह्मी सर्व सोडून इ." माशांचीं जाळीं मचवे व झोंपडीं हींच असतील. तथापि हींच त्याचें सर्वस्व होतें. तर हीं ख्रीस्ताकरितां सोडणें हें बहुत धन सोडण्यासारिखें त्यास होतें. तूं या तरुणास सांगितलें तसें आह्मी केलें आहे, तर काय फळ प्राप्त होईल?

२८ मग येशूने त्यांस ह्मटलें, मी तुह्मास खचीत सांगतों कीं, मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल, तेव्हां माझ्या मागें चालणारे तुह्मीहि पुनःस्थितींत बारा आसनांवर (१) बसून इस्राएलाच्या बारा वंशांचा न्याय ठरवाल.

२९ आणि ज्यानें (२) घरें किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा बायका किंवा लेंकरें किंवा शेतें माझ्या नामाकरितां सोडलीं आहेत, तो शंभरपट पावेल, आणि सर्वकाळच्या जीवनाचें वतन पावेल.

---

(१) मात्थी. २०:२१. लूक २२,२८–३०. १ करिं. ६:२,३. प्रग. २:२६.
(२) मार्क. १०:२९,३०. लूक १८:२९,३० १ करिं. २:९.

---

२८ या वाक्यांत ख्रीस्त परलोकींचें फळ सांगतो. येशू ख्रीस्त जगाचा न्याय ठरवील, तेव्हां प्रेषितांस विशेष मान मिळेल असें शिकविलें आहे. "इस्राएलाच्या बारा वंशांचा इ." इस्राएल हे देवाचे निवडलेले लोक होते, ह्मणून हें नांव देवाच्या सर्व लोकांस पडलें आहे. ख्रीस्त ह्मणतो कीं, जसे राजे आपल्या चाकरांस मोठ्या चाकरीबदल विशेष मान देतात, तसें तो न्यायदिवशीं आपल्या प्रेषितांस विशेष मान देईल.

२९ ख्रीस्ताचे खरे शिष्य व्हावें ह्मणून त्यावर दुसऱ्या सर्व गोष्टीपेक्षां प्रीति केली पाहिजे, व त्याकरितां अवघें सोडायास मान्य असलें पाहिजे. "माझ्या नामाकरितां." मार्कस ह्मणतो कीं, व शुभवर्त्तमानाकरितां ह्मणजे ख्रीस्तावर प्रीति करून व शुभवर्त्तमान मानून. "तो शंभरपट पावेल." मार्कस ह्मणतो कीं, या सांप्रत काळीं शंभरपट घरें व भाऊ बहिणी इ. हें अक्षरशः समजायाचें नाहीं. जें सोडलें त्यापेक्षां शंभरपट मोलवान असी शांति, आनंद व समाधान हीं ख्रिस्ती धर्मावरून मिळतील, असा अर्थ समजला पाहिजे. पाठलागासुद्धां असें मार्कस ह्मणतो. तर तो शंभरपट लाभ असा आहे कीं, ऐहिक नुकसान व पाठलाग त्याला बाधक होणार नाहींत. जें सुख ख्रीस्तानें मात्थी. ५:१०—१२ यांत वर्णिलें तेंच. तो शंभरपट लाभ आहे. ख्रिस्ती माणसाला जरी कठीण पाठलाग होत आहेत तरी त्याच्या अंतःकरणांत मोठा आनंद व सुख राहावें, हें साध्य आहे, असें मंडळीच्या बखरीवरून पटतें.

३० परंतु पहिले ते शेवटले, आणि शेवटले ते पहिले, असे बहुत होतील. (१)

(१) मत्थो. २०:१६. २१:३१,३२. मार्क १०:३१. लूक १३:३०. गल. ५:७. इब्री. ४:१.

३० ही ओवी २० अध्यायासीं संबंधांत आहे.

**सूचना.** १ दुष्ट माणसें हमेश ख्रिस्त्यांस फाशांत पाडण्याचा प्रसंग पाहतात. ओ. ३. यासाठीं तीं शास्त्रलेख शोधून अनाठायीं व वाईट अर्थांत लावितात. ओ. ७. २ लग्न हा संबंध सर्वांहून जवळचा आहे. कोणी सर्कारच्याने व्यभिचाराच्या कारणाशिवाय सूटपत्र द्यावें, असें ठरवत नाहीं. ठरविलें तर सर्कारी कायदा देवाच्या आज्ञाविरुद्ध असें होईल. ओ. ९. लग्नाच्या संबंधावरून प्रीति करण्याचा व कृपाळूपणें वागण्याचा धर्म होय. ओ. ६ नवरा व बायको हीं एक असें होतें, आणि आयुष्यपर्यंत त्यांचें सुख, त्यांची परस्पर प्रीति ममता व मान यांवर अवलंबून राहत आहे. तर लग्न अविचारानें करूं नये. नवरा व बायको यांमधील कांहीं स्वभावसाम्य, एकचित्त, समता, व समगुण असें असावें. त्यांच्या वयांत फार अंतर नसावें. लग्नापूर्वी परस्परांची ओळख बरीच असावी, आणि ख्रिस्त्यानें ख्रिस्त्यासीं लग्न करावें. धर्माविषयीं सम्मत व सम आशा यांवरून कुटुंबांतलें सर्वांहून चांगलें सुख होतें. परलोकीं सर्वकाळचा वियोग होईल असें पाहून अतिशय दुःख होतें. तर लहानपणीं लग्न करण्याची जी चाल आहे तिजविषयीं काय सांगावें? असें लग्न करण्याकडून दोघांचेंहि सुख आयुष्यभर बुडून जाण्याचें मोठें भय आहे. हिंदु लोकांच्या कुटुंबांत द्वेष, तंटा, भांडण, सूटपत्र देणें इत्यादि अनर्थ नित्य घडत आहेत याचें एक प्रबळ कारण ही चाल आहे, याविषयीं संशय नाहीं. ही चाल सुधारण्याचें मोठें अगत्य आहे. ३ बाळकांस ख्रिस्ताजवळ आणून आशीर्वाद मागणें हें योग्य आहे. ओ. १३—१५. कुटुंबांत व देवळांत प्रार्थना करून त्यांसाठीं देवापासून आशीर्वाद मागावा, हा सर्व ख्रिस्ती आईबापांचा धर्म आहे, असें ते मानितात. ४ मोठ्या आग्रहानें व आस्थेनें तारण साधून घ्यायास प्रयत्न करावा हें योग्य आहे. ओ. १६. तो तरुण धावत आला. त्यानें आग्रह केला, हें ठीक होतें. तारणाचें अगत्य व मोल अवाच्य आहे. अनंतकाळ जवळ आहे. पाप्यानें ख्रिस्ताला लवकर शरण गेलें पाहिजे नाहीं तर सर्वकाळचा नाश होईल. तरुणांनीं यावें. मोठ्या पदवीच्या मातबर माणसांनीं यावें. सुस्वभावाचे व प्रियकर यांनीं यावें. सर्वांनीं येऊन ख्रिस्ताच्या पुण्याकडून क्षमा व तारण शोधावें. कोणी आपल्या पुण्यावर भरवसा ठेवूं नये. आपण

## अध्याय २०.

१ कारण कीं आकाशाचें राज्य कोणीएका घरधन्यासारिखें आहे; तो आपल्या द्राक्षमळ्यांत कामकऱ्यांस मोलानें लावायास सकाळीं बाहेर गेला.

२ आणि त्यानें कामकऱ्यांसीं रोजचा पावला (१) असा ठराव करून त्यांस आपल्या द्राक्षमळ्यांत पाठविलें.

३ मग तिसऱ्या तासीं त्यानें बाहेर जाऊन अड्ड्यावर दुसरे रिकामे उभे राहिलेले पाहिले.

---

(१) माथी. १८:२८.

---

गरीब, लाचार, पापी असें मानून जेव्हां माणसें देवाच्या दयेवर आपणाला सोपून देतात तेव्हां मात्र ते विश्वासेंकरून शांति व आनंद पावतात. ५ वास्तविक आपण आहों त्यापेक्षां आपण अधिक चांगले, असें मानून लोक वारंवार फसतात. ओ. १७. ईश्वर अंतःकरणाकडे पाहतो. बाह्यकृत्यांकडून त्याचें आज्ञापालन होतच नाहीं. ६ द्रव्य योग्य प्रकारें खर्चिलें तर सुखकारक आहे, नाहीं तर नाशकारक असें आहे. ओ. २३,२४. द्रव्याची फार इच्छा धरून बहुतएक सर्वकाळचा नाश पावत आहेत. ७ ख्रीस्ताकरितां अवघें सोडणें भाग आहे. ओ. २७–२९. आमचें सर्वस्व थोडें किंवा फार असो, तें त्याला सारिखेंच आहे. संपूर्ण अंतःकरणानें त्यावर प्रीति व विश्वास ठेवणें भाग आहे. ८ ख्रीस्ताला अंगीकारून मोलवान फळ प्राप्त होतें. इहलोकीं संकटांत व मरणांत समाधान व शांति व आनंद, आणि परलोकीं सर्वकालिक सुख असें फळ मिळतें. ९ जे इहलोकीं देवाच्या सेवेंत विशेष उपयोगी आहेत त्यांस सौख्यलोकांत विशेष मान व फळ मिळेल. ओ. २८. ज्यानीं बहुतांस न्यायी केलें, ते ताऱ्यांसारिखे सदासर्वकाल प्रकाशतील. दान. १२:३.

१ "कारण कीं." या शब्दावरून याचा मागल्या वाक्यासीं जवळचा संबंध दिसून येतो. "आकाशाचें राज्य," ह्मणजे पृथ्वींतली व आकाशांतली मंडळी. मात्थी. ३:२. यावरील टीका पाहा. ईश्वर आपल्या सेवकांस प्रतिफळ कसें देईल हें या दाखल्यावरून दिसून येतें.

२,३ यहूदी सूर्य उगवल्यापासून मावळेपर्यंत दिवसाचे बारा विभाग सारिखे करीत असत, तर तिसऱ्या तासीं ह्मणजे नऊ वाजतां.

४ आणि तो त्यांस ह्मणाला, तुह्मीहि द्राक्षमळ्यांत जा, आणि जें योग्य असेल तें मी तुह्मास देईन; मग ते गेले.

५ अणखी साहाव्या व नव्या तासीं त्याने बाहेर जाऊन तसेंच केलें.

६ नंतर अकराव्या तासीं बाहेर जाऊन त्याने दुसरे रिकामे उभे राहिलेले पाहिले; आणि त्याने त्यांस ह्मटलें, तुह्मी सारा दिवस एथें रिकामे कां उभे राहिलां ? (१)

७ ते त्याला ह्मणाले, आह्मास कोणी मोलाने लाविलें नाहीं ह्मणून; त्याने त्यांस ह्मटलें, (२) तुह्मीहि द्राक्षमळ्यांत जा, आणि जें योग्य असेल तें तुह्मास मिळेल.

८ मग संध्याकाळ झाल्यावर द्राक्षमळ्याचा धनी आपल्या कारभाऱ्याला ह्मणाला, कामकऱ्यांस बोलाव, आणि शेवटल्यांपासून आरंभ करून पहिल्यांपर्यंत त्यांस मजुरी दे. (३)

९ तेव्हां अकराव्या तासाचे (४) ते आल्यावर त्यांतील एकएकाला पावला पावला मिळाला.

---

(१) नीति. १२:१५. यहेज्क. १६:४२. प्रेषि. १७:२१. इब्री. ६:१२.
(२) उपदे. ९:१० योह. ९:४. (३) लूक. १०:७. (४) लूक. २३:४०–४३.

---

४ "जें योग्य असेल तें इ." पहिल्यांसीं देणें ठरविलें, पण यांस धन्याला जें योग्य वाटेल, तें द्यायाचें होतें.

५ "साहाव्या." ह्मणजे बारा वाजतां. "नव्या." ह्मणजे बारांवर तीन वाजतां.

६ "अकराव्या तासीं." ह्मणजे पांच वाजतां. तेव्हां काम करायास एकच तास राहिला.

८ "मग संध्याकाळ झाल्यावर इ." दिवस समाप्त होऊन मजुरी देण्याची वेळ आली.

९ "एक एक पावला मिळाला इ." ज्यानी एक तास काम केलें होतें, त्यांस उदारपणाने पूर्ण दिवसाची मजुरी दिल्ही.

१० मग पहिले येऊन, आपणांस जास्ती मिळेल असें त्यांनी मनांत आणिलें, परंतु त्यांतीलहि एकएकाला पावला पावला मिळाला.

११ आणि त्यांनी घेतल्यावर घरधन्यापाशीं कुरकुर करून ह्मटलें, (१)

१२ या शेवटल्यानी एकच तास काम केलें, आणि आह्मी दिवसभर उन्हातान्हांत कष्ट केले असतां त्वां आह्मास व त्यांस बरोबर लेखिलें आहे.

१३ तेव्हां त्याने त्यांतून एकाला उत्तर दिल्हें, गड्या, (२) मी तुझा अन्याय करीत नाहीं; त्वां मजसीं पावल्याचा करार केला नाहीं काय?

१४ तूं आपलें घेऊन नीघ; पण जसें तुला तसें या शेवटल्यालाहि द्यावें असी माझी खुशी आहे. (३)

१५ माझें जें आहे त्याविषयीं मी आपल्या खुशीप्रमाणें करायास मुखत्यार नाहीं काय? (४) मी चांगला आहें यामुळें तुझा डोळा (५) वाईट आहे काय?

१६ याप्रमाणें (६) शेवटले ते पहिले व पहिले ते शेवटले होतील; कारण कीं बोलाविलेले बहुत आहेत, (७) परंतु निवडलेले थोडके.

---

(१) लुक. १५:२९,३०. (४) रोम. ९:१५—२४. याक. १:१८.
(२) मात्थी. २२:१२. (५) अनु. १५.९. मात्थी. ६:२३.
(३) योह. १७:२. (६) मात्थी. १९:३०.
(७) मात्थी. २२:१४. १ थेस्स. २:१३. याक. १:२३—२५.

---

१०—१२ पहिल्यांनी ज्यास्ती काम केलें ह्मणून ज्यास्ती मिळावें असें मनांत आणून ते कुरकुर करूं लागले.

१३—१५ "गड्या, मी तुझा अन्याय करीत नाहीं इ." म्या तुला ठरावाप्रमाणें दिल्हें आणि आतां यांनी काम केलें त्यापेक्षां ज्यास्ती द्यावें असी माझी खुशी असली तर तुला काय? तुला कराराप्रमाणें मिळालें आहे तर तृप्त हो, आणि मला माझ्या खुशीप्रमाणें बक्षीस करूं दे.

१६ "याप्रमाणें शेवटले ते पहिले इ." या दाखल्याचें तात्पर्य हें आहे. न्यायकाळीं सर्वांस न्यायाप्रमाणें मिळेल. जे ख्रिस्ताला अंगीकारतात ते सर्व आकाशलोकांत पोहंचतील, परंतु जे खरे ख्रिस्ती होतात त्यांतून जर ईश्वर कित्येकांस निवडून घेतो, आणि अधिक बुद्धि व शक्ति देऊन त्यांस

१७ नंतर येशू (१) यरुशालेमास जात असतां, वाटेंत बारा शि-
ष्यांस एकीकडे नेऊन तो त्यांस ह्मणाला;

१८ पाहा, आपण यरुशलेमास जातों, आणि मनुष्याचा पुत्र मुख्य
याजकांच्या व शास्त्रयांच्या हातीं पडेल; आणि ते त्याला मरणदंड
ठरवितील.

१९ मग थट्टा करायास व फटके मारायास व खांबीं द्यायास (२)
ते त्याला विदेश्यांच्या स्वाधीन करितील; (३) आणि तिसऱ्या दिवसीं
तो पुन्हा उठेल.

---

(१) मार्थी. १६:२१. इ. मार्क. १०:३२. इ. लूक. १८:३१. इ. योह. १२:१२ इ.
(२) यशा. ५३:५. (३) मार्थी. २७:२. इ. मार्क. १५:१,१६. लूक. २३:१. इ. योह. १८:२८. इ. प्रेषि. ३:१२. १ करिं. १५:३—७.

---

आपल्या सेवेंत अधिक उपयोगी करितो, आणि शेवटीं अधिक मोठें फळ देतो, तर असें करून तो दुसऱ्यांचा अन्याय करीत नाहीं. सर्व खरे ख्रिस्ती तारण पावतील, परंतु आकाशलोकांतलीं फळें भिन्न भिन्न होतील, याविषयीं संशय नाहीं. फळ सेवेच्या काळाप्रमाणें नव्हे, तर विशेष सेवा करण्यासाठीं जे गुण व प्रसंग द्यायास ईश्वराची खुशी असेल त्याप्रमाणें होईल.

१७-१९ मार्क. १०:३२—३४. लू. १८:३१—३४ पाहा. ख्रिस्त आतां यरूशलेमास शेवटल्या वेळीं जात होता. जगाच्या पापाबद्दल मरण सोसायास तो जात होता. "बारा शिष्यांस एकीकडे नेऊन इ." सर्व यहुदी पुरुषानीं या सणांत हजर असावें असा नेम होता. निर्ग. २३:१७. बहुत समुदाय वाटेंत चालले होते; आपल्या शिष्यांस आपल्या मरणाविषयीं सांगण्याची इच्छा असतां त्यांस त्याला एकीकडे न्यावें लागलें. मार्कस ह्मणतो कीं येशू त्यांच्या पुढें चालला आणि ते थक झाले. इ. मला पराधीन करून जिवें मारतील असें त्यानें त्यांस पूर्वीं सांगितलें होतें. (मार्थी. १७:२२.) हीं गोष्ट वास्तविक होणार, असें भय ते आतां धरूं लागले. आपल्या मरणाचा प्रकार पूर्वीं सांगून आपण सर्वज्ञ आहें, असें प्रमाण ख्रिस्तानें पुरविलें. यहूदी लोकांच्या मोठया सभेकडे जीव घेण्याचा अधिकार नव्हता. परंतु मरणदंड ठरवून त्याला रोमी सर्कारच्या स्वाधीन करायास ते मोकळे होते, आणि त्यानीं तसें केलें. मार्थी २६:६६. २७:२. "विदेश्यांच्या स्वाधीन." ह्मणजे पिलातस व रोमी शिपायी यांच्या स्वाधीन. मार्थी. २७:२,२७—३०. भविष्यवादांत कोठें कोठें ख्रीस्ताला वधस्तंभीं देणें व जिवें मारणें हें

२० नंतर (१) जबदीच्या पुत्राच्या आईने आपल्या पुत्रांबरोबर त्याजकडे येऊन पायां पडून त्यापासीं कांहीं मागितलें.

२१ तेव्हां त्याने तिला ह्मटलें, तुला काय पाहिजे? ती त्याला ह्मणाली, तुझ्या राज्यांत या माझ्या दोघां पुत्रांतील एकाने तुझ्या उजवीकडे आणि एकाने तुझ्या डावीकडे बसावें ह्मणून सांग.

२२ परंतु येशूने उत्तर दिल्हें कीं, तुह्मी काय मागतां, हें तुह्मास समजत नाहीं; जो प्याला मला प्यायाचा आहे तो तुमच्याने पिववेल, आणि जो बातिस्मा (२) मला घ्यायाचा आहे तो घेववेल काय? ते त्याला ह्मणाले, घेववेल.

२३ मग त्याने त्यांस ह्मटलें, माझा प्याला तुह्मी प्याल, (३) आणि जो बातिस्मा मला घ्यायाचा आहे तो तुह्मी घ्याल खरें, पण ज्यासाठीं

---

(१) मार्क. १०:३५. (३) प्रेषि. १२:२. रोम. ८:१७. २ करिं. १:७. प्रग. १:९.
(२) लूक. १२:५०.

---

पूर्वीं लिहून ठेविलें होतें. यशा. ५३. गीत २२. दान. ९:२६,२७ पाहा. हीं भविष्यें व ख्रीस्ताचें सांगणें अगदीं पूर्ण झालें, यावरून तोच खरा मशीहा व तारणारा असें पक्कें प्रमाण पटलें.

२०—२८ मार्क. १०:३५—४५. पाहा. "नंतर जबदीच्या पुत्राच्या आईने इ." ही सलोमे असेल. मार्क. १५:४०. १६:२. "आपल्या पुत्रांबरोबर." हे याकोब व योहान्न होते. मार्क. १०:३५.

२१,२२. येशू गादीवर बसून जगिक राज्य स्थापणार असें अद्याप शिष्यांस वाटलें, आणि ते उंच जागा, मान, व हुद्दे पाहत होते. ख्रिस्ताने त्यांस समजाविलें कीं माझ्या राज्यांत उंच पदवीवरून इहलोकीं सुख व मान मिळेल, असें नाहीं, तर केवळ निंदा व दुःखें प्राप्त होतील. "प्याला मला प्यायाचा इ." या शब्दावरून दुःख व संकटें दाखवलीं आहेत. यशा. ५१:१७,२२. गीत. ७५:८. "आणि जो बातिस्मा इ." या शब्दाचा तोच अभिप्राय. ख्रिस्ताचें राज्य स्थापण्यास बहुत दुःखें व पाठलाग सोसायाचे होते. शिष्यांनी असें समजून त्यासाठीं सिद्ध व्हावें असी ख्रीस्ताची इच्छा होती.

२३ "माझा प्याला तुह्मी प्याल." इ. हे मजवर खरा विश्वास ठेवितात, असें पाहून ख्रीस्ताने ह्मटलें कीं तुह्मी मजसाठीं दुःखें सोसाल. हेरो-

माझ्या बापानें तयार केलें, त्यावांचून कोणास माझ्या उजवीकडे आणि
माझ्या डावीकडे बसविणें हें मजकडे नाहीं.

२४ तेव्हां ते दाहा जण हें ऐकून त्या दोघां भावांवर रागें भरले.

२५ परंतु येशूनें त्यांस बोलावून ह्मटलें, विदेश्यांचे अधिकारी त्यां-
वर धनीपणा करितात, आणि मोठे लोक त्यांवर सत्ता करितात, हें
तुह्मास ठाऊक आहे. (१)

२६ परंतु तुह्मामध्यें तसें होऊं नये, (२) तर जो कोणी (३) तुह्मा-
मध्यें मोठा व्हायास पाहील तो तुमचा चाकर होवो;

२७ आणि जो कोणी तुह्मामध्यें पहिला व्हायास पाहील तो तुम-
चा दास होवो;

२८ ज्या प्रकारें मनुष्याचा पुत्र सेवा घ्यायास नाहीं, तर सेवा
करायास (४) आणि बहुतांची खंडणी व्हावी ह्मणून आपला जीव
द्यायास आला, (५) तसेंच.

---

(१) लूक. २२:२५,२६. (३) माथी. २३:११. मार्क. ९:३५. १०:४३.
(२) १ पेत्र. ५:३. (४) लूक २२:२७. योह. १३:४,१४, फिलि. २:७.
(५) यशा. ५३:५,८,११. दान ९:२४,२६. १ तीम. २:६. तित. २:१४. इब्री. ९:२८.
१ पेत्र. १:१८,१९. प्रग. १:५.

---

दानें याकोबाला जिवें मारिलें. प्रेषि. १२:२. योहान्न खीस्ताचें राज्य
व सहनता यांमध्यें बहुत दिवसपर्यंत भागीदार झाल्यावर पात्मस बेटांत
हद्दपार केला गेला. प्रग. १:९. "माझ्या उजवीकडे." जे खीस्ताला
अनुसरतात त्या सर्वांस फळें मिळतील, परंतु ईश्वरी संकेताप्रमाणें मिळतील
असें खीस्तानें शिकविलें.

२४-२७ शिष्यांची ईर्षा व हेवा पाहून खीस्तानें त्यांस बोलावून समजा-
विलें कीं, माझें राज्य जगीक नाहीं. जगीक राजे आपल्या प्रजांवर धनीप-
णा करितात आणि जे आवडते आहेत त्यांस पक्षपातानें विशेष मान व हुद्दा
देतात, परंतु माझ्या राज्यांत जो सर्वांहून नम्र व मंडळीच्या सेवेंत विशेष
उपयोगी व चांगला सेवक तो उत्तम व मोठा असा मोजला जाईल. खि-
स्ती उपदेशकांस चाकर व सेवक असें ह्मटलें आहे. १ करिं. ३:५. ४:१.
२ करिं. ३:६. ६:४. एफ. ४:१२.

२८ "ज्या प्रकारें मनुष्याचा पुत्र." येशू आपल्या कित्त्याकडे त्याचें
लक्ष लावितो. तो देवाच्या रूपांत होता, फिलि. २:६,७. तरी त्यानें

२९ तेव्हां ते यरीहोपासून जात असतां, मोठा समुदाय त्याच्या मागें चालला.

३० आणि पाहा, (१) वाटेवर बसलेले दोन अंधळे, येशू जवळून जात आहे हें ऐकून ओरडत बोलले, हे प्रभु, दाविदाच्या पुत्रा, आह्मावर दया कर.

३१ तेव्हां उगेच राहा, असें समुदायानें त्यांस धमकाविलें, परंतु

(१) मात्थी. ९:२७. मार्क. १०:४६. लूक. १८:३५.

दासाचें रूप धरिलें. पापी मनुष्यांसाठीं तो श्रम व दुःख सोसायास आला. मनुष्य पापाचा दोष व दंड यांच्या स्वाधीन असून सर्वकाळचा नाश पावायास योग्य आहे असें पाहून खीस्तानें त्यासाठीं आपला जीव दिल्हा, व त्याच्या बद्दल दंड सोसला. पाप्यांचें तारण होण्यासाठीं हें अगत्य होतें. कारण, १ पापी मरेलच मरेल, असें देवानें सांगितलें होतें. २ सर्व माणसें आज्ञा मोडून पापी झालीं होतीं, तर न्यायाप्रमाणें त्यास नाश पावणें भाग होतें. ३ आपल्या पापाचें कांहीं प्रायश्चित्त करतां येईना. ४ पवित्र दूतांला देखील माणसांच्या पापाबद्दल कांहीं प्रायश्चित्त करितां येईना. यास्तव हें काम करण्यासाठीं देवानें आपला पुत्र पाठविला. योह. ३:१६. १ योह. ४:१०. १ पेत्र. १:१८, १९. मग. १३:८. यो. १:२९. एफे. ५:२. इब्री. ८:२७. यशा. ५३.

२८–३४. मार्क. १०:४६-५२. लूक. १८:३५–४३. १९:१ पाहा. यरीहो हें यार्देन नदीच्या पश्चिमेस सुमारें चार कोस व यरूशालेमाच्या पूर्वोत्तरेस सुमारें नऊ कोस होतें. यहोशवानें कनान देशांत पोंचल्यावर हें पहिलेंच नगर हस्तगत केलें. यहोश. ३:१६.६:२०,२१,२६. जो कोणी तें बांधायास प्रयत्न करिल त्यावर जी शपथ यहोशवानें घातली ती पुढें पांचशें वर्षांनंतर आहाब राज्याच्या कारकीर्दीत पूर्ण झाली. १ राजे. १६:३४. मागून तेथें भविष्यवाद्यांची शाळा होती, आणि अलिशानें तेथें मोठा चमत्कार केला. २ राजे. २:५,२१. तेथें महान हेरोद राजा मरण पावला. हें मोठें नगर होतें पण आतां तें पन्नास घरांचें लहान गांव आहे.

३० "दोन अंधळे." यानी खीस्ताविषयीं ऐकिलें होतें आणि हा चांगला प्रसंग आहे असें समजून त्यानीं आग्रहानें त्याचें साह्य मागितलें. "दाविदाच्या पुत्रा." खरा मशीहा दाविदाच्या वंशांत व्हायाचा होता ह्मणून ही संज्ञा पडली. गीत. १३२:११,१२.८९:३,४.

ते अधिकच ओरडत बोलले, हे प्रभू, दाविदाच्या पुत्रा, आह्मावर दया कर.

३२ येशूने उभें राहून त्यांस बोलावून ह्मटलें, म्यां तुह्मासाठीं काय करावें ह्मणून मागतां?

३३ ते त्याला ह्मणाले, हे प्रभू, आमचे डोळे उघडावे.

३४ तेव्हां येशूला कळवळा येऊन त्याने त्यांच्या डोळ्यांस हात लाविला, आणि लागलेंच त्यांच्या डोळ्यांस दिसूं लागलें, आणि ते त्याच्या मागें चालले.

---

३४ "डोळ्यांस हात लाविला." तुझ्या विश्वासानें तुला तारिलें आहे, असेंहि बोलला ह्मणून मार्कस व लूका ह्मणतात. त्यांचे डोळे उघडायास विश्वासाच्या ठायीं कांहीं सामर्थ्य नव्हतें, परंतु त्यांस विश्वास होता ह्मणून त्यांनीं ख्रीस्ताचें साह्य मागितलें. तसेंच पापापासून तारायास विश्वास समर्थ नाहीं. तथापि गरीब, अंधळे, लाचार, पापी हे विश्वासेंकरून येशूकडे शरण जातात, आणि तो सर्वांस तारायास समर्थ आहे. हा प्रसिद्ध चमत्कार होता. १ हे अंधळे बहुतेकांस माहित होते. २ ते येशूच्या ओळखीचे नव्हते, आणि त्यानें मोठ्या समुदायाच्या देखतां त्यांचे डोळे उघडले. ३ ते त्याच्या मागें चालले आणि त्यांनीं देवाची स्तुति केली. (मार्क. व लूक.) लोकांनीहि देवाची स्तुति केली. (लू.) वास्तविक चमत्कार झाला आहे अशी सर्वांची खातरी झाली.

**सूचना** १ कित्येक देवाच्या सेवेंत दुसऱ्यापेक्षां उपयोगी असतात. जीं फळें सौख्यलोकांत मिळतील तीं एकसारखींच होतील, असें नाहीं, परंतु ईश्वर कोणाचाहि अन्याय करणार नाहीं. जें मिळतें तें कृपेनें मिळतें तर कोणालाहि हक्क नाहीं. ईश्वर फळ द्यायास बोलावील तोंपर्यंत त्याच्या सेवेंत तत्पर असावें असें करणें सर्वांस अवश्य आहे. फळ हें कृपादान आहे, यास्तव कुरकुर करण्याची जागा कोणासहि नाहीं.२ जे अकराव्या तासीं कामास लागले त्यांच्या गोष्टीवरून असें दिसून येतें कीं फार वयांत असतांहि कित्येक लोक कदाचित् ईश्वराकडे फिरतील, परंतु असी गोष्ट क्वचित् घडती. वृद्ध पापी फारकरून वळत नाहींत. ते जसे जगतात तसे मरतात. तर उशीर लावूं नये. लहानपणापासून देवाच्या सेवेंत तत्पर असून मरणास सिद्ध असावें. आईबापानीं आपल्या लेंकरांसाठीं उंच मानाची पदवी व जागा शोधण्याविषयीं संभाळावें. ओ. २०—२२. नम्रता हीच सुभक्तीचा परिणाम आहे. ३ त्या अंधळ्याच्या गोष्टीवरून सर्व पाप्यांची गत दाखविली आहे. (१) सर्व

## अध्याय २१.

१ नंतर (१) ते येरूशलेमाजवळ येऊन जाइत झाडांच्या डोंगरा-
पासीं बेथफागे एथवर पोहंचले, तेव्हां येशूने दोघां शिष्यांस पाठवितां-
ना त्यांस सांगितलें कीं,

२ तुह्मी आपल्या समोरच्या गांवांत जा, ह्मणजे लागलेंच बांध-
लेली गाढवी व तिच्या बरोबर शिंगरूं तुह्मास मिळेल; त्यांस सोडून
मजकडे आणा.

३ आणि कोणी तुह्मास कांहीं ह्मटलें तर प्रभूला याची गरज
आहे असें सांगा, ह्मणजे तो तेव्हांच त्यांस पाठवील.

---

(१) मार्क. ११:१. लूक. १९:२९.

---

माणसें देवाचे गुण व गौरव आणि आपलें सर्वकाळचें हित यांविषयीं पापा-मुळें अंधळीं झालीं आहेत. (२) तर त्यानी ख्रीस्ताला हाक मारावी. केवळ त्याच्याच साह्याने त्यांचे डोळे उघडतील. (३) हल्लींचा प्रसंग पाहा. ख्रीस्त दुसऱ्याने त्या वाटेने गेला नाहीं; तो प्रसंग चुकला तर त्यांचे डोळे कधीं उघडले नसते. येशू तारायास सिद्ध आहे इतक्यांत पाप्यानी त्याला शरण जावें. (४) लोकानी धमकाविलें व ते हसले तरी ख्रीस्ताला हाक मारल्या-वांचून राहूं नये. (५) जे आग्रह करितात त्यांचें मागणें निष्फळ होणार नाहीं. ख्रीस्त ऐकेल व त्यांस तारील. (६) परंतु पाप्यानी उठून यावें. त्यानी तारण साधून घ्यायास झटावें, नाहीं तर ख्रीस्त त्यांस तारणार नाहीं.

१—१६. मार्क. ११:१—११. लू. १९:२९—४४ पाहा.

१ "ते यरूशलेमाजवळ येऊन." ते यरीहोपासून येत होते. ती वाट खडकांतून चालली. लूक. १०:३०. जाइत डोंगराच्या पश्चिमेस गेथसेमने बाग होता आणि पूर्वेस बेथफागे व बेथानी हे गांव होते. हा डोंगर सुमारें एक मैल लांब व सातशें फूट उंच आणि त्यावरून यरूशलेम शहर सगळें दिसतें.

२ "बांधलेली गाढवी." राजे गाढवांवर बसून स्वारी करीत असत. न्या. १०:४. १२:१४. १ शमु. २५:२०. १ राजे. १:३३.

३ "प्रभूला यांची गरज इ." धन्याने गाढवी धाडावी ह्मणून हा निरोप पुरा होता. त्या प्रांतांत ख्रीस्ताने लाजरसाला मेलेल्यांमधून उठाविलें व अनेक चम-त्कार केले होते, आणि हा खरा मशीहा असी बहुतेकांची खातरी झाली होती

४ तेव्हां भविष्यवाद्याकडून जें सांगितलें होतें (१) तें पूर्ण व्हावें
ह्मणून हें सर्व झालें; तें असें कीं,
५ जीयोनाच्या कन्येला सांगा, (२) पाहा, तुझा राजा नम्र होऊन
गाढवावर, गाढवीचें वचें शिंगरूं यावर बसून तुजकडे येत आहे.
६ तेव्हां शिष्यानी जाऊन येशूने त्यांस सांगितल्याप्रमाणें केलें;
७ आणि गाढवी व शिंगरूं हीं आणिलीं, आणि त्यांवर आपलीं
वस्त्रें घालून त्यांवर त्याला बसविलें.
८ तेव्हां मोठ्या समुदायाने आपलीं वस्त्रें वाटेवर पसरलीं, आणि
दुसऱ्यानी झाडांच्या डाहाळ्या तोडून वाटेंत पसरिल्या.
९ आणि पुढें चालणारे व मागें चालणारे समुदाय ओरडत बोलले,
दाविदाच्या पुत्राला होसान्ना; प्रभूच्या नांवाने येणारा धन्यवादित (३)
असो; परम उंचांमध्यें होसान्ना. (४)
१० मग तो यरूशलेमांत आल्यावर सर्व नगर गलबलून बोललें,
हा कोण ?
११ तेव्हां समुदाय ह्मणाले; गालीलांतील नाजारेथकर येशू भवि-
ष्यवादी हाच आहे.

---

(१) जख. ९:९. (३) गीत ११८:२६. मात्थ. २३:३९.
(२) यशा. ६२:११. मार्क. ११:४. इ. योह. १२:१५. (४) लूक २:१४.

---

१—६ "हें सर्व झालें इ." जख. ९:९. पाहा. जीयोनाची कन्या ह्मणजे यरूशलेम. ज्या डोंगरावर तें शहर वसलें त्यांतील एकाचें नांव जीयोन आहे.

७, ८ "त्यांवर आपलीं वस्त्रें घालून इ." असें करून त्यानी त्याचा सन्मान केला. २ राजे. ९:१३. दुसऱ्यानी आपलीं वस्त्रें व झाडांच्या डाहाळ्या वाटेवर पसरून त्याला मान दिल्हा. जेव्हां कोणी विजयी वीर अथवा राजा आपल्या राज्यांत येई तेव्हां त्याच्या पुढें फुलें, माळा वगैरे घालावीं ही सन्मान व उत्साह करण्याची चाल फार रूढींत होती.

९—११ "होसान्ना." हा धांवा करण्याचा किंवा जयाचा शब्द आहे. यहूदी आपले सण पाळितांना गीतें ११९—११८ हीं गात असत, आणि लोक होसान्ना व हालिलुया हीं उत्तर वाक्यें मध्यें मध्यें ह्मणत असत.

१२ नंतर (१) येशू देवाच्या देवळांत गेला, आणि देवळांत विकणारे व विकत घेणारे या सर्वांस त्याने बाहेर घालवून दिल्हें, आणि सराफाचे चौरंग व खबुत्रें विकणाऱ्यांच्या बैठकी उलथ्या केल्या;

(१) मार्क. ११:११. लूक. १९:४५. इ. योह. २:१५. इ.

१२—२२ मार्क. ११:१२—१९. लू. १९:४६—४८ पाहा. "देवळांत गेला." शलमोन राजाने पहिलें देऊळ ख्रीस्तापूर्वीं सुमारें १००५ वर्षांनी बांधलें होतें. तें बांधायास सात वर्षे लागलीं. १ राजे. ६:३८. हें देऊळ नबूखद्नेसराने ख्रीस्तापूर्वीं ५८४ वर्षी मोडून टाकिलें. २ काल. ३६:६,७,१९. मग यहूदी बाबिलेपासून परत आल्यावर जरुब्बाबेलाने फिरून बांधलें. परंतु हें दुसरें देऊळ पहिल्यापेक्षां इतकें हलकें होतें कीं वृद्ध माणसें पाहून रडलीं. तें कांहीं मोडकें झालें आणि हेरोद आपलीं दुष्ट व क्रूर कामें यांवरून यहूदी प्रतिकूल आहेत हें पाहून त्यांस अनुकूल करण्यास ख्रीस्तापूर्वीं सुमारें १६ व्या वर्षी तें नीट करूं लागला. त्याने तें पूर्वीपेक्षां शोभायमान केलें. ख्रीस्त या दुसऱ्या देवळांत आला तेव्हां हग्गाई २:८. हा भविष्यलेख पूर्ण झाला. हें देऊळ दुरुस्त करितांना हेरोदाने १८००० माणसें लाविलीं आणि नऊ वर्षांनी तें सिद्ध झालें, परंतु तो पुढें त्याला अधिक सुशोभित करीत गेला. (यो. २:२०) हें देऊळ त्या शहरांतील दुसऱ्या सर्व इमारतींपेक्षां अधिक शोभायमान होतें. त्याचें महाद्वार ११५ फूट उंच व ३७ फूट रुंद होतें. योसेफस ह्मणतो कीं सूर्य उगवते वेळेस त्यावर इतकें तेज प्रकाशे कीं पाहाणाऱ्यांस आपलें तोंड मुरडावें लागे. आंतली किंवा सर्वांहून पवित्र खोली ३० फूट चौरस होती. तींत कराराची पेटी व संकेत लेखाच्या पाट्या आणि पेटीवरती दयासन व करूब असें ठेवीत असत. या खोलींत प्रमुख याजक वर्षांतून एकदां जाई आणि दुसरा कोणी कधीं जात नसे. रोमी लोकांनी या देवळाचा अगदीं नाश केला तेव्हां ख्रीस्ताने जें भविष्य सांगितलें होतें (मात्थी. २४:२) तें पूर्ण झालें. ज्युलयन जो धर्मत्याग करणारा तो फिरून बांधूं लागला, परंतु भूमींतून अग्नीचे गोळे निघूं लागले यामुळें बांधणाऱ्यांस तें काम सोडावें लागलें. "बाहेर घालवून दिल्हें." हें देवळाच्यांत नव्हे तर परदेशाच्या अंगणांत झालें. या अंगणांत देवळांतल्या सेवेसाठीं जें कांहीं काम लागेल तें करावें हें अयोग्य वाटलें नाहीं. पण उत्तरोत्तर ते आपल्या संसाराचें काम तेथें कपट व दगलबाजी करून चालवूं लागले, आणि हें अगदीं अनुचित होतें.

१३ आणि त्याने त्यांस सांगितलें, माझें घर प्रार्थनेचें घर ह्मण-
तील (१) असें लिहिलें आहे; परंतु तुह्मी तें लुटाऱ्यांची गुहा (२) असें
केलें आहे.

१४ मग अंधळे व लंगडे देवळांत त्याकडे आले, आणि त्याने
त्यांस बरें केलें. (३)

१५ तेव्हां त्याने केलेले चमत्कार पाहून, आणि देवळांत लेंकरें
दाविदाच्या पुत्राला होसान्ना, असें ओरडतांना ह्मणत आहेत, हेंहि
पाहून मुख्य याजक व शास्त्री रागें भरले;

१६ आणि त्याला ह्मणाले, हे काय बोलतात हें ऐकतोस काय?
तेव्हां येशूने त्यांस ह्मटलें, होय; बाळकें व तान्हीं यांच्या तोंडांतून
(४) त्वां स्तुति पूर्ण करविली आहे, हें तुह्मी कधीं वाचिलें नाहीं काय?

१७ नंतर तो त्यांस सोडून नगराबाहेर बेथानीस गेला, आणि
तेथें वस्तीस राहिला.

१८ अणखी सकाळीं तो फिरून नगरास जातांना त्याला भूक
लागली.

१९ तेव्हां वाटेवर अंजिराचें झाड पाहून (५) तो त्याकडे गेला;

---

(१) यशा. ५६:७. (३) यशा. ३५:६. (५) मार्क. ११:१३.
(२) इर्म. ७:११. (४) गीत. ८:२.

---

१३—१८ "असें लिहिलें आहे इ." यशा. ५६:७. ख्रीस्त त्यांस धमकावून व घालवून कसा निर्भय राहिला? आणि त्यांनी कां मानिलें बरें? याविषयीं हे विचार आहेत. १ ख्रीस्त अधिकाराने बोलला, आणि हा अधिकार व बोलणें योग्य असें त्यांच्या मनांत ठसलें. २ त्यांचें मन साक्ष देत होतें कीं आपण करितों तें वाईट आहे. हा खरा मशीहा असें साधारण लोक मानीत होते. लोकांचीही खातरी पाहून मुख्य याजक व शास्त्री यांनी अधिक रागें भरून त्याचा जीव घेण्याचा एकोपा केला. मार्क. ११:१८,१९. लु. १९:४७,४८. मात्थी. २७:१८. ते हेवा करून ख्रीस्तासीं कुरकुर करूं लागले. ख्रीस्ताने त्यांच्या शास्त्रांतील (गीत. ८:२) वाक्य काढून त्यांस कुंठित केलें.

१९ "अंजिराचें झाड पाहून." फळ नाहीं ह्मणून ख्रीस्ताला कळलें नव्हतें,

परंतु त्यावर पानावांचून कांहीं मिळालें नाहीं; मग त्यानें त्याला ह्मटलें, यापुढें तुला फळ कधीं न येवो; मग तें अंजिराचें झाड तेव्हांच वाळून गेलें. (१)

२० नंतर शिष्य तें पाहून आश्चर्य करून ह्मणाले, हें अंजिराचें झाड किती लवकर वाळून गेलें.

२१ तेव्हांच येशूनें त्यांस उत्तर दिल्हें कीं, मी तुह्मास खचीत सांगतों, तुह्मास विश्वास असला (२) व तुह्मी संशय न धरिला, तर अंजिराच्या झाडाला केल्याप्रमाणें कराल असें केवळ नाहीं, तर तुह्मी या डोंगराला ह्मटलें कीं, तूं उपटून समुद्रांत पड (३) तर तें घडेल.

२२ आणि विश्वास धरून प्रार्थना करितांना जें कांहीं तुह्मी मागाल (४) तें सर्व तुह्मास मिळेल.

२३ नंतर (५) तो देवळांत जाऊन उपदेश करीत असतां मुख्य याजक व लोकांचे वडील त्याकडे येऊन ह्मणाले, कोणत्या अधिकारानें (६) हें करितोस, आणि हा अधिकार तुला कोणी दिल्हा?

---

(१) यहूदा १२. (४) मात्थ. ७:७. मार्क. ११:२४. मार्क. ५:१६. १ योह. ३:२२. ५:१४.
(२) मात्थ. १७:२०. १७:६. याक. १:६. (५) मार्क. ११:२७. लूक २०:१.
(३) मात्थ. ८:१२. (६) निर्ग. २:१४.

---

असें समजायाचें नाहीं, परंतु तो मनुष्यासारिखा बोलत व वागत होता. ज्या दिवसीं त्यानें विकणाऱ्यांस देवळांतून घालविलें त्याच सकाळीं अंजिराचें झाड त्यानें वाळविलें (मार्क.) असें दिसतें. यहूदी लोकांचा नाश होणार हें दर्शविण्यास ख्रिस्तानें तें झाड वाळविलें असें वाटतें. लूक १३.६.

२०—२२ ख्रीस्तानें या चमत्कारावरून शिष्यांचा विश्वास बळवायास यत्न केला. मोठी अडचण दूर करण्याविषयीं डोंगर हालविणें ही ह्मण लावीत असत. शिष्यांस बहुत पाठलाग व अडचणी लागणार होत्या आणि त्यांस यासाठीं सिद्ध करावें असी ख्रिस्ताची इच्छा होती. "तें सर्व तुह्मास मिळेल." हें वचन प्रेषितांसच दिल्हें होतें. प्रार्थनेविषयीं दुसरीं मोलवान वचनें आहेत, परंतु चमत्कार करण्याच्या शक्तीसारखें हें वचन प्रेषितांसच दिल्हें होतें.

२३–२७ मार्क. ११:२७—३३. लू. २०:१—९ पाहा. "कोणत्या अधिकारानें इ." ख्रिस्तानें आपल्या देवपणाविषयीं जीं प्रमाणें पटविलीं

२४ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, मीहि तुह्मास एक गोष्ट पुसतों, ती मला सांगाल तर कोणत्या अधिकाराने हें करितों, हें मीहि तुह्मास सांगेन.

२५ योहान्नाचा बातिस्मा कोठून झाला? आकाशापासून किंवा माणसांपासून? तेव्हां ते आपापल्यामध्यें विचार करूं लागले कीं, आकाशापासून ह्मणूं तर तो आह्मास ह्मणेल, असें असतां तुह्मी त्यावर विश्वास कां ठेविला नाहीं?

२६ आणि माणसांपासून ह्मणूं तर आह्मी लोकांस भितों, कारण कीं सर्व योहान्नाला भविष्यवादी (१) असें मानितात.

२७ तेव्हा त्यांनी येशूला उत्तर दिल्हें कीं, आह्मास ठाऊक नाहीं. मग तो त्यांस ह्मणाला, मी कोणत्या अधिकाराने हें करितों हें तुह्मास सांगत नाहीं.

२८ परंतु तुह्मास कसें वाटतें? एका माणसाला दोन पुत्र होते, (२) तो पहिल्याकडे जाऊन बोलला, मुला, आज माझ्या द्राक्षमळ्यांत जाऊन काम कर.

---

(१) मात्थ. १४:५. (२) लूक १५:११ इ.

---

त्यांकडे जर त्यांनी लक्ष लाविलें असतें तर असें विचारिलें नसतें. त्यांस ख्रीस्ताला उत्तर देणें भाग नव्हतें. ख्रीस्ताचा अधिकार उघड होता. त्याने आपली चमत्काराची शक्ति लपविली नव्हती. यास्तव त्याने योहान्नाच्या बाप्तिस्म्याविषयीं पुसून त्यांस कुंठित केलें. त्याला ठाऊक होतें कीं, योहान्न खरा भविष्यवादी असें जर कबूल होतील तर मी खरा मशीहा असेंहि कबूल करावें लागेल. कां कीं योहान्नाने त्याचा बाप्तिस्मा केला व त्याविषयीं साक्ष दिल्ही होती. आणि "माणसांपासून" असें बोलले तर त्यांची बेआब्रू होईल, असें ठाऊक होतें. कां कीं योहान्न खरा भविष्यवादी असी सर्व लोकांची खातरी होती. त्यांनी आपला दुमारा पाहिला. ह्मणून ते बोलले, "आह्मास ठाऊक नाहीं." पण हें बोलणें खोटें होतें. त्यांस ठाऊक होतें पण ते सांगेनात.

२८—३२. "एका माणसाला दोन पुत्र होते इ." या दोन पुत्रांवरून यहूदी लोक आणि जकातदार व पापी असे ख्रीस्ताने दर्शविले. "मी नाहीं जात." हें पाप्यांचें बोलणें होतें. ते आदीं देवाची सेवा करीनात. नंतर

२९ तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं मी नाहीं जात; तथापि तो कांहीं वेळानें (१) पस्तावून गेला.

३० मग दुसऱ्याकडे जाऊन त्याने तसेंच ह्मटलें, तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, महाराज, जातों, पण गेला नाहीं.

३१ या दोघांतून कोणत्याने बापाच्या आज्ञेप्रमाणें केलें? ते त्याला ह्मणाले, पहिल्याने. येशूने त्यांस ह्मटलें, मी तुह्मास खचीत सांगतों कीं, जकातदार व कसबिणी तुमच्या अगोदर देवाच्या राज्यांत जातात.

३२ कारण कीं योहान्न न्यायाच्या मार्गाने तुह्माकडे आला तरी तुह्मी त्यावर विश्वास ठेविला नाहीं; परंतु जकातदार (२) व कसबिणी (३) यांनी त्यावर विश्वास ठेविला; असें असतां तुह्मी तें पाहून त्यावर विश्वास ठेवण्यासाठीं पश्चात्ताप केला नाहीं. (४)

३३ अणखी एक दाखला ऐकून घ्या; कोणी घरधनी मनुष्य

(१) २ कल. ३३:१२, १३. १ करिं. ६:११. एफ. २:१-१३. (३) लूक.७:३७ इ.
(२) लूक ३:१२. (४) प्रग. २:२१.

योहान्नाचा व ख्रीस्ताचा उपदेश ऐकून ते पश्चात्ताप करून मान्य झाले. दुसरा बोलला कीं "महाराज, जातों, पण गेला नाहीं." यावरून शास्त्री व परोशी यांचें आचरण दाखविलें आहे. देवाच्या आज्ञा पाळण्याचें मीस धरून व बहुत बाह्यविधि करीत असतांहि ते वास्तविक देवाला प्रतिकूल होते, आणि ख्रीस्ताला वधस्तंभीं देण्याची संधि पाहत होते. "ते त्याला ह्मणाले, पहिल्याने." ते ठीक बोलले आणि असें बोलून त्यांनी आपल्याला दोषी ठरविलें. "देवाच्या राज्यांत जातात." ह्मणजे ख्रिस्ती होऊन आकाशलोकांत तुमच्या अगोदर जातील. तुह्मी स्वमताभिमानी व हट्टबुद्धीने अजून पश्चात्ताप करीत नाहीं. त्यांतील बहुतेक पश्चात्ताप करून विश्वास धरितात ह्मणून तारण पावतील. "योहान्न न्यायाच्या मार्गाने." योहान्नाने देवासमोर न्यायी ठरण्याचे खरे उपाय ह्मणजे पश्चात्ताप करणें, व ख्रीस्तावर विश्वास ठेवणें, असें शिकविलें. जकातदार व पापी यांनी त्याचें ऐकून पश्चात्ताप केला पण तुह्मी करीत नाहीं. तर जो पुत्र बोलला कीं महाराज, जातों, पण गेला नाहीं, त्यासारिखे तुह्मी आहां.

३३—४६ मार्क. १२:१—१२. लू. २०:९-१९. पाहा. देवाच्या मंडळीला उपमा देण्यास वारंवार द्राक्षमळा लावितात या ठिकाणीं यहूदी

होता त्याने द्राक्षमळा लाविला, (१) आणि त्याभोंवतें कुंपण घातलें, व त्यामध्यें द्राक्षारसासाठीं कुंड खणिलें, व माळा बांधिला; मग तो माळ्यांस सोंपून देऊन आपण प्रवासास गेला.

३४ नंतर फळांचा हंगाम आला, तेव्हां त्याचीं फळें घेण्याकरितां त्याने चाकरांस माळ्यांकडे पाठविलें. (२)

३५ तेव्हां (३) माळ्यानी त्याच्या चाकरांस धरून कोणाला ठोकिलें, कोणाला जिवें मारिलें, कोणाला धोंडमार केला.

३६ फिरून त्याने पहिल्यांपेक्षां अधिक अशा दुसऱ्या चाकरांस पाठविलें त्यासहि त्यानी तसेंच केलें.

३७ शेवटीं, ते माझ्या पुत्राची भीड धरितील, असें ह्मणून त्याने आपल्या पुत्राला त्यांकडे पाठविलें.

३८ परंतु माळी पुत्राला पाहून आपापल्यांमध्यें ह्मणाले, हा

(१) गीत ८०:८–१६. यशा. ५:१–७. इर्म २:२१. मार्क. १२:१. लूक २०:९. इ.
(२) २ राजे १७:१३. इ. (३) २ काल. ३६:१६. नहे. ९:२६. इर्म. २५:३–७. मात्थी. ५:१२. २३:३४–३७. प्रेषि. ७:५२. १थेस्स. २:१५. इब्री. ११:३६,३७. प्रग. १६:९.

लोकांला लाविला आहे. देवाने त्यांस निवडून मोठे उपकार व आशीर्वाद दिल्हे होते, आणि त्याविषयीं विशेष काळजी घेतली होती. "आपल्या चाकरांस इ." जे भविष्यवादी देवाने त्याकडे पाठविले होते त्यांसीं यहूदी जसें एथें सांगितलें त्याप्रमाणें वागले. लू. १३:३४. इब्री. ११:३७. १ शमु. २२:१८. १ राजे. १९:१०. इर्म. ४४:४,५,६. २ काल. ३६:१६. नहे. ४:२६. २ काल. २४:२०,२१.

३७ "शेवटीं, ते माझ्या पुत्राची भीड इ०" हा एकुलता व फार प्रिय पुत्र होता (मार्क.) देवाने आपला एकुलता पुत्र येशू ख्रीस्त पाप्यांसाठीं जीव द्यायाला कसा जगांत पाठविला, आणि असें करून त्याने केवढी प्रीति दाखविली हें या दाखल्यावरून मनांत ठसण्यासारिखें दिसून येतें कीं नाहीं! देवाने त्यांकडे बहुत वर्षांपासून भविष्यवादी पाठविले होते, परंतु त्यानी त्यांस धिक्कारिलें व जिवें मारिलें होतें. हा एकच उपाय राहिला आणि देवाने बापाच्या प्रीतीने व ममतेने आपल्या एकुलत्या पुत्राला दुष्ट पाप्यांसाठीं जीव द्यायास पाठविलें. यो. ३:१६,१७. १ यो. ४:९,१४. रोम. ८:३,३२. गल. ४:४.

३८ ईश्वर आशीर्वाद व उपकार करितो, त्या सर्वांचा उपभोग बळाने घ्यावा आणि कांहींच उतराई न करावी असी दुष्ट लोकांची इच्छा आहे.

वतनदार आहे, चला, (१) आपण याला जिवें मारूं व याचें वतन
घेऊं.

३९ तेव्हां त्यांनी त्याला धरून द्राक्षमळ्याबाहेर काढून जिवें
मारिलें. (२)

४० यास्तव द्राक्षमळ्याचा धनी आल्यावर तो त्या माळ्यांस
काय करील?

४१ ते त्याला ह्मणाले, तो त्या वाइटांचा मोठा नाश करील, (३)
आणि जे माळी हंगामीं त्याला फळें देत जातील, अशा दुसऱ्यांस
(४) द्राक्षमळा सोपून देईल.

४२ येशू त्यांस ह्मणाला, शास्त्रामध्यें तुह्मी हें कधीं वाचिलें नाहीं
काय? जो धोंडा (५) बांधणाऱ्यानी अव्हेरिला तो कोपऱ्याचा मुख्य
धोंडा झाला; हें प्रभूकडून झालें; आणि आमच्या पाहण्यांत आश्च-
र्याचें आहे.

---

(१) इब्री. १:१,२. (२) प्रेषि. २:२३. ४:२५-२७. (३) गीत. २:४,५,९. जख. १२:२. (४) लूक. २१:२४. रोम. ९:२६. ११:११. (५) गीत. ११८:२२. यशा. २८:१६. १ पेत्र. २:६,७.

---

३९ ख्रीस्ताने या वाक्यांत आपलीच गत सांगितली. यहुद्यानी त-
सेंच त्याला जिवें मारिलें, तेव्हां हें भविष्य पूर्ण झालें. मात्थी २७:२०–२९.
प्रेषि. २:२३. ७:५१,५२.

४०,४१ हें बोलून त्यानी आपल्याला दोषी व दंडपात्र ठरविलें. त्या
माळ्यांचा दोष उघड आणि धन्याने त्यांचा नाश करावा हें योग्य असें त्यांस
वाटलें. त्यानी ठीक ठरविलें. पाहा, ते दुष्ट माळी आपणच, असें ते सम-
जले नाहींत.

४२,४३ "येशू त्यांस ह्मणाला इ०" ख्रीस्त त्यांवर हा मोठा दोष लागू
करितो. "कोपऱ्याचा मुख्य धोंडा." ह्मणजे येशू ख्रीस्त. तोच ख्रिस्ती मंड-
ळीचा पाया व तो कृपा व आशा यांचा एकच आधार आहे. जसें त्यांच्या
शास्त्रांत लिहिलें होतें (गीत ११८:२२,२३.) त्याप्रमाणेंच त्यानी त्याला धि-
क्कारिलें. असें असतांहि हाच मंडळीचा शिरोभाग असें देवाने नेमून ठे-
विलें होतें. ख्रीस्ताने आपल्याला नीच करून जगांत यावें, आणि धिक्कार,
निंदा, दुःख व मरण देखील सोसावें, मग देवाने त्याला मेलेल्यांमधून उठ-
वून त्याकडून यहूदी व परदेशस्थ यांस तारावें हें पाहून सर्वांनी आश्चर्य व

४३ यास्तव मी तुह्मास सांगतों कीं, देवाचें राज्य (१) तुह्मापासून काढिलें जाईल, आणि जी प्रजा त्यांतलीं फळें देईल तिला मिळेल.
४४ आणि जो त्या धोंड्यावर (२) पडेल त्याचा चुराडा होईल, परंतु ज्या कोणावर तो पडेल त्याचा भुगा होईल. (३)
४५ तेव्हां मुख्य याजक आणि परोशी त्याचे दाखले ऐकून असें समजले कीं, हा आह्माविषयीं बोलत आहे.
४६ तेव्हां त्यानी त्याला धरायास पाहिलें, परंतु लोकांस भ्याले; कारण कीं ते त्याला भविष्यवादी असें लेखीत असत. (४)

---

(१) यशा. २८:२. (२) यशा. ८:१४,१५. (३) इब्री. २:२,३. (४) लूक. ७:१६. योह. ७:४०.

---

स्तुति करावी खरी. यहूदी देवाचे निवडलेले लोक व राज्यांतले पुत्र असे होते. परंतु त्या दुष्ट माळ्यासारखे वागून ते आपल्याच ठरावावरून दंडास व नाशास योग्य झाले होते. त्यांचा नाश लवकरच व्हायाचा आणि राज्य त्यांपासून जाऊन परदेशस्थांस मिळायाचें होतें (प्रेषि. २८:२८.) असें ख्रीस्तानें त्यांस स्पष्ट सांगितलें.

४४ "जो त्या धोंडयावर पडेल." यशा. ८:१४,१५. ख्रीस्ताने आपल्याला धोंडा ह्मटलें मग धोंडयावर पडण्याचें भय ह्मणजे जे ख्रीस्ताला अडवितात त्या सर्वांचा नाश होईल असें सुचविलें.

४५,४६ ख्रीस्ताने आपलें बोलणें असें लागू केल्यावर त्यांस समजलें कीं हा आह्माविषयीं बोलत आहे. परंतु आपण वास्तविक दोषी असें कबूल न होतां त्यानी केवळ अधिक रागें भरून लोकांला भ्याले नसते तर तेव्हांच त्याला धरिला असता. सूचना १ "ख्रीस्त सर्वज्ञ आहे." आह्मी शिष्यांसारिखा त्यावर भरवसा ठेवून त्याच्या आज्ञा पाळाव्या. ओ. २—४. २ ख्रीस्त जीवनाचा राजा आहे. तो राज्य करितो व सर्वकाळ करीलच. तर त्याचा मान व गौरव करण्यास आपलें सर्व तन, मन, धन याला अर्पावें यांत सुख मानावें. ओ. ३,७—९. ३ लेंकरानी ख्रीस्ताची प्रीति व स्तुति करायास शिकावें. त्यानी सेवा व स्तवन करावें हें ख्रीस्ताला बरें वाटतें. त्यानी लहानपणांत आपलें अंतःकरण ख्रीस्ताला देऊन त्याच्या सेवेस लागावें. ४ लोकानी या वेळेस ख्रीस्ताला मान दिल्हा. ओ. ९—१२. त्याला मोठा मान मिळणार आहे. तो आपल्या बापाच्या गौरवाने पवित्र दूतांसहवर्त्तमान फिरून येईल. तेव्हां आह्मी त्याला पाहूं आणि

तेव्हां सर्वांनी मिळून त्याची स्तुति करायास सिद्ध व्हावें म्हणून आतां प्रयत्न करावे. ५ मान मिळत असतांहि ख्रीस्त नम्र व लीन राहिला; या उत्साहामध्येंहि तो यरुशलेमाविषयीं रडला. (लू.) कोणी राजानें अथवा वीरानें असी करुणा कधीं दाखविली नाहीं. पापी व लाचार माणसांची त्याला अजूनहि दया येती. जो पश्चात्ताप करून ख्रीस्ताकडे शरण येतो त्याला तो अंगीकारायास तयार आहे. ६ पवित्र शास्त्र लेख हे सर्व पूर्ण होतील. (लू.) यरुशलेमाचा नाश होणार असें भविष्य ख्रीस्तानें सांगितलें तें भयंकर प्रकारें पूर्ण झालें. हीं प्रमाणें पाहून ज्यांची खातरी होत नाहीं कीं हाच खरा तारणारा ते तसाच नाश पावतील. ७ ख्रीस्तानें देऊळ शुद्ध केलें. ओ. १२. तसेंच आमचे अंतःकरण शुद्ध होऊन पवित्र आत्म्याच्या वस्तीसाठीं सिद्ध असावें. ईश्वर अशुद्ध देवळांत किंवा अपवित्र अंतःकरणांत राहत नाहीं. ८ आह्मी ख्रीस्तावर प्रीति करितों असें ह्मणून जर चांगलें फळ देत नाहीं तर जसें अंजिराच्या झाडाला, त्याप्रमाणें तो आह्मास शाप देईल. ओ. १९,२०. जर आह्मी नम्र व शुद्ध आचरण दाखवितों तर आह्मी खरे ख्रीस्ती आहों, नाहीं तर आह्मी ख्रीस्ती असें कितीहि ह्मटलें तरी तें व्यर्थ आहे. ९ माणसें अब्रू मिळवायास योग्य कीं अयोग्य असें फारकरून कांहींहि करायास मान्य होतात. ओ. २६ काय उचित होईल हें पाहत नाहींत, पण लोक काय ह्मणतील हें पाहतात. असीं माणसें सत्यता आपल्या हेतूस बाधक होईल असें वाटलें तर खोटें बोलतील. ओ. २७. १० आपण जातों, असें बोलून न जाणारे असे बहुत लोक आहेत. ओ. ३०. हा मार्ग खरा, हा येशू ख्रीस्त खरा तारणारा, असें जे ह्मणतात आणि पुढें पश्चात्ताप करूं व विश्वास ठेवूं असें वचन देतात परंतु पाप करीत जातात, ते नाश पावतील. ११ ईश्वरानें आपल्या सेवकांस भ्रष्ट जगांत पाप्यांस सुमार्गावर आणावयास पाठवावें यांत त्याची मोठी दया दिसून येती. ओ. ३३—३८. त्यानें एकामागें एक असे पुष्कळ भविष्यवादी पाठविले आणि लोकांनी त्यांस जिवें मारिलें. परंतु देवाची दया अपार. ती अद्याप संपली नाहीं. हजारों लोक शुभवर्त्तमान गाजवितांना मरण पावले, तथापि ईश्वर अजून आपल्या चाकरांस पाठवून या दुष्ट जगाला पश्चात्ताप करायास व विश्वास धरून तारण घ्यायास बोलावीत आहे ही दया अनंत आहे. जर माणसें हट्टबुद्धि धरून पश्चात्ताप करणार नाहींत तर जें तारण त्यांस देऊं केलें आहे तें काढून दुसऱ्यांस द्यावें व त्यांचा नाश होऊं द्यावा हें किती योग्य आहे? जे ख्रीस्ताला धिक्कारतात त्या सर्वांचा नाश होईलच. ओ. ४४

१ तेव्हां येशू दाखल्यानीं पुन्हा त्यांस ह्मणूं लागला कीं;

२ आकाशाचें राज्य (१) कोणीएका राजासारिखें आहे; त्यानें आपल्या पुत्राचें लग्न केलें. (२)

३ आणि लग्नाला बोलाविलेल्यांस आणायाला त्यानें आपल्या चाकरांस पाठविलें, (३) परंतु ते येईनात.

४ पुन्हा त्यानें दुसऱ्या चाकरांस पाठवितांना ह्मटलें, बोलाविलेल्यांस सांगा, पाहा, म्यां आपलें जेवण तयार केलें आहे, आपले बैल व पुष्ट पशु मारिले; अवघें तयार आहे, लग्नाला चला.

५ परंतु हें कांहीं मनावर न घेतां (४) ते कोणी आपल्या शेताला कोणी आपल्या व्यापाराला गेले;

---

(१) लूका. १४:१६. (२) प्रग. १९:७,९. (३) गीत. ६८:११. इसा. २५:४. ३५:१५. प्रग. २२:१७. (४) गी. १०६:२४,२५. नी. १:२४,२५. प्रेषि. २४:२५. रोम. २:४.

---

२ "आकाशाचें राज्य." मात्थी. ३:२, यावरील व्याख्या पाहा. असें एका राजानें मेजवानी करून लोकांस बोलाविलें तसें ईश्वर पापी लोकांस तारणोपाय सिद्ध करून आपल्या राज्यांत बोलाविता. यहूदी लोकांनीं ख्रिस्ताला व शुभवर्त्तमानाला धिक्कारिलें असतां परदेशस्थानीं ऐकून स्वीकारिलें यांविषयीं ख्रिस्तानें हा दाखला सांगितला.

३ "आपल्या चाकरांस पाठविलें." ईश्वर आपले सेवक पाठवितो असें कीं त्यानीं शुभवर्त्तमान गाजवावें आणि पाप्यांस त्याच्या राज्यांत बोलवावें. "ते येईनात." तसेंच ईश्वर सर्वांस बोलाविता आणि खुशी असली तर सर्वांनीं यावें. परंतु बहुत यावयास इच्छीत नाहींत आणि शेवटीं सर्व सृष्टीच्या समक्ष उघड होईल कीं ते येईनात याच कारणास्तव ते नाश पावले.

४ "दुसऱ्या चाकरांस इ." यासाठीं कीं त्यानीं आग्रह करून त्यांस बोलावून आणावें. तसें ईश्वर पाप्यांचें फार सहन करितो आणि अनेक सेवक पाठवून त्यांस फिरून फिरून बोलाविता.

५ "परंतु हें कांहीं मनावर न घेतां इ." तसेंच पापी शुभवर्त्तमान तुच्छ मानितात आणि देवाची कृपा अव्हेरितात. देव आणि सौख्यलोक यांपेक्षां ते संसारावर अधिक प्रीति करितात आणि त्यांत निमग्न होऊन ऐहिक लाभ मिळविण्यासाठीं आपल्या जीवात्म्याचा नाश पावतात.

६ आणि वरकडानी त्याच्या चाकरांस धरून गांजिलें (१) व जिवें मारिलें.

७ तेव्हां राजा ऐकून रागें भरला, आणि आपलीं सैन्यें पाठवून त्याने त्या घातकांचा नाश केला (२) व त्यांचें नगर जाळून टाकिलें.

८ मग तो आपल्या चाकरांस ह्मणाला, लग्न तयार आहे खरें, परंतु बोलावलेले योग्य नव्हते. (३)

९ यास्तव तुह्मी मार्गांच्या चवाठ्यांवर जाऊन जितके तुह्मास मिळतील तितक्यांस लग्नाला बोलावा.

१० मग त्या चाकरानीं बाहेर मार्गांत जाऊन बरे वाईट जितके त्यांस मिळाले, (४) त्या सर्वांस एकवट केलें, आणि बसणाऱ्यानीं लग्नाची जागा भरून गेली.

---

(१) १ थेस्स. २:१५. (२) दान. ९:२६. लूक. १९:२७. (३) मात्थ. १०:११,१२. प्रेषि. १३:४६. प्रग. ३:४, २२:१४. (४) मात्थ. १३:४७.

---

६ "आणि वरकडानी इ." कितीएक तें आमंत्रण तुच्छ मानून आपल्या कामावर गेले. परंतु दुसऱ्यानी महद्द्वेष दाखवून चाकरांस गांजिलें आणि जिवें मारिलें. तसें कोणी पापी केवळ उपेक्षा करितात आणि तुच्छ मानितात, परंतु दुसरे ख्रीस्ताचा व ख्रिस्ती लोकांचा फार द्वेष करितात आणि त्यांस जिवें मारायास पाहतात. त्या लोकानीं राज्याच्या द्वेषामुळें चाकरांसीं जसें केलें, तसेंच आतां पापी लोक देवाचा व ख्रीस्ताचा द्वेष करितात ह्मणून ते उपदेशकांवर दोष ठेवितात आणि त्यांस गांजितात.

७ यहूदी लोकानीं भविष्यवाद्यांस जिवें मारिलें होतें. शेवटीं ख्रीस्त जो देवाचा एकुलता पुत्र त्याला मारलें यामुळें परमेश्वराने त्यांचा व यरूशलेमाचा नाश केला. ख्रीस्ताने सुचविलें तसेंच सुमारें तीस वर्षांनी झालें. रोमी सैन्यानें येऊन त्यांचा अति नाश केला.

८ "बोलाविलेले योग्य नव्हते." जे ख्रीस्ताला नाकारून देवाची कृपा अव्हेरितात ते आकाशलोकांतलें सुख पावण्यास योग्य नाहींत, खरें. अशानी नाश पावावा हें योग्य असें सर्वकाळपर्यंत समजेल.

९ याप्रमाणें देवाने यहूद्यांस सोडून परदेशस्थांस बोलाविलें.

१० "बरे वाईट इ." ह्मणजे सर्व प्रकारचे लोक. जन्मस्वभावाने कोणी चांगले नाहींत, तरी कितीएक दुसऱ्यांपेक्षां वाईट आहेत. ईश्वर सर्वांस बोलावितो आणि सर्वांसाठीं तारणोपाय सिद्ध झाला आहे.

११ मग राजा बसणाऱ्यांस पाहायास (१) आंत आला, तेव्हां लग्नाचा पोशाक (२) त्याला नव्हता अशा माणसाला त्याने पाहिलें.

१२ तेव्हां तो त्याला ह्मणाला, गड्या, लग्नाचा पोशाक ल्याल्यावांचून एथें कां आलास? तेव्हां तो उगाच राहिला. (३)

१३ मग राजाने चाकरांस सांगितलें, हात पाय बांधून त्याला न्या (४) व बाहेरील अंधारांत (५) टाका; तेथें रडणें व दांतखाणें होईल.

---

(१) जक. १:१२. (२) गीत. ४५:१४. यशा. ६१:१०. २ करिं. ५:३. एफ. ४:२४. प्रग. १६:१५:१९:८. (३) इमं. २:२६. (४) यशा. ५२:१. प्रग. २१:२७. (५) मात्थी. ८:१२.

---

११ "लग्नाचा पोशाख ल्याला नव्हता इ." प्राचीन काळीं जेव्हां कोणी मेजवानी करीत तेव्हां ते वस्त्रें तयार करीत असत, असें कीं ज्यांस बोलाविलें त्यांनी येऊन तीं वस्त्रें घालावीं आणि मग आंत येऊन बसावें. हा माणूस लग्नाचें वस्त्र घातल्यावांचून आंत गेला, आणि असें करून त्याने राज्याचा मोठा अपमान केला. जे ख्रीस्ताचें पुण्य अव्हेरून आपल्या पुण्यावर भरवसा ठेवितात ते या माणसासारिखे आहेत. ख्रीस्ताने तारणोपाय सिद्ध केला; सर्व पाप्यांसाठीं पुरून उरेसें पुण्य त्याने केलें, असें कीं जे त्याला शरण येतील त्यांकडे ख्रीस्ताचें पुण्य मोजलें जाईल आणि ते तारण पावतील. परंतु बहुत लोक ख्रीस्तावर भाव न ठेवितां आपलें मळीण चिंध्या झालेलें वस्त्र घालून येतात, ह्मणून जसें राज्याने त्या माणसाशीं केलें तसें ईश्वर त्यांस करील. ख्रीस्ताने आपला जीव देऊन मोठा तारणोपाय सिद्ध केला. तर जे आपल्याला पुण्यवान मोजून ख्रीस्ताचें पुण्य अव्हेरितात ते ईश्वराचा फार अपमान करितात, आणि जेव्हां तो त्यांचा हिशोब घेईल तेव्हां त्यांस बाहेरील अंधारांत टाकील.

१२ "तो उगाच राहिला." जे शेवटीं नाश पावतील ते अनुत्तर होतील, त्यांचें मन साक्ष देईल कीं दोष आह्माकडेच आहे. देवाने आह्मास बोलाविलें, ख्रीस्ताने आपल्या रक्ताकडून देखील आह्मासाठीं प्रायश्चित्त केलें आणि तारणोपाय केला, परंतु आह्मी अंगिकारिलें नाहीं. आह्मी आपला नाश करून घेतला असें पाहून त्यांचें मन फारच खाईल.

१३ "बाहेरील अंधारांत." मात्थी. ८:१२, यावरील टीका पाहा. ह्मणजे सर्व ढोंग्यांस आणि अपश्चात्ताप्यांस जो दंड परलोकीं लागणार त्यांत.

१४ या प्रकारें बोलावलेले बहुत, (१) परंतु निवडलेले थोडके आहेत.

१५ नंतर (२) परोश्यानी जाऊन बोलण्यामध्यें त्याला फाशांत कसें पाडावें याविषयीं मसलत केली.

१६ आणि त्यानी आपल्या शिष्यांस हेरोदी यांसुद्धां त्याजकडे पाठवून ह्मटलें, हे गुरु, आह्मास ठाऊक आहे कीं, तूं खरा आहेस, आणि देवाचा मार्ग खरेपणानें सांगतोस, आणि कोणाची काळजी धरीत नाहींस; कारण कीं माणसांच्या तोंडाकडे तूं पाहत नाहींस.

१७ तर तुला कसें वाटतें, काइसाराला पट्टी देणें हें योग्य आहे किंवा नाहीं; हें आह्मास सांग.

---

(१) मात्थी. ७:१४. २०:१६. लूक. १३:२३, २४. (२) मार्क. १२:१३. इ. लूक. २०:२०. इ.

---

१४ यहूदी बोलाविलेले होते परंतु त्यांतील थोडके तारण पावण्यासाठीं निवडलेले होते. त्यांतील बहुतएक ख्रिस्ताला नाकारून नाश पावले. तसें दुसऱ्या राष्ट्राविषयीं. ईश्वर सर्वांस बोलावितो परंतु जे ऐकून शुभवर्तमान अंगीकारितात आणि त्याप्रमाणें चालतात ते थोडके आहेत. विशेषेंकरून ख्रिस्ताच्या वेळेस खरे विश्वासणारे ते थोडकेच होते.

१५—२२ मार्कस. १२:१३—१७. लूक. २०:२०—२६ पाहा.

१५ हल्लींहि या परोश्यांसारिखे बहुत लोक आहेत. खरेपण काय हें समजायास ते इच्छीत नाहींत, केवळ खिस्ती लोकांस कुंठित करावें अथवा फाशांत पाडावें एवढीच त्यांची इच्छा आहे.

१६ "हेरोदी." ह्मणजे जे हेरोदासारिखे रोमी सर्काराला अनुकूल होते ते. काइसाराला पट्टी देणें योग्य आहे असें ते ह्मणत असत. परंतु हें मत यहूदी आणि विशेषेंकरून परोशी अंगीकारीनात. परक्या राजाला पट्टी देणें हें मोश्याच्या शास्त्राविरुद्ध आहे (अनु. १७:१५) असें ते ह्मणत असत; तर पट्टी देऊं नये, असें ह्मटलें ह्मणजे हेरोदी त्याजवर दोष ठेवितील आणि द्यावी असें ह्मटलें ह्मणजे परोशी आणि बहुतकरून सर्व लोक हा दोषी व शास्त्र मोडणार असें ठरवितील ह्मणून त्यांस ठाऊक होतें. तर त्याने आमच्या प्रश्नाचें कसेंहि उत्तर दिल्हें तरी तो फाशांत पडेल असें त्यांस वाटलें. "तूं खरा आहेस इ." हें सर्व खरेंच होतें तथापि ते आपला हेतु लपविण्यासाठीं केवळ ढोंगानें बोलले.

१७ "काइसाराला." हें नांव ज्युलियस काइसार याच्या मागून सर्व रोमी

१८ तेव्हां येशू त्यांचें दुष्टपण जाणून बोलला, अहो ढोंगी, माझी परीक्षा कां पाहतां?

१९ पट्टीचा पैका मला दाखवा. तेव्हां त्यांनी त्याजकडे पावली आणिली.

२० मग त्याने त्यांस ह्मटलें, हा मुखवटा व पत्ता कोणाचा?

२१ ते त्याला ह्मणाले, काइसाराचा; तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, तर काइसाराचें काइसाराला, (१) व देवाचें देवाला (२) भरून द्या.

२२ तेव्हां हें ऐकून ते आश्चर्य करूं लागले, आणि त्याला सोडून गेले.

२३ त्याच दिवशीं (३) पुन्हा उठणें नाहीं असें ह्मणणारे सदोकी (४) यांनी त्याजकडे येऊन त्याला विचारिलें कीं,

२४ हे गुरु, मोश्याने सांगितलें कीं, कोणीएक लेंकरें झाल्या-

(१) मात्थ. १७:२५,२७. रोम. १३:७. (२) मला. १:६–८; ३:८-१०. (३) मार्क. १२:-१८. इ. लूक. २०:२७. इ. (४) प्रेषि. २३:८.

बादशाहांला देत असत. त्यांनी हा प्रश्न केला त्या वेळेस तिबेरयस जो फार तुच्छ व दुष्ट होता तो राज्य करीत होता.

१८ "त्यांचें दुष्टपण जाणून इ." यावरून ख्रीस्त अंतर्साक्षी होता असें प्रमाण पटतें. "अहो ढोंगी." त्यांचें ढोंग ख्रीस्ताने पाहिलें आणि याचा दोष त्यांजवर स्पष्टपणें लाविला.

२१,२२ तो पैका काइसाराचा आहे असें प्रमाण त्याची आकृति व पत्ता यांवरून पटलें, ह्मणून त्याला द्यावा हें योग्य होतें. ज्याचें त्याला देणें हें मत योग्य. परंतु जें जें आह्मास आहे तें सर्व देवाने दिल्हें तर जी काइसाराचीं तीं काइसाराला देणें योग्य असल्यास किती विशेषेंकरून जीं देवाचीं तीं देवाला देणें योग्य आहे. याप्रमाणें ख्रीस्ताने जरी हेरोद्याचें मत धरण्यासारिखें उत्तर दिल्हें तरी त्याने त्याचें ढोंग आणि दुष्टपण उघडकीस आणून निषेधलें, असें कीं ते लाजले आणि विस्मित झाले, आणि लवकर त्याला सोडून गेले. त्याला फाशांत न पाडितां ते स्वतः कुंठित झाले.

२३—३२ मार्कस. १२:१८—२७. व लूका. २०:२७—३८. पाहा. "पुन्हा उठणें नाहीं." सदोक्यांच्या मताविषयीं मात्थी. ३:७. यावरील टीका पाहा. त्यांनी देहाचें पुन्हा उठणें नाकारलें असें केवळ नाहीं, परंतु दूत

वांचून मेला, (१) तर त्याच्या भावानें त्याची बायको घ्यावी, आणि आपल्या भावासाठीं संतति उत्पन्न करावी.

२५ तर आह्मामध्यें सात भाऊ होते, त्यांतला पहिला लग्न करून मेला; आणि त्याला संतति नसतां त्याची बायको त्याच्या भावासाठीं राहिली.

२६ दुसरा व तिसराहि सातव्यापर्यंत तसेंच.

२७ आणि सर्वांच्या मागून बायकोहि मेली.

२८ तर पुन्हां उठण्याच्या वेळेस ती त्या सातांतील कोणाची बायको होईल? कारण कीं ती त्या सर्वांची होती.

२९ तेव्हां येशूनें त्यांस उत्तर दिल्हें कीं, शास्त्र व देवाचें सामर्थ्यहि तुह्मी जाणत नाहीं (२) यामुळें चुकतां.

३० कारण कीं पुन्हा उठण्याच्या वेळेस ते लग्न करून घेत नाहींत व लग्न करून देतहि नाहींत, तर आकाशांतील देवाच्या दुतांसारिखे असतात. (३)

३१ आणि मेलेल्यांच्या पुन्हा उठण्याविषयीं देवानें जें तुह्मास सांगितलें, तें तुह्मी वाचिलें नाहीं काय?

(१) अनु. २५:५. रूथ. १:११. (२) योह. २०:९. (३) मात्थ. १८:१०. १ योह. ३:२.

नाहींत, परलोकवास नाहीं आणि मरणानंतर आत्मेहि नाहींत असें ते ह्मणत असत.

२५—२८ "सात भाऊ इ." असी गोष्ट कधीं घडली नसेल. परंतु साध्य होती आणि अवघड उदाहरण व्हावें ह्मणून त्यानी ही गोष्ट काढिली. जसी इहलोकीं तसी परलोकीं माणसांची अवस्था होईल असें त्यांस वाटलें आणि सात नवऱ्यांची एकच बायको कसी होईल, ही त्यांची भ्रांति होती.

२९,३० "जाणत नाहीं यामुळें चुकतां." त्यानी पुन्हा उठण्याविषयीं खोटें मत धरलें होतें. पुन्हा उठण्यांत लग्न करून घेतील देतील असें शास्त्रांत कोठेंहि सांगितलें नाहीं. ख्रीस्तानें त्यांची चूक काढून त्यांस समजाविलें कीं माणसाची परलोकींची अवस्था वेगळी होईल. तेथें लग्नाचा संबंध राहणार नाहीं. याप्रमाणें सदोकी याची हरकत नाहींसी झाली.

३१,३२ एथें ख्रीस्त त्यांच्याच शास्त्रांतून पुन्हा उठण्याविषयीं प्रमाण काढून पटवितो. निर्ग. ३:६,१५. जेव्हां देवानें हें वाक्य सांगितलें तेव्हां

३२ कीं, मी आब्राहामाचा देव (१) व इझाकाचा देव व याकोबाचा देव आहें. देव हा मेलेल्यांचा देव नव्हे, जीवंतांचा आहे.

३३ तेव्हां हें ऐकून समुदाय त्याच्या उपदेशावरून आश्चर्य करूं लागले. (२)

३४ नंतर त्याने सदोकी कुंठित केले हें ऐकून परोशी एकवट झाले.

३५ तेव्हां त्यांतील एका शास्त्र्याने (३) त्याची परीक्षा पाहाण्याकरितां विचारिलें कीं,

३६ हे गुरु, नेमशास्त्रांत कोणती आज्ञा मोठी ?

३७ मग येशू त्याला ह्मणाला, (४) तुझा देव प्रभु यावर तूं आप-

---

(१) निर्ग. ३:६,१६. इब्री. ११:१६. (२) मात्थी. ७:२८. मार्क. १२:१७.
(३) लूक १०:२५. इ. (४) अनु. ६:५; १०:१२.

---

आब्राहाम, इझाक आणि याकोब मरून गेले होते तरी देवाने सांगितलें कीं मी त्यांचा देव आहें. तर ते त्या वेळेस होते असें असावें; कारण जे नाहींसे झाले त्यांचा देव तो कसा होईल? तो मेलेल्यांचा, ह्मणजे जे नाहींसे झाले त्यांचा नव्हे तर जीवंतांचा देव आहे. याप्रमाणें त्यांच्याच शास्त्रावरून देखील त्यांचें मत खोटें पटलें.

३४–४० मार्क. १२:२८–३४. पाहा. सदोकी कुंठित झाले यावरून परोशी हर्ष पावले असतील, तरी तेहि ख्रीस्ताचे शत्रु होते आणि अभिमान धरून आपण त्याला फाशांत पाडूं असें मनांत आणून आले.

३५ हेरोदी यानी ख्रीस्ताची परीक्षा राजनीतीविषयीं आणि सदोक्यानीं पुन्हा उठण्याविषयीं घेतली होती. आतां परोशी शास्त्राविषयीं त्याची परीक्षा पाहतात.

३६ "कोणती आज्ञा मोठी?" याविषयीं यहूदी पुष्कळ वाद करीत असत. कोणी कोणी यज्ञपशु विशेष असें ह्मणत. दुसरे कित्येक सुंता विशेष आहे असें ह्मणत असत.

३७ "येशू त्याला ह्मणाला इ." मार्कस ह्मणतो कीं आदीं तो बोलला, हे इस्राएला, तूं ऐक, प्रभु आमचा देव तो एक प्रभु आहे. देव एकच हा सिद्धांत मुख्य आणि मूळचा आहे ह्मणून ख्रीस्ताने या ठिकाणीं काढिला. मग या एकाच देवावर कसी प्रीति करावी, ही सर्वाहून विशेष व भारी गोष्ट आहे असें त्याने दाखविलें. "सर्व अंतःकरणाने इ." ह्मणजे दुसऱ्या सर्व गोष्टींपेक्षां देवावर अधिक निष्ठा व प्रीति करावी. दुसरा कोणी अथवा

त्या सर्व अंतःकरणानें व आपल्या सर्व जिवानें व आपल्या सर्व मनानें प्रीति कर;

३८ हीच पहिली व मोठी आज्ञा आहे.

३९ आणि दुसरी ती इजसारिखी आहे कीं, (१) तूं जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर.

४० या दोन आज्ञांत सर्व नेमशास्त्र व भविष्यशास्त्र आटलीं आहेत. (२)

---

(१) लेवी १९:१८. (२) रोम. १३:९. याक. २:८.

---

कोणतीहि वस्तू अंतःकरणाला इतकी प्रिय नसावी. आपल्या जीवावर देखील इतकी प्रीति नसावी. जो कोणी या आज्ञांप्रमाणें करितो तो देवाच्या गौरवाकरितां आपला जीव द्यायास तयार आहे. आपलीं अवघीं देवाला सोंपून द्यावीं आणि त्यासाठीं जगावें अथवा मरावें हें त्याला बरें वाटेल.

३८ "हीच पहिली इ." ह्मणजे मुख्य. ही आज्ञा बाकीच्या सर्व आज्ञांचें मूळ आहे. सर्वांवर त्यांच्या श्रेष्ठपणाप्रमाणें प्रीति करायाची आहे. देव सर्वांहून श्रेष्ठ गौरवी आहे ह्मणून त्याजवर सर्वांहून अधिक व पूर्ण प्रीति केली पाहिजे. अनु. ६:५.

३९ "दुसरी ती इजसारिखी आहे." लेवी. १९:१८. शास्त्रानें हें विचारिलें नव्हतें पण ख्रीस्त शास्त्राचा सर्व सारांश काढून सांगतो. मात्थी. १९:१९. यावरील व्याख्या व रोम. १३:९. पाहा. मार्कस ह्मणतो यापेक्षां दुसरी कोणतीहि आज्ञा मोठी नाहीं.

४० "या दोन आज्ञांत इ." ह्मणजे मोश्यानें व भविष्यवाद्यानीं जें जें लिहिलें त्या सर्वांचा सारांश या दोन आज्ञांत येतो. माणसानीं देवावर व एकमेकांवर प्रीति करावी हाच धर्म, हाच धार्मिकपणा आहे. माणसानीं ही प्रीति करावी, हा मोश्याचा व भविष्यवाद्यांचा, आणि ख्रीस्ताचा व प्रेषितांचा हेतु व इच्छा होती. मार्कस (१२:३२—३४) ह्मणतो कीं, तो शास्त्री बोलला, हे गुरू, बरें, खरें बोललास, आणि कबूल झाला कीं असी प्रीति करणें हें सर्व होम व यज्ञ यांपेक्षां अधिक आहे. ख्रीस्तानें हें पाहून त्याला ह्मटलें, तूं देवाच्या राज्यापासून दूर नाहींस. त्याच्या मनाची खातरी झाली आणि तो ख्रीस्ताचा उपदेश स्वीकारण्यासारिखा झाला असें दिसतें. मार्कस आणि लूका ह्मणतात कीं तेव्हांपासून कोणीहि त्याला अणखी विचारायास धजेना. त्या सर्व पंथानीं ख्रीस्ताला फाशांत पाडावयास प्रयत्न

४१ आणि परोशी मिळाले असतां त्यांस येशूने विचारिलें कीं;

४२ ख्रीस्ताविषयीं तुह्मास (१) कसें वाटतें? तो कोणाचा पुत्र? ते त्याला ह्मणाले, दाविदाचा.

४३ त्याने त्यांस ह्मटलें, तर दावीद आत्म्याकडून त्याला प्रभु, (२) असें कां ह्मणतो कीं,

४४ प्रभूने माझ्या प्रभूला सांगितलें, मी तुझ्या शत्रूंस तुझ्या पायांचें आसन करीन तोंपर्यंत तूं माझ्या उजवीकडे बैस?

४५ यास्तव दावीद त्याला प्रभु असें ह्मणतो, तर मग तो त्याचा पुत्र कसा होईल?

४६ तेव्हां कोणाच्याने त्याला एका शब्दाने देखील उत्तर देववेना, (३) आणि त्या दिवसापासून कोणीहि त्याला अणखी विचारायास धजला नाहीं. (४)

---

(१) मार्क. १२:३५. इ. लूक २०:४१. इ. (२) गीत ११०:१. प्रेषि. २:३४,३५. इब्री १:-१३. १०:१२,१३. (३) लूक १४:६६. मार्क. १२:३४. लूक २०:४०.

---

केला होता, परंतु त्याने ज्ञानाने उत्तर केलें, असें कीं ते सर्व विस्मित होऊन कुंठित झाले.

४१—४६. मार्कस. १२:३५—३७. व लूका. २०:४१–४४. परोशी इत्यादि कुंठित झाल्यावर ख्रीस्ताने त्यांस एक प्रश्न केला. ते आपल्या शास्त्रांतल्या भविष्यसूचनाविषयीं फार अडाणी होते आणि मशीहाविषयीं त्यांची मोठी भ्रांति होती. हें दाखवावें आणि त्यांस आपणाविषयीं बरोबर समजवावें या हेतूने ख्रीस्ताने हा प्रश्न केला.

"दावीदाचा." मशीहा दावीदाच्या वंशांतला यायाचा असें सर्व यहुद्यांचें मत होतें. याविषयीं जुन्या करारांत स्पष्ट सांगितलें होतें. तसाच तो देवहि होईल आणि त्यांचें राज्य या जगाचें नाहीं असेंहि त्यांच्या शास्त्रांत दाखविलें होतें. तथापि त्यानी ही गोष्ट ध्यानांत ठेविली नाहीं, परंतु तो दावीदाचा पुत्र असून त्याच्या गादीवर बसेल आणि आमचे सर्व शत्रु मारून आह्मास मोठें व पराक्रमी राष्ट्र करील एवढें ते मनांत आणीत असत. "तर दावीद आत्म्याकडून त्याला प्रभु, असें कां ह्मणतो!" गीतें. ११०:१. या प्रश्नावरून ख्रीस्ताने त्यांची भ्रांति स्पष्ट काढून दाखविली. त्याने दाखविलें कीं, जरी तो दावीदाचा पुत्र आहे तरी दावीदाने त्याला प्रभु

ह्मटलें आणि यावरून प्रमाण पटतें कीं तो दावीदापेक्षां कोणी थोर व श्रेष्ठ आहे असें दावीदानेंहि त्याला मोजलें. तो दावीदाचा पुत्र व प्रभूहि कसा आहे याचें उत्तर ते द्यायास समर्थ नव्हते. जर ख्रीस्त दावीदापेक्षां श्रेष्ठ आहे आणि दावीदाने त्याला प्रभु ह्मटलें त्याच वेळेस जर ख्रीस्त होता तर तो दावीदाचा पुत्र कसा. या प्रश्नाला एकच उत्तर होतें असें कीं, ख्रीस्त देव असून मनुष्य झाला. तो देहाने दावीदाचा पुत्र आहे परंतु देवपणाने तो सर्वकाळापासून आहे. जरी दावीदाचा पुत्र तरी तो त्याचा प्रभु आणि देवहि आहे. तो आपल्या वैऱ्यांस आपल्या पायांचें आसन करीलच करील. गीतें. २:९,१२. इब्री. १०:१३. १ करिं. १५:२५.

**सूचना** १ जे तारण पावण्यास बोलाविले आहेत, असे बहुत लोक शुभवर्त्तमान धिक्कारून आपल्या पापांत मरून नाश पावतील, आणि याचा दोष त्याकडेच होईल. देवाने त्यांस आमंत्रण केलें परंतु ते येईनात ह्मणून नाश पावले. ओ. ३. २ देवाचें शुभवर्त्तमान नाकारणें हें फार अनुपकारी होणें असें आहे. ओ. ३–५. देवाने आपला पुत्र आह्मासाठीं मरायाला दिल्हा. तो आह्मावर कृपा करून आला. तो अझून आह्मास तारण द्यायाला बोलावितो. असें असतां जे हीं अनंत कृपा अव्हेरितात त्यांस हाय हाय! ३ गर्विष्ठ आणि द्रव्यवान हे देवाचें आमंत्रण अव्हेरून नाश पावतात इतक्यांत बहुत गरिब व दरिद्री ख्रीस्ताला शरण जाऊन तारण पावतील. ओ. ९,१०. ४ झडती घेण्याचा दिवस येणार आहे ३:११. तेव्हां ख्रीस्ताची दृष्टि आह्मावर होईल. तो आमची झडती घेईल. आह्मी त्याला शरण जाऊन त्याच्या पुण्याचें तेजस्वी वस्त्र घातलें कीं काय? किंवा तें धिक्कारून आपल्या पुण्याच्या मळीण चिंध्या घातल्या याविषयीं तो पाहील. तेव्हां खरा पश्चात्ताप, खरा विश्वास, वास्तविक सुभक्ति, शुद्ध मन आणि शुद्ध आचरण हींच मात्र चालतील. ढोंग ईश्वरासमोर चालणार नाहीं. आपण फसावें हें किती मूर्खपण! देवाला फसवायास पाहावें हें पाप आणि वेडेपण आहे. देव सर्वांचें अंतःकरण जाणतो आणि जे ढोंगाने येतात त्यांचें देवाला तेव्हांच कळतें. ५ अधिकाऱ्यांस मान देणें. ओ. २१. ते कदाचित् दुष्ट असतील तरी सर्कार देवाकडून नेमले आहेत. रोम. १३:१. ह्मणून आह्मी नम्र, सहनशील, व आज्ञांकित असावें. मात्थी. २३:३. तथापि सर्कारचा हुकूम देवाच्या आज्ञांप्रमाणें आहे तेथवरच मानिला पाहिजे; देवाच्या आज्ञांविरुद्ध असल्यास मानूं नये. मनुष्यापेक्षां देवाचें ऐकलें पाहिजे. ६ अमुक सिद्धांत खोटा असें जर कोणी दाखवूं लागतात तर आपण तो सिद्धांत समजतों किंवा नाहीं याविषयीं त्यानी संभाळावें. ओ. २९. सदोक्यानी पुन्हा उठणें बरोबर समजलें नव्हतें ह्मणून त्याविषयीं दिकत न घेतां तें कसें

## अध्याय २३.

१ तेव्हां येशू समुदायांस व आपल्या शिष्यांस ह्मणाला,
२ शास्त्री (१) व परोशी मोश्याच्या आसनावर बसले आहेत.
३ यास्तव जें जें ते तुह्मास पाळायास सांगतील, तें अवघें पाळा

(१) मल. २:७.

आणि परलोकवास कसा होईल याविषयीं विचारायाचें होतें. ७ जे मेले ते पुन्हा उठतीलच. ओ. ३१,३२. परलोकवास आहेच, हें शास्त्रावरून प्रगट झालें आहे. आपले जे धार्मिक सोयरे धायरे मेले ते देवाजवळ पूर्ण सुख पावले आहेत, यावरून आपण आनंद करावा. आणि आपण त्यांकडे जातों, आपणासहि तें सुख मिळेल, आणि तेव्हां आपण दूतांसारिखे होऊं आणि सर्व पाप दुःख व मरण यांपासून मोकळे होऊं असें मनांत आणून आपण देवाच्या सेवेंत तत्पर राहून ऐहिक दुःख सहनशीलतेनें व संतोषानें सोसावें. ८ आपण संपूर्ण हृदयानें देवावर प्रीति करावी. ओ. ३७. देव प्रीतिपात्र आहे. तो पूर्ण आहे. त्याचे सर्व गुण पूर्ण आहेत. लहान व थोर, बाल व वृद्ध, सर्वांनी आपल्या संपूर्ण जीवानें मरण येई तोंपर्यंत देवावर प्रीति करीत जावें. ९ आपण शेजाऱ्यांवरहि प्रीति करावी. ओ. ३९. त्यांनी आह्मासीं करावें ह्मणून इच्छितों तसें आपण त्यांसीं केलें पाहिजे. नियमशास्त्र व भविष्यशास्त्र यांचा सारांश हाच आहे. सर्वांनी असें केलें तर सर्व जगामध्यें कल्याण आणि सुख कसें वाढेल बरें ? १० ख्रीस्ताविषयीं तुह्मास कसें वाटतें ? ओ. ४२. असें प्रत्येकास विचारितों. तुमचें मत काय आहे ? तो देव व मनुष्यहि आहे किंवा केवळ मनुष्य ? तुह्मी त्याला कसें मानितां ? तो पवित्र व प्रीतिपात्र असें मानून तुह्मी त्याजवर प्रीति व भरवसा ठेवितां काय ? हाच तारणारा मला पाहिजे असें समजून तुह्मी त्याजवर सर्व आशा ठेवितां काय ? मी पापी व लाचार, तो पवित्र व सर्वसमर्थ तारणारा असें मानून तुह्मी त्याला शरण जातां आणि त्याचें पुण्य आपलें असें करून घ्यावयास प्रयत्न करितां कीं काय ? सर्वांनी समजावें कीं येशू ख्रीस्त याकडूनच आशा आहे. याला धिक्कारावें हें पाप मोठें, भयंकर आणि नाशकारक आहे. जो ख्रीस्ताला धिक्कारितो तो आपली एकच आशा आणि आश्रय तुच्छ मानून नाश पावतो.

२ "मोश्याच्या आसनावर." मोश्यानें नेमशास्त्र दिल्हें आणि तें उलगडून सांगणें हें परोशी व शास्त्री यांचें काम होतें.

३ "जें जें इ." ह्मणजे जें शास्त्राप्रमाणें आहे तें पाळावयास सांगतील

व करा; परंतु त्यांच्या करण्याप्रमाणें करूं नका, कारण कीं ते सांगतात खरें पण करीत नाहींत. (१)

४ अणखी ते भारी व वाहायास अवघड (२) अशीं ओझीं बांधून माणसांच्या खांद्यावर देतात, परंतु ते आपल्या बोटानें देखील तीं हालविण्यास इच्छीत नाहींत.

५ आणि आपलीं सर्व कामें (३) माणसानी पाहावीं ह्मणून करितात, आणि आपलीं स्मरणपत्रें रुंद करितात, (४) आणि आपल्या वस्त्रांचे कांठ वाढवितात.

---

(१) रोम. २:२१–२३. (२) प्रेषि. १५:१०.
(३) मात्थ. ६:१—१६. (४) गण. १५:३८.

---

तर पाळा. असा अर्थ समजला पाहिजे, कारण कीं ते कधीं कधीं आपल्या सांप्रदायेंकरून देवाच्या आज्ञा मोडीत असत. मात्थी. १५:१–६. परंतु जरी शास्त्राप्रमाणें करीत नसत तरी ते फारकरून बरोबर सांगत असत. ते लोकांस सांगत, पण स्वतः करीत नसत.

४ "ते भारी...ओझीं इ." ह्मणजे पशुयज्ञ, सुंता इत्यादि क्रियांसंबंधी गोष्टी. यांविषयीं पेत्रस ह्मणतो कीं आमचे पूर्वज व आह्मीहि वाहायास समर्थ नव्हतों. प्रेषि. १५:१०. ह्या सर्व गोष्टी पाळायास शास्त्री व परोशी लोकांस निक्षूण सांगत पण याविषयीं ते स्वतः खर्च अथवा साह्य करीत नसत. हल्लीं जे लोकांवर भार ठेवितात आणि जप तप, उपास, दहदंड, जत्रेस जाणें, मूर्तिपूजा करणें इत्यादि बहुत क्रिया केल्या पाहिजेत आणि विशेषेंकरून आह्मास दक्षिणा द्या असें सांगतात ते त्यांसारिखे आहेत कीं नाहींत?

५ "स्मरणपत्रें इ." इब्री चर्मपटाच्या पटीवर शास्त्रांतील अमुक वाक्यें लिहून, हीं ताईत तोडगे असें मानून नेसत असत. ही रीत त्यानी निर्गम. १३:१६. यावरून चालू केली, पण याचा अर्थ अगदीं चुकला. नीति. ३:१,३. ६:२१. पाहा. ते एक स्मरणपत्र सभेंत जाते वेळेस कपाळावर घालीत असत. तें चार पट्यांचें होत असे. पहिल्या पटीवर निर्ग. १२: २—१०, दुसऱ्यावर निर्ग. १३:११—२१. तिसऱ्यावर अनु. ६:४—९. आणि चवथ्यावर अनु. ११:१८—२१. असें लिहिलें होतें. ते दुसऱ्या प्रकारचें स्मरणपत्र कोपऱ्याच्या खिळीच्या आंतल्या बाजूस बांधीत असत. आपण शास्त्राचा विशेष सन्मान करितों असें दाखविण्याकरितां परोशी

६ अणखी जेवणामध्यें मुख्य बैठकी व सभास्थानांमध्यें मुख्य आसनें, (१)

७ आणि चव्हाट्यांमध्यें मुजरे घेणें, आणि माणसांकडून गुरुजी गुरुजी असें ह्मणवून घेणें, हें त्यांस आवडतें.

८ परंतु तुह्मी आपल्यांस (२) गुरुजी असें ह्मणवून घेऊं नका; कारण कीं तुमचा एकच गुरु ख्रीस्त आहे, आणि तुह्मी सर्व भाऊ आहां.

९ आणि पृथ्वीवर कोणाला बाप म्हणूं नका, कारण कीं जो आकाशामध्यें तो तुमचा एकच बाप आहे. (३)

---

(१) मार्क. १२:३८. इ. लूक. ११:४३. इ. (२) याक. ३:१. (३) मार्था. ६:९.

---

आपलीं हीं स्मरणपत्रें विस्तीर्ण करीत असत. "वस्त्रांचे कांठ इ." ह्मणजे झालर. त्यानीं ही झालर आपल्या वस्त्रांच्या कांठांस लावावी असी आज्ञा होती यासाठीं कीं त्यानीं दुसऱ्या लोकांपासून वेगळें राहावें आणि देवाच्या सर्व आज्ञा आठवून पाळाव्या. गण. १५:३८—४०. अनु. २२:१२.

६,७ सन्मान पावावा असी त्यांची मोठी आवड होती. लोकानीं त्यांस स्वामी ह्मणावें आणि त्यांस मोठें मानावें हें त्यांस फार आवडे. आणि हल्लीं असे कोणी लोक नाहींत काय? माणसानीं पाहावें व मोठी अब्रू आपल्यांस मिळावी अस्या हेतूने कोणी आपलीं कृत्यें करीत नाहींत काय? जे आपलें तोंड व जटाजूट राखेने भरतात, फार वाढलेले नख अथवा दुसरी विलक्षण गोष्ट दाखवून आपण कोणी मोठे पुण्यवान आहों असा मीस जे दाखवितात ते याच हेतूने करितात कीं नाहींत?

८ "परंतु तुह्मी आपल्यांस गुरुजी इ." ख्रीस्ताने आपल्या शिष्यांस अशा सन्मानाच्या संज्ञा घेणें मना केलें. मीच तुमचा स्वामी आहें आणि तुह्मी सर्व भाऊ असें कारण त्याने दाखविलें. खिस्ती लोकानीं जगापासून आणि एकमेकांपासून सन्मान पावण्याची आवड दाखवावी हें योग्य नाहीं. ख्रीस्ताला सर्व मान द्यावा आणि ख्रिस्त्यानीं सारिखेंच भाऊप्रमाणें मोजलें जावें.

९ "बाप ह्मणूं नका." जो खरोखर बाप त्याला ह्मणायाला बाध नाहीं आणि एथें मना केलें नाहीं. आईबापांस मान द्यावा असी देवाची आज्ञा आहे. निर्ग. २०:१२. मार्था. १९:४. एफे. ६:१,२,३. परंतु दुसऱ्या कोणीएकाला विशेष अधिकार व थोरपण आहे असें मानून त्याला बाप ह्मणावें हें योग्य नाहीं. या अर्थी केवळ देव आमचा बाप आहे. त्यालाच पूर्ण अधिकार आहे.

१० आणि आपल्यास गुरुजी असें ह्मणवून घेऊं नका, कारण कीं तुमचा एकच गुरु ख्रीस्त आहे.

११ परंतु जो तुह्मामध्यें मोठा (१) त्यानें तुमचा चाकर व्हावें.

१२ आणि जो कोणी आपणाला उंच करील (२) तो नीच होईल, आणि जो कोणी आपणाला नीच करील तो उंच होईल.

१३ आणि अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय, कां कीं तुह्मी आकाशाचें राज्य माणसापुढें बंद करितां, ह्मणजे तुह्मी स्वतां आंत जात नाहीं, आणि आंत जाणाऱ्यांसहि जाऊं देत नाहीं.

---

(१) मार्थी. २०:२६, २७. (२) नीति १५:३३. याक. ४:६.

---

१० या वाक्यावरून अधिकाऱ्यांस योग्य संज्ञा व पदवी देणें मना केलें नाहीं. त्यांस मान देणें योग्य आहे. मार्थी. २२:२१. रोम. १३:७. १ पेत्र. २:१७. ख्रीस्तानें केवळ आपल्या लोकांमध्यें सन्मानाच्या फुकट संज्ञा व श्रेष्ठपणा मना केलें.

११,१२ जो नम्र व लीन आहे त्याला देव विशेष मान देईल. मार्थी. २०:२६. यावरील व्याख्या पाहा.

१३ "तुह्मा ढोंग्यांस हाय हाय." तुह्मी ढोंगी आहां आणि तुह्मावर दंड येईलच येईल. ख्रीस्तानें हा भयंकर व मनांत ठसण्यासारिखा उपदेश देवळांत मोठ्या समुदायामध्यें केला. हा त्याचा शेवटला उपदेश होता आणि त्यानें अगोदर जें जें सांगितलें होतें त्या सर्वांचा सारांश होता. "विधवांचीं घरें." ह्मणजे मालमत्ता. आपण फार ज्ञानी, न्यायी व कृपाळू असें ते दाखवीत असत, ह्मणून विधवा गरीब इत्यादि आपली मालमत्ता सुरक्षित राखण्यासाठीं त्यांच्या हवालीं ठेवीत असत, मग त्यांस फसवून ते काढून घेत असत. अणखी ते धार्मिकपणाचें सोंग दाखवून धर्मसंबंधी कामाबदल बहुत मागून घेत असत. "ढोंगानें." ह्मणजे आपण फार धार्मिक असें दाखवून गरीब लोकांस अधिक फसवावें ह्मणून ते कधीं कधीं तीन तासांपर्यंत प्रार्थना करीत असत. फार वेळ प्रार्थना करीत यांत कांहीं वाईट नव्हतें, परंतु ढोंगानें केली यांत पाप होतें. "आकाशाचें राज्य–बंद करितां." त्यांनी मशीहाविषयीं खोटीं मतें शिकवून आणि व्यर्थ सांप्रदायें करून आकाशाचें राज्य बंद केलें. जेव्हां बहुत लोक ख्रीस्तावर विश्वास ठेवून राज्यांत ह्मणजे ख्रिस्ती मंडळींत जाण्यासारिखे होते तेव्हां त्यांनी अडथळा घालून प्रतिबंध केला. लूका (११:५२) ह्मणतो कीं, तुह्मी ज्ञानाची किल्ली

१४ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय, कां कीं तुह्मी विधवांचीं घरें (१) खाऊन टाकितां, आणि ढोंगानें लांबलांब प्रार्थना करितां, यामुळें तुह्मी अधिक दंड पावाल!

१५ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कारण कीं तुह्मी एक शिष्य मिळवायासाठीं समुद्र व भूमि फिरतां, आणि मिळाला ह्मणजे तुह्मी त्याला नरकास योग्य आपल्याहून दुप्पट करितां. (२)

१६ अहो अंधळे वाटाडे, (३) तुह्मास हाय हाय; कां कीं तुह्मी ह्मणतां, कोणी देवळाची शपथ वाहिली तर तें कांहीं नाहीं; परंतु कोणी देवळांतील सोन्याची शपथ वाहिली तर तो ऋणी होईल.

१७ अहो मूर्ख (४) व अंधळे, मोठें तर कोणतें, सोनें अथवा सोनें पवित्र करणारें देऊळ तें?

---

(१) २ तीम. ३:६. तित. १:११. (२) योह. ८:४४. प्रेषि. १३:१०. एफ. २:३.
(३) १५:१४. (४) गीत. ९४:८.

---

नेली आहे. तुह्मी स्वत: आंत गेलां नाहीं व आंत जाणाऱ्यांस मना केलें, ह्मणजे लोकांनी ख्रीस्तावर विश्वास न ठेवावा ह्मणून त्याविषयींच्या भविष्यवादाच्या खोट्या व्याख्या सांगत असत. हल्लीं कितीएक लोक तसेंच करितात. ते ख्रीस्ताला अंगीकारीत नाहींत असें केवळ नव्हे, परंतु जे पश्चात्ताप करून त्याला अंगीकारण्यास तयार आहेत त्यांस नांव ठेवून, थट्टा, निंदा इत्यादि करून प्रतिबंध करितात.

१५ "शिष्य." ह्मणजे जे परदेशस्थ यहूदी धर्मानुसरणारे झाले ते. परोशी आपली संख्या वाढवावी अथवा त्यांपासून कांहीं लाभ घ्यावा ह्मणून असे शिष्य बहुत प्रयत्न करून मिळवीत असत, परंतु मिळाल्यावर त्यांस शिकवीत नसत आणि हे शिष्य फार दुर्व्यसनी व अगदीं दुष्ट होत असत.

१६ "शपथ वाहिली इ." मात्थी. ५:३२—३७ यावरील सांगितलेलें तें पाहा. "तें कांहीं नाहीं." ह्मणजे पाळण्याचें अगत्य नाहीं. "सोन्याची." सोनें हें देवळांतील दुसऱ्या सर्व भागांपेक्षां ते अधिक पवित्र मानीत असत. "तो ऋणी होईल." ह्मणजे शपथ फेडायास बांधिला आहे.

१७ हें सोनें दुसऱ्या ठिकाणीं असल्यास पवित्र नव्हतें. तें देवळावरून पवित्र होतें. हें देवळांतील दुसऱ्या सर्व भागांपेक्षां पवित्र मानावें हा केवढा भ्रम!

१८ आणि कोणी वेदीची शपथ वाहिली तर तें कांहीं नाहीं,
परंतु तिजवर अर्पिलेल्याची शपथ कोणी वाहिली तर तो ऋणी होईल.
१९ अहो मूर्ख व अंधळे, मोठें तर कोणतें, अर्पण किंवा अर्पण
पवित्र करणारी वेदी ती ? (१)
२० यास्तव जो वेदीची शपथ वाहतो तो तिची व तिजवरील अ-
र्पण्यांची शपथ वाहतो.
२१ आणि जो देवळाची शपथ वाहतो तो त्याची व त्यांतल्या
राहाणाऱ्याची (२) शपथ वाहतो.
२२ आणि जो आकाशाची शपथ वाहतो तो देवाच्या आसनाची
(३) व त्यावरील बसणाऱ्याची शपथ वाहतो.
२३ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कां कीं (४)
पुदिना व शेफा व जिरें यांचा दाहावा भाग तुह्मी देतां परंतु नेमशा-

(१) निर्ग. २९:३७; ३०:२९. (२) २ काल. ६:२. गीत. २६:८. (३) गीत. ११:४. यशा. ६६:१. मात्थ. ५:३४. (४) लूक. ११:४२.

१८–२० "वेदीची इ." या पितळाच्या वेदीची लांबी रुंदी सुमारें तीस फूट व उंची पंधरा फूट होती. २. काल. ४:१. तिजवरील अर्पण पशु व पांखरें असें होत असे. जसें सोनें देवळावरून तसें अर्पण वेदीवरून पवित्र झालें. तर देवळाची व वेदीची शपथ विशेष होती ह्मणून त्यांची चाल उगीच होती.

२१ "त्यांतल्या राहणाऱ्याची." ह्मणजे देवाची. १ राज. ८:१०,१३. गीतें. ८०:१.

२२ "देवाच्या आसनाची." आकाश देवाचें आसन आहे. मात्थी. ५:३४. तेथें तो वैभवांत बसतो ह्मणून त्याचें राजासन ह्मटलें आहे. या वाक्यांत ख्रीस्त शिकवितो कीं, जर कोणी कशाची शपथ वाहतो तर तो देव साक्षी करून ठेवितो ह्मणून त्याची शपथ फेडिली पाहिजे. कशाची शपथ उगीच वाहावी हें मूर्खपण व पाप आहे.

२३ "यांचा दाहावा भाग इ." यहूद्यानी आपल्या सर्व मालमत्तेचा दशमांश याजकांस द्यावा असा नेम होता. गण. १८:२०–२४. दुसरा दशमांश ते देवळाच्या भजनाबद्दल देत असत, आणि दर तिसऱ्या वर्षी ते अणखी एक दशमांश गरीब लोकांस देत असत. अनु. १४:२८,२९. याप्रमाणें ते आपल्या मालमत्तेचा सुमारें एक तृतीयांश दान धर्म देत असत. शेता-

त्यांतील मुख्य गोष्टी (१) ह्मणजे न्याय व दया व विश्वास या तुह्मी टाकिल्या; या करायाच्या होत्या, आणि त्या सोडायाच्या नव्हत्या.

२४ अहो अंधळे वाटाडे, तुह्मी मुरकुटाला गाळितां, आणि उंटाला गिळितां.

२५ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय, कारण कीं (२) ताट वाटी बाहेरून साफ करितां, आणि तीं आंतून लूट व बलात्कार यानी भरलीं आहेत.

२६ अरे अंधळ्या परोश्या, ताट वाटी बाहेरून साफ व्हावी ह्मणून पहिल्याने तीं आंतून साफ कर.

२७ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कारण कीं तुह्मी चुना लावलेल्या कबरांसारिखें (३) आहां, त्या बाहेरून सुंदर

---

(१) १ शमु. १५:२२. इर्म. २२:१५,१६. होशे. ६:६. मी. ६:८. मात्थ. ९:१३.
(२) मार्क. ७:४. (३) लूक. ११:४४. प्रेषि. २३:३.

---

तलें उत्पन्न यांचा दशमांश द्यावा असा नेम होता. अनु. १४:२२. पुदिना इत्यादि भाजीविषयीं कांहीं सांगितलें नव्हतें. परंतु परोशी इतके खरमरे होते कीं यांचाहि दशमांश दिल्हा पाहिजे असें ते शिकवीत असत. अशा क्षुल्लक गोष्टींविषयीं फार जपून ते विशेष भारी गोष्टी अगदी सोडीत असत. तसेंच हल्लीं कितीएक लोक अगदीं लहानशा क्रियांसंबंधी गोष्टींविषयीं फार जपतात, पण इतक्यांत प्रसंग पाहून ते आपल्या शेजाऱ्यांस फसवितात व विश्वासघातक होतात. परंतु ईश्वर अंतःकरण पारखितो.

२४ "मुरकुटाला गाळितां इ." ही ह्मण परोश्यांच्या वर्त्तणुकीला बरोबर लागली. ते अगदी क्षुल्लक गोष्टी पाळायास निक्षून सांगत असत पण त्याच वेळेस ढोंग, कपट, जुलूम इत्यादि मोठीं पापें करीत असत.

२५,२६ "बाहेरून साफ करितां." हात धुणें, स्नान अर्पण इत्यादि क्रियांविषयीं ते फार जपत असत. परंतु त्या भांड्यासारिखे ते जरी बाहेरून साफ तरी त्यांचीं अंतःकरणें ढोंग, कपट, जबरदस्ती इत्यादि सर्व प्रकारच्या दुष्टपणाने अगदी भरलीं होतीं. त्या परोश्यांसारिखे बहुत आहेत. ख्रीस्ताने त्यांस शिकविलें कीं, अंतःकरण शुद्ध असलें पाहिजे, नाहीं तर बाह्यात्कारी शुद्धता उपयोगी नाहीं.

२७,२८ "चुना लावलेल्या कबरांसारिखे आहां." असीं प्रेतस्थानें बाहेरून सुंदर दिसतात खरें परंतु आंत पाहिलें ह्मणजे केवळ हाडें व कुज-

दिसतात खऱ्या, परंतु आंतून मेलेल्यांच्या हाडानी व सर्व मळाने भर-
लेल्या आहेत.

२८ तसेंच तुह्मी बाहेरून माणसांस नीतिमान दिसतां, खरें, परंतु
आंतून ढोंगाने व अन्यायाने भरले आहां.

२९ अहो शास्त्री व परोशी, तुह्मा ढोंग्यांस हाय हाय; कारण कीं
तुह्मी भविष्यवाद्यांच्या कबरा बांधितां, आणि नीतिमानांचीं थडीं सुंदर
करितां;

३० आणि ह्मणतां, आह्मी आपल्या वडिलांच्या दिवसांत असतों
तर भविष्यवाद्यांच्या घाताविषयीं त्यांचे सोबती झालों नसतों.

३१ याप्रमाणें तुह्मी भविष्यवाद्यांचा घात करणाऱ्यांचे (१) पुत्र
आहां, असी तुह्मी आपल्याविषयीं साक्ष देतां.

३२ तर तुह्मी आपल्या वडिलांचें माप भरा. (२)

३३ अहो साप, फुरस्यांच्या पिल्लानो, (३) नरकदंड कसा चु-
कवाल ?

---

(१) प्रेषि. ७:५२. १ थेस्स. २:१५. (२) उत्प. १५:१६. १ थेस्स. २:१६. (३) मात्थ. ३:७.

---

लेलीं प्रेतें भरलीं आहेत. तसीच त्या माणसांची गोष्ट. ही उपमा त्यांस बरोबरच लागली.

२९–३२ "तुह्मी भविष्यवाद्यांच्या कबरा बांधितां इ." भविष्यवाद्यांस मान देण्याकरितां बांधितों असें निमित्त ते ह्मणत असत, तरी आपण त्यांस बांधणाऱ्यांचे पुत्र आहों आणि त्यांसारिखे आहों असें त्यांचें मन साक्ष देत होतें आणि ते आपल्या वर्त्तणुकीवरूनहि तसीच साक्ष देत होते. "वडिलांचें माप भरा." जेव्हां त्यानीं खीस्ताला वधस्तंभीं दिल्हें आणि प्रेषितांचा पाठलाग केला तेव्हां त्यानी हें परिमाण पूर्ण केलें. त्याच वेळेस त्यांचा स्वभाव कसा होता आणि ते काय करणार होते हें खीस्ताला माहीत होतें.

३३ "अहो साप. इ." जरी ते धार्मिकपणाचा मीस दाखवीत असत तरी त्यांचें अंतःकरण फार धूर्त्त व दुष्ट होतें ह्मणून खीस्ताने त्यांस असें ह्मटलें. उत्प. ३:१-५; मात्थी. १२:३४. ते इतके ढोंगी व दुष्ट होते कीं सर्वकाळचा दंड चुकवावा हें साध्य नव्हतें. त्यांचें अंतःकरण खीस्ताला ठाऊक होतें आणि तो अधिकाराने बोलला.

३४ यास्तव पाहा, मी तुह्माकडे भविष्यवादी व ज्ञानी व शास्त्री यांस पाठवितों, आणि त्यांतील कित्येकांस तुह्मी जिवें माराल (१) व खांबीं द्याल, आणि त्यांतील कित्येकांस आपल्या सभास्थानांमध्यें फटके माराल, (२) आणि नगरोगनगरीं (३) त्यांच्या पाठीस लागाल.

३५ यासाठीं कीं नीतिमान हाबेल (४) याच्या रक्तापासून बरख्याचा पुत्र जखार्या(५)ज्याला तुह्मी वेदी व देऊळ यांच्या मध्यें जिवें मारिलें, त्याच्या रक्तापर्यंत सर्व नीतिमानांचें जें रक्त पृथ्वीवर पाडिलें तें तुह्मावर (६) यावें;

३६ मी तुह्मास खचीत सांगतों, या पिढीवर तें अवघें येईल.

३७ हे यरूशलेमा, यरूशलेमा, (७) भविष्यवाद्यांचा घात करणा-

---

(१) प्रेषि. ७:५९. (२) प्रेषि. ५:४०. २ करिं. ११:२४,२५ (३) इब्री. ११:३७.
(४) प्रग. १८:२४. (५) ज्खर. ४:८. (६) २ काल. २४:२०,२१. (७) लूक १३:३४.

---

३४ "भविष्यवादी इ." ह्मणजे प्रेषित इत्यादि उपदेशक. ख्रीस्तानें त्यांस पाठविलें आणि जसें सांगितलें तसेंच यहूद्यांनी त्यांस गांजिलें व कित्येकांस जिवें मारिलें. प्रेषि. ७:५९. १२:१,२; २२:१९-२४. २ करिं. ११:२४,२५.

३५ "यासाठीं कीं इ." त्याचे वाडवडील दोषी होते. ते त्यांसारिखे होते असें प्रमाण त्यांनी पटविलें. ख्रीस्ताला व त्याच्या शिष्यांस जिवें मारून ते आपल्या वाडवडिलांचें परिमाण पूर्ण करणार होते. यहूदी राष्ट्र फार खराब झालें होतें. हाबेलापासून त्यानें बहुत नीतिमानांचें रक्त पाडिलें होतें. तर आतां देवापासून शिक्षा प्राप्त होणार असें ख्रीस्तानें त्यांस सांगितलें. त्यांच्या वाडवडिलांनी जें दुष्ट कर्म केलें त्याविषयीं ते दोषी नव्हते खरे, परंतु आईबापांच्या पापामुळें लेंकरांवर अरिष्टें येतात. जर कोणी बाप मूर्खपणानें आपली सर्व मालमत्ता उडवितो अथवा लुच्चेगिरीनें आपल्यावर रोग आणितो तर येणेंकरून त्याच्या लेंकरांला दरिद्र रोग इत्यादि दुःखें लागतील. अणखी हे लोक आपल्या वाडवडिलांसारिखेच होते. त्यांनी पापरूप हातांनी ख्रीस्ताला वधस्तंभीं खिळून मारिलें आणि आपल्यावर क्रोध व दंड आणिला.

३६ "या पिढीवर इ." यापासून सुमारें ४० वर्षांनी यरूशालेमाचा नाश झाला. पुढील अध्याय पाहा.

३७ "हे यरूशलेमा इ." जेव्हां ख्रीस्तानें हें मोठें व सुंदर शहर आणि

ऱ्या व आपल्याकडे पाठविलेल्यांस धोंडमार करणाऱ्या, जसी कोंबडी आपलीं पिलें पंखांखालीं एकवट करिती त्या प्रकारें तुझ्या लेंकरांस (१) एकवट करायास कितीदां माझी इच्छा होती, पण तुमची इच्छा नव्हती.

३८ पाहा, तुमचें घर तुह्माकरितां ओसाड पडलें आहे. (२)

३९ कारण मी तुह्मास खचीत सांगतों कीं आतांपासून प्रभूच्या नामाने येणारा तो सुवंदीत, (३) असें ह्मणाल तोंपर्यंत मला पाहाणारच नाहीं.

(१) अनु. ३२:११,१२ गीत ९१:४. (२) जख. ११:६. (३) गीत ११८:२६. मात्थ. २१:९.

शोभायमान देवळ यांकडे पाहिलें आणि मनांत आणिलें कीं, या लोकांचे अन्याय व अपराध भरपुरास आले आहेत ते मला जिवें मारणार आहेत मग त्यांचा अगदीं विनाश होणार आहे, तेव्हां त्याला दया येऊन तो रडला. त्याने आठवण केली कीं, म्या वारंवार त्यांस बोध व विनंती केली पण ते ऐकेनात; आणि त्याला माहीत होतें कीं देवाची सहनता आतां सरली आणि त्यांची वस्ती ओसाड असें व्हायाचें आहे.

३८ "तुमचें घर इ." ह्मणजे त्यांचें देऊळ. हें त्यांच्या शहराची विशेष शोभा होती आणि ते सर्व त्याविषयीं फार अभिमानी असत. ख्रीस्तानें त्यांस कळविलें कीं हें मोडलें जाईल व परक्या लोकांच्या हातीं पडेल.

३९ "कारण मी इ." कृपा पावण्याची वेळ होऊन गेली आहे. म्या तुह्मास आश्रय व तारण देऊं केलें पण तुह्मी धिक्कारिलें. म्या बहुत दिवस तुह्मामध्यें वहिवाट करून उपदेश केला आहे, पण तुह्मी न ऐकतां मला जिवें मारणार आहां. तर तुह्माला मोठीं संकटें व कठीण दंड लागायाचा आहे. मोठीं अरिष्टें सोसावीं लागतील. मग प्रभूच्या नांवानें जो येतो तो धन्यवादित असें तुह्मास वाटेल, ह्मणजे मजविषयीं तुमची खातरी होईल. तुह्मी मजवर विश्वास ठेवाल. हें वचन अद्यापि पूर्ण झालें नाहीं. देवळाचा व राष्ट्राचा नाश याविषयीं जें सांगितलें तें पूर्ण झालें आहे, आणि पुढें यहूदी जे हल्लीं सर्व पृथ्वीवर फांकले आहेत ते कबूल होतील कीं, हा येशू ख्रीस्त आमचा वास्तविक मशीहा होता, आणि असी खातरी धरून ते त्यावर भाव ठेवितील. रोम. ११:२५—३२.

**सूचना** १ आह्मी दुष्ट माणसांच्या कित्त्यास अनुसरूं नये. ओ. २ माणसाचा कित्ता नव्हे पण देवाचें शास्त्र पाहून वर्त्तावें. आह्मी मनुष्यापेक्षां देवाला मानावें. माणसास आर्जवानें मोठ्या संज्ञा द्याव्या अथवा त्याकडून घ्याव्या हें योग्य नाहीं.

## अध्याय २४.

१ मग (१) येशू देवळांतून निघून बाहेर गेला, आणि त्याचे
शिष्य त्याला देवळाच्या इमारती दाखवायास जवळ आले.

---

(१) मार्क. १३:१. लूक. २१:५.

---

जो सर्वांहून नम्र तो सर्वांहून सन्मान्य व उंच आहे. ११:१२. २ परोशी व शास्त्री यांचे एथें लिहिलेल्या वर्णनावरून ढोंगाचा देवाला केवढा कंटाळा आहे हें समजतें. ख्रीस्ताने या भयंकर शब्दानी त्यांचा निषेध केला. त्यानी तेव्हांच रागें भरून त्याला जिवें मारिलें नाहीं यावरून आश्चर्य वाटतें. पण त्याची वेळ पूर्ण झाली नव्हती. त्यांच्या मनाने साक्ष दिल्ही असेल कीं, आपण खोटे व दुष्ट आहों, आणि त्या वेळेस ते ख्रीस्ताला मारायाला धजले नाहींत. ३ नाश पावणाऱ्या पाप्यांची दया येशूला येत असती. ओ. ३७. त्यांचें तारण व्हावें असी त्याची इच्छा आहे. त्यानी येऊन तारण घ्यावें ह्मणून तो त्यांसीं विनंती करितो. परंतु ते यावयास इच्छीत नाहींत. त्याची कृपा अव्हेरून ते नाशाच्या मार्गांत चालत जातात. ते नाश पावतात याचें कारण हेंच कीं ते ख्रीस्ताला शरण येत नाहींत. तो त्यांस तारायास इच्छितो पण त्यांची असी इच्छा नाहीं. पाप करीत जावें असी त्यांची इच्छा आहे, आणि त्यांच्या पुढें सर्वकाळचें जीवन व मरण ठेविलें असतां ते मरण व नाश आपल्या खुशीने निवडून घेतात. तर त्यानी नाश पावावा हें योग्य आहे, आणि ख्रीस्ताने स्पष्ट शिकविलें कीं असे लोक नाश पावतीलच पावतील. ओ. ३८. देवाची कृपा सरली असा दिवस येणार आहे; आणि जेव्हां देवाने पाप्याला सोडिलें तेव्हां त्यासाठीं आशा राहत नाहीं. कोणी माणूस, आई, बाप, उपदेशक, अथवा मित्र, होय दूत देखील त्याला तारूं शकत नाहीं. केवळ नाश सर्वकाळचा नाश होईल. तर पाप्यानी लवकर येऊन देवाची दया आग्रहाने मागावी.

ख्रीस्ताने २४ व्या अध्यायांत देवळाचा नाश भविष्येंकरून सांगितला. हीच गोष्ट मार्कस १३ व लूका २१:५—३८ एथेंहि पाहा.

१ येशू देऊळ सोडून जाते वेळेस त्याचे शिष्य येऊन तें दाखवूं लागले; पाहा कसे धोंडे व कशा इमारती. मार्क. १३:१०. तें देऊळ फार शोभायमान होतें ह्मणून शिष्यानी ख्रीस्ताचें लक्ष त्याकडे लाविलें. योसेफस ह्मणतो कीं त्या देवळांतले कितीएक धोंडे ४५ हात लांब, ५ हात उंच व ६ हात रुंद असे होते.

२ तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, तुह्मी हें सर्व पाहतां कीं नाहीं ? मी तुह्मास खचीत सांगतों, एथें खालीं पाडल्यावांचून धोंड्यावर धोंडा राहणार नाहीं. (१)

(१) १ राजे ९:७. इर्म. २६:१८. लूक १९:४४.

२ "धोंड्यावर धोंडा राहणार नाहीं." जेव्हां ख्रीस्तानें हें सांगितलें तेव्हां असा नाश होईल हें अगदीं असंभाव्य दिसलें. तें देऊळ मोठें द्रव्यवान व फार शोभायमान होतें. तें यहूदी राष्ट्राचा अभिमानपात्र असें होतें. परंतु केवळ ४० वर्षांनी ख्रीस्ताचें वचन पूर्ण झालें. ख्रिस्ती शकाच्या ७० व्या वर्षी तितस नामें रोमी सेनापतीनें मोठें सैन्य जमवून यरुशालेमावर हल्ला करून त्याचा नाश केला. जो यहूदी इतिहास कर्त्ता योसेफस भरवस्यास योग्य आहे त्यानें या गोष्टीचें वर्णन लिहून ठेविलें आहे. तो याजक होता आणि लढाई चालत असतां तो रोम्यांच्या हातांत पडला. तो यहूदी होता ह्मणून ख्रीस्तानें सांगितलेलीं भविष्यें पूर्ण झालीं हें दाखवावें असी त्याची इच्छा होईना, तथापि त्याच्या इतिहासावरून पक्का पुरावा झाला कीं तीं सर्व पूर्ण झालीं. योसेफस ह्मणतो कीं, देऊळ राखावें असी तितस सेनापतीची इच्छा होती ह्मणून यहूद्यांनी आज्ञेंत येऊन आपलें देऊळ व शहर राखावें असें मानवायास त्यानें मला वरचेवर त्यांकडे पाठविलें. परंतु ख्रीस्तानें वचन सांगितलें होतें आणि पूर्ण झालें पाहिजे. रोमी सेनापतीची इच्छा उलटी असतांहि देवळाचा नाश व्हावयाचा होता. यहूद्यांनी स्वत: पहिल्यानें देवळाच्या मंडपास आग लाविली, आणि एक रोमी शिपायानें हुकुमावांचून जळतें कोलित सोनेरी खिडकींतून आंत फेंकिलें यावरून मोठी ज्वाला लवकर उठली. तितसानें विझवायाचा हुकूम केला, पण अतिशय गडबड असतां कोणी मानिला नाहीं. शिपाई देवळाकडे दाटीनें धावले आणि त्यांस आवरण्यास भय किंवा विनंती किंवा मारणें चालेना. यहूद्यांच्या अतिद्वेषाकडून नाश करावयास चेतविले असतां त्यांनी तितसाच्या इच्छेविरुद्ध देऊळ अगदी जाळून टाकिलें. शहर हस्तगत केल्यावर तितसानें नाश करावयास हुकूम दिल्हा; केवळ तीन बुरूज राहूं द्यावयास सांगितलें. मग त्यांनी बाकीचें गावकूस अगदी पाडून टाकिलें आणि त्याचा पाया खणून काढिला असें कीं जागा अगदीं ओसाड पडली आणि ज्यांनी येऊन पाहिलें त्यांस एथें वस्ती कधीं होती असें वाटलें नाहीं. मैमानदीज एक यहूदी बखर कर्त्ता ह्मणतो कीं, रोमी लष्करांतील एका सरदारानें देवळाचा पाया नांगरला आणि याप्रमाणें मिखा. ३:१२. एथलें वाक्य व ख्रीस्ताचें वचन पूर्ण झालें. यहूदी लढाई पु. ६ मक. ४:५,६,७. पाहा.

३ नंतर तो जाइत झाडांच्या डोंगरावर बसला असतां शिष्य त्याजकडे एकांतीं येऊन ह्मणाले, या गोष्टी केव्हां होतील, आणि तुझ्या येण्याचें व काळाच्या समाप्तीचें चिन्ह काय (१) हें आह्मास सांग.

४ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं तुह्मास कोणी फसवूं नये ह्मणून जपा. (२)

५ कारण कीं बहुत माझ्या नामाने (३) येऊन मी ख्रीस्त आहें असें ह्मणतील, आणि बहुतांस फसवितील.

६ आणि तुह्मी लढाया (४) व लढायांच्या अवयां ऐकाल; तेव्हां जपा, घाबरूं नका, कारण कीं या सर्व गोष्टी अवश्य व्हावयाच्या आहेत, परंतु तितक्यांत शेवट होणार नाहीं.

---

(१) १ थेस्स. ५:१३. (२) कल. २:८. २ थेस्स. २:३. (३) इर्म. १४:१४. (४) दान. ११:

---

३ "जाइत झाडांच्या डोंगरावर." एथून सगळें शहर फार शोभायमान असें दृष्टीस पडलें. देवळाचा असा नाश होणार हें ऐकून प्रेषितांचें मन चेतलें असतां ते त्या गोष्टींविषयीं अणखी विचारायास त्याकडे येतात. ते तीन प्रश्न करितात, ह्मणजे १ त्या गोष्टी केव्हां व्हावयाच्या आहेत? २ ख्रीस्ताच्या येण्याचें चिन्ह काय? ३ जगाच्या समाप्तीचें चिन्ह काय? या तीन प्रश्नांचें उत्तर या अध्यायांत व २५ व्या अध्यायांत दिल्हें आहे.

४,५ "जपा." त्यांनीं न फसावें ह्मणून ख्रीस्ताने त्यांस सावध असण्यास ताकीद केली. "माझ्या नामाने इ०" त्याच्या अधिकाराने नव्हे परंतु मी ख्रीस्त आहें असें ह्मणून त्या वेळेस फारकरून सर्व यहूदी लोक ख्रीस्ताची वाट पाहत होते, (मात्थी. २:१,२.) ह्मणून त्यास फसवावें हें सवघड पडलें. असे ढोंगी फसविणारे बहुत आले. योसिफस ह्मणतो कीं, बहुत जादूगीर, फसविणारे, खोटे ख्रीस्त इत्यादि ढोंगी येऊन लोकांस आपल्या नादीं लावून रानांत नेत असत. एद्रियन बादशाहाची कारकीर्द यापासून सन १६८२ पर्यंत २४ खोट्या ख्रीस्तांचीं नामें इतिहासांत लिहून ठेविलीं आहेत.

६ "आणि तुह्मी लढाया इ०" रोमी इतिहासावरून असें दिसून येतें कीं यरूशलेमाचा नाश झाल्यापूर्वीं बहुत लढाया, बंडें व उलटापालटी झाल्या. केवळ १८ महिन्यांत चौघे बादशाह ह्मणजे निरो, गाल्बा, ओथो आणि वितेलियस यांचा घात बळाने झाला. जेव्हां ख्रीस्ताने हें भविष्य सांगितलें तेव्हां सार्वत्रिक शांति होती ह्मणून ह्या लढाया अधिक आश्चर्यकारक आहेत.

७ कारण कीं (१) राष्ट्र राष्ट्रावर, व राज्य राज्यावर उठेल, आणि जागोजागीं दुकाळ व मऱ्या व भूमिकंप होतील;

(१) हग्ग. २:२१,२२.

"परंतु तितक्यांत शेवट होणार नाहीं." ह्मणजे यहूदी व्यवस्थेचा शेवट. यरूशलेमाचा नाश लागलाच होणार नाहीं. सदरहू चिन्हें दिसून येतील तेव्हां भिऊं नका अणखी चिन्हें व्हायाचीं आहेत.

७ "कारण कीं राष्ट्र राष्ट्रावर इ०" कैसरियास यहूदी व सिरियन लोक यांमध्यें मोठी फूट झाली, आणि २०००० यहूदी मारिले होते. यावरून यहूदी लोकांनी सर्वत्र रागें भरून लढाया केल्या आणि सिरियन नगरोनगरीं जाऊन भयंकर नाश केला. सर्व यहूदी देशांत लढाई चालती झाली आणि इताल्यांतहि ओथो व वितेलियस यांच्या भांडणावरून चालू झाली. "आणि जागोजागीं दुष्काळ इ०" (प्रेषि. ११:२८.) तासितस, सुईतोनियस व युसीबियस ह्मणतात कीं दुष्काळ आला, आणि योसेफस ह्मणतो कीं यरूशलेमांत तो इतका कठीण पडला कीं बहुत लोक उपासीं मरण पावले. प्रा० का० २०,२. क्लादियसाच्या कारकीर्दीत ह्मणजे सन ४१–५४ याच्यांत रोम, पालस्तिन व ग्रीस या देशांत चार दुष्काळ पडले. "व मऱ्या." ४० व्यांत मरीचा वाखा बाबलोन्यांत चालू झाला. (यो. प्रा० का० १८:९,८.) आणि सन ६६ व्यांत इताल्यांत चालू झाली (तासि० १६,१३.) ह्या दोन्ही मऱ्या यरूशलेमाचा नाश घडल्यापूर्वीं झाल्या. "व भूमिकंप." यरूशलेमाचा नाश झाल्यापूर्वीं अनेक भूमिकंप झाले असें इतिहासांत लिहिलें आहे. तासितस ह्मणतो कीं, क्लादियसाच्या कारकीर्दीत एक भूमिकंप रोम एथें झाला, आणि निरोच्या कारकीर्दीत लावदिकीया, हैईरापोलिस, कलस्से, आणि नामांकित पोंपेयी हीं शहरें भूमिकंपानी पडलीं व फारकरून त्यांचा नाश झाला. लूका अणखी ह्मणतो भयंकर उत्पात व आकाशांतील मोठीं चिन्हें होतील. (लूका. २१:११.) हें भविष्य वचन योसेफसाने कधीं ऐकलें नसेल, आणि ऐकलें असतें तर तें पूर्ण झालें असें दाखवायास त्याने इच्छिलें नसतें. तरी यरूशलेमाचा नाश झाल्यापूर्वीं घडलेल्या बहुत चिन्हांचें वर्णन त्याने लिहून ठेविलें आहे. तो ह्मणतो कीं, एक तरवाररूप तारा येऊन शहरावर्त्ती उभा राहतां दिसला आणि एक धूमकेतु एका वर्षापर्यंत दिसला. बेखमीर भाकरींच्या सणांत रात्रीं तेजस्वी उजेड देवळांत वेदीसभोंवता प्रकाशला, असें कीं दोन प्रहरांपर्यंत दिवसासारिखा प्रकाश होता अगखी देवळाचा पूर्वेकडला दरवाजा जो भरींव पितळाचा असून वीस माणसांनी कष्टेंकरून मजबूत अडसर व खीळ यांकडून लावून बंद केला होता तो रात्रीं आपोआप उघडला. तो सण झा-

८ या सर्व गोष्टी तर वेदनांचा प्रारंभ होय.

९ तेव्हां (१) तुमचे हाल करण्याकरितां ते तुह्मास पराधीन करितील, आणि तुह्मास जिवें मारितील, (२) आणि माझ्या नामामुळें अवघ्या देशांचे लोक तुमचा द्वेष करितील.

---

(१) लूक. २१:१२. (२) योह. १६:२. प्रेषि. ७:५९.

---

त्यावर थोड्या दिवसांनीं सूर्य मावळल्यापूर्वीं अंतराळामध्यें रथ व चिलखत घातलेल्या शिपायांच्या टोळ्या इकडेतिकडे धांवतात व शहरासभोंवता वेढा घालितात असें दिसून आलें. तेव्हां समुदायाच्या शब्दासारिखा मोठा आवाज देवळांत ऐकूं आला असा कीं "आपण एथून जाऊं." लढाई चालू झाल्याच्या पूर्वीं चार वर्षांनीं अनानसाचा पुत्र येशू नामक कोणी शेतकरी जेव्हां शहर आबाद व शांत होतें तेव्हां एका मंडपाच्या सणांत येऊन मोठ्यानें ओरडूं लागला, असें कीं, "पूर्वेपासून वाणी व पश्चिमेपासून वाणी चौऱ्या वाऱ्यांपासून वाणी, यरूशलेम व पवित्र देऊळ यांविरुद्ध वाणी, सर्व लोकांविरुद्ध वाणी." लोकांनीं त्याला चाबुकांनीं मारिलें आणि प्रत्येक मारास तो ओरडे "यरूशलेमास हाय हाय, हाय हाय." योसेफस ह्मणतो कीं, तो दररोज सात वर्षांपर्यंत तसाच ओरडत गेला आणि शेवटीं "मलाहि हाय हाय" असें ओरडून तो शहराच्या गराड्यांत मारिला गेला.

८ "वेदनांचा प्रारंभ होय." ह्मणजे अधिक कठीण संकटें शेवट होण्याच्या पूर्वीं यावयाचीं आहेत.

९ "तेव्हां तुमचे हाल इ०" पेत्रस व योहान्न मोठ्या सभांत नेले होते. प्रेषि. ४:५,६,७. मार्कस. १३:९. पाहा. हीं सर्व पूर्ण झालीं. पेत्रस व योहान्न बंदिशाळेंत घातले होते (प्रेषि. ४:३.) पौलस व सिलसाहि बंदिशाळेंत घातले होते. (प्रेषि. १६:२४.) आणि मारिलेहि होते. (प्रेषि. १६:२३.) प्रेषि. १८:१२. २४:२४. २५:२३. पाहा. "आणि तुह्मास जिवें मारितील." ह्मणजे तुह्मांतील कितीएकांस जिवें मारितील." त्यांनीं स्तेफनसाला धोंड्यांनीं मारिलें. (प्रेषि. ७:५९.) हेरोदानें याकोबाला जिवें मारिलें. (प्रेषि. १२:२.) यरूशलेमाचा नाश झाल्यापूर्वीं निरोनें ख्रिस्त्याचा मोठा पाठलाग केला. त्यानें पेत्रस व पौलस व इतर बहुतेकांस मारिलें असें समजण्यांत आहे. येशूनें त्यांस सांगितलें कीं, राजे व अधिकारी यांच्या समोर तुह्मास नेतील, तथापि उत्तर देण्याविषयीं पूर्वीं काळजी करूं नये, कां कीं मी तुह्मास असी वाचा व ज्ञान देईन कीं, त्याला तुमच्या सर्व विरोध्यांच्यानें प्रत्युत्तर देववणार किंवा अडववणार नाहीं. लूका. २१:१४,१५. हें पूर्ण झालें. स्तेफनसाची गोष्ट

एल भविष्यवाद्याने सांगितलें, तो पवित्र स्थानांत उभा राहिलेला तुह्मी पाहाल, ( वाचणाऱ्याने ध्यानांत आणावें; )

१६ तेव्हां जे यहूद्यांत असतील त्यानी डोंगरावर पळून जावें;

१७ जो धाब्यावर असेल त्याने आपल्या घरांतून कांहीं नेण्याकरितां उतरूं नये;

१८ आणि जो शेतांत असेल त्याने आपलीं वस्त्रें नेण्याकरितां माघारें येऊं नये.

१९ आणि त्या दिवसामध्यें ज्या गरोदर व ज्या थान देणाऱ्या त्यांस हाय हाय; ( १ )

२० परंतु तुमचें पळणें हिंवाळ्यांत अथवा शाब्बाथ दिवसीं होऊं नये, ह्मणून प्रार्थना करा.

२१ कारण कीं ( २ ) जगाच्या प्रारंभापासून आजपर्यंत झालें नाहीं व होणारहि नाहीं, असें मोठें संकट त्या काळीं होईल.

---

(१) लूक. २३:२९. (२) दान. १२:१.

---

("वाचणाऱ्याने इ०") वाचणाऱ्याने लक्ष लावून हें दानिएलाकडून भविष्य समजावें ह्मणून हें सांगितलें होतें असें दिसतें.

१६ "तेव्हां जे यहूद्यांत इ०" तेव्हां शेवट आला असें समजून ख्रीस्त्यानी आश्रय शोधावा. "डोंगरावर." त्या डोंगरांत आश्रयासाठीं बहुत गुहा होत्या.

१७—१९. याचा अर्थ हाच कीं, त्यानी मोठ्या घाईनें पळावें, किंचित उशीर लावूं नये. जेव्हां यरूशलेमाचा नाश झाला तेव्हां ख्रिस्ती लोक हा बोध मानून यार्देनेच्या पलिकडे पेला गावास पळून आश्रय पावले, असें कीं एकहि ख्रिस्ती यरूशलेमांत नाश पावला नाहीं असें ह्मटलें आहे.

२० "हिंवाळ्यांत अथवा शाब्बाथ दिवसीं इ०" हिंवाळ्यांत पाऊस आणि अनेक अडचणी लागण्याजोग्या होत्या आणि शाब्बाथांत वाटेवर चालायाला मना केलें होतें. यास्तव अशा दिवसांत पळणें न व्हावें ह्मणून प्रार्थना करणें योग्य होतें.

२१ "मोठें संकट त्या काळीं होईल." हें संकट कसें व्हायाचें होतें याविषयीं लूकाने सांगितलें, असें कीं ते तरवारीच्या धारेनें पडतील, आणि त्यांस पाडाव करून सर्व राष्ट्रांमध्यें नेतील आणि विदेश्यांचे काळ पूर्ण होतील

तोंपर्यंत विदेशी लोक यरूशलेम तुडवितील. हें भयंकर रीतीनें पूर्ण झालें. योसेफस ह्मणतो कीं, जगाच्या प्रारंभापासून जितकीं संकटें कोणत्याहि राष्ट्राला लागलीं आहेत तीं सर्व यहूदी लोकांस या वेळेस जीं लागलीं त्यांपुढें अगदीं हलकीं होतीं. य० ल० १ पुस्त० ४. तें शहर रोमी शिपायांच्या हातीं पडलें तेव्हां त्यानीं मोठी कत्तल केली. त्याचें वर्णन करितांना योसेफस ह्मणतो कीं, आंत झपाटयानें धावून त्यानीं जितके आढळत त्या सर्वांस मारून टाकलें आणि घरांस आग लावून त्यांस व त्यांत जे होते त्यांसहि जाळून टाकलें. जेव्हां लुटण्यासाठीं घरांत जात तेव्हां उपासीं मेलेले असे कुटुंबांतले सर्व जण व बहुत माणसें दृष्टीस पडत मग हात रिकामी असतां ते बाहेर निघत. पण जरी मेलेल्यांची दया येते तरी जीवंत असे जितके अढळत त्या सर्वांस ते मारीत असत, असें कीं रस्ते धडयानीं भरले आणि इतकें रक्त सर्व शहरामध्यें वाहिलें कीं जळत होत्या अशा बहुत वस्तु रक्तानें विझाल्या. य० ल० पु० ६. प्रक० ८§५; व प्रक०९§२,३. त्या वेळेस यरूशलेमांत ११,००,००० माणसें मारिलीं होतीं, आणि सभोंवतील प्रांतांत २,५०,००० असे सर्व मिळून १३,५०,००० माणसें नाश पावलीं. तरवारीच्या धारेनें हीं सर्व मारलीं असें नाहीं, कितीएकांस त्यानीं वधस्तंभीं दिल्हें, बहुतेकांस छडीनें मारून व अनेक प्रकारची कठीण इजा देऊन शेवटीं वधस्तंभीं दिल्हें. रोमी शिपायानीं रागानें व द्वेषानें यहुद्यांस थट्टेकरून वांकडे तिकडे वधस्तंभीं खिळून मारिलें, आणि वधस्तंभासाठीं जागा व देहांसाठीं वधस्तंभ पुरेत तोंपर्यंत त्यानीं हें काम चालविलें. त्यांचें रक्त आह्मावर व आमच्या लेंकरांवर असो, (मात्थी. २७:२५) हा जो शाप यहुद्यानीं आपल्यावर यावा ह्मणून मागितला तो सदरहु भयंकर रीतीनें पूर्ण झाला. जेव्हां रोमी सैन्यानें यरूशलेमाभोंवता वेढा घातला तेव्हां यहूद्यांचा मोठा सण चालत होता आणि त्याकरितां ३०,००,००० यांपेक्षां ज्यास्ती माणसें मिळत असत. यावरून अतिशय दुष्काळ पडला असा कीं जे सर्वांहून नीच अमंगळ जनावर खाइनात ते पदार्थ लोक खात असत. एक कुलीन बाईनें भुकेनें व निराशेनें आपलें बाळक मारून शिजविलें आणि कोणीएकाला कळल्यापूर्वीं तिनें त्याचा अर्ध भाग खाल्ला होता. य० ल० पु० ६ प्रक० ३ §३,४. हें क्रूर व भयंकर कृत्य भविष्यवचनाप्रमाणें झालें. अनु. २८:२३,५६,५७. त्यांस पाडाव करून सर्व राष्ट्रांमध्यें नेतील, असेंहि लूकानें सांगितलें. योसेफस ह्मणतो कीं, पाडाव करून नेले असे ९७,००० होते. जीं सर्वांहून उंच व सुंदर तरुण माणसें त्यांस तितसानें आपल्या जयासाठीं ठेविलें, बाकीचे होते त्यांस सभोंवतील प्रांतांमध्यें वांटून दिल्हें, असें कीं रंगभूमीमध्यें रानपशूसीं युद्ध करितांना त्यानीं नाश पावावा. त्यानें कितीएकांस मि-

२२ आणि ते दिवस थोडे केले नसते तर कोणी माणूस न निभावता, परंतु निवडलेल्यांसाठीं (१) ते दिवस थोडे होतील.

२३ तेव्हां (२) कोणी तुह्मास ह्मटलें, पाहा, ख्रीस्त एथें किंवा तेथें आहे, तर विश्वास धरूं नका.

२४ कारण खोटे ख्रीस्त व खोटे भविष्यवादी (३) उठतील, आणि असीं मोठीं चिन्हें व चमत्कार (४) दाखवितील कीं, साधेल (५) तर निवडलेल्यांस देखील फसवितील.

---

(१) यशा. ६५:८,९. (२) अनु. १३:१-३. (३) मात्थ. २४:५,११. (४) २ थेस्स. २: ९—११. प्रग. १३:१३. (५) योह. १०:२८,२९.

---

सऱ्यांत सर्कारी कारागिरांत पाठविलें आणि बहुतेक तरुणांस विकून टाकिलें. य० ल० पु० ६ प्रक० ९:६२,३.

२२ "आणि ते दिवस थोडे केले नसते इ०" योसेफस ह्मणतो, तितसानें शहरासभोंवता वेढा घालून त्यांस उपासीं मारावें असा निश्चय पहिल्यानें केला होता. परंतु यहूदी त्यासीं लढूं लागले आणि रोमी रागानें त्यांच्या पाठीस लागून गांवकोस फोडून आंत शिरले. रोमासहि जाणें तितसाला जरूर पडलें, यास्तव त्यानें आपला पहिला बेत सोडून हल्ला केला आणि शहराचा नाश लवकर केला. याप्रमाणें ते दिवस थोडे झाले. हें ख्रिस्ती लोकांच्या कल्याणार्थ झालें. तसें जे देवावर प्रीति व भरवसा ठेवितात त्यांचें कल्याण तो सर्व गोष्टींकडून घडवितो.

२३ "पाहा, ख्रीस्त एथें इ." ख्रीस्त येऊन आह्मास रोमी जबरदस्तीपासून मोकळें करील असी आशा यहूदी धरीत होते. त्या मोठ्या संकटांमध्यें अनेक उठून बोलूं लागले कीं आपण ख्रीस्त आहों आणि त्यांच्या मागें बहुत चालूं लागले. ख्रीस्तानें त्यांस अगोदर सुचविलें, ह्मणून त्यांस फसण्याचें कारण नव्हतें.

२४ "खोटे ख्रीस्त." आपण ख्रीस्त असें जे बोलत ते. "खोटे भविष्यवादी." आपण भविष्यवादी असें जे लबाडीनें बोलत ते "मोठीं चिन्हें व चमत्कार इ." ह्मणजे चमत्कार करण्याचें सोंग दाखवून लोकांस फसवितील. योसेफस ह्मणतो कीं, बहुत असे खोटे ख्रीस्त व भविष्यवादी त्या संकटांमध्यें वास्तवीक उठले आणि जादुगिरी व कुविद्या करून लोकांस फसवून रानांत नेलें. प्राचीन. पु० २० प्रक० ८,६. "साधेल तर." त्या खोट्या ख्रीस्ताकडून घडलेले चमत्कार खऱ्या चमत्कारांसारिखे होते, असें कीं जर साधलें असतें तर खऱ्या ख्रिस्त्यांस ठकविलें असतें. तें साध्य नव्हतें. खरा ख्रीस्त

२५ पाहा, म्यां अगोदरच तुह्मास सांगून ठेविलें आहे.

२६ यास्तव त्यांनी तुह्मास ह्मटलें, पाहा, तो रानांत आहे, तर तुह्मी बाहेर जाऊं नका; पाहा, तो एकांतामध्यें आहे, तर विश्वास धरूं नका.

२७ कारण कीं जसी वीज (१) पूर्वेपासून निघून पश्चिमेपर्यंत चमकती, तसेंच मनुष्याच्या पुत्राचें येणेंहि होईल.

२८ कारण कीं जेथें कोठें प्रेत असेल तेथें गीध जमतील. (२)

२९ आणि त्या दिवसांतील संकटानंतर लागलाच सूर्य अंधक

(१) जख. ९:१४: लूक. १७. इ. (२) इयो. ३९:३०.

आला आहे असा त्यांचा विश्वास इतका दृढ होता कीं ते फसेनात. खरे ख्रिस्ती कधीं कधीं कदाचित् बहकून जातील आणि शास्त्रांतल्या अमुक सिद्धांताविषयीं ते कदाचित् संशय धरितील, परंतु ते अगदीं फसतील असें नाहीं. ज्यानें त्यांस खंडून घेतलें तो त्यांस राखील.

२५ "पाहा इ०" त्यांनी संभाळावें असी ख्रीस्ताची इच्छा होती ह्मणून त्यानें त्यांस पूर्वीं सांगितलें.

२६ ख्रीस्त अकस्मात् आणि वाटत नाहीं अशा ठिकाणीं उठून दिसेल असी वाट यहूदी पाहत होते; हें समजून खोटे ख्रीस्त त्यांच्या मताप्रमाणें युक्ति योजीत असत. आणि तो रानांत आहे अथवा एकांतामध्यें आहे असें बोलून लोकांस आपल्या नादीं लावीत असत. याप्रमाणें थुदास व यहूदा माहीलकर यांनी लोकांस फसविलें. प्रेषित. ५:३६,३७.

२७ "कारण कीं इ." वीज अकस्मात् चमकती, तसेंच ख्रीस्ताचें येणें होईल. एथें यरूशलेमाच्या नाशास येणें आणि जगाच्या समाप्तीस येणें या दोहोंविषयीं समजावें. तर १. ख्रीस्ताच्या येण्याचे हे दोन प्रसंग विशेष असें समजावें. २ हे दोन प्रसंग बहुत प्रकारें एकसारिखे असतां त्यांस एकच वर्णन लागतें. तर एथल्या वर्णनावरून यरूशलेमाच्या नाशास येणें प्रथम समजायाचें आहे पण त्याच वर्णनावरून जगाच्या समाप्तीसाहि येणें असें दर्शविलें आहे.

२८ "कारण कीं इ." प्रेत कोठें आहे हें जसें गीध गरुड लवकर समजून खायास येतात तसेंच यरूशालेम नासल्या प्रेतासारिखें असतां रोमी सैन्य लवकर त्यावर येऊन त्याचा अगदीं विनाश करील. जेथें जेथें लोक दुष्ट आहेत तेथें तेथें देवापासून दंड प्राप्त होण्याजोगा आहे.

२९ "सूर्य अंधक होईल इ." हें वाक्य कदाचित् लाक्षणिक आहे.

होईल, (१) आणि चंद्र आपला उजेड देणार नाहीं, आणि तारे आ-
काशांतून पडतील, आणि आकाशांतील सैन्यें डळमळतील. (२)
३० तेव्हां मनुष्याच्या पुत्राचें चिन्ह आकाशामध्यें दिसेल, (३)
अणखी त्या काळीं पृथ्वीवरल्या सर्व जाती ऊर बडवून घेतील, आणि
(४) मनुष्याच्या पुत्राला सामर्थ्यानें व मोठ्या गौरवानें आकाशाच्या
ढगांवर येतांना पाहतील.

---

(१) यशा. १३:१०. यहेज्क. ३२:७. आम. ५:२०. प्रेषि. २:२०. प्रग. ६:१२. (२) २ पेत्र. ३:१०. (३) दान. ७:१३. प्रग. १:७. (४) मात्थ. १६:२७. मार्क. १३:२६. लूक २२:६९.

---

शहरांची व राज्यांची उलटापालट व नाश असीं मोठीं संकटें यावरून दर्शविलीं आहेत. बाबेल, सोर इत्यादि शहरांचा व देशाचा नाश अशा लाक्षणिक शब्दांनीं पूर्वीं सांगितला होता. यशा. १३:१०.२४:२३.३४:४.५०.३. यहेज. ३२:७. योएल. ३:१५.— लूका अणखी ह्मणतो (२१:२५.) समुद्र व लाटा यांची गर्जना होत असतां भयानें व जगावर येणाऱ्या गोष्टींची वाट पाहण्यानें माणसें प्राण सोडीत असतां, पृथ्वीवर संकट व पेंच होईल. या सर्व लाक्षणिक बोलण्यावरून मोठीं व भयंकर संकटें दर्शविलीं आहेत.

३० "मनुष्याच्या पुत्राचें चिन्ह." ह्मणजे ख्रिस्त यरूशलेमाचा नाश करायाला येतो असें चिन्ह हें जगाच्या समाप्तीसहि ख्रीस्ताच्या येण्याविषयीं लागेल. शिष्यांनीं त्याला विचारिलें होतें कीं, तुझ्या येण्याचें आणि जगाच्या समाप्तीचें चिन्ह काय? ख्रिस्तानें दोन्ही गोष्टी लक्षून उत्तर दिल्हें. यरूशलेमाचा नाश करायाला येण्याचें चिन्ह सदहू गोष्टी पूर्ण असणें असें होईल. जगाच्या समाप्तीस विशेष वैभव आणि त्याबरोबर पवित्र दूत, असें होईल. १. थेस्स. ४:१६. लूका. २१:२७. मात्थी. २६:६४. प्रेषि. १:११. "पृथ्वीवरल्या सर्व जाती ऊर बडवून घेतील." जगाचा नाश होईल तेव्हां जगांतील सर्व लोक शोक करितील. आपण ख्रीस्ताला धिकारलें आणि दंडास पात्र झालों असें पाहून दुष्ट लोक न्यायदिवशीं शोक करितील. योह.१९:३७.प्रग.१:७."आणि मनुष्याच्या पुत्राला इ." हें जगाच्या समाप्तीस ख्रीस्ताच्या येण्याविषयीं असेल. तो मेघानें वर आकाशांत गेला, प्रेषि. १:९. आणि फिरून तसाच येईल. प्रेषि. १:११. "सामर्थ्यानें." जगाच्या समाप्तीस तो जग जाळून टाकण्यानें (२ पेत्र. ३:७,१०,१२.) मेलेल्यांस उठविल्यानें (यो० ५:२९,३०. १ करिं. १५:५२;) जिवंत अस-

३१ आणि करण्याच्या मोठ्या आवाजाने (१) तो आपल्या दुतांस पाठवील, आणि ते आकाशाच्या एका शेवटापासून दुसऱ्या शेवटापर्यंत त्याच्या निवडलेल्यांस चहुंकडून जमा करितील. (२)

३२ आतां अंजिराच्या झाडाच्या दाखल्यावरून शिका; (३) त्याच्या डाहाळीला रस येऊं लागला व पानें फुटूं लागलीं, ह्मणजे उन्हाळा जवळ आला असें समजतां.

---

(१) १ थेस्स. ४:१६. (२) जख. १४:५. (३) लूक २१:२९.

---

तील त्यांस पालटण्याने (१ थेस्स. ४:१७. १ करिं. १५:५२.) आणि नीतिमंतांस सौख्यलोकांत घेण्याने (मात्थी २५:३४) व दुष्टांस नरकांत धाडण्याने (मात्थी २५:४१,४६. योह. ५:२९.) हें सामर्थ्य दाखवील. "मोठया वैभवाने." हें वैभव ख्रीस्ताच्या येण्याचा प्रकार व बरोबरचे दूत येणेंकरून आणि जीं अद्भुतें घडतील त्यांकडून दिसून येईल. (मात्थी. २६,६४.२५:३१.)

३१ "आणि करण्याच्या मोठया आवाजाने इ०" यहूदी मोठी सभा मिळवायाची असली तर करण्याच्या आवाजाने लोकांस बोलावीत असत. लेवी २९:९. गण १०:२ न्या. ३:२७. ख्रीस्ताने त्यांची रूढी धरून दूत शेवटल्या दिवसीं त्या रीतीने सर्व जग न्यायास बोलावितील असें दाखविलें. १ थेस्स. ४:१६, १ करिं. १५:५२. "दुतांस पाठवील." दूत ह्मणजे जासूद. अचेतन पदार्थ देखील ज्यांकडून देव आपल्या लोकांचें रक्षण करितो त्यांस दूत ह्मटले आहेत. गीतें १०४:४. परंतु मनुष्यापेक्षां थोर व फार बुद्धिवंत प्राणी जे माणसांचें रक्षण व तारण यांविषयीं उद्योगी आहेत त्यांस फारकरून हें नांव दिल्हें आहे. इब्री १:१४. "निवडलेल्यांस चहुंकडून जमा करितील." निवडलेले ह्मणजे खरे ख्रिस्ती. हें यरूशलेमाच्या नाशाविषयीं लाविलें तर अर्थ हाच कीं देव चिन्हें, अद्भुतें, माणसें, दूत इत्यादि उपायेंकरून ख्रिस्ती लोकांस एकवट करून त्यांचें रक्षण करील, असें कीं यहूदी लोकांबरोबर ते नाश पावणार नाहींत. वास्तविक ह्मटलें तर असें झालें. त्या भयंकर संकटांतून सर्व ख्रिस्ती निभावले, कोणी ख्रिस्ती नाश पावला नाहीं. आणि न्यायदिवसींहि तसेंच होईल. देव आपले दूत पाठवून आपल्या लोकांस चहुंकडून एकवट करील. मात्थी १३:२९. ४१–४३. त्या भयंकर दिवसासाठीं सर्वांनी सिद्ध होण्यास झटावें.

३२,३३ "आतां अंजिराच्या झाडाच्या दाखल्यावरून इ." पानें फुटतात तेव्हां जसें तुह्मी अनुमान करितां कीं उन्हाळा जवळ आहे तसेंच

३३ तसेंच तुह्मी या सर्व गोष्टी पाहाल तेव्हां तो काळ जवळ दारासीं (१) आहे असें समजा.

३४ मी तुह्मास खचीत सांगतों, हें सर्व पूर्ण होईल तोंपर्यंत ही पिढी टळून जाणार नाहीं.

३५ आकाश (२) व पृथ्वी टळून जातील, परंतु माझीं वचनें टळून जाणार नाहींत.

३६ अणखी त्या दिवसाविषयीं व त्या घटकेविषयीं कोणाला ठाऊक नाहीं, (३) आकाशांतील दुतांसहि नाहीं, केवळ माझ्या बापाला ठाऊक आहे.

३७ आणि नोहाचे दिवस जसे होते, तसेंच मनुष्याच्या पुत्राचें येणेंहि होईल.

---

(१) याक. ५:९ (२) गीत १०२:२६. यशा. ५१:६. (३) जख. १४:७. १ थेस्स. ५:२

---

सदर्हु चिन्हें दिसून येतील तेव्हां यरूशलेमाचा नाश लागास आला आहे असें जाणा. लुका (२१:२८,३१) ह्मणतो, तेव्हां तुमची खंडणी जवळ आली आहे, आणि देवाचें राज्य जवळ आलें आहे असें समजा. ह्मणजे तीं सर्व भयें व संकटें यांपासून तुमची सुटका होईल आणि इहलोकीं देवाचें राज्य स्थापित होईल. पण शेवटल्या दिवसीं ख्रिस्ती लोकांचीं सर्व दुःखें, संकट, पाप व मरण देखील यांपासून सुटका होईल. आणि देवाचें राज्य आकाशलोकांत सर्वकाळपर्यंत स्थापित होईल.

३४ "ही पिढी टळून जाणार नाहीं." एक पिढी तीस किंवा चाळीस वर्षांची होत असती. ख्रीस्तानें हें सांगितलें तेव्हांपासून यरूशलेमाचा नाश चाळीस वर्षांच्या आंत झाला. तेव्हां त्या सर्व गोष्टी पूर्ण झाल्या. त्या गोष्टी शेवटल्या दिवसीं फिरून पूर्ण होणार नाहींत असें सांगितलें नाहीं. ख्रीस्तानें सांगितलें तें सर्व जेंकडून बरोबरच पूर्ण झालें अशा गोष्टी यरूशलेमाच्या नाशांत घडल्या. तशा गोष्टी जगाच्या समाप्तीस फिरून घडतील.

३५ "आकाश व पृथ्वी टळून जातील इ." ख्रीस्तानें सांगितलें तें सर्व पूर्ण होण्याविषयीं हें अतिशय दृढ वचन आहे.

३६-३९ "अणखी त्या दिवसाविषयीं इ." ती वेळ जवळ आहे ह्मणून समजावें असीं चिन्हें ख्रीस्तानें सांगितलीं; परंतु ती वेळ बरोबरच कळवायाची नव्हती. नोहाचा दाखला ख्रीस्ताच्या येण्याविषयीं बरोबर लागतो.

३८ कारण कीं जसें जलप्रलयाच्या पूर्वीच्या दिवसांत नोहा तारवांत गेला (१) त्या दिवसापर्यंत लोक खात पीत होते, लग्न करून घेत व लग्न करून देतहि होते;

३९ आणि जलप्रलयाने येऊन सर्वांस नेलें तोंपर्यंत ते समजले नाहींत तसेंच मनुष्याच्या पुत्राचें येणेंहि होईल.

४० त्या वेळेस शेतांत दोघे असतील, एकाला घेतील एकाला ठेवितील.

४१ जात्यावर दोघी दळीत बसतील, एकीला घेतील एकीला ठेवितील.

४२ यास्तव जागे राहा, (२) कां कीं कोणत्या घटकेंत तुमचा धनी येईल हें तुह्मास ठाऊक नाहीं.

४३ अणखी समजा कीं, अमुक प्रहरीं चोर येईल, हें घरधन्याला कळलें असतें तर तो जागा राहिला असता, आणि त्याने आपलें घर फोडूं दिल्हें नसतें.

४४ यास्तव तुह्मी तयार व्हा, कां कीं ज्या घटकेंत तुह्मास वाटत नाहीं त्या घटकेंत मनुष्याचा पुत्र येईल.

---

(१) उत्प. ६:२. (२) लूक १२:३९,४०. प्रग. ३:३; १६:१५.

---

देवाने नोहाकडून त्या लोकांस जलप्रलयाच्या येण्याविषयीं सरासरीं कळविलें होतें. परंतु ते कांहीं लक्ष्य देईनात आणि शेवटीं जलप्रलय अकस्मात् आले आणि ते सर्व बुडून नाश पावले. उत्प. ६. ७. ८. ९. तसेंच यरूशलेमाचा नाश करायाला आणि जगाच्या समाप्तीसाहि ख्रीस्ताच्या येण्याविषयीं होईल. जरी ख्रीस्ताने पूर्वीं चिन्हें सांगितलीं तरी लोक वाट पाहणार नाहींत आणि त्यांस वाटत नाहीं तेव्हां तें येणें अकस्मात् होईल.

४२ "यास्तव जागे राहा." ख्रीस्ताचें येणें जवळ आहे, तर त्याचीं चिन्हें पाहा आणि त्याची वाट पाहून सिद्ध असा.

४३,४४ "अणखी हें समजा कीं इ." ख्रीस्ताने आपला बोध शिष्यांस लागू करावा ह्मणून चोराचा दाखला काढला. माझें येणें चोरासारिखें, ह्मणजे वाटत नाहीं तेव्हां अकस्मात् होईल. तर तुह्मी संभाळा आणि सिद्ध व्हा. सर्व प्रसंगीं प्रार्थना करीत असतां जागे राहा. लूका. २१:३६. हल्लींहि सर्वांनी हा बोध मानावा.

४५ तर आपल्या परिवाराला यथाकाळीं (१) खायाला ( २ ) द्या-
यास ज्याला त्याच्या धन्याने त्यांवर ठेविलें, असा विश्वासू व बुद्धिमान
चाकर कोण?

४६ ज्या चाकराला त्याचा धनी येऊन तसें करितांना पाहील
तो धन्य.

४७ मी तुह्मास खचीत सांगतों कीं त्याला तो आपल्या सर्व माल-
मत्तेवर ठेवील. ( ३ )

४८ परंतु माझा धनी येण्यास उशीर करितो, असें तो वाईट चा-
कर आपल्या अंतःकरणांत ह्मणाला,

४९ आणि सोबतीच्या चाकरांस मारूं लागला, आणि झिंगले-
ल्यांबरोबर खाऊं पिऊं लागला;

५० तर ज्या दिवसीं तो वाट पाहत नाहीं (४) त्या दिवसीं, आणि
जी घटका तो जाणत नाहीं त्या घटकेस त्या चाकराचा धनी येईल;

५१ आणि त्याला कापून टाकील, आणि ढोंग्यांबरोबर त्याला
वांटा देईल, तेथें रडणें व दांत खाणें होईल. ( ५ )

---

(१) इफ़ि. ३:१५. (२) मात्थ. १३:५२. (३) मात्थ. २५:२१. (४) १ थेस्स. ५:३. प्रग. ३:३. (५) मात्थ. २५:३०.

---

४५—४७ "शिष्यानीं हा बोध ध्यानांत ठेवून ख्रिस्ताचें येणें जवळ आहे असें समजावें आणि हमेश त्याची वाट पाहून सिद्ध राहावें ह्मणून त्यानें हा अणखी दाखला काढला. विश्वासू चाकर यावरून खरा ख्रिस्ती, देवाचा विश्वासू सेवक ( किंवा उपदेशक ) असें समजावें. ख्रीस्तानें आपल्या शिष्यांस मंडळीवर ठेविलें असें कीं त्यानीं मंडळीचें हित पाहून योग्य वेळेस आत्मिक अन्न द्यावें. यो. २१:१५-१७; प्रेषि. २०:२८; १ करिं. ४:१,२. तसेंच आतां उपाध्यानीं व सर्व ख्रिस्त्यानीं एकमेकांचें हित पाहून आणि ख्रीस्ताच्या येण्याची वाट पाहून सिद्ध असावें. जो सिद्ध असा सांपडेल तो धन्य. जेव्हां प्रभु येईल तेव्हां तो त्याला आपल्याजवळ सौख्य लोकांत घेईल आणि त्याला सर्वकाळचें सुख, मान आणि गौरव देईल.

४८—५१ "परंतु तो वाईट चाकर इ." जे ख्रिस्ती व उपाध्ये अविश्वासू होतात व आपला अधिकार व वजन जुलूम करण्यासाठीं अथवा स्वार्थ बुद्धीनें आपल्या हितासाठीं लावितात त्याचें आचरण व शिक्षा हीं एथें दाखविलीं आहेत. ते सर्व ढोंगी आहेत आणि जेथें रडणें व दांत खाणें हो-

## अध्याय २५.

१ तेव्हां आकाशाचें राज्य दाहा कुमारींसारिखें (१) होईल; त्या
आपल्या मशाली घेऊन वराला (२) भेटायास निघाल्या.
२ आणि त्यांत पांच (३) शाहाण्या व पांच मूर्ख अशा होत्या.
३ मूर्ख होत्या त्यानी आपल्या मशाली घेतल्या असतां आपल्या
बरोबर तेल घेतलें नाहीं; (४)
४ परंतु शाहाण्यानी आपल्या मशालींबरोबर बुधल्यांत तेल
घेतलें. (५)

---

(१) गीत ४५:१४. २ करिं. ११:२. (२) योह. ३:२९. (३) इर्म. २४:२–९. मात्थ. २२:१०. (४) यशा. ४८:१. (५) १ योह. २:२०.

---

ईल तेथें त्यांस वांटा मिळेल, हा बोध मनांत ठसण्याजोगा आहे. आतांहि ख्रिस्ताचें येणें जवळ आहे. मरण आणि न्यायदिवस सर्वांस लवकर येई-ल असें असतां सर्वांनी त्यांसाठीं सिद्ध असावें.

१ "तेव्हां आकाशाचें राज्य इ." मात्थी. ३:२ यावरील व्याख्या पाहा. न्यायाला ख्रीस्त येईल त्याविषयीं हें ह्मटलें आहे. ख्रिस्ती मंडळी ख्रीस्ताची नवरी आहे असी उपमा वारंवार शास्त्रांत दिल्ही आहे, आणि ख्रिस्ती लोकांस आपल्या जवळ घेण्याला ख्रीस्ताचें येणें याला लग्नाची उपमा दिल्ही आहे. लग्नाचा संबंध सर्वांहून जवळचा, प्रिय आणि टिकाऊ आहे ह्मणून याची उपमा ख्रीस्त व त्याचे लोक यांच्या संबंधाला दिल्ही आहे. मात्थी. ९:१५. यो. ३:२९. प्रग. १९;७;२१:९. एफे. ५:२५–३२. या दाहा कुमारींवरून ख्रिस्ती मंडळी समजावी. मंडळी शुद्ध व पवित्र असावी यास्तव ही उपमा शोभती. २ करिं. ११:२. विल. १:१९. २:१३. वर कोणत्या वेळेस येणार हें कुमारींस बरोबर माहीत नव्हतें, ह्मणून सावध राहून त्यांला वाट पाहायाची होती. तसेंच ख्रिस्ती मंडळीने जागें राहून ख्रीस्ताची वाट पाहावी.

२–४ "आणि त्यांत पांच शाहाण्या इ." ज्या वराच्या येण्याला सिद्ध होत्या त्या बुद्धिमंत होत्या; ज्या सिद्ध नव्हत्या त्या मूर्ख होत्या. तसेंच जे ख्रीस्ताच्या येण्याला सिद्ध होतात ते शाहाणे, जे सिद्ध नाहींत ते मूर्खच आहेत. वराला सिद्ध व्हावें ह्मणून तेलाचें अगत्य होतें. ख्रीस्ताच्या येण्याला सिद्ध व्हावें यासाठीं मन शुद्ध असलें पाहिजे. खरें धार्मिकपण अंतःकरणांत असलें पाहिजे.

५ मग वराला उशीर झाला ह्मणून सर्वांस डुकल्या येऊन (१) झोंप लागली.

६ तेव्हां मध्यरात्रीं (२) असी हाक (३) झाली कीं, पाहा, वर येत आहे, त्याच्या भेटीस बाहेर चला. (४)

७ मग त्या सर्व कुमारी उठल्या व आपल्या मशाली नीट करूं लागल्या.

८ तेव्हां मूर्खांनी शाहाण्यांस ह्मटलें, तुह्मी आपल्या तेलांतून आह्मास कांहीं द्या, कां कीं आमच्या मशाली विझतात. (५)

९ तेव्हां शाहाण्यानी उत्तर दिल्हें कीं, कदाचित् आह्मास व तुह्मास पुरणार नाहीं. त्यापेक्षां तुह्मी विकणाऱ्याच्या एथें जाऊन (६) आपल्या करितां विकत घ्या.

१० मग त्या विकत घ्यायास गेल्या इतक्यांत (७) वर आला, आणि ज्या तयार होत्या त्या त्याच्या बरोबर लग्नास आंत गेल्या, मग दार बंद झालें. (८)

११ नंतर त्या दुसऱ्या कुमारी मागून येऊन ह्मणाल्या (९) हे प्रभु प्रभू, आह्मासाठीं उघड.

---

(१) १ थेस्स.५:६. (२)प्रग. १६:१५. (३) १ थेस्स.४:१६. (४) आम.४:१२.(५)लूक. १२:३५. (६) यशा. ५५:१,६. (७) आम. ८:१२,१३. (८) इब्री. ३:१८,१९. प्रग. २२:११. (९) मात्थ. ७:२१–२३. इब्री. १२:१७.

---

७—९ "मशाली नीट करूं लागल्या." त्यानी तेल घातलें, परंतु ज्यानी तेल आपल्या बरोबर घेतलें नव्हतें त्यांस काय उपाय; त्या मोठया संकटांत पडल्या. तसेंच जे लोटून लोटून मरणास सिद्धता करीत नाहींत त्यांस मरण जवळ आलें ह्मणजे मोठें भय आणि संकटें प्राप्त होतात. आपण अगोदर पश्चात्ताप करून ख्रीस्ताला शरण गेलों तर किती बरें असें त्यांस वाटतें. जे ख्रीस्ती लोकांची निंदा करून त्यांस धिक्कारितात ते देखील मरते वेळेस मोठें भय धरितात आणि ख्रिस्त्यांचें साह्य आग्रहानें मागतात, परंतु त्यांचें मन इतकें कठीण झालें आणि त्यानी इतका वेळ देवाची कृपा अव्हेरिली कीं त्यांस उपाय नाहीं, आशा नाहीं, असें फारकरून सांपडतें.

१०,११ "ज्या तयार होत्या त्या त्याच्या बरोबर लग्नास आंत गेल्या." यावरून असें दाखविलें कीं ख्रीस्त न्यायास येईल तेव्हां जे सिद्ध ते त्याच्या

१२ परंतु त्याने उत्तर दिल्हें कीं, तुह्मास खचीत सांगतों, मी तुह्मास ओळखत नाहीं. (१)

१३ यास्तव तुह्मी जागे राहा. (२) कां कीं कोणत्या दिवसीं किंवा कोणत्या घटकेस मनुष्याचा पुत्र येईल हें तुह्मास ठाऊक नाहीं.

---

(१) हब. १:१३. (२) मात्थ. २४:४२,४४. मार्क. १३:३३,३५. लूक. २१:३६.

---

बरोबर देवाच्या राज्यांत ह्मणजे सौख्यलोकांत जातील. जे पश्चात्ताप करून ख्रीस्तावर भरवसा ठेवितात आणि नीतीने व पवित्रतेने चालून त्याच्या येण्याची वाट पाहतात ते सिद्ध होतील. मार्क. १६:१६, यो. ५:२४, प्रेषि. ३:१९.प्रग. २२:११. २पेत्र. ३:११,१२.१तीम.६:१७-१९.२तीम.४:६,७,८. मग दार बंद झालें. मग कोणाचें आंत जाणें होईना. तसेंच देवाने आपले सर्व खरे भक्त सौख्यलोकांत घेतले ह्मणजे दार बंद होईल आणि कोणी आंत जाऊं शकणार नाहीं. मरते वेळेस जे सिद्ध होतात ते आंत जातील, बाकीच्या सर्वांस बाहेरील अंधारांत व क्लेशांत राहावें लागेल. दार बंद झाल्यावर कोणीएकाला पश्चात्ताप करायाला अथवा सिद्ध व्हायाला कांहींच जागा राहणार नाहीं. प्रग. २२:२. उप. ११:३.९:१०, मात्थी.२५:४६.

१२ "मी तुह्मास ओळखत नाहीं." ह्मणजे तुह्मी माझे मित्र नाहींत. खरे ख्रीस्ती, खरे भक्त, असें मी तुह्मास ओळखत नाहीं. परलोकीं ढोंग अगदीं चालणार नाहीं.

१३ "यास्तव तुह्मी जागे राहा." या सगळ्या दाखल्यांचा हाच अभिप्राय आहे. त्या कुमारी वराला भेटायाला जात होत्या, तसेंच सर्व लोक ख्रीस्ताला भेटायाला जात आहेत. वराच्यासारिखें त्याचें येणें अकस्मात् होईल. कोणीएकाला जेव्हां मरण येतें तेव्हां ख्रीस्त आला असें आहे. तेव्हां ख्रीस्त त्याचा न्याय ठरवील. तर त्यासाठीं सर्वांनी सिद्ध असावें. वर येतो आहे असी हाक झाली तेव्हां त्या मूर्ख कुमारींस किती दुःख वाटलें असेल. त्या सिद्ध नव्हत्या ह्मणून दार बंद झालें आणि त्या बाहेर राहिल्या. तसेंच बहुत लोक मरते वेळेस शोक करूं लागतात आणि सिद्ध होण्यास कांहीं प्रयत्न करितात, परंतु फार उशीर झाला आणि आकाशलोकाचें दार त्यांस बंद होईल. असें समजून जे ख्रीस्ती आहेत त्यानी नित्य जागे राहावें, आणि जे ख्रीस्ती नाहींत त्यानी किंचित् उशीर लावूं नये, कारण कीं त्यांस वाटत नाहीं अशा घटकेस ख्रीस्ताचें येणें होईल.

१४ जसें कीं, (१) प्रवासास जाणाऱ्या माणसाने आपल्या चाकरांस बोलाविलें व आपली मालमत्ता त्यांस सोंपिली.

१५ आणि त्याने एकाला पांच हजार रुपये व एकाला दोन हजार व एकाला एक हजार असे प्रत्येकास ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें दिल्हे, (२) आणि लागलाच प्रवासाला गेला.

१६ मग ज्याला पांच हजार रुपये मिळाले होते त्याने जाऊन त्यांचा व्यापार केला, आणि अणखी पांच हजार रुपये मिळविले.

१७ तसेंच ज्याला दोन हजार मिळाले होते त्यानेहि अणखी दोन हजार मिळविले.

१८ परंतु ज्याला एक हजार मिळाले होते त्याने जाऊन भूमि खणिली, आणि तींत आपल्या धन्याचा पैका लपविला.

---

(१) लूक. १९:१२. इ. (२) रोम १२:६. १ करिं. १२:४. इ. एफ. ४:११.

---

१४ "प्रवासास जाणाऱ्या माणसाने इ०" जे आपलें तारण व दुसऱ्याचें कल्याण साधून घेण्यासाठीं आपली बुद्धि व शक्ति लावितात त्यांस तद्रूप फळ मिळेल हें दाखवायास ही उपमा दिल्ही होती. कोणी माणूस आपल्या चाकरांस कांहीं मालमत्ता सोंपून देतो मग पुढें त्यांचा हिशोब घेतो, तसेंच देवाने सर्वांस कांहीं गुण, बुद्धि व शक्ति दिल्हीं आहेत, आणि ते त्यांचा कसा उपयोग करितात याविषयीं तो पुढें त्यांचा हिशोब घेईल, मग ज्यानी बरें केलें त्यांस तो चांगलें फळ देईल, आणि ज्यानी वाईट केलें त्यांस शिक्षा देईल.

१५ "पांच हजार रुपये." यावरून ईश्वर माणसांस देतो त्यांतील उत्तम गुण असें समजावें. "त्याच्या योग्यतेप्रमाणें दिल्हें.' प्रत्येकाने आपल्या शक्तीप्रमाणें देवाचें गौरव करावें असें देव पाहतो.

१६,१७ "ज्या दोघांला पांच व दोन हजार रुपये दिल्हे होते त्यानी व्यापार करून अणखी पांच व दोन हजार मिळविले. यावरून जे आपले गुण व शक्ति योग्य कामांत लावितात त्यांची वर्त्तणूक दाखविली आहे.

१८ "पैका लपविला." त्याने आपली शक्ति चांगल्या कामांत लाविली नाहीं. ज्यांस देवाने थोडेंच दिल्हें तेच मात्र लपवितात अथवा अयोग्य कामांत खर्चितात असें नाहीं. ज्यांस देवाने उत्तम गुण व शक्ति दिल्हीं आहेत ते देखील वारंवार लपवितात अथवा अयोग्य कामांत लावितात. अशांस देव अधिक कठीण दंड देईल.

१९ मग बहुत काळानंतर (१) त्या चाकरांचा धनी आला, आणि त्यांचा हिशोब घेऊं लागला. (२)

२० तेव्हां ज्याला पांच हजार रुपये मिळाले होते तो येऊन अणखी पांच हजार रुपये आणून ह्मणाला, महाराज, आपण मला पांच हजार रुपये सोपून दिल्हे; पाहा, त्यांवर म्या अणखी पांच हजार रुपये मिळविले.

२१ तेव्हां त्याच्या धन्याने त्याला ह्मटलें, बरें, उत्तम व विश्वासू चाकरा, तूं थोडक्यांवर विश्वासू झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, (३) तूं आपल्या धन्याच्या आनंदांत ये.

२२ नंतर ज्याला दोन हजार रुपये मिळाले होते तोहि येऊन ह्मणाला, महाराज, आपण मला दोन हजार रुपये सोपून दिल्हे; पाहा, त्यांवर म्या अणखी दोन हजार रुपये मिळविले.

२३ त्याला त्याच्या धन्याने ह्मटलें कीं, बरें, उत्तम व विश्वासू चाकरा, तूं थोडक्यांवर विश्वासू झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, तूं आपल्या धन्याच्या आनंदांत ये.

२४ मग ज्याला एक हजार रुपये मिळाले होते तोहि येऊन ह्मणाला, महाराज, म्या तुला जाणिलें कीं, तूं कठोर (४) माणूस आहेस, ह्मणजे त्वां पेरिलें नाहीं (५) तेथें तूं कापितोस व त्वां विखरिलें नाहीं तेथून गोळा करितोस.

---

(१) मात्थ २४:४८. (२) मात्थी. १८:२३,२४. (३) लूक. १२:४४.२२:२९. प्रग. ३:२१. (४) इयो. २१:१५. (५) इर्म. २:३१.

---

१९ "धनी आला इ०" तसाच ख्रीस्त न्यायास येऊन सर्वांचा हिशोब घेईल. रोम. १४:१२. २करिं.५:१०. १ थेस्स. ४:१६. मेषि.१:११,१७:३१.

२०–२३ या चाकरांप्रमाणें जे ख्रीस्ती आपले गुण व शक्ति, आपलें व दुसऱ्याचें तारण व देवाचें गौरव करण्यासाठीं खर्चितात त्यांस ख्रीस्त येईल तेव्हां आपल्या जवळ सौख्य लोकांत घेऊन मोठें सुख, गौरव आणि मान देईल. ओ. ३४. १ यो. २:२८.

२४ "मग ज्याला एक हजार रुपये मिळाले इ०" ज्याला देवाने थोडकेंच दिल्हें आहे त्याला तें वाईट कामांत घालायाला निमित्य नाहीं असें दाखवावें हा या दाखल्याचा अभिप्राय आहे. प्रत्येकाने आपल्या शक्तीप्रमाणें करावें असी देवाची आज्ञा आहे. "तूं कठोर माणूस आहेस."

२५ ह्मणून म्या भिऊन (१) तुझे हजार रुपये भूमींत लपवून ठेविले; पाहा, तुझे तुला मिळाले.

२६ तेव्हां त्याच्या धन्याने त्याला उत्तर दिल्हें कीं, अरे वाईट व आळसी चाकरा, (२) म्या पेरिलें नाहीं तेथें मी कापितों, आणि म्या विखरिलें नाहीं तेथून गोळा करितों, हें तुला ठाऊक होतें.

२७ तर माझा पैका सावकाराजवळ ठेवायाचा होता, ह्मणजे म्या आल्यावर आपला व्याजासुद्धां घेतला असता.

२८ यास्तव ते हजार रुपये याजपासून घ्या, आणि ज्याजवळ दाहा हजार रुपये आहेत त्याला द्या.

---

(१) नीति. २६: १३. प्रग. २१:८. (२) इयो. १५:५,६. मात्थ. १८:३२. लूक. १९:२२. यहुदा. १५.

---

हा चाकर आपल्या आळसाविषयीं निमित्य काढायाला आपल्या धन्यावर दोष ठेवितो.

२५ "ह्मणून म्या भिऊन इ०" ते हरवून जातील असें भय वाटलें ह्मणून तो निमित्य दाखवितो, परंतु वास्तविक जर त्याने सावकाराजवळ ठेविले असते तर हरविले असतांहि त्याला दोष लागला नसता. त्याने आपल्या आळसाविषयीं हें निमित्य उगेंच काढिलें. तसेंच पापी आपलें तारण साधून घेण्यासाठीं कांहीं प्रयत्न न करितां सुस्थ राहून केवळ देवावर दोष ठेवितात.

२६,२७ "अरे वाईट व आळसी चाकरा." तो दुष्ट होता असें प्रमाण त्याने आपल्या धन्यावर दोष ठेवून पटविलें होतें. तो आळसी होता असें ते रुपये लपवून त्याने प्रमाण पटविलें होतें. हल्लीं असे पापी किती आहेत ? देणारा कोण आहे ? आमच्याठायीं बोलतो करतो तो कोण आहे ? असें बोलून ते आपल्या तारणाविषयीं किंचित् काळजी धरीत नाहींत, पण सर्व दोष देवावर ठेवितात. जे असें करितात ते आपला दोष फार वाढवितात आणि आपणावर अधिक कठीण दंड आणितात. "हें तुला ठाऊक होतें." प्राचीन काळच्या बहुत प्रतींत एथें प्रश्नाची खूण दिल्ही आहे असें कीं हें तुला ठाऊक होतें काय ? तर तुला अधिक प्रयत्न करायाचे होते. आळस करण्याचा तुझा अधिक दोष आहे. धनी आपण कठोर असा कबूल आहे ह्मणून समजायाचें नाहीं; केवळ चाकराच्या तोंडच्या बोलण्यावरून त्याला दोषी ठरवितो.

२८ त्याने त्यांचा उपयोग केला नाहीं, तर त्याला नसावे. जे आपलें

२९ कां कीं (१) ज्याला आहे त्याला देतील, आणि त्याला फार होईल, आणि ज्याला नाहीं त्याचें असेल तें देखील त्याजपासून घेतील.(२)

३० आणि त्या निरुपयोगी चाकराला बाहेरील अंधारांत टाका; (३) तेथें रडणें व दांत खाणें होईल.

३१ अणखी मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवानें येईल, (४) आणि त्याबरोबर सर्व पवित्र दूत येतील, तेव्हां तो आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल.

---

(१) मात्थ. १३:१२. मार्क. ४:२५. लूक. ८:१८. १९:२६. (२) लूक. १०:४२. (३) मात्थ. ८:१२. (४) दान. ७:१३. जख. १४:५ मात्थ. १६:२७; १९:२८. मार्क. ८:३८. प्रेषि. १.११. १ थेस्स. ४: १६. २ थेस्स. १:७ यहूदा. १४. प्रग. १:७.

---

तारण साधून घेण्यास प्रयत्न करीत नाहींत त्यांचें साह्य देव करणार नाहीं.

२९ "कां कीं ज्याला आहे इ०" मात्थी. १३:१२ व्याख्या पाहा. जो कोणी आपल्याला जें सोंपिलें त्याचा चांगला उपयोग करितो त्याचा धनी त्याला अणखी सोंपून देईल अथवा चांगलें फळ देईल, परंतु जो कांहींच उपयोग करीत नाहीं अथवा चांगला व्यय करीत नाहीं त्याला धनी अणखी कांहीं सोंपून देणार नाहीं. जें दिल्हें तें देखील तो त्यापासून काढून, जो त्याचा चांगला उपयोग करील त्याला देईल. संसाराविषयीं ह्मटलें तर मनुष्यामध्यें तसेंच घडतें, आणि देवहि या नेमाप्रमाणें प्रतिफळ देईल.

३० "आणि त्या निरुपयोगी इ०" या दाखल्याचा अर्थ संक्षेपेंकरून असा आहे. १. देवानें आपल्या सेवकांस सारिखींच गुण व शक्ति दिल्हीं नाहींत. २. ते आपले गुण व शक्ति देवाचा मान व गौरव करण्यांत लावायास बांधिले आहेत. ३. असें केल्यानें त्यांचे गुण व शक्ति वाढतात. ४. त्यांनीं आपले गुण व शक्ति यांचा जसा उपयोग केला त्याप्रमाणें त्यांचा न्याय होईल. ५ पापी लोक देव कठोर धनी असें मोजतात. ६. अन्याय केल्याबदल असें केवळ नव्हे परंतु चांगलें न केल्याबदल पाप्यांस हिशोब द्यावा लागेल. ज्यानें आपले रुपये लपवून धन्याला तेच परत दिल्हे तो जर दोषी ठरून नाश पावला तर जे आपले सर्व गुण व शक्ति अयोग्य कामांत खर्चतात ते किती विशेषेंकरून नाश पावतील!

३१ "पुत्र आपल्या गौरवानें येईल इ०" जगाच्या समाप्तीस ख्रीस्त येईल तेव्हां तो सृष्टीचा राजा व मस्तक असतां मोठ्या वैभवानें व गौरवानें येईल,

३२ आणि त्यासमोर सर्व राष्ट्रें जमा होतील, (१) आणि ज्या प्रकारें मेंढपाळ शेरडांतून मेंढरें वेगळीं करितो, (२) त्या प्रकारें तो त्यांस वेगळें करील. (३)

३३ आणि मेंढरांस तो आपल्या उजवीकडे (४) व शेरडांस डावीकडे उभें करील.

३४ तेव्हां राजा आपल्या उजवीकडल्यांस ह्मणेल, अहो माझ्या

---

(१) रोम. १४:१०. २ करिं. ५:१० प्रग. २०:१२. (२) यहेज्क. ३०: ३८. मात्थ. १३:४९. (३) गीत ७८:५२. योह. १०: १४, २७. (४) इब्री. १:३.

---

असें शास्त्रांत ठिकाणोठिकाणीं ह्मटलें आहे. प्रेषि. १:११;एफे.१:२०–२२; १ थेस्स. ४:१६; १करिं. १५:२४,२५,५२.

"तो आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल." अक्षरशः नव्हे, पण वास्तविक राजा व न्यायाधीश असतां तो सर्व लोकांस जमावील व न्याय करून सर्वांस प्रतिफळें देईल.

३२ "आणि त्यासमोर सर्व राष्ट्रें इ०" खीस्त न्यायास येईल तेव्हां हें जग जळून नाश पावेल.२पेत्र.३:१०,१२;प्रग.२०:११. तेव्हां खरे ख्रिस्ती जे मेलेले ते सर्व पहिल्याने उठतील. १थेस्स. ४:१६. जे जिवंत असतील ते पालटून मेलेल्यांमधून उठलेल्यांसारिखे होतील.१करिं.१५:५२–५४. १थेस्स.४:१७. सर्व दुष्ट उठून न्यायास बाहेर येतील. यो. ५:१८,१९; दान. १२:२;मात्थी. १३:४१,४२;प्रग. २०:१३.मग जगाचा न्याय ठरवून तो नीतिमंतांस तारील. आणि दुष्टांस जेथें रडणें व दांत खाणें होईल तेथें वांटा देईल.

३३ "आणि मेंढरांस इ०"ह्मणजे नीतिमंतांस.यो. १०:७,१४,१५,१६,२७. गीत. १०:३.७४:१;२३. "उजवीकडे" त्यांस मान देण्यासाठीं. उप. १०:२. एफे. १:२०; गीतें. ११०:१; प्रेषि. २:२५.३३. "शेरडांस." ह्मणजे दुष्टांस. यहेज्क. ३४:१७. "डावीकडे." अपमान व त्यांचा दोष दाखविण्यासाठीं. उप. १०:२.

३४ "तेव्हां राजा." ह्मणजे येशू खीस्त जो सृष्टीचा राजा व न्यायाधीश तो. लूका. १९:३८. यो. १८:३७. प्रग. १७:१४.१९:१६. तें वतन करून घ्या. खीस्ती हे देवाचे वतनदार असें शास्त्रांत कोठकोठें ह्मटलें आहे. रोम. ८:१७.गल.४:६,७इब्री.१:१४.१यो.३:२.हें वतन देवाने आपल्या लोकांसाठीं पूर्वीपासून सिद्ध केलें. जे आपलीं पापें पदरांत घेऊन खीस्ताला शरण जातात त्यानीं तारण पावावें असा संकेत देवाने पूर्वीपासून केला आहे. तसेंच जे शरण जात नाहींत पण स्वइच्छेने चालून पाप करीत जातात आणि अपश्चा-

बापाचे आशीर्वादित, (१) या, जें राज्य (२) जगाच्या मांडण्यापासून तुह्माकरितां तयार केलें (३) तें वतन करून घ्या. (४)

३५ कारण कीं (५) मी भुकेला होतों, तेव्हां तुह्मी मला खायास दिल्हें; तान्हेला होतों तेव्हां मला प्यायास दिल्हें; परका होतों तेव्हां मला घरांत घेतलें. (६)

३६ उघडा, (७) तेव्हां मला पांघरूण दिल्हें; रोगी होतों तेव्हां माझा समाचार घेतला; (८) बंदिशाळेंत (९) होतों तेव्हां मजकडे आलां.

३७ त्या वेळेस नीतिमान त्याला उत्तर देतील कीं, हे प्रभु, आह्मी तुला भुकेलें केव्हां पाहून खायास दिल्हें? आणि तान्हेलें केव्हां पाहून प्यायास दिल्हें?

३८ आणि तुला परकें केव्हां पाहून घरांत घेतलें? आणि उघडें केव्हां पाहून पांघरूण दिल्हें?

३९ आणि तुला रोगी अथवा बंदिशाळेंत केव्हां पाहून तुजकडे आलों?

---

(१) गीत. ११५: १५. (२) रोम. ८:१७. १ पेत्र. १:४. (३) १ थेस्स. २:१२. प्रग. ५: १०. (४) १ करिं. २:९. इब्री. ११:१६. (५) यशा. ५८:७. यहेज्क. १८:७. (६) १ पेत्र. ४:९. ३ योह. ५. (७) याक. २:१५,१६. (८) १:२७. (९) २ तीम. १:१६. इब्री. १३:२.

---

त्तापी असून मरण पावतात त्यानी नाश पावावा असाहि संकेत देवानें पूर्वींपासून केला आहे. असें असतां जे खुशीनें नाशाचा मार्ग धरितात ते आपला नाश करून घेतात. यो. ५:४० मार्क. १६:१५,१६.

३५,३६ "कारण कीं मी भुकेला होतों इ०" येशू ख्रीस्त आपल्या लोकांवर केलेलं उपकार आपणावर केल्यासारिखे मोजतो. मात्थी १०:४०,४२. ख्रीस्त व त्याचे लोक यांमध्यें जो संबंध तो सर्वांहून प्रिय व जवळचा आहे. यो. १५: ४,५,६. एफे. ४:२३-३२. १ करिं. ६:१९. ह्मणून जे ख्रीस्त्यांचा अन्याय करितात ते माझा अन्याय करितात आणि जे गरीब व दुःखित ख्रिस्त्यांवर उपकार करितात ते मजवर उपकार करितात असें ख्रीस्त मोजतो.

३७—३९ "त्या वेळेस नीतिमान त्याला उत्तर देतील इ०" ते नम्रता दाखवितात. आपण कांहीं स्तुति अथवा फळ पावण्याजोगीं कर्मै केलीं असें वाटत नाहीं ते दाखवितात.

४० तेव्हां राजा त्यांस उत्तर देईल कीं, मी तुह्मास खचीत सांगतों, या माझ्या भावांतलि लाहानांतून एकाला तुह्मी असें केलें, तितक्यावरून (१) मलाच केलें आहे.

४१ मग डावीकडल्यांसहि तो ह्मणेल, अहो शापग्रस्तहो, जो सर्वकाळचा अग्नि (२) सैतानासाठीं व त्याच्या दुतांसाठीं तयार केला (३) आहे त्यांत मजपासून जा. (४)

४२ कारण कीं, मी भुकेला होतों तेव्हां तुह्मी मला खायास दिल्हें नाहीं; तान्हेला होतों तेव्हां मला प्यायास दिल्हें नाहीं.

---

(१) नीति. १९:१७. मार्क. ९:४१. इब्री. ६:१०. (२) लूक. १३:२७. (३) मात्थ. १३:४०,४२. प्रग. १४:११. (४) यहूदा. ६. प्रग. २०:१०.

---

४० "माझ्या भावांतील लाहानांतून इ०" ख्रिस्ती किती जरी गरीब, दुःखित व त्रासलेले असले तरी ख्रीस्त त्यांस आपले भाऊ ह्मणतो आणि जें जें त्यांस केलें तें तें मला केलें असें मोजतो. यावरून जगाच्या न्यायाधिशाची केवढी कृपा दिसून येती.

४१ "सर्वकाळचा अग्नि." हे शब्द, परलोकीं दुष्टांस कठीण शासन प्राप्त होईल तें दाखविण्यास लाविले आहेत. ही भयंकर उपमा हिन्नोम खोऱ्याच्या अग्नीवरून घेतली असें दिसतें. मात्थी. ५:२२ यावरील टीका पाहा. परलोकीं दुष्ट वास्तविक अग्नींत जळतील असें विचारिलें तर हीं नाशवंत शरीरें मरणाकडून पालटून अविनाशी होतील, मग त्यांस व आत्म्यासहि योग्य असें अतिशय दुःख पीडा व यातना जेणेकडून होईल तें शासन प्राप्त होईल, असें अग्नि या शब्दावरून दाखविलें आहे. सर्वकाळचा अग्नि हे शब्द त्या शासनाचा प्रकार दाखविण्यासाठीं नव्हे पण तें शासन भयंकर, खचीत, अतिशय व सर्वकाळीक होईल असें दाखविण्यासाठीं लाविले आहेत. तें शासन कोणत्या प्रकारचें याविषयीं विशेष चिंता नाहीं. पण तें अतिशय व सर्वकाळचें होईल या खचीतीवरून सर्वांनी तें चुकवायास आणि आपलें तारण साधून घ्यायास मोठे व अखंड प्रयत्न करीत जावें. तें शासन सैतान व त्याचे दूत व देवाचे सर्व शत्रु यांसाठीं सिद्ध आहे. हें शासन सर्व दुष्टांचें वतन होईल.

४२—४६ जीं कर्मे केल्यावरून ख्रीस्त आपल्या लोकांस स्तुति व चांगलें फळ देतो तींच न केल्यावरून तो दुष्टांस दोषी ठरवून शासन देतो. याप्रमाणें मोठ्या अन्यायामुळें असें केवळ नव्हे पण कर्तव्य कर्म न केल्यामुळें पाप्यांस सर्वकाळचें शासन प्राप्त होईल. जे ख्रिस्ताची निंदा व छळ-

४३ परका होतों तेव्हां मला घरांत घेतलें नाहीं; उघडा, तेव्हां मला पांघरूण दिल्हें नाहीं; रोगी व बंदिशाळेंत होतों तेव्हां माझा समाचार घेतला नाहीं.

४४ तेव्हां हेहि त्याला उत्तर देतील कीं, हे प्रभू, आह्मी तुला भुकेलें अथवा तान्हेलें अथवा परकें अथवा उघडें अथवा रोगी अथवा बंदिशाळेंत असें केव्हां पाहून तुझी सेवा केली नाहीं?

४५ तेव्हां तो त्यांस उत्तर देईल कीं, मी तुह्मास खचीत सांगतों, तुह्मी या लाहानांतील एकाला असें केलें नाहीं, तितक्यावरून (१) मलाच केलें नाहीं.

४६ ते तर सर्वकाळच्या शासनांत जातील, आणि नीतिमान सर्वकाळच्या जीवनांत जातील. (२)

## अध्याय २६.

१ मग असें झालें कीं येशूने हीं सर्व वचनें संपविल्यावर आपल्या शिष्यांस ह्मटलें,

(१) जख. २:८. प्रेषि. ९:५. (२) दान. १२:२. यो. ५:२९.

णूक करितात अथवा ते दुःखित व गरजवंत असतां त्याचें साह्य करीत नाहींत ते मजसीं तसेंच करितात असें ख्रीस्त मोजतो. अगखी दुष्टांच्या भावना ख्रिस्त्यांच्या पासून किती वेगळ्या आहेत, पाहा. ख्रिस्ती केवळ नम्रता दाखवितात, दुष्ट मोठा अभिमान दाखवितात; त्यांनी सुकर्म केलें नसतां आपण केलें असा भास ते दाखवितात.

४६ "ते तर सर्वकाळच्या शासनांत इ०" दुष्ट व नीतिमान यांची परलोकींची अवस्था अगदी भिन्न होईल आणि दोघांची अवस्था सर्वकाळची होईल असें स्पष्ट दाखविलें आहे. कोणतीहि गोष्ट यापेक्षां अधिक दृढतेनें स्थापिली नाहीं. तर परलोकवास खचीत होणार आहे, आणि माझीं इहलोकीं कर्मे व आचरण याप्रमाणें माझी अवस्था परलोकीं दुःखाची किंवा सुखाची होईल असें प्रत्येकानें आपल्या ध्यानांत ठेवावें. असें समजून आपण नाश चुकवायास आणि सर्वकाळचें सुख मिळवायास किती प्रयत्न करावे?

१-१३ मार्क. १४: १-११. लुका. २२:१-६, यो. १२:१-७.

२ तुह्मास ठाऊक आहे कीं, (१) दोन दिवसानी वल्हांडण सण आहे, आणि मनुष्याच्या पुत्राला खांबीं देण्यास पराधीन करितील.

(१) मार्क. १४:१.इ. लूका. २२:१.इ. यो. १३:१. इ.

२ वल्हांडण सण. यहूदी मिसर देशांतल्या दासपणांतून आपल्या सुटकेच्या आठवणीसाठीं हा सण पाळीत असत. निर्ग. १२:१३. ते निसान (चैत्र) महिन्याच्या पंधराव्यापासून एकविसाव्या तारिखेपर्यंत ह्मणजे सात दिवस पाळीत असत. निर्ग. १२:१५–२०;२३:१५. या सगळ्या दिवसांत ते न फुगलेली भाकर खात असत, ह्मणून या सणाला न फुगलेल्या भाकरीचा सण असेंहि ह्मणत असत. निर्ग. १२:१८. लेवी. २३:६. चवदाव्या तारिखेस ते आपल्या घरांतून सगळे खमीर दूर करीत असत. या चालीवरून पौलसाने उपमा काढिली. १ करिं. ५:७. १० व्या तारिखेस घरधनी एका वर्षाचा कोंकरा कळपांतून निवडून ठेवीत आणि चवदाव्या तारिखेस मारीत असत. निर्ग. १२:१–६; अनु. १६: २,५,६. देवाच्या आज्ञेवरून त्यानी त्या कोंकऱ्याचें रक्त आपल्या दारांच्या चौकटांस शिंपडल्यानंतर उपाध्ये वेदीजवळ ओतीत असत. निर्ग. १२:७. मग दोन शूल आडवे घालून कांहीं हाडूक न मोडतां भाजीत आणि कडू भाजीबराबर खात असत. खाते वेळेस एकएका मंडळींत दाहांहून कमी अथवा विसांपेक्षां ज्यास्ती माणसें नसावीं. ते प्रवासास जाण्यासारिखे कंबर बांधून व वाहाणा घालून खात असत. याकडून ज्या त्वरेनें ते दासपणांतून निघणार होते ती त्यानीं दर्शविली. या सणामध्यें भोजन येणेंप्रमाणें.—प्रथम कांहीं पाणी व द्राक्षरस मिश्रित करून ते उपकारस्तुति करून पीत असत. हा पहिला प्याला होता. मग हात धूत आणि देवाची उपकारस्तुति फिरून करीत असत नंतर अन्न घालीत. ते अन्न कडू भाजी, न फुगलेली भाकर व कोंकरा आणि त्यासाठीं खजूर, अंजिर, खिसमीस व सिरका इत्यादिकांचें मिश्रित केलेलें ओलवण असें होतें. मग फिरून उपकारस्तुति करून ते थोडीशी कडू भाजी घेऊन खात असत. त्यानंतर सर्व पात्रें काढून प्रत्येक माणसापुढें द्राक्षारसाचा दुसरा प्याला पहिल्याप्रमाणें ठेवीत. लेंकरानी लक्ष्य लावून या क्रियेचा अभिप्राय विचारावा ह्मणून पात्रें काढीत असें ह्मणतात. निर्ग. १२:२६,२७. तेव्हां जो मुख्य यहूद्यांचें मिसरांत दासपण व निभावण्याचा प्रकार वर्णून हा सण स्थापायाचा अभिप्राय उलगडून सांगत असे. मग पात्रें फिरून आणल्यावर तो ह्मणे, हें वल्हांडण जेवण आपण खातों कारण कीं प्रभूनें मिसरांत आमच्या वडिलांचीं घरें वल्हांडलीं. मग तो आपल्या हातांत कडू भाजी घेऊन याकडून मिसरांतील दासपण कठीण ह्मणून दाखविलें, आणि न फुगलेली

३ तेव्हां कायफा नामें प्रमुख याजक याच्या घरीं मुख्य याजक व शास्त्री व लोकांचे वडील जमले.

---

भाकरहि घेऊन येथेंकडून निभाव अकस्मात ह्मणून दाखविलें आहे, असें ह्मणे. हें झाल्यावर ते ११३ व ११४ गीतें पाठ ह्मणत व प्रार्थना करीत. मग ते सर्व आपल्यापुढें ठेविलेला द्राक्षारस पीत असत. हा दुसरा प्याला होता. मग ते हात धुऊन तें जेवण खात. यानंतर ते आपले हात फिरून धूत व अणखी प्याला पीत. याला स्तुतीचा प्याला ह्मटला आहे कारण कीं तो मुख्य यावर विशेष उपकारस्तुति करीत असे. जेव्हां ख्रीस्ताने प्रभुभोजन स्थापिलें तेव्हां त्याने हा प्याला घेतला असें दिसतें. १ करिं. १०:१६. जाते वेळेस ते अणखी एक प्याला पीत. त्याला हाल्लेल ह्मणत कारण कीं त्याबरोबर ते कनिष्ठ हाल्लेल ह्मणजे ११५,११६,११७, व ११८ गीतें पाठ ह्मणत असत. ही चाल लक्षून प्रभूने व त्याच्या शिष्यानी प्रभुभोजन झाल्यावर गीत गायलें. मात्थी. २६:३०. ख्रिस्ताने हा सण यहूद्यांच्या रीतीप्रमाणें पाळिला असेल. परंतु असें करितां त्याने दाखविलें कीं ज्याचें प्रतिरूप हा सण आहे तें माझ्या मरणाकडून पूर्ण होणार. ह्मणून त्याच्या बदल त्याने प्रभुभोजन स्थापिलें आणि तेव्हांपासून तो सण पाळायाचा नव्हता.

३ "प्रमुख याजक." हें याजकपण आदीं आहरोनाला दिल्हें होतें, निर्ग. २८. आणि त्याच्या संतानांत राहायाचें होतें. गण. ३:१०. ख्रीस्ताच्यापूर्वीं १६० वर्षं आंतियोकस एपिफेनीसाने ज्याने दुसऱ्यापेक्षां ज्यास्ती देऊं केलें त्याला याजकपण विकत दिल्हें. ख्रीस्ताच्यापूर्वीं १५२ वर्षीं सूरयाचा राजा आलक्षांदर याने ज्यानथन प्रमुख याजक केला आणि मागून यहूद्यानी त्याचा भाऊ शिमोन प्रमुख याजक व राजाहि केला आणि हेरोदापर्यंत हे दोन्ही हक्क त्याच्या संतानांत राहिले. हेरोदाने व त्याच्या मागून सर्व रोमी अधिकाऱ्यानी आपल्या मर्जीप्रमाणें प्रमुख याजक बदल केले यावरून कायाफा त्याच वर्षीं प्रमुख याजक होता असें ह्मटलें आहे. यो. ११:५१. आणि जरी एकाच वेळेस एकच प्रमुख याजक असे तरी अनेक माणसांला तें नाम देत असत कारण कीं ते पूर्वीं प्रमुख याजक होऊन त्यांपासून याजकपण काढलें होतें. "जमले." ही यहूद्यांची मोठी सभा होती. मात्थी ५:२२. यावरील टीका पाहा.

४,५ लोकांस फारकरून वाटलें कीं हा ख्रीस्त देवाचा खरा अवतार व माणसांचा एकच तारणारा आहे ह्मणून याजक व शास्त्री यांस भय वाटलें कीं सणामध्यें त्याला धरून जिवें मारिलें तर लोक गडबड करतील. सणाच्या सात दिवसांत लोक चहुंकडून यरूशलेमांत येत असत आणि

४ आणि येशूला कपटानें धरावें व जिवें मारावें असी त्यांनी मसलत केली.

५ परंतु सणांत हें करूं नये, केलें तर कदाचित् लोकांमध्यें गलबला होईल, असें त्यांनी ह्मटलें.

६ आणि येशू बेथानींत कोडी शिमोन याच्या घरीं असतां,

७ कोणी बायको ( १ ) फार मोलवान सुगंध तेलाची आलाबास्त्र कुपी घेऊन त्याजकडे आली, आणि तो जेवायास बसला असतां तिनें ती त्याच्या डोक्यावर ओतिली.

८ तेव्हां त्याचे शिष्य हें पाहून रागें भरून बोलले, हा नाश कशाला ?

---

(१) गीत. २:२. (२) योह. ११:१,२. १२:३.

---

सुमारें ३०,००,००० माणसें जमत असत. तर याकरितां ख्रीस्ताला गुप्तरूपें अथवा कपटानें धरून जिवें मारावें असें याजक व शास्त्री यांस वाटलें.

६ "कोडी शिमोन." तो कोडी होता, पण बरा झाला होता असें दिसतें कारण कीं कोड्याबरोबर खायास अनुचित होतें. योहान्न ( १२:१. ) ह्मणतो कीं, या घरांत जो लाजारस मेलेल्यांमधून उठविलेला तोहि होता. तो कदाचित शिमोनाचा कोणी आप्त होता.

७ "कोणी बायको." ह्मणजे लाजारस व मार्था यांची बहीण मारया. यो. १२:३. "आलाबास्त्र." ह्मणजे एका सुंदर प्रकारचा सफेत संगमरवर. याचा फार उपयोग सुगंध तेल राखण्यासाठीं करीत असत. या सुगंध तेलास नार्द ह्मणत असें मार्कस (१४:३.) व योहान्न (१२:३.) सांगतात. तें तेल एका मूळाचें काढीत असत. तें फार सुगंध आणि अंगाला लावण्यास उत्तम असें ते मानीत असत. एका कुपीचें मोल सुमारें शें पन्नास रुपये असें होतें. (मार्क. १४:५.) "त्याच्या डोक्यावर ओतिली." यो. (१२:३.) ह्मणतो कीं पायांसहि लाविलें आणि आपल्या केसांनीं त्याचे पाय पुसिले. डोक्यावर ओतणें हा चाल सामान्य होती पण पायांवर लावून तिनें मोठी नम्रता व ख्रीस्तावरील फार प्रीति दाखविली.

८ "रागें भरून बोलले." योहान्न ह्मणतो, जो जळफळून बोलला तो यहूदा होता. तो चोर होता आणि कसणी वाहत असतां तींतून चोरून काढीत असे. त्याचें मुख्य धोरण आपला स्वार्थ असें होतें.

९ कारण कीं हें सुगंध तेल विकून बहुत पैसे आले असते व गरिबांस देतां येते.

१० तेव्हां येशू हें जाणून त्यांस ह्मणाला, या बायकोला त्रास कां देतां ? इने तर मजसाठीं चागलें काम केलें आहे.

११ कारण कीं (१) दरिद्री सर्वकाळ तुह्मामध्यें आहेत, परंतु मी (२) सर्वकाळ तुह्मामध्यें नाहीं.

१२ इने तर हें सुगंध तेल माझ्या शरिरावर घातलें हें माझ्या उत्तरकार्यासाठीं केलें.

१३ मी तुह्मास खचीत सांगतों, सर्व जगामध्यें जेथें जेथें हें शुभवर्तमान गाजवितील तेथें इनें जें केलें आहे तेंहि इच्या आठवणीसाठीं सांगतील.

---

(१) अनु. १५: ११. (२) योह. १४:१९. १७:११.

---

९ "गरिबांस देतां येते इ." त्याला वास्तविक दरिद्र्यांविषयीं कांहीं काळजी वाटली असें नाहीं. पण त्या मोलाचा लोभ त्याने धरिला. जळफळण्याचें कांहीं कारण नव्हतें. तें मारयेचें होतें आणि तिने आपल्या मर्जीप्रमाणें खर्चावें हें योग्य होतें. हल्लीं जेव्हां ख्रिस्ती लोक परोपकारीक काम चालविण्यास आपली मालमत्ता खर्चितात तेव्हां हा नाश कशाला असें बोलून बहुत जळफळतात परंतु हें काम देवाला प्रिय आहे. आणि हें करून ते देवावरील आपली प्रीति दाखवितात आणि हें देवाला पसंत होतें.

११ "कारण कीं इ." दरिद्र्यांस देणें योग्य होतें (गीत. ४१:१. नीति. १४:२१. २९:७; गल. २:१०) आणि ख्रीस्त मना करीना पण देण्यास उत्तेजन देई. परंतु प्रत्येक धर्म योग्य समयीं केला पाहिजे. दरिद्री त्यांजवळ सर्वकाळ राहण्याचे होते आणि जेव्हां इच्छा होती तेव्हां नित्य त्यांचें बरें करायास सांपडायाचे होते. ख्रीस्त देहाने त्यांजवळ अगखो राहायाचा नव्हता, ह्मणून त्याला मान व प्रीति दाखविण्याचा हा विशेष प्रसंग पडला होता.

१२,१३ "माझ्या उत्तरकार्यासाठीं केलें." मारयेला पूर्वी हें समजलें असें दिसत नाहीं, परंतु तिने प्रीतीने केलें आणि उत्तरकार्यासाठीं योग्य क्रिया होती यास्तव प्रभूला पसंत झाली आणि त्याने याविषयीं हें वचन दिल्हें. जे चांगले धार्मिक आहेत त्यांचीं सुकर्में त्यांच्या आठवणीसाठीं मांडावीं व वर्णावीं हें योग्य आहे.

१४ तेव्हां यहुदा इस्कारयोते नामें बारांतील एक (१) हा मुख्य याजकांकडे जाऊन ह्मणाला,

१५ म्या त्याला तुमच्या स्वाधीन केलें, तर मला काय द्याल? तेव्हां त्यानी त्याला तीस रुपये देऊं केले. (२)

१६ तेव्हांपासून तो त्याला पराधीन करायाची संधि पाहूं लागला.

१७ नंतर बेखमीर भाकरीच्या सणाच्या पहिल्या दिवशीं (३) शिष्य येशूकडे येऊन त्याला ह्मणाले, त्वां वल्हांडणाचें भोजन करावें याकरितां आह्मी कोठें तयारी करावी ह्मणून तुझी आज्ञा आहे?

१८ तेव्हां त्याने ह्मटलें, नगरांत अमक्याजवळ जाऊन त्याला सांगा कीं, गुरु ह्मणतो, माझी वेळ जवळ आली आहे, मी आपल्या शिष्यांसुद्धां तुझ्या एथें वल्हांडण करितों.

---

(१) मात्थ. १०:४. (२) जख. ११:१२, १३. मात्थ. २७:३. (३) निर्ग. १२:६, १८.

---

१४ "तेव्हां यहूदा इ." लूका ह्मणतो कीं सैतान यहूद्यांत शिरला ह्मणजे त्याला प्रेरिलें व मोहांत घातलें. "याजकडे." तो सरदारांजवळहि गेला. (लूका. २२:४) देवळांत पुष्कळ द्रव्य होतें ह्मणून पाहारा ठेवण्याचें अगत्य पडलें, आणि त्यावर सरदार असत. होईल तितका पैका मिळावा असा यहुदाचा हेतु असेल ह्मणून अनेक माणसांकडे गेला आणि अनेक जणांसीं निखालस ठराव करावा असें पाहिलें असेल.

१५ "तीस रुपये देऊं केले." हे गुलामाचें मोल होतें. (निर्ग. २१:३२) आणि ख्रीस्ताला धिक्कारण्यासाठीं त्यानी हें मोल ठरविलें असेल.

१६ "संधि पाहूं लागला." समुदाय नाहीं असी संधि पाहायाची होती. बहुत लोक त्यावर विश्वास ठेवीत होते आणि गडबड करून त्याला आमच्या हातांतून सोडवितील असें भय त्या याजकांस पडलें.

१७—१९. मार्कस १४:१२—१६; लूका. २२:७-१३. पाहा. "बेखमीर भाकरींच्या." त्या आठ दिवसांत फुगलेली भाकर अगदीं खायाची नव्हती ह्मणून या सणाला बेखमीर भाकरींचा ह्मणत. "पहिल्या दिवसीं." ह्मणजे १४ व्या तारिखेस ती तारीख मोजून सणाचे दिवस आठ असे होते.

१८ "अमक्याजवळ जाऊन इ." ख्रीस्ताने त्या माणसाचें नांव सांगितलें नाहीं, पण जो पाण्याची घागर घेऊन भेटेल त्याच्यामागें जा, (मार्कस व लूका पाहा) असें सांगितलें. त्याने केवळ पेत्रस आणि योहान्न या दोघां

१९ मग येशूने शिष्यांस सांगितलें होतें तसें त्यांनी केलें, व वल्हांडणाची तयारी केली.

२० आणि संध्याकाळ झाल्यावर तो बारांबरोबर जेवायास बसला.

२१ आणि ते जेवीत असतां त्याने ह्मटलें, मी तुह्मास खचीत सांगतों कीं, तुह्मांमधील एक मला पराधीन करील.

---

शिष्यांस पाठविलें, आणि ज्या घरीं जायाचें होतें तें यहूदास न कळावें ह्मणून ख्रीस्ताने त्याच्या धन्याचें नांव सांगितलें नाहीं असें दिसतें. तें असो, असा माणूस शिष्यांस भेटेल आणि तो आपल्या घरांत सिद्ध केलेली जागा देईल हें ख्रीस्ताला पूर्वी कळलें यावरून प्रमाण पटतें कीं तो सर्वज्ञानी होता. हें केवळ अंतर्ज्ञानावरूनच कळलें असावें. "गुरु ह्मणतो." या शब्दावरून त्या माणसाला समजायाचें होतें. यावरून असें दिसतें कीं त्याला ख्रीस्ताची ओळख होती आणि तो त्याचा शिष्य होता, यास्तव ख्रीस्ताची आज्ञा आहे असें समजून त्याने मान्य होऊन खोली दाखविली. "माझी वेळ जवळ इ." मरण पावण्याची वेळ असा अर्थ असेल. पाप्यांसाठीं प्रायश्चित्त करावयाला वधस्तंभीं मरण सोसलें पाहिजे हें पूर्वीपासून ख्रीस्ताला माहीत होतें. हें बरोबर समजून ख्रीस्त अवतार घेऊन या दयेच्या कामावर आला, आणि सोसण्याची वेळ जवळ आली तेव्हां त्याला समजलें.

१९ "वल्हांडणाची तयारी केली." ह्मणजे कोंकरूं व दुसरे पदार्थ हीं नेमाप्रमाणें सिद्ध केलीं. निर्ग. १२:३—१७.

२० "संध्याकाळ झाल्यावर इ." हें जेवण सूर्य मावळल्यावर आणि कधीं कधीं रात्रीमध्यें जेवीत असत. निर्ग. १२:८. आदीं ते कंबर बांधून व उभे राहून खात असत, आणि असें करून मिसरांतून आपला निकडीचा निभाव दर्शवीत असत. पण मागून ही रीत बदलून ते सामान्य जेवणाच्या रीतीप्रमाणें निजून खाऊं लागले. जेवायास बसले असतां शिष्य, कोण थोर आहे याविषयीं वाद करूं लागले. लूका. २२:२४—३० त्या वेळेसहि प्रभुभोजन स्थापन्यापूर्वी ख्रीस्ताने आपल्या शिष्यांस नम्रता शिकविण्यासाठीं त्यांचे पाय धुतले. यो. १३:१—२०.

२१–२४. मार्कस १४:१८-२१, लूका. २२:२१–२३. व योहान्न १३: २१,२२ पाहा. योहान्न ह्मणतो कीं, येशू आत्म्यांत घाबरला. ह्मणजे यहूदा जें महापातक करणार होता तें जाणून तो आत्म्यांत घाबरला.

२२ तेव्हां ते फार खिन्न होऊन त्यांतील एक एक त्याला ह्मणूं लागला, हे प्रभू, तो मी आहें काय ?

२३ तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, (१) जो मजबरोबर ताटांत हात घालितो तोच मला पराधीन करील.

२४ मनुष्याच्या पुत्राविषयीं जसें लिहिलें आहे (२) तसा तो जातो खरा, परंतु जो मनुष्याच्या पुत्राला पराधीन करितो, त्या माणसाला हायहाय; तो माणूस जन्मला नसता तर त्याला बरें होतें.

(१) गीत ४१:९. ५५:१२-१५. (२) गीत २२. यशा. ५३.

२२ "तेव्हां ते फार खिन्न होऊन इ." योहान्न ह्मणतो कीं एकमेकांकडे पाहून ते फार चिंताक्रांत होऊं लागले आणि तें जो करणार तो कोण असेल, असें पुसूं लागले. केवळ यहूदा आपल्या मनाचा दुष्ट हेतु जाणून उगाच राहिला, मग तो मीच आहें ह्मणून समजेल अशा भयाने व आपला दुष्ट बेत लपविण्याकरितां शेवटीं त्यानेंहि पुसलें.

२३ "ताटांत हात घालितो." ह्या ताटांत कडू ओलवण होतें. ख्रीस्ताने त्यांत तुकडा बुचकळून यहूदाला देऊन, जो मला परस्वाधीन करणार तो हाच असें दाखविलें.

२४ "मनुष्याच्या पुत्राविषयीं." ह्मणजे ख्रीस्ताविषयीं. "तसा तो जातो इ." ह्मणजे मरतो. गीत. ३१:१३. उत्प. १९:२. ख्रीस्ताचें मरण कसें व्हायाचें याविषयीं जुन्या करारांत बहुत भविष्यलेख होते. गीत. ४१:९. दान. ९:२६,२७.यश. ५३:४--९. "त्या माणसाला हाय हाय." हें पातक मोठें व भयंकर आहे आणि त्या माणसाला भयंकर शिक्षा प्राप्त होईल. जरी देवाचे संकेत व ठरविलेले नेम यांप्रमाणें त्याने ख्रीस्ताला परस्वाधीन केलें तरी पापरूप हातानी परस्वाधीन करून वधस्तंभीं दिल्हें; आणि करणारा फार अपराधी झाला, असा कीं जर जन्मला नसता तर बरें होतें. कारण कीं जो दंड त्याला प्राप्त व्हायाचा तो सर्वकालीक दंड. सरेल अथवा त्यापासून सुटका होईल असें कधीं व्हावयाचें असतें तर हें वाक्य खरें न होतें. कां कीं तेव्हांपासून पुढें अनंत काळपर्यंत सुख भोगल्यापासून दुःखापेक्षां सुख जास्ती झालें असें होईल, आणि न जन्मला तर बरें होतें हें खरें नाहीं असें होईल. तर या वाक्यावरून प्रमाण पटतें कीं परलोकीं जो दंड दुष्टांस लागणार तो सर्वकालिक होईल. ख्रीस्त देवाच्या संकेताप्रमाणें परस्वाधीन केला गेला तरी यहूदा दोषी होता याविषयीं कोणी अडखळतात व दिकत घेतात. तर याविषयीं असें मनांत आणावें कीं यहूदाने तें महापातक करावें

२५ तेव्हां त्याला पराधीन करणारा यहुदा याने उत्तर दिल्हें कीं, हे गुरू, तो मी आहें काय? तो त्याला ह्मणाला, तूं ह्मणतोस तसेंच.

२६ आणि ते जेवीत असतां येशूनें भाकर घेतली, आणि आशीर्वाद मागून ती मोडिली, (१) आणि शिष्यांस दिल्ही व ह्मटलें, घ्या, खा, हें माझें शरीर आहे.

---

(१) १ करिं. ११:२३. इ.

---

असें कांहीं उत्तेजन देवाच्या संकेतावरून झालें नाहीं. त्याने हा अपराध स्वखुशीने केला आणि त्याचा दोष त्याच्याच माथ्यावर होता. योसेफाच्या भावांनी त्याला दासपणांत विकून टाकिलें आणि हें देवाच्या संकेताप्रमाणें झालें तरी ते भाऊ तसेच दोषी होते आणि योसेफाने माफ करीत असतांहि तसेंच मोजलें. उत्पत्ति. ५०:२०. दुष्ट माणसांनी आपल्या पापांचा दोष देवावर ठेवूं नये. आपण आपल्या खुशीने करितों आणि पाप केलें तर आपणच दोषी असी साक्ष प्रत्येकाचें मन देतें.

२५ "तूं ह्मणतोस तसेंच." होय, तूंच आहेस. यहूदाने केवळ आपला मनांतला दुष्ट हेतु लपवावा ह्मणूनच पुसलें. पण ख्रीस्ताने तो हेतु जाणून प्रसिद्ध केला.

२६–३० मार्कस. १४:२२–२६. लूका. २२:१५–२०, १ करिंथ. ११:२३—२५. पाहा.

२६ "आणि ते जेवीत असतां." ह्या वल्हांडणाचें जेवण आपल्या शिष्यांबरोबर करावयास ख्रीस्ताने फार इच्छिलें होतें. (लूका.) आपली आठवणूक स्थापावी, आपल्या शिष्यांस येणारीं दुःखें सोसायास सशक्त करावें, त्यांस या संस्काराचा खरा अभिप्राय उलगडून दाखवावा आणि त्यांबरोबर अणखी एक वेळ ईश्वरी भजन करावें ह्मणून हा प्रसंग इच्छिला होता. "आशीर्वाद मागून ती मोडली." त्याने भाकर मोडून येणारीं दुःखें प्रदर्शविलीं. करिंथ. ११:२४. "हें माझें शरीर आहे." ह्मणजे माझ्या शरिराचा दाखला आहे. माझें शरीर मरणाकडून कसें मोडलें जाणार हें या मोडलेल्या भाकरीवरून दाखविलें आहे आणि यावरून माझ्या दुःखाची आठवण होईल. ती भाकर ख्रीस्ताचें वास्तविक शरीर असें समजायाचें नाहीं. ती त्याचें शरीर नव्हतें. त्याचें शरीर तेव्हांच त्यांच्या देखतां जिवंत होतें, तर ती भाकर आणि तो द्राक्षारस ख्रीस्ताचें वास्तविक शरीर व रक्त झालें असें समजावें यापेक्षां असंगत व असंभाव्य तें काय! वल्हांडण

२७ नंतर त्याने प्याला घेतला, आणि आशीर्वाद मागून तो त्यांस दिल्हा, आणि ह्मटलें, यांतून सर्व घ्या.

२८ कारण कीं हें माझें रक्त आहे, हें नव्या कराराचें, (१) हें पापांची क्षमा होण्यासाठीं बहुतांकरितां ओतिलें, असें आहे.

२९ आणि मी तुह्मास सांगतों कीं मी आपल्या बापाच्या राज्यांत (२) तुह्माबरोबर नवा पिईन त्या दिवसापर्यंत द्राक्षवेलाचा हा उपज एव्हांपासून पिणारच नाहीं.

---

(१) इर्म. ३१:३१. (२) यशा. २५:६.

---

सण स्थापिला तेव्हां मोशे ह्मणाला तें (कोंकरूं) परमेश्वरासाठीं वल्हांडण आहे, ( निर्ग. १२:११. ) ह्मणजे दुताने यहूद्यांचीं घरें वल्हांडलीं याचा दाखला व आठवणूक हें कोंकरूं व वल्हांडण जेवण आहे. तर ख्रीस्ताच्या बोलण्याचा अर्थ हाच कीं, ही मोडलेली भाकर माझ्या मोडलेल्या व दुःखानीं व्याप्त झालेल्या शरिराचा दाखला व आठवणूक असी आहे.

२७ "नंतर त्याने प्याला घेतला." द्राक्षरसाचा प्याला. हा प्याला घेत असत तेव्हां शेवटलीं गीतें गाऊं लागत असत.

२८ "कारण कीं हें माझें रक्त आहे." ह्मणजे हा द्राक्षरस माझ्या रक्ताचा दाखला आहे. "हें नव्या कराराचें." देवाने पूर्वीं यहूद्यासीं करार करून यज्ञपशूच्या रक्ताकडून शिक्का केला. निर्ग. २४:८. तो लक्षून ख्रीस्ताने सांगितलें कीं हा नवा करार माझ्या रक्ताकडून मुद्रित होतो. "पापांची क्षमा होण्यासाठीं—ओतिलें, असें आहे." पापांची क्षमा व्हावी ह्मणून ख्रीस्ताचें रक्त ओतिलें. हाच तरणोपाय देवाने नेमला. पाप्यांचा बदला होऊन ख्रीस्त त्यांसाठीं मरण पावला. योहान्न. १:२९; एफ. ५:२. इब्री. ७:२७; १ योह. २:२; ४:१०; यशा. ५३:१०; रोम. ८:३२; २ करिं. ५:१५. ख्रीस्ताने जें दुःख सोसलें तेणेंकडून नेमशास्त्र आणि देवाचा न्याय हीं पूर्ण झालीं आणि देव पाप्यांस सर्वकालिक दंड लावण्याबदल तें प्रायश्चित्त स्वीकारून घेतो. देवाने आपला एकुलता पुत्र मरायाला दिल्हा यावरून त्याने पापाचा अति द्वेष दाखविला आहे.

२९ "बापाच्या राज्यांत." आकाशलोकांत जे देवाचे खरे भक्त ते सव तेथें ख्रीस्ताबरोबर सर्वकालिक सुख भोगतील. ते आकाशलोकांत वास्तविक द्राक्षारस पितील, असें नाहीं, तर जें भागीपण व सुख या संस्कारावरून सुचविलें आहे तें भोगतील, असें समजायाचें आहे. सौख्य लोकाला मेजवानीचा दाखला वारंवार दिल्हा आहे. "त्या दिवसापर्यंत—पिणार-

३० नंतर गीत गाऊन ते निघून जाइत झाडांच्या डोंगरास गेले.

३१ तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, तुह्मी सर्व याच रात्रीं मजमुळें अडखळाल; कारण असें लिहिलें आहे कीं, (१) मी मेंढपाळाला मारीन, आणि कळपांतल्या मेंढरांची दाणादाण होईल.

३२ परंतु मी उठल्यावर (२) तुमच्या अगोदर गालीलांत जाईन.

(१) जख. १३:७. (२) मात्थ. २८:७,१०, १६.

च नाहीं." ख्रीस्ताने एथें शिकविलें कीं वल्हांडण सण आणि ज्यावरून पुढल्या गोष्टी प्रदर्शविल्या आहेत त्या सर्व रीति उपमा इत्यादि आतां समाप्त होतात. मी मरणार आहें; मी हा संस्कार स्थापितों असें कीं तुह्मी पाळून माझी आठवण करावी आणि मजबरोबर आकाशलोकांतलें सुख भोगायास सिद्ध व्हावें. मी आता जातों, हा संस्कार इहलोकीं मी फिरून पाळीत नाहीं, पण सौख्यलोकांत तुह्माबरोबर सर्वकालिक सुख भोगीन.

३० "नंतर गीत गाऊन इ." यहूदी वल्हांडण सण करते वेळेस ११३ व ११४ गीतें गात असत, आणि त्याच्या समाप्तीस ११५—११८ गीतें गात असत. ख्रीस्त व शिष्य यानी हींच गीतें गायलीं असतील. "जाइत झाडांच्या डोंगरास." मात्थी. २१:१ यावरील व्याख्या पाहा.

३१–३५ मार्कस १४:२७—३१. लूका. २२:३१-३४; यो. १३:३४—३८ पाहा.

३१ "तुह्मी सर्व याच रात्रीं इ०" तूं कोठें जातोस असें पेत्रसानें ख्रीस्ताला पुसलें होतें. ख्रीस्त उत्तर देऊन बोलला कीं जेथें मी जातों तेथें तुझ्याने माझ्या मागें आतां येववत नाहीं, परंतु पुढें माझ्यामागें येसील. यावर पेत्रस बोलला, मी तुझ्या साठीं जीव देईन. यो. १३: ३६. हें ऐकून ख्रीस्ताने त्यांस स्पष्ट कळविलें कीं, याच रात्रीं तुह्मी सर्व मजविषयीं अडखळाल. शत्रु मला धरून गांजतील तेव्हां तुह्मी सर्व मला सोडून जाल. "कारण असें लिहिलें आहे." जख. १३: ७. हें ख्रीस्ताविषयीं लिहिलें होतें आणि यावेळेस पूर्ण झालें असें दाखविलें आहे. "मेंढपाळाला." ख्रीस्त जो आपल्या लोकांचा मेंढपाळ तो. यो. १०: ११,१४. ख्रीस्त मेंढपाळ तर त्याचे सर्व लोक मेंढरें ह्मणावीं. त्याच रात्रीं शिष्यांची दाणादाण झाली. त्याच रात्रीं देव जो बाप त्याने ख्रीस्ताला दुष्टांच्या स्वाधीन दिल्हें असें कीं त्याने जगाच्या पापांचें ओझें वाहावें आणि जगासाठीं मायश्चित्त करावें.

३३ तेव्हां पेत्रसाने त्याला उत्तर दिल्हें कीं, सर्व तुजमुळें अडखळले तरी मी कधींहि अडखळणार नाहीं.

३४ येशूने त्याला ह्मटलें, मी तुला खचीत सांगतों कीं, याच रात्रीं कोंबडा ओरडल्याअगोदर तूं मला तीन वेळां नाकारसील.

३५ पेत्रस त्याला ह्मणाला, मला तुजबरोबर मरावें लागलें तरी मी तुला नाकारणारच नाहीं; सर्व शिष्यांनीहि तसेंच ह्मटलें.

३६ नंतर (१) येशू त्यांबरोबर गेथसेमाने या नांवाच्या ठिकाणीं आला; मग तो शिष्यांस ह्मणाला, मी जाऊन तेथें प्रार्थना करीन तोंपर्यंत एथें बसा.

---

(१) मार्क. १४:३२. इ. लूक. २२:३९. इ. यो. १८:१.इ.

---

३२ "परंतु मी उठल्यावर इ०" शिष्यांस समाधान व धैर्य व्हावें आणि भेट कोणत्या ठिकाणीं व्हावयाची हें कळावें ह्मणून ख्रिस्तानें हें वचन त्यांस दिल्हें. हें वचन पूर्ण झालें. मार्कस १६:७, मात्थी. २८:१६. पाहा.

३३ "सर्व तुजमुळें इ०" पेत्रस सालस, आवेशी आणि आपल्या प्रभूवर प्रीति करणारा होता, पण आपल्या शक्तीवर भरवसा ठेवून त्यानें हें वचन केलें आणि आपली शक्ति किती थोडी व किती भारी दुःखें प्राप्त व्हावयाचीं होतीं हीं त्याला ठाऊक नव्हतीं. तर पेत्रसाच्या गोष्टीवरून असा बोध घ्यावा कीं, परीक्षा होई तोंपर्यंत आपण किती अशक्त हें समजत नाहीं, ह्मणून त्याचें साह्य व शक्ति यांवर भरवसा ठेवून त्याच्या सेवेंत व प्रीतींत टिकून राहण्याचा निश्चय करावा. पेत्रसाला गव्हांसारिखें चाळावें ह्मणून सैतानानें फार इच्छिलें (लूका.) परंतु प्रभूनें त्यासाठीं प्रार्थना केली आणि जरी तो अडखळला तरी तो फिरला आणि मग अधिक स्थिर बुद्धीनें प्रभूला लगटून राहिला.

३४ "याच रात्रीं." पेत्रस एवढा अवसानी असतांहि तो लवकर लाजून भिऊन नाकबूल होईल असें ख्रिस्तानें जाणिलें, यावरून ख्रिस्त सर्वसाक्षी व सर्वज्ञानी असें प्रमाण पटतें.

३६-४५. मार्कस. १४:३२-४२; लूका. २२:३९-४६; यो. १८:१.

३६ "गेथसेमाने या नांवाच्या ठिकाणीं आला." गेथसेमाने ह्मणून मळा होता (यो.) आणि येशू वारंवार आपल्या शिष्यांबरोबर तेथें जात असे. (लूका.) तो मळा हल्लीं आहे पण कांहींसा ओसाड पडला. कित्येक प्रवासी त्या स्थानीं जाऊन पाहिलें आणि त्याचें वर्णन केलें. "मी जाऊन इ०" धोंड्यांचा

३७ मग तो पेत्रसाला व जब्दीच्या दोघां पुत्रांस बरोबर घेऊन खिन्न व कष्टी होऊं लागला.

३८ तेव्हां त्यानें त्यांस ह्मटलें, माझा जीव मरणापर्यंत खिन्न आहे. (१) एथें राहा आणि मजबरोबर जागे असा.

३९ मग तो कांहींसा पुढें जाऊन पालथा पडला, आणि त्यानें असी प्रार्थना केली कीं, (२) हे माझ्या बापा, साधेल तर हा प्याला (३) मजपासून टळून जावो; तथापि (४) माझी इच्छा आहे असें नको तर तुझी आहे तसें होवो.

---

(१) गीत. ११६:३. यशा. ५३:३,१०. यो. १२:२७. (२) इब्री. ५:७. (३) मात्थ. २०:२२ (४) यो. ५:३०. ६:३८. रोम. १५:३. फिलि. २:८.

---

टप्या इतका दूर. (लूका.) त्यांनी परिक्षेंत न यावें ह्मणून त्यानें प्रार्थना करायाला सांगितलें होतें.

३७ "मग तो पेत्रसाल व जबदीच्या दोघां पुत्रांस इ०" याकोब व योहान्न यांस. मात्थी. १०:२. ख्रीस्तानें या तीन शिष्यांस अगोदर दोनदां आपला पराक्रम व गौरव पाहायाला नेलें होतें. त्यानें याईरस अधिकाऱ्याची कन्या बरी केली, (लूका. ८:५१) ही एक वेळ आणि तो डोंगरावर रूपांतर पावला ती दुसरी वेळ. (मात्थी. १७:१) "खिन्न व कष्टी होऊं लागला." जें कठीण दुःख सोसायाचें होतें तें मनांत आणून असा झाला.

३८ "माझा जीव मरणापर्यंत खिन्न आहे." ख्रीस्ताला एवढें भारी दुःख झालें याचें कारण काय? त्याचें काम सिद्धीस जाण्याच्या लागास आलें होतें. देव जो बाप आणि पवित्र दूत याचा आवडता सहवास व सोबत फिरून व्हावयाची होती, व आपलें पूर्वीचें गौरव मिळायाचें होतें; या सर्वांवरून ख्रीस्ताला त्या वेळेस हर्ष पावण्याचें कारण होतें. तर तो एवढा खिन्न झाला याचें कारण काय? जगाच्या पापांचा भार त्याजवर ठेविला होता, हेंच त्या भारी दुःखाचें कारण होतें. त्यानें आमच्या पापाचें ओझें वाहिलें, निश्चयें त्यानें आमचीं दुःखें साहिलीं व आमचे शोक वाहिले आहेत, यशा. ५३.४.

३९ पालथा पडला. गुडघे टेंकून (लूका) ह्मणजे आधीं गुडघे टेंकून आग्रहानें प्रार्थना करितां पालथा पडला. "साधेल तर इ०" ह्मणजे हें भारी दुःख सोसल्याशिवाय जगाचा उद्धार व्हावा हें साधेल तर तें मजपासून टळून जावो. ख्रीस्तानें हें दुःख सोसल्याशिवाय पाप्यांचें तारण व्हावें हें साधलें असतें तर त्याला सोसावें लागलें नसतें याविषयीं संशय नाहीं. परंतु

४० मग तो शिष्यांकडे आला, आणि ते झोंपीं गेले आहेत असें पाहून तो पेत्रसाला ह्मणाला, असेंच काय? घटकाभरहि माझ्या बरोबर तुमच्यानें जागें राहवेना?

४१ तुह्मी परीक्षेंत (१) येऊं नये ह्मणून जागे राहा (२) व प्रार्थना करा; आत्मा (३) तयार आहे खरा, (४) परंतु देह अशक्त.

(१) मार्क. १३:३३.१४:३८.लूक. २२:४०. एफ.६:१८. प्रग.१६:१५.(२) नीति. ४:१४,१५. प्रग. ३:१०. (३)यशा. २६:८,९. रोम.७:१८–२५.गल.५:१७.

हें साध्य नव्हतें. देवाचा न्याय पूर्ण असतांहि पाप्यांची क्षमा होऊन त्यांनीं तारण पावावें याकरितां ख्रिस्ताला त्यांच्याबदलीं होऊन दुःख सोसावें लागलें. मरणापर्यंत मान्य होऊन त्यानें पाप्यांस अशा अनंत मोलानें खंडून घेतलें. तो मनुष्यासारिखा दुःख सोसून घाबरला तरी देवास मान्य होऊन त्याची पवित्र इच्छा व संकेत पूर्ण केला जावा असी दृढ इच्छा धरली. तर ख्रिस्तानें एथें आपल्या लोकांस सर्व प्रकारच्या संकटांत चांगला कित्ता दाखविला आहे. संकटें दूर व्हावीं असी प्रार्थना करणें योग्य आहे, परंतु माझी इच्छा आहे तसें नको, तर तुझी इच्छा आहे तसें होवो, असी भावना सर्व काळ धरावी.

४० "ते झोंपीं गेले इ०" लूका ह्मणतो कीं ते खेदामुळें झोंपीं गेले. भारी दुःखावरून झोंप येती याविषयीं बहुत उदाहरणें आहेत. रस साहेब मनांतील रोगविषयक ग्रंथांत ह्मणतो कीं, खेदाचें दुसरें एक चिन्ह गाढ झोंप असें आहे. आई देखील आपलीं लेंकरें मेल्यावर लागलेंच खेदामुळें झोंपीं जातात असें म्या वारंवार पाहिलें. अपराधी माणसें फांसीं जाण्याच्या आदल्या रात्रीं वारंवार गाढ झोंपीं जातात. "तो पेत्रसाला ह्मणाला इ०" पेत्रस स्वबुद्धिनिष्ठ होता. मी तुला कधीं सोडणार नाहीं, पाहिजे तर तुझ्यासाठीं जीव देईन असा बोलला होता, तरी एक घटकाहि त्याच्यानें जागरण करवलें नाहीं.

४१ "तुह्मी परीक्षेंत येऊं नये इ०" अधिक कठीण परीक्षा होणार ह्मणून जागृत राहून देवाचें साह्य मागा. शिष्यांचा विश्वास कमी होता. ते प्रभूवर प्रीति करीत होते खरी, पण जीवंत असतां जगिक राज्य स्थापील असें त्यास वाटत होतें. त्याला मरण पावण्याचें अगत्य आहे आणि मग तो मेलेल्यांमधून उठेल याविषयीं त्यांस बरोबर समजलें नाहीं यास्तव दुष्ट लोक त्याला धिःकारून जिवें मारतील तेव्हां त्यांची कठीण परीक्षा व्हावयाची होती. त्यासाठीं त्यांनी सिद्ध व्हावें ह्मणून हा बोध दिल्हा. "आत्मा तयार आहे खरा इ." तुह्मी मजवर विश्वास ठेवून मला कधीं नाकारणार नाहीं असें तुह्माला

४२ अणखी दुसऱ्याने जाऊन त्याने असी प्रार्थना केली कीं, हे माझ्या बापा, हा प्याला मी प्याल्यावांचून मजपासून टळून जात नाहीं तर तुझ्या इच्छेप्रमाणें होवो.

४३ मग त्याने येऊन ते पुन्हा झोंपीं गेले आहेत असें पाहिलें; कारण कीं त्यांचे डोळे जड झाले होते.

४४ नंतर त्यांस सोडून फिरून जाऊन त्याने तिसऱ्याने (१) तेंच वाक्य ह्मणून प्रार्थना केली.

४५ तेव्हां तो आपल्या शिष्यांकडे येऊन त्यांस ह्मणाला, अझून झोंप व विसांवा घेता? पाहा, घटका जवळ आली आहे, आणि मनुष्याचा पुत्र पाप्यांच्या हातीं देतात.

४६ उठा आपण जाऊं; पाहा, मला पराधीन करणारा जवळ आला आहे.

४७ तेव्हां तो बोलत आहे इतक्यांत पाहा, (२) बारांतला एक

(१) २करिं. १२:८. (२) प्रेषि. १:१६.

वाटतें, पण संभाळा, मानवी प्रकृति अशक्त आहे. आपल्यावर भरवसा ठेवूं नका. जागे राहा व देवाचें साह्य मागा.

४२—४४ प्रभूने बरीच वेळ प्रार्थनेंत घालविली आणि शिष्यानी त्याचे शब्द नव्हेत पण प्रार्थनेचा सारांश लिहिला असें दिसतें. तो वरचेवर शिष्यांकडे माघारें येई मग दुःखाने व पीडेने व्याप्त होऊन फिरून जाऊन अधिक आग्रहानें प्रार्थना करी. दूताने येऊन त्याला शक्ति दिल्ही. (लूका.) यावरून आश्चर्य वाटूं नये. तो देव असून मनुष्य झाला, आणि मनुष्य असतां तो मनुष्यासारिखा जगला आणि दुःख व समाधान पावला. लूका ह्मणतो कीं, फार कष्टी होऊन त्याने अधिक आग्रहाने प्रार्थना केली आणि त्याचा घाम रक्ताच्या थेंबासारिखा भूमिवर पडला. मानवी प्रकृति कचरूं लागली आणि अति दुःख प्राप्त झालें. येशू ख्रीस्ताला हें अति दुःख व पीडा प्राप्त झाली याचें कारण काय, याविषयीं सर्वांनी बरोबर विचार करावे. (उ.२८ यावरील व्याख्या पाहा.)

४६ "उठा, आपण जाऊं." मला मरण पावण्याची वेळ आली आहे. ते मला धरावयास आले. तर त्यांबरोबर जाऊं.

४७-२७ मार्क. १४:४३-५२; लूका. २२:४७-५३. यो.१८:२-१२.

"बारांतला एक यहूदा आला." ही जागा यहूदाला माहीत

यहूदा आला; आणि त्या संगतीं मुख्य याजक व लोकांचे वडील यांकडला मोठा समुदाय तरवारी व सोटे घेऊन आला.

४८ आणि त्याला पराधीन करणारा याने त्यांस असी खूण (१) सांगून ठेविली होती कीं, मी ज्याचें चुंबन घेईन तोच तो आहे, त्याला धरा.

४९ तेव्हांच त्याने येशूच्या जवळ येऊन ह्मटलें, हे गुरू, सलाम, आणि त्याचें चुंबन घेतलें. (२)

५० तेव्हां येशूने त्याला म्हटलें, गड्या, (३) कशाकरितां आलास? तेव्हां त्यानीं जवळ येऊन येशूवर हात टाकिले व त्याला धरिलें.

५१ मग पाहा, येशूबरोबर जे होते त्यांतून एकाने हात लांबवून आपली तरवार उपसली, आणि प्रमुख याजकाच्या चाकराला मारून त्याचा कान कापून टाकिला.

(१) गीत. ३८:१२. (२) २ शमु. ६:२७.२०:९. गीत. २८:३. (३) गीत. ४१:९. ५५:१३.

होती. (यो.) ख्रीस्त व शिष्य वल्हांडण सण करीत होते तेव्हां यहूदाने त्यांस सोडून जाऊन यहूद्यांसीं बंदोबस्त केला व ही टोळी जमविली. "मोठा समुदाय तरवारी व सोटे घेऊन आला." त्याने ही टोळी मुख्य याजकांपासून मिळविली. (यो.) योसेफस ह्मणतो कीं वल्हांडण सण पाळायास बहुत समुदाय जमत असत आणि कांहीं बंड अथवा गडबड न व्हावी ह्मणून शिपायांची टोळी देवळाजवळ ठेवीत असत. ही टोळी याजकांच्या हुकुमांत होती. (मात्थी. २७:६५.) ही रोमी टोळी होती. याशिवाय लेवी पाहारे देवळासभोवते नित्य ठेविले होते. ज्यांस ख्रीस्ताला धरायास याजकांनी पाठविलें ते हे रोमी व लेवी शिपाई असे होते. त्यांस अनेक लुच्चे मिळाले असतील.

४८ "याने त्यांस असी खूण सांगून ठेविली इ." रोमी व कदाचित दुसऱ्या शिपायांस ख्रीस्ताची ओळख नव्हती ह्मणून यहूदाने ही खूण ठरविली.

४९ "हे गुरू, सलाम; इ." मित्रपणाच्या सोंगाने आपला दुष्ट हेतु साधावा असी यहूदाची इच्छा होती.

५० "गड्या, कशाकरितां आलास?" ख्रीस्ताला ठाऊक नव्हतें ह्मणून पुसलें असें नव्हे, तर यहूदा केवढा अन्याय व अपराध करीत होता याविषयीं त्याच्या मनांत सुचवावें ह्मणून पुसलें असेल.

५१ "त्यांतून एकाने इ." ह्मणजे पेत्रसाने. (यो०) "याजकाच्या चाक-

५२ तेव्हां येशू त्याला म्हणाला, तूं आपली तरवार म्यानांत परतून घाल, कारण कीं (१) सर्व तरवार धरणारे तरवारीने नाश पावतील.

५३ म्या आपल्या बापाजवळ आतां मागितलें, तर तो दुतांच्या बारा सैन्यांपेक्षां (२) अधिक मला देईल असा मी समर्थ नाहीं, हें तुला वाटतें काय?

५४ असें केलें तर शास्त्र कसें पूर्ण होईल? कारण कीं असेंच झालें पाहिजे. (३)

५५ त्याच वेळेस येशू समुदायांस म्हणाला, जसे लुटाऱ्यावर तरवारी व सोटे घेऊन जातां तसे मला धरायास बाहेर आलां काय? मी प्रतिदिवशीं देवळांत उपदेश करीत तुम्हाजवळ बसत असें; तेव्हां तुम्ही मला धरिलें नाहीं.

---

(१) उत्प. ९:६. यहेज्क. ३५:५,६. प्रग. १३:१०. (२) २ राजे. ६:१७. दान. ७:१०. मात्थ. ४:११. (३) लूक. २४:२६,४६.

---

राला इ." त्याचें नांव मलखस होतें. (यो० ) शिष्य फारकरून हत्यारबंद नव्हते. या प्रसंगीं त्यांनी दोन तरवारी घेतल्या होत्या (लूका. २२:३८.) लूका ह्मणतो कीं ख्रिस्ताने मलखसाच्या कानाला स्पर्श करून त्याला बरें केलें. याप्रमाणें त्याचे शत्रु त्याचा घात करायास पाहत असतांहि त्याने त्यांचें बरें केलें आणि आपलें देवपण दाखविलें.

५३ "बारा सैन्यांपेक्षां इ." सैन्य ह्मणजे सुमारें ६००० शिपायांची टोळी. पेत्रसाने आपला जीव धोक्यांत घातला असें केवळ नव्हे पण देवावर भरवसा नाहीं असेंहि दाखविलें, ह्मणून ख्रीस्ताने त्याला समजाविलें. त्याने त्या शिपायांपासून सुटावें असें योग्य असल्यास देवाने असंख्य दूत पाठवून त्यास सोडविलें असतें.

५४ "तर शास्त्र कसें पूर्ण होईल इ." जगासाठीं प्रायश्चित्त करायाला ख्रीस्ताला मरावें लागेल असे बहुत शास्त्रलेख भविष्यवाद्यानी लिहिले होते, आणि तें काम सिद्धीस नेण्याला मरण पावण्याचें अगत्य होतें, असें सुचवून त्याने शिष्यांस समजाविलें कीं मी खुशीने मरायाला जातों. सर्व आकाशसैन्य त्याच्या हुकुमांत असतांहि त्याने आपणाला दुष्टांच्या स्वाधीन केलें आणि पाप्यांसाठीं ह्मणजे आपल्या शत्रूंसाठीं त्याने स्वखुशीने आपला जीव दिल्हा.

५६ परंतु भविष्यवाद्यांचे लेख पूर्ण व्हावे, (१) म्हणून हें सर्व झालें. तेव्हां सर्व शिष्य त्याला सोडून पळाले.

५७ नंतर येशूला धरिलें होतें (२) त्यानी त्याला प्रमुख याजक कायफा याजवळ नेलें, तेथें शास्त्री व वडील जमले.

५८ आणि पेत्रस प्रमुख याजकाच्या वाड्यापर्यंत त्याच्या मागें दुरून चालत गेला, आणि आंत जाऊन परिणाम पाहायास चाकरांमध्यें बसला.

---

(१) उत्प. ३:१५. गीत २२:६२. यशा. ५३. विल. ४:२०. दान. ९:२४, २६. जख. १३:७. प्रेषि. १:१६. (२) मार्क. १४:५३ इ. लूक. २२:५४. इ. योह. १८:१२. इ.

---

५६ "तेव्हां सर्व शिष्य त्याला सोडून पळाले." हत्यारबंद टोळ्यांनी ख्रिस्ताला वास्तविक धरिलें आहे असें पाहून शिष्यांस भय वाटलें, आणि आपलीं सर्व वचनें लागलेच विसरून ते पळाले. तसेंच हलींहि जेव्हां भय वाटतें अथवा पाठलाग होतो तेव्हां बहुत माणसें ख्रीस्ताला लवकर सोडतात.

५७—७५. मात्थी व मार्कस हे मोठया सभेंत ख्रीस्ताचा न्याय ठरणें याचें वर्णन पहिलें करितात, मग पेत्रसाने ख्रीस्ताला कसें नाकारिलें हें लिहितात. लूका आदीं नाकारणें मग न्याय ठरणें असें मांडितो. योहान्न दोन्हीं बरोबर चाललीं असें मांडितो. मार्कस १४:५३—७२; लूका. २२:५४-७१; यो. १८:१३—२७ पाहा.

५७ "कायफा इ." योहान्न ह्मणतो कीं पहिल्याने त्यानी ख्रीस्ताला आन्ना जो कायफाचा सासरा त्याच्याजवळ नेलें. आन्ना प्रमुख याजक झाला होता, यास्तव त्याला मान देण्याकरितां आदीं त्याला त्याकडे नेलें, आणि शास्त्री व वडील एकत्र झाले तोंपर्यंत त्याला तेथें राखलें असेल. कायफा त्याच वर्षीं प्रमुख याजक होता. (यो.) ख्रीस्ताच्या वेळेस प्रमुख याजक वरचेवर बदलत असे. "शास्त्री व वडील." ह्मणजे राष्ट्रांतील सभेचे मुख्य सभासद.

५८ "पेत्रस . . . त्याच्यामागें दुरून चालत गेला." असें करून पेत्रसाने दोन भावना दाखविल्या. १. आपल्या धन्यावरील प्रीति. २. आपल्या जीवाविषयीं भय. यास्तव आपला जीव वांचविण्याकरितां तो दुरून चालला, तरी आपल्या धन्याला काय होईल हें पाहायापुरतें जवळ चालला. बहुत लोक याविषयीं पेत्रसासारिखें करितात. त्यांची खातरी झाली आहे कीं तो खरा तारणारा. तथापि उपहास व पाठलाग यांस भिऊन ते लाजून दुरून

५९ तेव्हां मुख्य याजक व वडील व संपूर्ण न्यायसभा यानी ये-
शूला जिवें माराया करितां त्याविषयीं खोटी साक्ष पाहिली ;
६० परंतु त्यांस मिळाली नाहीं, बहुत खोटे साक्षी आले असतांहि
मिळाली नाहीं. शेवटीं (१) दोन खोटे साक्षी येऊन बोलले कीं,
६१ याने ह्मटलें कीं, (२) देवाचें देऊळ मोडायास व तीन
दिवसांत तें बांधायास मी समर्थ आहें.

---

(१) गीत. २७:१२. ३५:११. (२) योह.२:१९–२१.

---

चालतात. ते गुप्तांत विश्वास धरितात पण लोकांच्या देखतां ख्रीस्ताला अनुसरत नाहींत. अशानी ख्रीस्ताचें वचन ध्यानांत ठेवावें कीं जो कोणी माणसांसमोर मला नाकारील, त्याला मीहि आपल्या आकाशांतील बापासमोर नाकारीन. जो माझ्यापेक्षां बापावर अथवा आईवर, पुत्रावर अथवा कन्येवर प्रीति करितो तो मला योग्य नाहीं. जे पेत्रसासारिखें ख्रीस्ताविषयीं लाजतात ते त्यासारिखे ख्रीस्ताला नाकारितात, आणि त्यासारिखे पश्चात्ताप करून फिरलें पाहिजे नाहीं तर ते खचीत नाश पावतील. योहान्न ह्मणतो कीं, पेत्रसाबरोबर दुसरा शिष्य होता. त्याने त्याचें नांव सांगितलें नाहीं. तो प्रमुख याजकाच्या ओळखीचा होता आणि वाड्यांत तेव्हांच गेला, आणि मग बाहेर येऊन त्याने पेत्रसालाहि आंत नेलें.

"परिणाम पाहायास चाकरामध्यें बसला." सुमारें मध्यरात्री होती आणि योहान्न ह्मणतो कीं हींव होतें यास्तव चाकर व हस्तक कोळशांचा विस्तव करून शेकत होते. त्याच प्रसंगीं व त्या जाग्यांत पेत्रसाने आपल्या प्रभूला पहिल्याने नाकारिलें असें पुढें सांगितल्यावरून दिसतें. (ओ. ६९. पाहा.)

५९ "खोटी साक्ष पाहिली." ती साक्ष खोटी असावी ह्मणून त्यानी इच्छिलें असें समजायाचें नाहीं. तो सर्कारचा अथवा देवाचा अपराधी आहे असी साक्ष शोधिली, ती खरी असो किंवा खोटी असो याविषयीं त्यांस चिंता वाटली नसेल. दोन साक्षी असावे आणि त्यांची साक्ष सुमेळ असावी एवढेंच पाहिजे. प्रमुख याजकाने ख्रीस्ताला त्याच्या शिष्यांविषयीं व उपदेशाविषयीं विचारिलें. (यो.)

६० "परंतु त्यांस मिळाली नाहीं." ह्मणजे त्यांची साक्ष विपरीत होती ह्मणून चालली नाहीं. बहुतानी खोटी साक्ष दिल्ही, परंतु त्यांच्या साक्षी सारिख्या झाल्या नाहींत. (मार्कस)

६१ "याने ह्मटलें कीं देवाचें देऊळ इ." मार्कस ह्मणतो, ते बोलले कीं,

६२ तेव्हां प्रमुख याजक उठून त्याला बोलला, तूं कांहींच उत्तर देत नाहींस काय? हे तुझ्याविरुद्ध कसी साक्ष देतात?

६३ तथापि येशू उगाच राहिला; (१) त्यावरून प्रमुख याजकानें त्याला ह्मटलें, मी तुला जिवंत देवाची शपथ घालितों (२) कीं, देवाचा पुत्र ख्रीस्त (३) तो तूं आहेस काय, हें आह्मास सांग.

---

(१) यशा. ५३:७. मात्थ २७:१२, १४. (२) १ शमु. १४:२६, २८. १ राजे. २२:१६. (३) मात्थ १६:१६. योह. १:३४.

---

आह्मी याला असें बोलतांना ऐकिलें, हें हातानें बांधलेलें देऊळ मी मोडून टाकीन, आणि तीन दिवसांमध्यें हातानें बांधलेलें नाहीं असें दुसरें बांधीन. फारकरून एकाचें बोलणें मात्थीनें लिहिलें आणि दुसऱ्याचें बोलणें मार्कसानें लिहिलें असेल. मार्कस अणखी ह्मणतो कीं, हीहि त्यांची साक्ष एकासारिखी झाली नाहीं. ज्याविषयीं ते त्याजवर दोष ठेवूं लागले ते त्यानें आपल्या देहाविषयीं सांगितले होते. हें देऊळ तुह्मी मोडा, मग मी तीन दिवसांत हें उभारीन. यो. २:१९. तो आपल्या शरीररूप देवळाविषयीं बोलला परंतु त्यांनी दुसऱ्या गोष्टीस लावून तो यरूशलेमांतील देवळाविषयीं बोलला असें समजावायास प्रयत्न केले. ख्रीस्तानें जें सांगितलें तेंच ते बोलले नाहींत, आणि तो कोणते शब्द बोलला याविषयीं त्यांची साक्ष एकासारिखी नव्हती ह्मणून ती चांगली नव्हती.

६२,६३ "येशू उगाच राहिला." जी साक्ष मिळाली ती चांगली नाहीं आणि हें समजून प्रमुख याजक जेणंकरून मला दोषी ठरवितां येईल असे कांहीं शब्द मजपासून ऐकून घ्यायास पाहत आहेत असें ख्रीस्ताला ठाऊक होतें ह्मणून तो उगाच राहिला. "जिवंत देवाची शपथ घालितों इ." मूर्तीसारिखा खरा देव निर्जीव असा नाहीं, आणि हें दाखविण्यासाठीं त्याला जिवंत देव ह्मणत असत. यहूद्यांमध्यें शपथ घालण्याची हीच रूढी होती, आणि साक्षीचा नियम असा होता कीं, कांहीं जें खरें तें लपून ठेविलें तर शपथ मोडली जाती. याजकाचा हा प्रश्न अगदीं अयोग्य असें जरी ख्रीस्ताला माहीत होतें तरी असी शपथ घातल्यावर मी उगाच राहिलों तर मी ख्रीस्त नाहीं ह्मणून कबूल आहें असें ते समजतील, हेंहि त्याला ठाऊक होतें. प्रमुख याजकानें हा प्रश्न रागानें केला असेल. दोषी ठरविण्याजोगी असी साक्ष अगदीं मिळाली नव्हती, आणि त्याच्या तोंडीं कांहीं ऐकून घेऊन तें दुर्भाषण ठरवावें हाच उपाय राहिला, यास्तव त्यांनी हा प्रश्न केला. होय,

६४ येशू त्याला ह्मणाला, तूं ह्मणतोस तसेंच; अणखी मी तुह्मास सांगतों, यापुढें (१) तुह्मी मनुष्याच्या पुत्राला पराक्रमाच्या उजवीकडे (२) बसलेलें, आणि आकाशाच्या ढगांवर येतांना पाहाल.

६५ तेव्हां प्रमुख याजक आपलीं वस्त्रें फाडून बोलला, याने दुर्भाषण केलें आहे; आह्मास अणखी साक्ष्यांची गरज काय? पाहा, आतां तुह्मी याचें दुर्भाषण ऐकिलें आहे.

(१) दान. ७:१३. योह. १:५१. १ थेस्स. ४:१६. प्रग. १:७.
(२) गीत ११०: १. प्रेषि. ७:५५.

मी देवाचा पुत्र आहें असा जर तो कबूल होईल तर तो दुर्भाषण करितो असें ठरवावें, आणि नाहीं असें ह्मणेल तर तो ढोंगी असून लोकांस ठकवितो असें ठरवावें, ह्मणून त्यांच्या मनांत होतें. "देवाचा पुत्र." मशीहा देवाचा पुत्र आणि देवासमान होईल असें यहूद्यांचें मत पहिल्यापासून होतें. यो. १०:३१—३९. गीत २.

६४ "तूं ह्मणतोस तसेंच इ." तुह्मी ह्मणतां तसा मी आहें. (लूका.) ख्रिस्त तेव्हांच हें बोलला नाहीं. पहिल्याने तो बोलला, जरी मी तुह्मास सांगतों, तरी तुह्मी विश्वास धरणारच नाहीं. अणखी जरी मी विचारितों ह्मणजे माझ्या देवपणाविषयीं प्रमाणें दाखवितों व तुमचें मत विचारितों तरी तुह्मी मला उत्तर देणार नाहीं किंवा मला सोडणार नाहीं. "अणखी मी तुह्मास सांगतों इ." पुढें तुमची खातरी होईल. तुह्मी मला देवाच्या उजवीकडे पाहाल, आणि आकाशांतून जें चिन्ह तुह्मी बहुदां मागितलें तेंहि तुह्मी पाहाल, ह्मणजे यरूशलेमाचा नाश करायाला व शेवटीं जगाचा न्याय ठरवायाला मला मेघांवर मोठ्या वैभवाने येतां पाहाल.

६५ "वस्त्रें फाडून बोलला इ." मोठा खेद दाखवायाला आपलीं वस्त्रें फाडीत असत. प्रमुख याजकाने आपल्यासमक्ष दुर्भाषण झाल्यामुळें खेद दाखवायाला वस्त्रें फाडिलीं. "याने दुर्भाषण केलें आहे." ह्मणजे शपथ घातल्यावर त्याने आपण जिवंत देवाचा पुत्र आहें, खरा मशीहा आहें आणि देवासमान असतां शेवटीं त्याच्या उजवीकडे बसेन व जगाचा न्याय ठरवीन, असें सांगितलें आहे. तर हें दुर्भाषण आहे असें त्यांनी ठरविलें आणि वास्तविक जर येशू मशीहा नसला तर त्याने सांगितलें तें दुर्भाषण असतें खरें. परंतु त्याने आपल्या देवपणाविषयीं पुरतीं प्रमाणें पटविलीं होतीं आणि तीं प्रमाणें पाहायाचीं होतीं, पण तीं न पाहतां त्यांनी त्याला दोषी ठरविलें.

६६ तुह्मास कसें वाटतें ? तेव्हां त्यांनी उत्तर दिल्हें कीं, तो मरण-दंडास योग्य आहे. (१)

६७ तेव्हां ते त्याच्या तोंडावर थुंकले, (२) आणि त्यांनी त्याला बुक्या मारिल्या, आणि कोणी त्याला चपडाका मारून बोलले,

६८ अरे खीस्ता, तुला कोणी मारिलें हें तूं भविष्यवादी असल्यास आह्मास सांग.

६९ पेत्रस तर (३) वाड्यांत बाहेर बसला होता, तेव्हां एक दासी त्याकडे येऊन ह्मणाली, तूंहि गालीली येशू त्यांच्या बरोबर होतास.

७० परंतु तो त्या सर्वांच्या समोर नाकारून बोलला, तूं ह्मणतीस तें मला ठाऊक नाहीं.

---

(१) लेवी. २४: १६. योह. १९:७. (२) यशा. ५०:६. (३) मार्क. १४:६६.इ. लूक. २२:५५. इ. योह. १८: १६. इ.

---

६६ "तो मरणदंडास योग्य आहे." त्यांनी आपल्या शास्त्राप्रमाणें त्याला मरणाच्या दंडीं ठरविलें. दुर्भाषण ह्या अपराधामुळें धोंडे मारावे असें शास्त्रांत होतें. लेवी. २४:१०—१६. पण आतां यहूदी रोमी सरकाराच्या स्वाधीन होते आणि मरणदंड लावायाला अधिकार नव्हता ह्मणून रोमी सरकाराकडे जाऊन अधिकार मिळवावा लागला.

६७ "तोंडावर थुंकले इ." त्यांनी खीस्ताचा अति अपमान केला. तोंडावर थुंकणें यापेक्षां मोठा अपमान नाहीं. गण. १२:१४. यश. १:६; इयोब. ३०:१०.

६८ "अरे खीस्ता इ." त्यांनी त्याचें तोंड झांकलें होतें, (मार्कस) आणि निंदा करून ते त्याच्या विरुद्ध बहुत अगखी बोलले. (लूका.) त्यांनी दुर्भाषणाचा दोष खीस्तावर ठेविला होता, असें असतांहि त्याची निंदा करून त्यांनी आपण होऊन दुर्भाषण केलें.

६९ "एक दासी इ." ती द्वारपाळी होती. (यो.) "तूंहि इ." यावरून असें दिसतें कीं, तो दुसरा शिष्य ह्मणजे योहान्न तिचा व दुसऱ्या कितीएकांचा ओळखीचा होता आणि आपण खीस्ताचा शिष्य असें दाखविलें होतें.

७० "परंतु तो त्या सर्वांच्या समोर नाकारून बोलला, इ०" मी शिष्य नाहीं. खीस्ताला जाणत नाहीं, तिच्या प्रश्नाचें कारण मला ठाऊकच नाहीं, असा तो सर्व प्रकारें नाकबूल झाला. नुक्ताच पेत्रस फार धीट व अवसानी

७१ मग तो बाहेर दरवाज्याकडे गेल्यावर दुसरीने त्याला पाहिलें, आणि तेथल्या लोकांस ह्मटलें कीं, नाजोरी येशू याजबरोबर हाहि होता.

७२ फिरून तो शपथ वाहून नाकारून बोलला कीं, मी त्या माणसाला ओळखत नाहीं.

७३ नंतर कांहीं वेळाने उभे राहणारे जवळ येऊन पेत्रसाला ह्मणाले, तूंहि त्यांतला आहेस खराच, कारण कीं तुझ्या बोलीवरून समजतें.

७४ तेव्हां तो शापानी व शपथानी बोलूं लागला, मी त्या माणसाला ओळखत नाहीं; इतक्यांत कोंबडा ओरडला.

७५ तेव्हां जी गोष्ट (१) येशूने पेत्रसाला ह्मटली होती कीं, कोंबडा ओरडल्या अगोदर तूं तीन वेळा मला नाकारसील, ती त्याला आठवली, मग तो बाहेर जाऊन फार दुःखी होऊन रडला.

(१) मात्थ. २६:३४. लूक. २२:३१—३४.

असून तुझ्यासाठीं जीव देईन असा बोलला होता. तर इतका लवकर नाकबूल झाला याविषयीं अधिक आश्चर्य.

७१,७२ "दुसरीनें त्याला पाहिलें." त्याला लाज वाटून तो विस्तव सोडून बाहेर गेला, पण व्यर्थ झालें; दुसरीने त्याला ओळखिलें. एका माणसानेंहि त्याला पाहिलें. (लुका). मग अधिक रागें भरून पेत्रस शपथ वाहून नाकबूल झाला. मार्कस ह्मणतो कीं, या वेळेस कोंबडा पहिल्याने ओरडला.

७३ "नंतर कांहीं वेळाने." सुमारें एका तासाने. (लुका) पेत्रस परत विस्तवाजवळ गेला होता. (यो.) "तुझ्या बोलीवरून समजतें." ह्मणजे त्याच्या बोलीवरून कळलें कीं, हा गालीली आहे, (मार्कस) आणि यावरून अधिक प्रमाण पटलें. मलखसाच्या नातलगानेंहि साक्ष दिल्ही. (यो.)

७४ "तेव्हां तो शापानी व शपथानी बोलूं लागला. इ." त्याला अति राग आला. अनेक माणसानी त्याला ओळखिलें होतें. त्याच्या बोलीवरून देखील तो प्रसिद्ध झाला होता, तर हा वास्तविक त्याचा शिष्य आहे असें सर्वांस न वाटावें ह्मणून अधिक हडसून नाकबूल होण्याचें अगत्य वाटलें, आणि त्याने ख्रीस्ताला नाकारिलें असें केवळ नव्हे परंतु शाप देऊन व शपथ वाहून हें दुसरें मोठें पाप केलें तेव्हांच कोंबडा दुसऱ्यांने ओरडला.

७५ "तेव्हां जी गोष्ट इ." कोंबडा ओरडल्यावरच प्रभूने मुरडून पेत्रसाकडे

दृष्टि लाविली, तेव्हां प्रभूची गोष्ट त्याला आठवली. (लूका.) त्या दयेच्या दृष्टीवरून पेत्रसाचीं सर्व वचनें आणि त्याचा भारी दोष हीं मनांत आलीं. तेणेंकरून तो दुःखानें व्याप्त झाला आणि त्याचें अंतःकरण बहुत खेदानीं भोसकलें जाऊन तो बाहेर अंधारांत पळून फार खिन्न होऊन रडला. पेत्रसाच्या गोष्टीवरून बोध घ्यावा. १ आपल्या शक्तीवर भरवसा ठेवूं नये. तो फार धीट होता. जीव देखील द्यायास कबूल होता. तथापि परीक्षा पडली तेव्हां तो लागलाच नाकबूल झाला. आपण स्थिर असें ज्यास वाटतें त्यानें न पडावें ह्मणून जपून चालावें. खरा ख्रिस्ती देवावरच भरवसा ठेवील व त्याचें साह्य मागेल. २ सर्वांहून मोठे उपकार व आशीर्वाद मिळाले तरी आपण पापांत पडणार नाहीं ह्मणून भरवसा नाहीं. पेत्रसाला विशेष उपकार व आशीर्वाद मिळाले होते, तरी त्यासारिखे प्रभूवर इतकी निंदा व दुःखें आणिलीं असे थोडकेच झाले. ३ अपराधाचा मार्ग उतरत आहे. एक पाप केलें तर फारकरून तें झांकायाला अधिक मोठें पाप करावें लागतें. पहिल्यानें पेत्रस लाजून प्रभूविषयीं नाकबूल झाला, मग शाप देऊन अधिक हडसून बोलावें असें अगत्य पडलें. पाप एकटेंच येत नाहीं. दार एकदां उघडलें ह्मणजे बहुत पापें झपाट्यानें दाटून शिरतात. ४ येशूच्या दृष्टीवरून पापाबदल मोठा पस्तावा उत्पन्न होतो. त्या दृष्टींत दया व निषेध आहेत. पाप करून आपण ख्रिस्ताचा अन्याय करितों आणि त्याच्या करुणेच्या दृष्टीवरून मनांत भारी खेद उत्पन्न होतात, अश्रु गळतात आणि आपले अपराध आठवून आपण खिन्न होऊन रडतों. ५ जेव्हां परीक्षेंत पडून पाप झालें तेव्हां एकांतीं जाऊन देवापाशीं सर्व कबूल करून क्षमा मागावी. तो आपल्या लेंकरांचें कण्हणें ऐकून दया करील आणि पेत्रसासारिखी त्यांस क्षमा करून फिरून अंगीकारील. ७ खऱ्या ख्रिस्त्यानीं पापांत पडावें हें साध्य आहे. पेत्रस खरा विश्वासणारा होता, आणि त्याचा विश्वास न खचावा ह्मणून प्रभूनें त्यासाठीं प्रार्थना केली होती. (लूका. २२:३२.) यास्तव तो शुद्धीवर आला आणि फार पस्तावा पावून प्रभुकडे फिरला. तसें प्रत्येक जो खरा ख्रिस्ती पापांत पडतो तो करिल, आणि जो असें करितो तो क्षमा पावेल, कारण देव दयाळू आहे. तथापि मी पश्चात्ताप करून क्षमा पावेन असें जो मनांत आणून जाणून बुजून पाप करितो त्यासाठीं आशा नाहीं. तो खरा ख्रिस्ती नाहीं. असें प्रमाण तो पटवितो. तो क्षमा पावणार नाहीं. पेत्रसाचा खेद खरा होता हें त्याच्या पुढील आचरणावरून पटलें. तेव्हांपासून तो धैर्य धरून मरणापर्यंत प्रभूच्या सेवेंत फार तत्पर राहिला आणि धर्मामुळें दुष्ट लोकांच्या हातानीं वधस्तंभीं दिल्हा गेला.

१,२. मार्कस १६:१; लूका. २३:१; यो. १८:२८. पाहा.

१२ परंतु त्याने उत्तर दिल्हें कीं, तुह्मास खचीत सांगतों, मी तुह्मास ओळखत नाहीं. (१)

१३ यास्तव तुह्मी जागे राहा. (२) कां कीं कोणत्या दिवशीं किंवा कोणत्या घटकेस मनुष्याचा पुत्र येईल हें तुह्मास ठाऊक नाहीं.

---

(१) इब्र. १:१३. (२) मात्थ. २४:४२,४४. मार्क. १३:३३,३५. लूक. २१:३६.

---

बरोबर देवाच्या राज्यांत ह्मणजे सौख्यलोकांत जातील. जे पश्चात्ताप करून ख्रिस्तावर भरवसा ठेवितात आणि नीतीने व पवित्रतेने चालून त्याच्या येण्याची वाट पाहतात ते सिद्ध होतील. मार्क. १६:१६, यो. ५:२४, प्रेषि. ३:१९.प्रग. २३:११. २पेत्र. ३:११,१२.१तीम.६:१७-१९.२तीम.४:६,७,८. मग दार बंद झालें. मग कोणाचें आंत जाणें होईना. तसेंच देवाने आपले सर्व खरे भक्त सौख्यलोकांत घेतले ह्मणजे दार बंद होईल आणि कोणी आंत जाऊं शकणार नाहीं. मरते वेळेस जे सिद्ध होतात ते आंत जातील, बाकीच्या सर्वांस बाहेरील अंधारांत व क्लेशांत राहावें लागेल. दार बंद झाल्यावर कोणीएकाला पश्चात्ताप करायाला अथवा सिद्ध व्हायाला कांहींच जागा राहणार नाहीं. प्रग. २२:२. उप. ११:३.९:१०, मात्थी.२५:४६.

१२ "मी तुह्मास ओळखत नाहीं." ह्मणजे तुह्मी माझे मित्र नाहींत. खरे ख्रीस्ती, खरे भक्त, असें मी तुह्मास ओळखत नाहीं. परलोकीं ढोंग अगदीं चालणार नाहीं.

१३ "यास्तव तुह्मी जागे राहा." या सगळ्या दाखल्यांचा हाच अभिप्राय आहे. त्या कुमारी वराला भेटायाला जात होत्या, तसेंच सर्व लोक ख्रिस्ताला भेटायाला जात आहेत. वराच्यासारिखें त्याचें येणें अकस्मात् होईल. कोणीएकाला जेव्हां मरण येतें तेव्हां ख्रीस्त आला असें आहे. तेव्हां ख्रीस्त त्याचा न्याय ठरवील. तर त्यासाठीं सर्वांनी सिद्ध असावें. वर येतो आहे असी हाक झाली तेव्हां त्या मूर्ख कुमारींस किती दुःख वाटलें असेल. त्या सिद्ध नव्हत्या ह्मणून दार बंद झालें आणि त्या बाहेर राहिल्या. तसेंच बहुत लोक मरते वेळेस शोक करूं लागतात आणि सिद्ध होण्यास कांहीं प्रयत्न करितात, परंतु फार उशीर झाला आणि आकाशलोकाचें दार त्यांस बंद होईल. असें समजून जे ख्रीस्ती आहेत त्यांनी नित्य जागें राहावें, आणि जे ख्रीस्ती नाहींत त्यांनीं किंचित् उशीर लावूं नये, कारण कीं त्यांस वाटत नाहीं अशा घटकेस ख्रीस्ताचें येणें होईल.

१४ जसें कीं, (१) प्रवासास जाणाऱ्या माणसानें आपल्या चाकरांस बोलाविलें व आपली मालमत्ता त्यांस सोपिली.

१५ आणि त्यानें एकाला पांच हजार रुपये व एकाला दोन हजार व एकाला एक हजार असे प्रत्येकास ज्याच्या त्याच्या योग्यतेप्रमाणें दिल्हे, (२) आणि लागलाच प्रवासाला गेला.

१६ मग ज्याला पांच हजार रुपये मिळाले होते त्यानें जाऊन त्यांचा व्यापार केला, आणि अणखी पांच हजार रुपये मिळविले.

१७ तसेंच ज्याला दोन हजार मिळाले होते त्यानेंहि अणखी दोन हजार मिळविले.

१८ परंतु ज्याला एक हजार मिळाले होते त्यानें जाऊन भूमि खणिली, आणि तींत आपल्या धन्याचा पैका लपविला.

(१) लूक. १९:१२. इ. (२) रोम १२:६. १ करिं. १२:४. इ. एफ. ४:११.

१४ "प्रवासास जाणाऱ्या माणसानें इ०" जे आपलें तारण व दुसऱ्याचें कल्याण साधून घेण्यासाठीं आपली बुद्धि व शक्ति लावितात त्यांस तद्रूप फळ मिळेल हें दाखवायास ही उपमा दिल्ही होती. कोणी माणूस आपल्या चाकरांस कांहीं मालमत्ता सोपून देतो मग पुढें त्यांचा हिशोब घेतो, तसेंच देवानें सर्वांस कांहीं गुण, बुद्धि व शक्ति दिल्हीं आहेत, आणि ते त्यांचा कसा उपयोग करितात याविषयीं तो पुढें त्यांचा हिशोब घेईल, मग ज्यांनीं बरें केलें त्यांस तो चांगलें फळ देईल, आणि ज्यांनीं वाईट केलें त्यांस शिक्षा देईल.

१५ "पांच हजार रुपये." यावरून ईश्वर माणसांस देतो त्यांतील उत्तम गुण असें समजावें. "त्याच्या योग्यतेप्रमाणें दिल्हें." प्रत्येकानें आपल्या शक्तीप्रमाणें देवाचें गौरव करावें असें देव पाहतो.

१६,१७ "ज्या दोघांला पांच व दोन हजार रुपये दिल्हे होते त्यांनीं व्यापार करून अणखी पांच व दोन हजार मिळविले. यावरून जे आपले गुण व शक्ति योग्य कामांत लावितात त्यांची वर्त्तणूक दाखविली आहे.

१८ "पैका लपविला." त्यानें आपली शक्ति चांगल्या कामांत लाविली नाहीं. ज्यांस देवानें थोडेंच दिल्हें तेच मात्र लपवितात अथवा अयोग्य कामांत खर्चितात असें नाहीं. ज्यांस देवानें उत्तम गुण व शक्ति दिल्हीं आहेत ते देखील वारंवार लपवितात अथवा अयोग्य कामांत लावितात. अशांस देव अधिक कठीण दंड देईल.

१९ मग बहुत काळानंतर (१) त्या चाकरांचा धनी आला, आणि त्यांचा हिशोब घेऊं लागला. (२)

२० तेव्हां ज्याला पांच हजार रुपये मिळाले होते तो येऊन अणखी पांच हजार रुपये आणून ह्मणाला, महाराज, आपण मला पांच हजार रुपये सोपून दिल्हे; पाहा, त्यांवर म्या अणखी पांच हजार रुपये मिळविले.

२१ तेव्हां त्याच्या धन्याने त्याला ह्मटलें, बरें, उत्तम व विश्वासू चाकरा, तूं थोडक्यांवर विश्वासू झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, (३) तूं आपल्या धन्याच्या आनंदांत ये.

२२ नंतर ज्याला दोन हजार रुपये मिळाले होते तोहि येऊन ह्मणाला, महाराज, आपण मला दोन हजार रुपये सोपून दिल्हे; पाहा, त्यांवर म्या अणखी दोन हजार रुपये मिळविले.

२३ त्याला त्याच्या धन्याने ह्मटलें कीं, बरें, उत्तम व विश्वासू चाकरा, तूं थोडक्यांवर विश्वासू झालास, मी तुला बहुतांवर ठेवीन, तूं आपल्या धन्याच्या आनंदांत ये.

२४ मग ज्याला एक हजार रुपये मिळाले होते तोहि येऊन ह्मणाला, महाराज, म्या तुला जाणिलें कीं, तूं कठोर (४) माणूस आहेस, ह्मणजे त्वां पेरिलें नाहीं (५) तेथें तूं कापितोस व त्वां विखरिलें नाहीं तेथून गोळा करितोस.

---

(१) मात्थ २४:४८. (२) मात्थी. १८:२३,२४. (३) लूक. १२:४४.२२:२९. प्रग. ३:२१. (४) इयो. २१:१५. (५) इर्म. २:३१.

---

१९ "धनी आला इ०" तसाच ख्रीस्त न्यायास येऊन सर्वांचा हिशोब घेईल. रोम. १४:१२. २करिं.५:१०. १ थेस्स. ४:१६. प्रेषि.१:११,१७:३१.

२०–२३ या चाकरांप्रमाणें जे ख्रीस्ती आपले गुण व शक्ति, आपलें व दुसऱ्याचें तारण व देवाचें गौरव करण्यासाठीं खर्चितात त्यांस ख्रीस्त येईल तेव्हां आपल्या जवळ सौख्य लोकांत घेऊन मोठें सुख, गौरव आणि मान देईल. ओ. २४. १ यो. २:२८.

२४ "मग ज्याला एक हजार रुपये मिळाले इ०" ज्याला देवाने थोडकेंच दिल्हें आहे त्याला तें वाईट कामांत घालायाला निमित्य नाहीं असें दाखवावें हा या दाखल्याचा अभिप्राय आहे. प्रत्येकाने आपल्या शक्तीप्रमाणें करावें असी देवाची आज्ञा आहे. "तूं कठोर माणूस आहेस."

२५ ह्मणून म्या भिऊन (१) तुझे हजार रुपये भूमींत लपवून ठेविले; पाहा, तुझे तुला मिळाले.

२६ तेव्हां त्याच्या धन्याने त्याला उत्तर दिल्हें कीं, अरे वाईट व आळसी चाकरा, (२) म्या पेरिलें नाहीं तेथें मी कापितों, आणि म्या विखरिलें नाहीं तेथून गोळा करितों, हें तुला ठाऊक होतें.

२७ तर माझा पैका सावकाराजवळ ठेवायाचा होता, ह्मणजे म्या आल्यावर आपला व्याजासुद्धां घेतला असता.

२८ यास्तव ते हजार रुपये याजपासून घ्या, आणि ज्याजवळ दाहा हजार रुपये आहेत त्याला द्या.

(१) नीति. २६: १३. प्रग. २१:८. (२) इसा. १५:५,६. मात्थ. १८:३२. लूक. १९:२२. यहुदा. १५.

हा चाकर आपल्या आळसाविषयीं निमित्य काढायाला आपल्या धन्यावर दोष ठेवितो.

२५ "ह्मणून म्या भिऊन इ०" ते हरवून जातील असें भय वाटलें ह्मणून तो निमित्य दाखवितो, परंतु वास्तविक जर त्याने सावकाराजवळ ठेविले असते तर हरविले असतांहि त्याला दोष लागला नसता. त्याने आपल्या आळसाविषयीं हें निमित्य उगेंच काढिलें. तसेंच पापी आपलें तारण साधून घेण्यासाठीं कांहीं प्रयत्न न करितां सुस्थ राहून केवळ देवावर दोष ठेवितात.

२६,२७ "अरे वाईट व आळसी चाकरा." तो दुष्ट होता असें प्रमाण त्याने आपल्या धन्यावर दोष ठेवून पटविलें होतें. तो आळसी होता असें ते रुपये लपवून त्याने प्रमाण पटविलें होतें. हल्लीं असे पापी किती आहेत ? देणारा कोण आहे ? आमच्याठायीं बोलतो करतो तो कोण आहे ? असें बोलून ते आपल्या तारणाविषयीं किंचित् काळजी धरीत नाहींत, पण सर्व दोष देवावर ठेवितात. जे असें करितात ते आपला दोष फार वाढवितात आणि आपणावर अधिक कठीण दंड आणितात. "हें तुला ठाऊक होतें." प्राचीन काळच्या बहुत प्रतींत एथें प्रश्नाची खूण दिल्हीं आहे असें कीं हें तुला ठाऊक होतें काय ? तर तुला अधिक प्रयत्न करायाचे होते. आळस करण्याचा तुझा अधिक दोष आहे. धनी आपण कठोर असा कबूल आहे ह्मणून समजायाचें नाहीं; केवळ चाकराच्या तोंडच्या बोलण्यावरून त्याला दोषी ठरवितो.

२८ त्याने त्यांचा उपयोग केला नाहीं, तर त्याला नसावे. जे आपलें

२९ कां कीं (१) ज्याला आहे त्याला देतील, आणि त्याला फार हो-
ईल, आणि ज्याला नाहीं त्याचें असेल तें देखील त्याजपासून घेतील.(२)

३० आणि त्या निरुपयोगी चाकराला बाहेरील अंधारांत टा-
का; (३) तेथें रडणें व दांत खाणें होईल.

३१ अणखी मनुष्याचा पुत्र आपल्या गौरवानें येईल, (४) आणि
त्याबरोबर सर्व पवित्र दूत येतील, तेव्हां तो आपल्या गौरवाच्या आस-
नावर बसेल.

---

(१) मात्थ. १३:१२. मार्क. ४:२५. लूक. ८:१८. १९:२६. (२) लूक. १०:४२. (३) मात्थ. ८:१२. (४) दान. ७:१३. जख. १४:५ मात्थ. १६:२७; १९:२८. मार्क. ८: ३८. प्रेषि. १:११. १ थेस्स. ४: १६. २ थेस्स. १:७ यहूदा. १४. प्रग. १:७.

---

तारण साधून घेण्यास प्रयत्न करीत नाहींत त्यांचें साह्य देव करणार नाहीं.

२९ "कां कीं ज्याला आहे इ०" मात्थी. १३:१२ व्याख्या पाहा. जो कोणी आपल्याला जें सोंपिलें त्याचा चांगला उपयोग करितो त्याचा धनी त्याला अणखी सोंपून देईल अथवा चांगलें फळ देईल, परंतु जो कांहींच उपयोग करीत नाहीं अथवा चांगला व्यय करीत नाहीं त्याला धनी अणखी कांहीं सोंपून देणार नाहीं. जें दिल्हें तें देखील तो त्यापासून काढून, जो त्याचा चांगला उपयोग करील त्याला देईल. संसाराविषयीं ह्मटलें तर मनुष्यामध्यें तसेंच घडतें, आणि देवहि या नेमाप्रमाणें प्रतिफळ देईल.

३० "आणि त्या निरुपयोगी इ०" या दाखल्याचा अर्थ संक्षेपेंकरून असा आहे. १. देवानें आपल्या सेवकांस सारिखींच गुण व शक्ति दिल्हीं नाहींत. २. ते आपले गुण व शक्ति देवाचा मान व गौरव करण्यांत लावायास बांधिले आहेत. ३. असें केल्यानें त्यांचे गुण व शक्ति वाढतात. ४. त्यांनीं आपले गुण व शक्ति यांचा जसा उपयोग केला त्याप्रमाणें त्यांचा न्याय होईल. ५ पापी लोक देव कठोर धनी असें मोजतात. ६. अन्याय केल्याबदल असें केवळ नव्हे परंतु चांगलें न केल्याबदल पाप्यांस हिशोब द्यावा लागेल. ज्यानें आपले रुपये लपवून धन्याला तेच परत दिल्हे तो जर दोषी ठरून नाश पावला तर जे आपले सर्व गुण व शक्ति अयोग्य कामांत खर्चतात ते किती विशेषेंकरून नाश पावतील!

३१ "पुत्र आपल्या गौरवानें येईल इ०" जगाच्या समाप्तीस ख्रीस्त येईल तेव्हां तो सृष्टीचा राजा व मस्तक असतां मोठया वैभवानें व गौरवानें येईल,

३२ आणि त्यासमोर सर्व राष्ट्रें जमा होतील, (१) आणि ज्या प्रकारें मेंढपाळ शेरडांतून मेंढरें वेगळीं करितो, (२) त्या प्रकारें तो त्यांस वेगळें करील. (३)

३३ आणि मेंढरांस तो आपल्या उजवीकडे (४) व शेरडांस डावीकडे उभें करील.

३४ तेव्हां राजा आपल्या उजवीकडल्यांस ह्मणेल, अहो माझ्या

---

(१) रोम. १४:१०. २ करिं. ५:१० प्रग. २०:१२. (२) यहेज्क. ३०: ३८. मात्थ. १३:४९. (३) गीत ७८:५२. योह. १०: १४, २७. (४) इब्री. १:३.

---

असें शास्त्रांत ठिकाणोठिकाणीं ह्मटलें आहे. प्रेषि. १:११;एफे.१:२०–२२; १ थेस्स. ४:१६; १करिं. १५:२४,२५,५२.

"तो आपल्या गौरवाच्या आसनावर बसेल." अक्षरशः नव्हे, पण वास्तविक राजा व न्यायाधीश असतां तो सर्व लोकांस जमावील व न्याय करून सर्वांस प्रतिफळें देईल.

३२ "आणि त्यासमोर सर्व राष्ट्रें इ०" ख्रीस्त न्यायास येईल तेव्हां हें जग जळून नाश पावेल.२पेत्र.३:१०,१२;प्रग.२०:११. तेव्हां खरे ख्रिस्ती जे मेलेले ते सर्व पहिल्याने उठतील. १थेस्स. ४:१६. जे जिवंत असतील ते पालटून मेलेल्यांमधून उठलेल्यांसारिखे होतील.१करिं.१५:५२–५४. १थेस्स.४:१७. सर्व दुष्ट उठून न्यायास बाहेर येतील. यो. ५:१८,१९; दान. १२:२;मात्थी. १३:४१,४२;प्रग. २०:१३.मग जगाचा न्याय ठरवून तो नीतिमंतांस तारील. आणि दुष्टांस जेथें रडणें व दांत खाणें होईल तेथें वांटा देईल.

३३ "आणि मेंढरांस इ०"ह्मणजे नीतिमंतांस.यो. १०:७,१४,१५,१६,२७. गीत. १०:३.७४:१;२३. "उजवीकडे" त्यांस मान देण्यासाठीं. उप. १०:२. एफे. १:२०; गीतें. ११०:१; प्रेषि. २:२५.३३. "शेरडांस." ह्मणजे दुष्टांस. यहेज्क. ३४:१७. "डावीकडे." अपमान व त्यांचा दोष दाखविण्यासाठीं. उप. १०:२.

३४ "तेव्हां राजा." ह्मणजे येशू ख्रीस्त जो सृष्टीचा राजा व न्यायाधीश तो. लूका. १९:३८. यो. १८:३७. प्रग. १७:१४.१९:१६. तें वतन करून घ्या. ख्रीस्ती हे देवाचे वतनदार असें शास्त्रांत कोठकोठें ह्मटलें आहे. रोम. ८:१७.गल.४:६,७इब्री.१:१४.१यो.३:२.हें वतन देवाने आपल्या लोकांसाठीं पूर्वींपासून सिद्ध केलें. जे आपलीं पापें पदरांत घेऊन ख्रीस्ताला शरण जातात त्यांनीं तारण पावावें असा संकेत देवाने पूर्वींपासून केला आहे. तसेंच जे शरण जात नाहींत पण स्वइच्छेने चालून पाप करीत जातात आणि अपश्चा-

बापाचे आशीर्वादित, (१) या, जें राज्य (२) जगाच्या मांडण्यापासून तुह्माकरितां तयार केलें (३) तें वतन करून घ्या. (४)

३५ कारण कीं (५) मी भुकेला होतों, तेव्हां तुह्मी मला खायास दिल्हें; तान्हेला होतों तेव्हां मला प्यायास दिल्हें; परका होतों तेव्हां मला घरांत घेतलें. (६)

३६ उघडा, (७) तेव्हां मला पांघरूण दिल्हें; रोगी होतों तेव्हां माझा समाचार घेतला; (८) बंदिशाळेंत (९) होतों तेव्हां मजकडे आलां.

३७ त्या वेळेस नीतिमान त्याला उत्तर देतील कीं, हे प्रभु, आह्मी तुला भुकेलें केव्हां पाहून खायास दिल्हें? आणि तान्हेलें केव्हां पाहून प्यायास दिल्हें?

३८ आणि तुला परकें केव्हां पाहून घरांत घेतलें? आणि उघडें केव्हां पाहून पांघरूण दिल्हें?

३९ आणि तुला रोगी अथवा बंदिशाळेंत केव्हां पाहून तुजकडे आलों?

---

(१) गीत. ११५: १५. (२) रोम. ८:१७. १ पेत्र. १:४. (३) १ थेस्स. २:१२. प्रग. ५: १०. (४) १ करिं. २:९. इब्री. ११:१६. (५) यशा. ५८:७. यहेज्क. १८:७. (६) १ पेत्र. ४:९. ३ योह. ५. (७) याक. २:१५,१६. (८) १:२७. (९) २ तीम. १:१६. इब्री. १३:२.

---

त्तापी असून मरण पावतात त्यांनी नाश पावावा असाहि संकेत देवानें पूर्वीपासून केला आहे. असें असतां जे खुशीनें नाशाचा मार्ग धरितात ते आपला नाश करून घेतात. यो. ५:४० मार्क. १६:१५,१६.

३५,३६ "कारण कीं मी भुकेला होतों इ०" येशू ख्रीस्त आपल्या लोकांवर केलेलं उपकार आपणावर केलल्यासारिखे मोजतो. मात्थी १०:४०,४२. ख्रीस्त व त्याचे लोक यांमध्यें जो संबंध तो सर्वांहून प्रिय व जवळचा आहे. यो. १५: ४,५,६. एफे. ४:२३–२२. १ करिं. ६:१५. ह्मणून जे ख्रीस्त्यांचा अन्याय करितात ते माझा अन्याय करितात आणि जे गरीब व दुःखित ख्रिस्त्यांवर उपकार करितात ते मजवर उपकार करितात असें ख्रीस्त मोजतो.

३७—३९ "त्या वेळेस नीतिमान त्याला उत्तर देतील इ०" ते नम्रता दाखवितात. आपण कांहीं स्तुति अथवा फळ पावण्याजोगीं कर्मे केलीं असें वाटत नाहीं ते दाखवितात.

४० तेव्हां राजा त्यांस उत्तर देईल कीं, मी तुह्मास खचीत सांगतों, या माझ्या भावांतील लाहानांतून एकाला तुह्मी असें केलें, तितक्यावरून (१) मलाच केलें आहे.

४१ मग डावीकडल्यांसहि तो ह्मणेल, अहो शापग्रस्तहो, जो सर्वकाळचा अग्नि (२) सैतानासाठीं व त्याच्या दुतांसाठीं तयार केला (३) आहे त्यांत मजपासून जा. (४)

४२ कारण कीं, मी भुकेला होतों तेव्हां तुह्मी मला खायास दिल्हें नाहीं; तान्हेला होतों तेव्हां मला प्यायास दिल्हें नाहीं.

---

(१) नीति. १९:१७. मार्क. ९:४१. इब्री. ६:१०. (२) लूक. १३:२७. (३) मात्थ. १३:४०,४२. प्रग. १४:११. (४) यहूदा. ६. प्रग. २०:१०.

---

४० "माझ्या भावांतील लाहानांतून इ०" ख्रिस्ती किती जरी गरीब, दुःखित व त्रासलेले असले तरी ख्रीस्त त्यांस आपले भाऊ ह्मणतो आणि जें जें त्यांस केलें तें तें मला केलें असें मोजतो. यावरून जगाच्या न्यायाधिशाची केवढी कृपा दिसून येती.

४१ "सर्वकाळचा अग्नि." हे शब्द, परलोकीं दुष्टांस कठीण शासन प्राप्त होईल तें दाखविण्यास लाविले आहेत. ही भयंकर उपमा हिन्नोम खोऱ्याच्या अग्नीवरून घेतली असें दिसतें. मात्थी. ५:२२ यावरील टीका पाहा. परलोकीं दुष्ट वास्तविक अग्नींत जळतील असें विचारिलें तर हीं नाशवंत शरीरें मरणाकडून पालटून अविनाशी होतील, मग त्यांस व आत्म्यासहि योग्य असें अतिशय दुःख पीडा व यातना जेणेंकडून होईल तें शासन प्राप्त होईल, असें अग्नि या शब्दावरून दाखविलें आहे. सर्वकाळचा अग्नि हे शब्द त्या शासनाचा प्रकार दाखविण्यासाठीं नव्हे पण तें शासन भयंकर, खचीत, अतिशय व सर्वकाळीक होईल असें दाखविण्यासाठीं लाविले आहेत. तें शासन कोणत्या प्रकारचें याविषयीं विशेष चिंता नाहीं. पण तें अतिशय व सर्वकाळचें होईल या खचीतीवरून सर्वांनी तें चुकवायास आणि आपलें तारण साधून घ्यायास मोठे व अखंड प्रयत्न करीत जावें. तें शासन सैतान व त्याचे दूत व देवाचे सर्व शत्रु यांसाठीं सिद्ध आहे. हें शासन सर्व दुष्टांचें वतन होईल.

४२—४६ जीं कर्मे केल्यावरून ख्रीस्त आपल्या लोकांस स्तुति व चांगलें फळ देतो तींच न केल्यावरून तो दुष्टांस दोषी ठरवून शासन देतो. याप्रमाणें मोठ्या अन्यायामुळें असें केवळ नव्हे पण कर्तव्य कर्म न केल्यामुळें पाप्यांस सर्वकाळचें शासन प्राप्त होईल. जे ख्रिस्ताची निंदा व छळ-

३२ तेव्हां ते बाहेर जात असतां, शिमोन नामें कोणीएक कुरेनी
माणूस त्यांस अढळला, त्याकडून त्यांनी जबरीने त्याचा खांब वाहविला.
३३ आणि गलगथा नामें जागा, ह्मणजे कवटीची जागा, तेथें येऊन,
३४ त्यांनी पित्ताने मिसळलेली (१) आंब त्याला प्यायास दिल्ही,
परंतु ती चाखल्यावर तो पिईना.

---

(१) गीत ६९:२१.

---

३२ "कोणीएक कुरेनी इ०" कुरेन हें शहर मिसराच्या पश्चिमेस लिब्या प्रांतांतलें होतें. तेथें बहुत यहूदी राहत आणि वारंवार तेथून यरूशलेमास जात असत. आदीं त्यांनी वधस्तंभ खीस्तावर घातला. (यो. १९:१७.)मग तो दमून अशक्त झाला असतां त्यांनी शिमोनाला धरून त्याकडून बलात्काराने वाहविला. वधस्तंभ हा दोन लांकडांचा † याप्रमाणें केला होता. त्यावर माणसाला लावून हात पाय कधीं कधीं बांधीत व कधीं कधीं खिळ्यांनी मारीत असत. त्यांनी खीस्ताचे हात पाय खिळून मारिलें. या वधस्तंभीं खीस्ताने जीव देऊन आह्मा पाप्यांसाठीं प्रायश्चित्त केलें. या गोष्टीवर तारण पावण्याची आमची एकच आशा अवलंबून राहत आहे.

३३ "गलगथा." या इब्री शब्दाचा अर्थ कवटी असा आहे. त्या जाग्याला हें नाम कशावरून पडलें हें पक्कें माहित नाहीं, पण तें वधस्थान होतें ह्मणून असेल.

३४ "पित्ताने मिसळलेली आंब इ०" मार्कस ह्मणतो कीं बोळाने मिश्रित द्राक्षारस त्यांनी त्याला प्यायास दिल्हा. आंब ही हलक्या आंबट द्राक्षारसाची होत असे. रोमी शिपाई पीत असत. त्याला आंब ह्मणणें किंवा द्राक्षारस ह्मणणें योग्य होतें. बोळ कडू आहे आणि याने मिश्रित झालेला द्राक्षारस अथवा आंब पिऊन ते मंद असत असें ह्मणतात. अपराध्यांस वधस्तंभीं देत तेव्हां त्यांस कांहींसें मंद करण्यासाठीं हें प्यायाला देत असत. पित्त हा काळिजाचा कडू कफ असें फारकरून आहे पण कोणत्याहि फार कडू पदार्थाला पित्त ह्मणतात. जसें इतर अपराध्यांस देत असत तसें खीस्ताला देऊं लागले पण तो पिईना. तो आपल्याला मंद करून दुःख कमी करीना. तो सोसायास जगांत आला, आणि जो प्याला त्याच्या बापाने दिल्हा होता तो प्यावा असें त्याला वाटलें. कांहीं वेळाने त्यांनी त्याला बोळाशिवाय नुस्ती आंब दिल्ही आणि ती तो प्याला. मात्थी. २७:४८ व यो. १९:२८—३०.

३५ मग त्याला खांबीं दिल्ह्यावर (१) त्यानी चिठ्या टाकून त्याचीं वस्त्रें वांटून घेतलीं; जें भविष्यवाद्याने (२) सांगितलें होतें तें पूर्ण व्हावें ह्मणून असें झालें; तें असें कीं, त्यानी आपल्यामध्यें माझीं वस्त्रें वांटून घेतलीं, आणि माझ्या पांघरूणावर चिठ्या टाकल्या.

३६ नंतर त्यानी तेथें बसून त्यावर पाहरा केला.

३७ आणि त्याच्या डोक्याच्या वरतें त्याच्या दोषारोपाचा लिहिलेला पत्ता त्यानी लाविला; तो असा कीं, यहूद्यांचा राजा येशू तो हाच आहे.

---

(१) गीत. २२:१६. मार्क. १५:२४. इ. लूक. २३:३४. इ. योह. १९:२४. इ.
(२) गीत. २२:१८.

---

३५ "मग त्याला खांबीं दिल्ह्यावर इ०" वधस्तंभीं मरण हें जसें सर्वांहून लज्जाकारक तसें सर्वांहून दुःखकारकहि होतें, हें या गोष्टींवरून उघड होईल. १. पाठीवर मार दिल्हे असतां, हात पाय मागें ताठ बांधून सर्व अंगांत कठाण इजा होत असे. २ बहुत शिरा व संधिबंधन असतात अशा ठिकाणीं हातापायांत खिळे मारण्याकडून विशेष पीडा होत असे. ३. वारा अशा बहुत जखमांस लागून ताप उत्पन्न होऊन दुःख वाटत असे. ४. रक्त फिरण्याला अडचण होऊन डोक्यांत व अंगांत अतिशय जोर व दुःख होत असे. ५. दुःख वाढत वाढत जाई, त्याला कांहीं अंतर अथवा विसावा नसे. मरणाशिवाय दुसऱ्या कशाचीहि आशा नसे. पिडलेला कधीं कधीं तीन दिवस दुःख सोसून मग मरण पावला आहे, तथापि ख्रीस्ताचें अतिशय दुःख लवकर समाप्त झालें. आमचीं दुःखें व अन्याय वाहून त्याच्या आत्म्याला दुःसह दुःख लागून त्याचा जीव लवकर गेला. "चिठ्या टाकून त्याचीं वस्त्रें वांटून घेतलीं इ." बाकी जीं वस्त्रें तीं वांटून दिल्हीं; त्याचा अंगरखा शिवणीवांचून संपूर्ण होता ह्मणून त्यानी त्यासाठीं पण घातलें. (यो. १९:२३.) वधस्तंभीं दिल्हेल्यांचीं वस्त्रें वांटून घेण्याची चाल होती. "तें पूर्ण व्हावें इ०" गीत. २२:१८. पाहा. हें गीत ख्रीस्ताविषयीं आहे आणि त्यांत ख्रीस्ताचें दुःख व मरण यांचें वर्णन पूर्वीं बरोबर लिहून ठेविलें होतें.

३६ "त्यावर पाहरा केला." त्याच्या मित्रानी येऊन सोडूं नये ह्मणून पाहरा केला.

३७ "आणि त्याच्या डोक्याच्या वरतें." ही पट्टी पिलातसाने इब्री, ग्रीक आणि लातीन अशा तीन भाषानी सारांशाने लिहिली.

३८ तेव्हां त्यानी त्याबरोबर दोन लुटारू, (१) एक उजवीकडे व एक डावीकडे असे खांबीं दिल्हे.

३९ आणि जवळून जाणाऱ्यानी आपलीं डोकीं डोलवीत (२) त्याची असी निंदा केली कीं,

४० अरे देऊळ मोडून तीन दिवसांत बांधणाऱ्या, तूं आपलें तारण कर; तूं देवाचा पुत्र असलास तर खांबावरून उतर.

४१ आणि तसेंच शास्त्री व वडील यांसुद्धां मुख्य याजकहि थट्टा करीत (३) बोलले कीं,

४२ त्याने दुसऱ्याचें तारण केलें, आपलें तारण त्याच्याने करवत नाहीं; तो इस्राएलाचा राजा असला तर त्याने आतां खांबावरून उतरावें, म्हणजे आम्ही त्यावर विश्वास ठेवूं.

४३ त्याने देवावर भरवसा ठेविला; तो त्याला प्रिय असला, तर त्याने त्याला आतां सोडवावें, (४) कारण कीं मी देवाचा पुत्र आहें, (५) असें तो बोलत असे.

---

(१) यशा. ५३:१२. (२) गीत. २२:७; १०९:२५. (३) इयोब. १३:९. गीत. ३५:१६. यशा. २८:३२. लूक. १८:३२. (४) गीत. ३:२,२२; ८:४२; १०:११; ७१:११. (५) योह. ५:१७,१८; १०:३०,३६.

---

३८ "दोन लुटारू इ." ख्रीस्ताला अधिक धिःकारावें म्हणून त्याला या दोन लुटाऱ्यांमध्यें वधस्तंभीं दिल्हें.

३९ "डोकीं डोलवीत इ." त्यानी थट्टेने व निंदेने डोलविलीं. इयोब. १६:४. गीत. १०९:२५.

४०,४१ "अरे देऊळ मोडून इ." देऊळ मोडून तीन दिवसांत बांधीन म्हणून ख्रीस्त बोलला असी त्यानी खोटी साक्ष दिल्ही होती. जो असा बोलला त्याने वधस्तंभावरून उतरावें असें त्यांस वाटलें, आणि निंदा करून ते असें बोलले.

४२,४३ "त्याने दुसऱ्यांचें तारण केलें इ." त्याने वास्तविक दुसऱ्यांस तारिलें होतें म्हणून कबूल करावें असें त्यांच्या मनांत नव्हतें. केवळ त्याने असा मिस दाखविला असें सुचवून त्याला धिःकारावें. ही विपरीत लक्षणावरून त्यानी केवळ निंदास्तुति केली. "तो इस्राएलाचा राजा असला इ." त्याने अगोदर आपल्या देवपणाविषयीं पुरतें प्रमाण पटविलें होतें. जरी चमत्कार करून तो वधस्तंभावरून उतरला असता तरी अधिक चांगलें

४४ आणि जे लुटारू त्याच्या बरोबर खांबीं दिल्हे होते, त्यानीहि त्याची तसीच निंदा केली.

४५ तेव्हां दोन प्रहरांपासून तिसऱ्या प्रहरापर्यंत, सर्व देशावर अंधार झाला. (१)

४६ आणि सुमारें तिसऱ्या प्रहरीं येशू मोठ्याने ओरडत बोलला, एली, एली, लमा शबाखथानी, ह्मणजे माझ्या देवा, माझ्या देवा,(२) त्वां मला कां टाकून दिल्हें ?

---

(१) आम. ८:९. (२) गीत. २२:१. यशा. ५३:१०. विल. १:१२.

---

प्रमाण पटलें नसतें, आणि याच वेळेस आपलें काम सिद्धीस न्यावें व पूर्ण प्रायश्चित्त करून तारणोपाय सिद्ध करावा असी इच्छा होती. मरण सोसायाचें असें त्याने पूर्वीं सांगितलें होतें, आणि आतां वेळ आली असतां त्याने आपणाला त्यांच्या स्वाधीन केलें आणि ज्यांसाठीं तो प्रायश्चित्त करीत होता त्यांची निंदा, व धिक्कार यांमध्यें आपला जीव अर्पण केला. त्यानी हीं सर्व करून आपले भविष्य शास्त्रलेख पूर्ण केले आणि हा ख्रीस्त वास्तविक खरा मशीहा व जगाचा एकच तारणारा असें सर्वांहून दृढ प्रमाण पटविलें.

४४ "आणि जे लुटारू इ." एक लुटारू याने पस्तावा पावून ख्रीस्तापासीं क्षमा मागितली. लूका. २३: ३९.

४५ "तेव्हां दोन प्रहरांपासून इ." इंग्लिश कालमान ह्मटलें तर नऊ वाजेपासून तीन वाजेपर्यंत. "सर्व देशावर अंधार झाला." पौर्णिमेला जेव्हां चंद्र सूर्यापासून लांब आहे तेव्हां वल्हांडण सण पाळीत असत, यास्तव ग्रहणाकडून अंधार पडला असें नाहीं. लूका ह्मणतो कीं सूर्य अंधक झाला. (लूका. २३:४५.) देवाने आपल्या पुत्राविषयीं प्रमाण पटवावें व साक्ष द्यावी ह्मणून मोठा चमत्कार करून हा अंधार पाडिला, आणि नीतिमत्वाचा सूर्य ह्मणजे जगाचा उद्धारक प्राण सोडीत होता तेव्हां देवाने असी साक्ष द्यावी हें विशेष योग्य होतें.

४६ "एली, एली, लमा शबाखथानी इ." हे सुरो खाल्डी भाषेतले शब्द आणि त्यांचा अर्थ दाखविला आहे. "माझ्या देवा, माझ्या देवा, इ." मरते वेळेस ख्रीस्ताला विशेष दुःख झालें. तें कसें अथवा काय होतें याविषयीं आमच्यानी सांगवत नाहीं. हें मात्र माहीत आहे कीं त्या वेळेस त्याने आमच्या अन्यायाचें ओझें वाहिलें, आमच्या पापाबद्दल त्याने दुःख सोसलें. (मात्थी. २६:३८ यावरील टीका पाहा.) आमच्या पापाबद्दल

४७ तेव्हां तेथें जे उभे होते त्यांतील कित्येकानी हें ऐकून ह्मटलें कीं, तो एलीयाला बोलावितो.

४८ तेव्हांच त्यांतून एकाने धावत जाऊन स्पंज घेतलें. आणि (१) आंबेने भरून व वेतावर घालून त्याला प्यायास दिल्हें.

४९ परंतु वरकड ह्मणाले, असूं दे, एलीया येऊन त्याला तारील कीं नाहीं हें पाहूं.

५० मग येशूने मोठ्याने ओरडून प्राण सोडिला.

५१ तेव्हां पाहा, देवळांतील पडदा (२) वरपासून खालपर्यंत फाटून त्याचे दोन विभाग झाले, (३) आणि भूमि कांपली आणि खडक फुटले;

---

(१) गीत. ६९:२१. २ काल. ३:१४. (२) निर्ग. २६:३१. लेवी. १६:२, १५, २१, २३. (३) यशा. २५:७.

---

प्रायश्चित्त करून त्यानें इतकें दुःख सोसिलें कीं तो आतां आमचा एकच आश्रय आहे हें आह्मास माहित आहे. त्याने आमच्या ठिकाणीं शापपात्र होऊन आह्मास नेमशास्त्रांतील शापापासून खंडून घेतलें आहे. गल. ३:१३.

४७ "एलीयाला बोलावितो." कितीएकांला ती भाषा न समजून, एली या शब्दावरून एलीया असें वाटलें.

४८ "एकाने धावत जाऊन स्पंज घेतलें इ." येशू ह्मणाला होता कीं मला तहान लागली आहे, (योह. १९:२८) ह्मणून याने असें केलें. "आंबेने भरून." ही रोमी शिपायांचें रोजचें पिणें होतें. ही आंब तो प्याला असें दिसतें.

४९ "वरकड ह्मणाले असूं दे, इ." ते द्वेषाने असें बोलले. पिण्याकडून देखील थोडेंसें समाधान व्हावें असी त्यांची खुशी नव्हती.

५० "मग येशूने मोठ्याने ओरडून इ." पूर्ण झालें आहे असे शब्द ओरडून बोलला. या जगांत पूर्वीं कधीं झालें नव्हतें अशा दुःखांत व अति क्लेशांत येशू हे शब्द बोलला. ह्याच वेळेस प्रायश्चित्त पूर्ण झालें, पाप्यांपासून शाप लोटून जाऊन त्यांचें तारण साध्य असें झालें, आणि आकाशलोकाचें राज्य सर्व खऱ्या विश्वासणाऱ्यांस उघडलें गेलें.

५१ "तेव्हां पाहा, देवळांतील पडदा इ." ज्याकडून पवित्रस्थान व पवित्रांतील पवित्रस्थान हीं भिन्न केलीं (निर्ग. २६:३१-३३.) तो हाच पडदा. उपाध्या ह्याच वेळेस पवित्रस्थानांत धूप जाळीत असे, त्याने ही

५२ आणि थडीं उघडलीं (१) आणि झोंपीं गेलेले (२) पवित्र लोक यांतील बहुतांचीं शरीरें उठलीं;

५३ आणि तो उठल्यानंतर ते थड्यांतून (३) निघून पवित्र नगरांत गेले आणि बहुतांस दिसले.

५४ तेव्हां (४) शतपति व त्याच्या बरोबर येशूवर पाहरा करणारे हे तो भूमिकंप व त्या झालेल्या गोष्टी पाहून फार भ्याले व बोलले, खराच हा देवाचा पुत्र होता.

५५ आणि तेथें बहुत बायका दुरून पाहत होत्या, त्या येशूची सेवा करीत त्याच्या मागें गालीलाहून आल्या होत्या; (५)

(१) यशा. २५:८; २६:१९. होश. १३:१४. योह. ५:२५, २८. (२) दान. १२:२. १ थेस्स. ४:१४. (३) १ करिं. १५:२०. (४) मार्क. १५:३९. लूक. २३:४७. इ. (५) लूक. ८:२,३.

गोष्ट पाहिली असेल. पवित्रांतील पवित्रस्थान ही आकाशलोकाची उपमा असें समजण्यांत येतें आणि हा पडदा फाटून गेला, तेव्हां आकाशलोक सर्वांसाठीं ख्रीस्ताकडून उघडला आहे, असें दाखविलें होतें. "आणि भूमि कांपली." येशू ख्रीस्त खरा मशीहा असें पटवावें आणि ज्यानी त्याला वधस्तंभीं दिल्हें त्यांचा अपराध दाखवावा ह्मणून त्याच समयीं हा भूमिकंप झाला.

५२,५३ "आणि थडीं उघडलीं इ." देवाने हे मोठे चमत्कार करून प्रमाण पटविलें कीं, हा वधस्तंभीं दिल्हेला येशू खरा मशीहा व तारणारा असा आहे. "झोंपीं गेलेले." ह्मणजे मेलेले. पवित्र लोकांचें मरण यास शास्त्रांत कोठें कोठें झोंप असें ह्मटलें आहे. "पवित्र नगरांत." ह्मणजे यरूशालेमांत. एथें यहूद्यांचें मुख्य देवस्थान होतें ह्मणून त्या शहराला पवित्र ह्मणत असत.

५४ "फार भ्याले." येशू वास्तविक खरा तारणारा, आणि त्याला वधस्तंभीं दिल्ह्यामुळें देव रागें भरून आमचा सूड उगवायास येतो असें त्यांस वाटलें. "हा देवाचा पुत्र इ." त्या चमत्कारावरून त्यांची खातरी झाली होती.

५५ "दुरून पाहत होत्या." शिपायानी त्यांस जवळ येऊं दिल्हें नसेल. त्यानी दुरून ख्रीस्ताची वेदना फार दुःखित होऊन पाहिली. "येशूची सेवा करीत." येशूच्या सर्व संकटांत त्या स्त्रिया विश्वासू राहिल्या. ज्या स्त्रिया आतां ख्रीस्तावर भाव ठेवितात त्यांसाठीं हा चांगला कित्ता आहे.

५६ त्यांमध्यें माग्दालीणी मारया, आणि याकोब व योसे यांची आई मारया, आणि जब्दीच्या पुत्रांची आई अशा होत्या.

५७ मग संध्याकाळ झाल्यावर (१) अरिमाथाईतील योसेफ नामें एक धनवान माणूस आला, हाहि येशूचा शिष्य होता;

५८ त्याने पिलातसाकडे जाऊन येशूचें शरीर मागितलें, तेव्हां पिलातसाने शरीर द्यायास आज्ञा केली.

५९ मग योसेफाने तें शरीर घेऊन तागाच्या स्वच्छ वस्त्राने गुंडाळिलें.

६० नंतर त्याने खडकांत खोदिलेलें आपलें नवें थडें यांत तें

(१) मार्क. १५:४२. लूक. २३:५०. योह. १९:३८.

५६ "माग्दालीणी मारया." इने प्रभूवर प्रीति करावी ह्मणून विशेष कारण होतें. त्याने तिच्यामधून सात भूतें घालवून तिचा भयंकर रोग दूर केला होता आणि तिला शुद्धीवर आणिलें होतें. मार्कस १६:९ पाहा. "जब्दीच्या पुत्रांची आई." मात्थी. १०:२ पाहा. इचें नाम सालोमे होतें. मार्कस १५:४० पाहा.

५७ "मग संध्याकाळ झाल्यावर इ." ख्रीस्त इतक्यांत मेला आहे असें कळलें होतें. (योहान्न. १९:३१-३७.) "धनवान माणूस." हा योसेफ अब्रूवान माणूस होता. तो योग्य सभासद होता व देवाच्या राज्याची वाट पाहत होता. (मार्कस. १५:४३) तो चांगला व नीतिमान होता आणि सभासदांच्या दुष्ट विचाराला व कामाला सम्मत दिल्हें नव्हतें. (लूका. २३:५१. यो. १९:३८.)

५८ "त्याने पिलातसाकडे इ." हुकुमावांचून कोणी तें न्यावयास मुक्त्यार नव्हता ह्मणून त्याने मागितलें. जरी अगोदर गुप्त शिष्य होता तरी आतां त्याने धैर्य धरून येशूवरील प्रीति दाखविली.

५९ "मग—स्वच्छ वस्त्राने गुंडाळिलें." सुगंध द्रव्यासुद्धां गुंडाळिलें. (यो. १९:४०) मेताला अनेक प्रकारचीं सुगंध द्रव्यें घालावीं असी यहूद्यांची रीत होती. (२ काल. १६:१४) सप्तकाच्या पहिल्या दिवसीं मारया व इतर बायका मसाला व सुगंध तेल येशूच्या शरिराला लावायास आल्या. (लूका. २३:५६; २४:१)

६० "नंतर—आपलें नवें थडें इ." हें थडें एका मळ्यांत होतें आणि त्यांत कोणीहि तोंपर्यंत ठेविलें नव्हतें. (यो. १९:४१.) अणखी त्या थड्यांत

ठेविलें. (१) आणि मोठा धोंडा थड्याच्या दारासीं लोटून लाविल्यावर निघाला.

६१ तेव्हां थड्यासमोर माग्दालीणी मारया व दुसरी मारया ह्या तेथें बसलेल्या होत्या.

६२ आणि दुसरा दिवस ह्मणजे तयारी करण्यानंतर जो दिवस, त्यांत मुख्य याजक व परोशी पिलातसाकडे मिळून जाऊन बोलले,

६३ महाराज, तो ठक (२) जिवंत असतां बोलला होता कीं तीन दिवसांनंतर (३) मी उठेन असी आह्मास आठवण आहे.

६४ यास्तव तिसऱ्या दिवसापर्यंत थड्याचा बंदोबस्त करायास सांग; नाहीं तर कदाचित त्याचे शिष्य रात्रीं येऊन त्याला चोरून नेतील, (४) आणि तो मेलेल्यांमधून उठला आहे, असें लोकांस सांगतील, मग शेवटलें ठकविणें पहिल्यापेक्षां वाईट होईल.

६५ तेव्हां पिलातस त्यांस ह्मणाला, तुमच्या जवळ पाहरा आहे; जा, आणि तुमच्याने होईल तसा बंदोबस्त करा.

---

(१) यशा. ५३:९. (२) योह .७:१२,४७. २ करिं. ६:८. (३) मात्थ. १६:२१; १७:२३; २०:१९. लूक २४:६,७. योह. २:१९. (४) मात्थ. २८:१३.

---

ठेविल्यावरून एक भविष्यलेख पूर्ण झाला (यशा. ५३:९.) हें थडें खडकांत खोदिलें असतां आणि मोठा धोंडा दारासीं लोटून पाहाराहि ठेविला असतां शिष्यानी येऊन प्रेताला चोरून न्यावें हें अगदीं असाध्य होतें.

६१–६३ "तयारी करण्यानंतर इ." वल्हांडणाच्या पहिल्या दिवसीं ते सर्व वस्तु सिद्ध करीत असत ह्मणून त्याला सिद्धतेचा दिवस ह्मणत असत. "तो ठक इ." हा ठक आहे असा आरोप त्यानी ख्रीस्तावर आणिला होता, आणि तसें ह्मणणें अद्यापि बरें वाटलें. हा आरोप खरा असें त्याच्या मरण्याकडून पटलें ह्मणून ते बोलले.

६४ "यास्तव तिसऱ्या दिवसापर्यंत इ." तिसऱ्या दिवसीं मी उठेन असें येशू बोलला होता ह्मणून तोंपर्यंत पाहरा ठेविला ह्मणजे पुरे, असें त्यांस वाटलें. हा मेलेल्यांमधून उठला असी गोष्ट प्रसिद्ध झाली ह्मणजे तो वास्तविक खरा मशीहा आहे असें समजून पहिल्यापेक्षां अधिक लोक त्याजवर विश्वास ठेवितील असें त्यानी ठीक मानिलें.

६५ "तुमच्या जवळ पाहरा आहे इ." रोमी शिपायांचा एक पाहरा

६६ मग त्यांनीं जाऊन धोंड्यावर शिक्का मारून (१) पाहरा ठेवून थडग्याचा बंदोबस्त केला.

## अध्याय २८.

१ मग शाब्बाथानंतर (२) सप्तकाचा पहिला दिवस उजेडतांच माग्दालीणी मारया (३) व दुसरी मारया ह्या थडें पाहायास गेल्या.

(१) दान. ६:१७. (२) मार्क. १६:१. लूक. २४:१ इ. योहा. २०:१. इ. (३) मात्थ. २७:५६.

---

यहूद्यांस दिल्हा होता ते देवळाच्या पश्चिमोत्तरेस आंतोनिय नामक गढांत राहत असत. वधस्तंभाजवळहि चौकी करायास पिलातसानें त्यांस एक पाहरा दिल्हा होता. तर त्यांच्या स्वाधीन पुरते शिपायी होते आणि पिलातस बोलला कीं आपल्या समजुतीप्रमाणें बंदोबस्त करा.

६६ "धोंड्यावर शिक्का मारून इ." ख्रीस्तानें अस्या रीतीनें पुरलें जावें कीं त्याच्या पुन्हा उठण्याविषयीं कांहीं ठकविणें होईना, ही ईश्वरी सत्ता पाहून आह्मास अचंबा वाटतो. त्याच्या मित्रांनीं हा बंदोबस्त केला असल्यास तो वास्तविक निमित्य करून ह्यांनीं हा बंदोबस्त केला असें ह्मणायास साध्य होतें. परंतु मित्रांनीं नव्हे, त्याच्या शत्रूंनीं पिलातसाला तो मेलाच आहे असें सांगून पाहरा मागून ठेविला आणि असा बंदोबस्त केला कीं कांहीं फसविणें अगदीं होईना. जगाच्या खातरीस होण्याजोगें असें प्रमाण ख्रीस्ताच्या पुन्हा उठण्याविषयीं पटावें ह्मणून त्याच्या शत्रूंनीं उपाय करून सिद्धीस नेलें.

१ "पहिला दिवस." ह्मणजे ख्रिस्ती शाब्बाथ. यहूदी आठवड्याचा सातवा दिवस ह्मणजे शनिवार हा शाब्बाथ असें पाळीत असत. त्या दिवसीं कबरेंत राहून ख्रीस्त पहिल्या दिवसीं उठला ह्मणून या गोष्टीच्या आठवणीसाठीं सर्व ख्रिस्ती लोक हा पहिला दिवस शाब्बाथ असें पाळीत आले आहेत. "उजेडतांच." मोठ्या सकाळीं सूर्य उगवते वेळेस. (मार्कस १६:२.) मोठ्या पहाटेस. (लूका २४:१.) अंधार असतांना (यो. २०:१.) "माग्दालीणी मारया." ती प्रेतस्थळाजवळ पहिलीच आली आणि आपला मेलेल्यांतून उठलेला प्रभु तिनें पहिल्यानेच पाहिला. "दुसरी मारया." ही याकोबाची व योस्याची आई होती. सलोमेहि आली होती (मार्क. १६. १.) ह्या स्त्रिया सुगंध द्रव्यें विकत घेऊन येशूला लेपन करायास आल्या. "ह्या थडें पाहायास गेल्या." आपला प्रभु व तारणारा याविषयीं त्यांस मोठी काळजी वाटली ह्मणून जरी पुरला होता तरी आपली त्यावरील प्रीति दाखवीत गेल्या.

२ तेव्हां पाहा, मोठा भूमिकंप झाला होता; कारण कीं प्रभूचा दूत आकाशांतून उतरून येऊन दारापासून धोंडा लोटून त्यावर बसला होता.

३ त्याचें स्वरूप (१) विजेसारिखें होतें, आणि त्याचें वस्त्र बर्फासारिखें पांढरें होतें.

४ तेव्हां त्याच्या भयानें पाहरेकरी थरथरां कांपून मेल्यासारिखे झाले.

५ मग दुतानें त्या बायकांस उत्तर दिल्हें; (२) भिऊं नका, कारण कीं (३) खांबीं दिल्हेला येशू याचा शोध तुह्मी करितां, हें मला ठाऊक आहे.

---

(१) गीत. १०४:४. यहेज्क. १:४-१४. दान. १०:६. प्रग. १:१४-१६.
(२) इब्री. १:१४. (३) गीत. १०५:३,४.

---

२ "त्यावर बसला." पाहरेकऱ्यानीं हा दूत धोंड्यावर बसलेला पाहिला; स्त्रियांस मग तो उभा दिसला.

३ "विजेसारिखें इ." ह्मणजे फार तेजस्वी. "बर्फासारिखें पांढरें इ." निर्दोषपणा व पवित्रता यांचें चिन्ह पांढरें वस्त्र असें शास्त्रांत होतें. प्रेषि. १:१०; दान. ७:९; प्रगट. ३:४,५. ४:४. ७:१३,१४.

४ "पाहरेकरी थरथरां कांपून इ." रात्र होती, दुतानें अकस्मात येऊन धोंडा लोटून दिल्हा, एकाएकीं भूमि कांपली आणि मोठा प्रकाश झाला असें दिसतें, ह्मणून पाहरेकरी कांपले आणि मूर्छित झाले असतील. याच वेळेस प्रभु उठला असें दिसतें.

५ "मग दुतानें त्या बायकांस उत्तर दिल्हें. इ." त्या स्त्रिया थड्यांत गेल्यावर हा दूत दिसला. मार्कस १६:५. व लूका २४:३. पाहा. धोंडा लोटलेला पाहून प्रेत आहे कीं नाहीं हें पाहायास त्या आंत गेल्या, आणि तेथें दूत त्यांच्या दृष्टीस पडला. लूका ह्मणतो, दोन मनुष्य होते. मात्थी व मार्कस एक जो बोलला त्याविषयीं मात्र सांगतात. अनेक नव्हते असें ते सांगत नाहींत. ग्रंथकर्त्ते वर्णन करितांना ज्याकडे विशेष लक्ष जातें त्याचेंच वर्णन फारकरून करितात. मात्थी दूत पण मार्कस व लूका मनुष्य ह्मणतात, याविषयीं एवढें समजायाचें कीं, दूत दृष्टीस पडत तेव्हां मनुष्यरूप धरून पडत असत. ह्मणून त्यांचें वर्णन करितांना शास्त्रकर्त्ते त्यांस कधीं कधीं मनुष्य कधीं कधीं दूत असें ह्मणतात.

६ तो एथें नाहीं; कां कीं त्याने सांगितल्याप्रमाणें (१) तो उठ-
ला आहे. या, प्रभु निजला होता ती जागा पाहा.
७ आणि लवकर जाऊन त्याच्या शिष्यांस सांगा कीं, तो मेलेल्यां-
मधून उठला आहे, (२) आणि पाहा, तो तुमच्या अगोदर गालीलांत
जातो, तेथें (३) तुह्मी त्याला पाहाल; पाहा, म्या तुह्मास सांगितलें
आहे.
८ तेव्हां त्या बायका भयाने व फार आनंदाने थडग्यापासून लव-
कर निघून त्याच्या शिष्यांस वर्तमान सांगायास धावल्या.
९ मग त्या त्याच्या शिष्यांस तें सांगायास जात असतां, पाहा, येशू

---

(१) मात्थ. २७:६३. (२) लूक. २४:३४ १ करिं. १५:४. (३) मात्थ. २८:१६,१७.

---

६ "तो उठला आहे." मी तिसऱ्या दिवसीं उठेन असें बहुत वेळां ख्रिस्ताने शिष्यांस पूर्वीं सांगून ठेविलें होतें, परंतु त्यांस समजलें नाहीं ह्मणून त्यानी त्याच्या उठण्याची वाट पाहिली नाहीं. मात्थी १६:२१;२०:१९. "ती जागा पाहा." थडग्यांत प्रेत ठेवण्याची जागा बाजूला खडकांत खोदून काढीत असत.

७ "त्याच्या शिष्यांस सांगा इ." आणि पेत्रसालाहि सांगा, असें मार्कसांत आहे. पेत्रसानें नुक्तेंच प्रभूला नाकारिलें होतें. तर ख्रीस्ताने असा विशेष निरोप त्याला पाठवावा यांत किती दया व प्रीति दिसून येतात! पेत्रस आपल्या पापामुळें कांहीं निराश झाला असतां त्याला धैर्य द्यावें आणि क्षमा पावल्याची खातरी द्यावी असा प्रभूचा हेतु असेल. तर यावरून, जे खरे ख्रीस्ती कधीं अविश्वासी होतात त्यावरहि ख्रीस्ताची ममता आहे असें दिसून येतें. "गालीलांत जातो, येथें तुह्मी त्याला पाहाल." हें लवकर पूर्ण होऊन ख्रीस्त शिष्यांस गालीलांत भेटला. (याच अध्यायाची १६ ओवी पाहा)

८ "भयाने आणि फार आनंदाने इ." त्यानी चमत्कारिक गोष्ट ह्मणजे धोंडा लोटलेला पाहिला, दिव्य दूतहि पाहिला आणि ख्रीस्त उठला असें दूत बोलला होता. या सर्वांवरून त्यांस भय वाटलें आणि मोठा आनंदहि होता, ह्मणून शिष्यांस सांगायास धावत गेल्या.

९ "त्याचे पाय धरिले इ." येशू त्यांस भेटून बोलला तेव्हां त्यानी त्याला ओळखिलें आणि हा वास्तविक देवाचा खरा अवतार असें समजून देवासच योग्य असें त्याचें भजन केलें.

त्यांस भेटला व ह्मणाला, सलाम. (१) मग त्यांनी जवळ जाऊन त्याचे पाय धरिले, आणि त्याला नमन केलें.

१० तेव्हां येशूनें त्यांस ह्मटलें, भिऊं नका, जा, माझ्या भावांस सांगा कीं, गालीलांत जा, (२) ह्मणजे तेथें मला पाहाल.

११ आणि त्या जात असतां पाहा, पाहरेकऱ्यांतील कित्येकांनी नगरांत जाऊन सर्व झालेलें वर्त्तमान मुख्य याजकांस सांगितलें.

१२ तेव्हां त्यांनी वडिलांसुद्धां मिळून मसलत केल्यावर शिपायांस पुष्कळ पैका देऊन सांगितलें कीं,

१३ असें बोला, रात्रीं आह्मी झोंपेंत असतां त्याच्या शिष्यांनी येऊन त्याला चोरून नेलें; (३)

(१) योह. २०:१९. (२) इब्री. २:११. (३) मात्थी. २६:६४.

१० "भिऊं नका." प्राचीन काळीं दूत अथवा दिव्य प्राणी दिसत तेव्हां लोक भीत असत. (लूका. ९:८; न्यायाधीश ६:२२,२३, १३:२१,२२.) तसें या स्त्रिया येशू मेलेल्यांमधून उठला हें पाहून हा वास्तविक दिव्य प्राणी असावा असें मनांत आणून भिऊं लागल्या. येशूनें त्यांस शांतवन केलें. "जा, माझ्या भावांस सांगा इ." या शब्दावरून केवढी प्रीति दिसती! जरी त्यानें मेलेल्यांमधून उठून आपला पराक्रम दाखविला होता आणि जरी आतां आकाशलोकाच्या सिंहासनावर भगवान् असा बसणार होता तरी त्यानें आपल्या शिष्यांस भाऊ ह्मणायाला तुच्छ मानिलें नाहीं. गरीब पाप्यांस शिष्य करून तो आपले भाऊ आणि आकाशलोकाचे संगती वतनदार असें मोजतो, यांत केवढी दया पाहा! "गालीलांत जा." येशू गालीलांत उपदेश करूं लागला होता, आणि आतां फिरून तेथें स्वस्थ ठिकाणीं व एकांतीं शिष्यांस भेटून बोध द्यावा आणि संपूर्ण जगांत शुभवर्त्तमान घोषण करण्याची आज्ञा द्यावी ह्मणून त्यानें त्यांस तेथें बोलाविलें.

१२,१३ "याजक व वडील भारी विचारांत पडले." आतां काय करायाचें? त्यांनी पाहिलें कीं ख्रीस्ताचें प्रेत गेलें आहे. त्यांनी आपल्या खुशीनें पाहारा ठेवून बंदोबस्त केला होता असा कीं शिष्यांनी त्याला चोरून नेलें असें निमित्य सांगायाला जागा नव्हती. तरी हीच युक्ति राहिली असें पाहून त्यांनी शिपायांस लांच देऊन त्यांस समजाविलें आणि ते जाऊन लबाडीनें बोलले कीं रात्रीं आह्मी झोंपेंत पडलों तेव्हां त्याच्या शिष्यांनी त्याला चोरून नेलें.

१४ आणि हें सुभेदाराच्या कानीं पडलें, तर आह्मी त्याला समजावूं, आणि तुह्मास निर्भय करूं.

१५ मग त्यानी पैका घेऊन आपणांस शिकविल्याप्रमाणें केलें, आणि हीच गोष्ट यहूदी लोकांमध्यें आजपर्यंत चालत आली आहे.

---

१४ "हें सुभेदाराच्या कानीं पडलें इ." त्यांस ठाऊक होतें कीं पिलातस लांच खात असतो, अणखी तो ख्रीस्ताची गोष्ट मनावर घेत नाहीं. तर कानीं पडलें असतांहि तो फारकरून कांहीं चौकसी करणार नाहीं, आणि करूं लागला तर पैका देऊन त्याला समजवायास अवघड पडणार नाहीं. असें मनांत आणून त्यानी ही युक्ति काढिली, आणि शिपायानी त्यांचें ऐकून दिल्हेला पैका घेऊन लोकांमध्यें ही खोटी आवई उठविली.

१५ "आजपर्यंत इ." मात्थीनें हें शुभवर्त्तमान लिहिलें तोंपर्यंत ही आवई चालत आली. एथें वर्णिलेलें ख्रीस्ताचें पुन्हा उठणें ख्रिस्ती धर्मातला एक मुख्य सिद्धांत आहे आणि याविषयीं बळकट प्रमाण पटतें याविषयीं विचार–असें कीं १. मी मेलेल्यांमधून उठेन असें वरचेवर ख्रीस्तानें पूर्वी सांगितलें होतें. मात्थी. १४:४०;१६:२१;२०:१९ पाहा. २. तो मेलाच याविषयीं कांहीं संशय राहिला नाहीं. शिष्य, रोमी व यहूदीहि कबूल होते. ३. कोणी त्याला चोरून नेऊं नये ह्मणून पक्का बंदोबस्त केला होता. त्याच्या शत्रूनी साठ माणसांचा पाहरा ठेवून थडयाच्या दारासीं मोठा धोंडा लावून शिक्का मारिला होता. ४. तिसऱ्या दिवसीं प्रेत नाहीं असें झालें. याविषयींहि सर्व कबूल होते. याविषयीं मुख्य याजकानें कांहीं संशय दाखविला नाहीं. प्रेत कसें गेलें याविषयीं मात्र ते निमित्य पाहूं लागले. तो उठून जिवंत आहे असें शिष्य बोलले. आह्मी झोंपेंत होतों तेव्हां त्याचे शिष्यानी त्याला चोरून नेलें असें ह्मणायाला यहुद्यानी रोमी शिपायांस पैका दिल्हा आणि लोकांस समजाविलें, असें कीं बहुतेकानी तें खरें मानिलें. परंतु ही गोष्ट किती असंगत व असंभाव्य आहे पाहा. (१) कोणी तें प्रेत न चोरावें ह्मणून पाहारा ठेविला होता. (२) पाहरा करितांना कोणी झोंपेंत पडला तर त्याला ठार मारावें असा दंड रोमी सैन्यांत नेमला होता, आणि इतक्या माणसानी एकदम कायदा मोडून आपला जीव प्राणसंकटांत आणावा हें अगदीं असंभाव्य आहे. (३) शिष्य थोडकेच, अशक्त व भीत होते. बागांत ज्यानी ख्रीस्ताला धरून नेलें त्यांसमोर ते पळून गेले होते, तर त्यानी साठ शिपायांपासून त्याला चोरून न्यायास धजावें हें कसें होईल? (४) ते सर्व शिपाई झोंपेंत जातील असें शिष्यांस कशावरून वाटावें? अथवा झोंपेंत गेले तरी त्यांस जागें करण्या-

शिवाय तो मोठा धोंडा शिक्का मोडून लोटावा आणि प्रेत काढावें हें कसें व्हावयाचें होतें? (५) प्रेतवस्त्रें नेलीं नव्हतीं तर बरोबर गुंडाळून ठेविलीं होतीं हें तर चोरांचें काम नव्हे. (६) जर शिपाई वास्तविक झोंपेंत पडले तर कोणी त्याला चोरून नेलें हें कसें कळायाचें होतें? तर त्यांचें ह्मणणें प्रत्येक प्रकारें असंगत व असंभाव्य आहे. परंतु शिष्यांचें ह्मणणें खरें यास चांगला आधार आहे. (१) ख्रीस्त उठला तेव्हां शिपायांनी पाहिलें नाहीं याचें कारण शिष्य बरोबर सांगतात, असें कीं, ते दूत पाहून घाबरले आणि मेल्यासारिखे झाले. (२) तो उठल्यावर आह्मास दिसला असें सर्व शिष्यांनी आणि इतर बहुतेकांनी निक्षूण ह्मटलें. (३) त्यांनी यरूशलेमांत यहूदी व मुख्य याजक यांच्या समक्ष ही गोष्ट प्रशस्तपणें सांगितली. आतां आपण प्रवृत्त केलेली गोष्ट खरी असें जर यहूद्यांनी मानिलें तर शिष्यांस धरून हे लबाड आहेत, यांनीच वास्तविक प्रेत चोरून नेलें असा पुरावा त्यांनी कां दिल्हा नाहीं? असा पुरावा द्यायास त्यांनी प्रयत्न देखील कधीं केला नाहीं, तर त्यांनी आपण सांगितलेली गोष्ट खरी मानिली नाहीं असें प्रमाण पटतें कीं नाहीं? (४) शिष्यांनी ख्रीस्ताविषयीं फसावें हें साध्य नव्हतें. ते तीन वर्षें त्याबरोबर राहून त्यांची याची पक्की ओळख झाली होती. तो उठल्यावर त्यांनी त्याचे हात पाय व भोंसकलेली कूस पाहिली. चाळीस दिवसांपर्यंत ते त्याबरोबर राहून खात पीत व संभाषण करीत गेले. साक्ष पटविण्यासाठीं शिष्यांची मंडळी पुरती होती. सर्कारांत दोन माणसांची साक्ष खरी असें मानितात. तर उठलाच आहे आणि आह्मी त्याला पाहिलें आहे ही साक्ष ज्यांनी सर्वदां सर्व ठिकाणीं दिल्ही असे अकरा प्रेषित आणि इतर बहुत प्रमाणिक माणसें होतीं. हीं सर्व फसलीं असें होईल काय? होईल तर कोणाचीहि साक्ष कधीं मानूं नये असें झालें. ५. ख्रीस्त मेलेल्यांमधून उठला आहे असी शिष्यांची पक्की खातरी होती. त्याविषयीं त्यांनी बळकट प्रमाणें पटविलीं. त्यांच्या शत्रूंनी त्यांस नांव ठेविलें, तुच्छ मानिलें, पाठलाग केला आणि जिवें मारिलें तरी त्यांतील कोणी या गोष्टीविषयीं कांहीं संशय कधीं दाखविला नाहीं. येशू ख्रीस्त पाप्यांसाठीं मेला आणि मेलेल्यांमधून उठला आहे ही गोष्ट सांगण्यासाठीं ते समुद्र ओलांडून जात, देशोदेशीं फिरत आणि आपला जीव सर्व प्रकारच्या संकटांत घालीत असत. शिष्यांची साक्ष खरी असें जगानें मानिलें. ख्रीस्त उठल्यावर पन्नासाव्या दिवसीं तीन हजार यहूद्यांनी एकदम ही साक्ष खरी आहे असें मानून ख्रीस्तावर विश्वास ठेवला. प्रेषि. २:४१. इतर बहुत यहूदी आणि हजारों हजार परप्रजा यांनी प्रेषितांचा उपदेश ऐकून विश्वास धरिला आणि ख्रीस्त मेलेल्यांमधून उठला हा विश्वास तिनशें वर्षांच्या आंत सर्व रोमी

१६ नंतर अकरा शिष्य (१) गालीलांत जो डोंगर येशूने त्यांस नेमिला होता, त्याकडे गेले.

१७ तेव्हां त्यांनी त्याला पाहून (२) त्याला नमन केलें, परंतु कित्येकांस संशय वाटला.

१८ तेव्हां येशू जवळ येऊन त्यांसीं बोलून असें ह्मणाला कीं, आकाशांत व पृथ्वीवर सर्व अधिकार (३) मला दिल्हा आहे.

---

(१) मात्थ. २६:३२. (२) मात्थ. १६:२८. (३) गीत. २:६. ८२:१२. ११०:१–३. यशा. ९:६,७. दान. ७:१४. मात्थ. ११:२७. लूक. १:३२. योह. १७:२. रोम. १४:९. एफ. १:२०,२१. इब्री. २:८. १ पेत्र. ३:२२. प्रग. ११:१५.

---

राज्यावर पसरला होता. प्रेषित फसविणारे असल्यास त्या दिवसांत पुरावा पटवायास अगदी सोपें पडलें असतें. असें असतां त्या दिवसांत विशेषेंकरून लोकांची खातरी होऊन त्यांनी विश्वास धरिला आणि शिष्यांची साक्ष खरी असें प्रमाण ख्रिस्ती मंडळी वाढवून देवानेच पटविलें.

१६ "नंतर अकरा शिष्य इ." यहूदा मेला होता. अकरा शिष्य राहिले. ख्रीस्ताने पूर्वी सांगून ठेविलें होतें (मात्थी. २६:३२) त्याप्रमाणें ते गालीलांत एका डोंगरावर गेले. हा डोंगर कोणता होता हें सांगितलें नाहीं.

१७ "कित्येकांस संशय वाटला." यो. २०:२५. पाहा. या संशयावरून प्रमाण पटतें कीं, शिष्य प्रमाणिक होते. बळकट प्रमाणें पाहिल्यावांचून त्यांची खातरी होईना. या प्रमाणाविषयीं त्यांनी बारीक चौकसी केली. ते लवकर विश्वास धरीनात. परंतु खातरी झाल्यावर इतर लोकांस पुरावा देऊन प्राणसंकटांत देखील साक्ष द्यायास ते तयार होते. या सर्वांवरून सिद्ध होतें कीं, ते फसले नाहींत आणि दुसऱ्यांस त्यांनी फसविलें नाहीं.

१८ "सर्व अधिकार मला दिल्हा आहे." येशू ख्रीस्त सृष्टीचा उत्पन्न कर्ता असतां याला सर्वांवर मूळचा अधिकार होता. यो. १:३. कल. १:१६,१७; इब्री. १:८. पाहा. परंतु तो जगाचा तारणाराहि आहे आणि या अर्थात विशेषेंकरून सृष्टि त्याच्या स्वाधीन ठेविली आहे यासाठीं कीं त्याने आपणासाठीं पाप्यांस खंडून मंडळी मिळवावी आणि आपल्या निवडलेल्यांचें रक्षण करून व त्यांचे सर्व शत्रु जिंकून त्यांस यशस्वी व विजयी करून तारावें. एफ. १:२०, २३; १ करिं. १५:२५—२७; यो. ५:२२, २३. फिलि. २:६—११; तर तो देवाचा अवतार व माणसांचा तारणारा या अर्थात त्याला दूत व भुतें, आपले लोक व दुष्ट माणसें, यांवर आणि अवघ्या सृष्टीवर अधिकार दिल्हा आहे.

१९ यास्तव तुह्मी जाऊन (१) सर्व देशांतील लोकांस (२) शिष्य करा; त्यांस बापाच्या व पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामानें बाप्तिस्मा द्या.

२० ज्या ज्या आज्ञा तुह्मास दिल्ह्या त्या सर्व पाळायास त्यांस शिकवा (३) आणि पाहा, काळाच्या समाप्तीपर्यंत मी तुह्माबरोबर सर्वकाळ आहें. (४) आमेन.

---

(१) मार्क. १६:१५. (२) यशा. ५२:१०. रोम. १०:१८. (३) प्रेषि. २:४२. १ करिं. ११:२. (४) मात्थ. १८:२०. प्रग. १:१८.

---

१९ "यास्तव तुह्मी जाऊन इ." मला सर्व अधिकार आहे ह्मणून या कामावर जायाला भिऊं नका. तुमचें रक्षण करायास मी समर्थ आहें. जग माझ्या स्वाधीन ठेविलें आहे. जरी तुह्मी अशक्त तरी मी सर्व समर्थ आहें. जरी तुह्मास पाठलाग आणि बहुत संकटें लागतील तरी त्यांपासून सोडवायास माझ्या ठायीं शक्ति आहे. मजवर भरवसा ठेवा. जरी तुह्मी मरून जातां तरी मी जगतों आणि हें काम सिद्धीस जाईलच जाईल. जा, सर्व देशांतील लोकांस शिष्य करून त्यांस त्र्येक देवाच्या नामानें बाप्तिस्मा द्या. पवित्र आत्म्याकडून मन स्वच्छ होण्याचें अगत्य दाखवावें आणि ख्रीस्ती धर्म माणसांसमोर अंगीकारण्याची खूण व्हावी यासाठीं बाप्तिस्मा द्यायाचा होता. बापाच्या व पुत्राच्या व पवित्र आत्म्याच्या नामानें बाप्तिस्मा द्यायाचा यावरून सिद्ध होतें कीं, पुत्र व पवित्र आत्मा बापासमान आहेत.

२० "मी तुह्माबरोबर सर्वकाळ आहें." हें केवढें मोलवान वचन! आपल्या सामर्थ्यानें जग जिंकावें असें ख्रिस्ती लोकांचें काम नाहीं. त्यांस ईश्वरी सामर्थ्य देऊं केलें आहे. येशू ख्रीस्त आपल्या लोकांबरोबर जगाच्या समाप्तीपर्यंत असून त्यांचें साह्य संभाळ करील आणि शेवटीं आपणाजवळ सौख्य लोकांत घेईल. पण एकटेंच तारण पावावें असी त्यांची इच्छा नसावी. संपूर्ण जगाला शुभवर्त्तमान घोषण करून ख्रीस्ताच्या स्वाधीन करण्याविषयीं प्रयत्न करावें ह्मणून ख्रीस्ताची आज्ञा आहे. त्याचें ऐकून शिष्यानी हें काम मनावर घेऊन प्रवृत्त केलें आणि आजपर्यंत देवाचे खरे भक्त चालवीत आले आहेत. हल्लीं ख्रिस्ती मंडळी फार वाढूं लागली आहे. ख्रिस्ती लोक जगांतील सर्व देशांत जाऊन शुभवर्त्तमान सांगतात आणि देवाच्या कृपेनें व साह्यानें हें काम लवकर सिद्धीस जाऊन हें संपूर्ण जग ख्रीस्ताला वश्य होईल असा भरवसा आहे.

---

# मार्कसानें केलेलें शुभवर्त्तमान.

## अध्याय १.

देवाचा पुत्र (१) येशू ख्रीस्त याच्या शुभवर्तमानाचा प्रारंभ.

२ ज्याप्रमाणें भविष्यवाद्यांच्या ग्रंथांमध्यें (२) लिहिलें आहे कीं, पाहा, मी आपल्या दुताला तुझ्या पुढें पाठवितों; तो तुझा मार्ग तुझ्या पुढें तयार करील;

३ रानांत कोणीएका ओरडणाऱ्याची वाणी (३) झाली कीं, प्रभूचा मार्ग तयार करा, त्याच्या वाटा नीट करा ;

४ त्याप्रमाणें योहान्न (४) रानांत बाप्तिस्मा देऊं, व पापांची क्षमा होण्यासाठीं (५) पश्चात्तापाचा बाप्तिस्मा गाजवूं लागला.

५ तेव्हां सर्व यहूदा देशांतील लोक व यरुशलेमकर निघून त्याकडे गेले, आणि त्या सर्वांनी आपलीं पापें पदरीं घेऊन (६) यार्देन नदींत त्यापासून बाप्तिस्मा घेतला.

६ योहान्न तर उंटाच्या लवेचें वस्त्र पांघरला होता, व त्याच्या कंबरेस कातड्याचा कंबरबंद होता, आणि तो टोळ (७) व रानमध खात असे.

७ आणि तो गाजवीत असे कीं, (८) ज्याच्या वाहणांचा बंद मी लवून सोडायास योग्य नाहीं, असा कोणीएक मजपेक्षां समर्थ माझ्या मागून येत आहे.

---

(१) इब्री. १:१,२. (२) मल. ३:१. (३) यशा. ४०:३.
(४) मात्थ. ३:१. लूक. ३:३. योह. ३:२३. (५) प्रेषि. २२:१६.
(६) ले. २६:४०–४२. गनि. ३२:५. नी. २८:१३. १ योह. १:८–१०.
(७) ले. ११:२२. (८) मात्थ. ३:११. योह. १:२७. प्रेषि. १२:२५.

---

१. "देवाचा पुत्र–शुभवर्तमानाचा प्रारंभ." ही साधारण गोष्ट नाहीं. ही देवाच्या पुत्राचीं मतें व कर्मे यांविषयीं असून भारी व मन लावण्याजोगी अशी आहे. शुभवर्तमान ह्मणजे येशू ख्रिस्ताकडून जो तारणोपाय त्याविषयींची सुवार्ता.

२–११. मात्थी. ३:३–१७ यावरील टीका पाहा.

८ म्यां तुमचा बाप्तिस्मा पाण्यानें केला खरा, परंतु तो पवित्र आ-
त्म्यानें तुमचा बाप्तिस्मा करील. (१)

९ आणि त्या दिवसांमध्यें असें झालें कीं येशू गालीलांतील नाजा-
रेथाहून आला, व त्यानें योहान्नापासून यार्देनेंत बाप्तिस्मा घेतला. (२)

१० तेव्हां पाण्यांतून वर येतांच आकाश फाटलें व आत्म्याला (३)
खबुत्रासारिखें आपल्यावर उतरतांना त्यानें पाहिलें.

११ आणि आकाशांतून अशी वाणी झाली कीं, तूं माझा प्रिय
पुत्र आहेस, तुजविषयीं मी संतुष्ट आहें. (४)

१२ मग आत्म्यानें त्याला लागलेंच रानांत घालविलें.

१३ तेव्हां सैतान त्याची परीक्षा करीत असतां तो तेथें रानांत
चाळीस दिवस (५) राहिला; तेव्हां तो वनपशूंमध्यें होता; आणि
दूत त्याची सेवा करूं लागले.

१४ आणि योहान्न पराधीन झाल्यानंतर येशू गालीलांत (६)
गेला, आणि देवाच्या राज्याचें शुभवर्त्तमान गाजवीत (७) ह्मणाला,

---

(१) यो. ३:११. प्रेषि. १:५. २:४०. १०:४५. ११:१५, १६.
(२) मात्थ. ३:१३. लूक. ३:२१. (३) यश. ४२:१. योह. १:३२. (४) गीत. २:७.
(५) मात्थ. ४:१. लूक. ४:१. (६) मात्थ. ४:१२. (७) लूक. ८:१.

---

१२. "मग आत्म्यानें रानांत घालविलें." ह्मणजे पवित्र आत्म्यानें त्याला प्रेरून नेलें. मात्थ. ४:१.

१३. "तो वनपशूंमध्यें होता." अश्या भयावस्थेंत सैतानाचे मोह त्यावर आधिक प्रबळ होण्याजोगे होते असें दिसतें. परंतु वनपशु, पापमोह इत्यादि भयांपासून तो देव बापावर भरवसा ठेवून निभावला. तर भयगतींत आह्मीहि तसेंच करावें. "दूत त्याची सेवा करूं लागले." परीक्षेचे चाळीस दिवस झाल्यावर ही सेवा करूं लागले. लूक. ४:२.

१४. "आणि योहान्न पराधीन झाल्यानंतर." हेरोदानें योहान्नाला बंदिशाळेंत द्वेषानें घातलें होतें. मात्थ. १४:३. "येशू गालीलांत गेला." मेयर व दुसरे कित्येक टीकाकर्ते यांचें मत आहे कीं हेरोद मलाहि धरायास पाहील असें समजून येशू अधिक निर्भय व्हावा ह्मणून या दूरच्या व अप्रसिद्ध प्रांतांत जाऊन कांहीं दिवस राहिला, आणि या मताला मात्थ. १४:१३. यावरून कांहींसा आधार होतो. दुसरे कित्येक ह्मणतात कीं त्या प्रांता-

१५ समय पूर्ण (१) झाला आहे व देवाचें राज्य जवळ आलें आहे, पश्चात्ताप करा, (२) व शुभवर्त्तमानावर विश्वास ठेवा. (३)

१६ नंतर (४) गालीलाच्या समुद्राजवळ चालत असतां त्याने शिमोन व त्याचा भाऊ अंद्रयास यांस समुद्रांत जाळें टाकितां पाहिलें, कारण कीं ते मासे धरणारे होते.

१७ तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, माझ्या मागें या, ह्मणजे मी तुह्मास माणसांचे धरणारे करीन.

१८ मग ते लागलेच आपलीं जाळीं सोडून देऊन त्याच्या मागें चालले.

१९ नंतर त्याने कांहींसें पुढें जाऊन जब्दीचा पुत्र याकोब व त्याचा भाऊ योहान्न यांस तारवांत जाळीं नीट करितांना पाहिलें.

२० तेव्हांच त्याने त्यांस बोलाविलें, मग ते आपला बाप जब्दी याला मोलकऱ्यांबरोबर तारवांत सोडून त्याच्या मागें चालले.

---

(१) दान. २:४४, ९:२५. गल. ४:४. एफ. १:१०.
(२) प्रेषि. २:३८. (३) रोम. १६:२६. (४) मात्थ. ४:१८. इ. लूक. ५:४. इ.

---

तले लोक देवाची गोष्ट ऐकायास तयार आहेत आणि योहान्न बंदिशाळेंत घातला असतां त्यांस उपदेश करायास समर्थ नाहीं असें पाहून योहान्नाने सुरू केलेलें काम त्यांमध्यें चालवीत जावें याच हेतूने तो गेला. यांतून कोणतें मत खरें याचा निर्णय करणें अगत्य नाहीं. जे उत्सुकतेने ऐकून विश्वास धरायास मान्य असत त्यांमध्यें असून हें काम चालवावें असें ख्रीस्ताला वाटत असे. आणि जें मोठें भारी काम करायास तो जगांत आला होता तें सिद्धीस जाई तोंवर आपल्या जिवाचें संरक्षण करावें असेंहि त्याला वाटत असे; ह्मणून तो वेळोवेळ भय आहे असें पाहून एक ठिकाण सोडून दुसऱ्या ठिकाणीं जाई व साधारण उपाय करून आपल्या जिवाचें रक्षण करी. तसें आह्मीहि जें मोठें काम देवाने आमच्या हातीं दिल्हें असेल तें सिद्धीस जाईल तोंपर्यंत आपल्या जिवाचें रक्षण करायास झटावें हें योग्य आहे. मात्थ. २४:१६ पाहा.

१५. "समय पूर्ण झाला आहे," ह्मणजे ख्रीस्ताच्या येण्याचा समय. "देवाचें राज्य इ." मात्थ. ३:२. यावरील टीका पाहा. "शुभवर्तमानावर विश्वास ठेवा." तारणाविषयींची सुवार्ता स्वीकारून घ्या.

१६–२०. मात्थ. ४:१८–२२. यावरील टीका पाहा.

२१ नंतर ते कपरणाहूमांत गेले, आणि लागलेंच त्याने शाब्बाथ दिवशीं सभास्थानांत जाऊन उपदेश केला.

२२ तेव्हां त्याच्या उपदेशावरून ते थक्क झाले, ( १ ) कारण कीं शास्त्र्यांसारिखा नाहीं तर अधिकार असल्यासारिखें त्याने त्यांस उपदेश केला.

२३ तेव्हां अशुद्ध आत्मा लागलेला ( २ ) असा माणूस त्यांच्या सभास्थानांत होता.

२४ आणि तो ओरडत बोलला कीं, अरे येशू नाजोरेथकरा, आमचा तुझा काय संबंध ? आमचा नाश करायास आलास काय ? तूं कोण आहेस हें मला ठाऊक आहे, देवाचा पवित्र तो.

२५ तेव्हां येशूने त्याला असें धमकाविलें कीं, उगाच राहा व यांतून नीघ.

२६ तेव्हां तो अशुद्ध आत्मा त्याला पिळून मोठ्याने ओरडून त्यांतून निघाला.

(१) मात्थ. ७:२८. (२) लूक. ४:३३ इ.

२१–२७. ही गोष्ट लूक. ४:३१–३७, एथेंहि लिहिली आहे. कपरणाहूमाविषयीं मात्थ. ४:१३, याची टीका पाहा. "सभास्थानांत." असीं ४८० भजनस्थानें यरूशलेमांत होतीं. "उपदेश केला." सभास्थानाचा अधिकारी शास्त्र वाचल्यावर, कोणाची इच्छा असेल त्याला लोकांस उपदेश करायाला बोलावीत असे. प्रेषि. १३:१५. ख्रीस्त अश्या प्रसंगीं वरचेवर उपदेश करीत असे.

२२. "अधिकार असल्यासारिखा." तो देवाचा पुत्र असतां त्याला ईश्वरी अधिकार होता.

२३. "अशुद्ध आत्मा." मात्थ. ४:२४ याची टीका पाहा.

२४. "आमचा तुझा काय संबंध." त्याच्या बोलण्याचा अभिप्राय त्वां मला काढावें हें योग्य नाहीं, असा होता. परंतु सैतानाच्या कामाचा नाश करायास ख्रीस्त जगांत आला आणि या माणसावर दया करून अशुद्ध आत्मा घालवावा हें योग्य होतें. सैतानाने कोणीएकाला पाडाव करून नेलें तर लुटारू सैतानच, आणि ख्रीस्ताने त्या माणसाला पुनः आपलेंसें करून घ्यावें हें योग्य आहे. "हें मला ठाऊक आहे." अशुद्ध आत्मे ख्रीस्ताला तेव्हांच ओळखत असत. "देवाचा पवित्र तो." ह्मणजे मशिहा. तो परम पवित्र अभिषिक्त असा होता. दान. ९:२४.

२५,२६. त्या माणसाला नाहीं, तर अशुद्ध आत्म्याला येशूने धमकावि-

२७ मग ते सर्व थक्क झाले व एकमेकांस असें ह्मणूं लागले, हें काय? हा काय नवीन उपदेश? कारण कीं, तो अशुद्ध आत्म्यांसहि अधिकाराने आज्ञा करितो व ते त्याला मानितात.

२८ नंतर त्याची कीर्ति लागलीच चहुंकडल्या सर्व गालील प्रदेशांत पसरली.

२९ मग ते सभास्थानांतून निघाल्यावर लागलेच (१) याकोब व योहान्न यांबरोबर शिमोन व अंद्रयास यांच्या घरीं गेले.

३० शिमोनाची सासू तर तापाने पडली होती, तेव्हांच त्यानी तिजविषयीं त्याला सांगितलें.

३१ मग त्याने जवळ जाऊन तिचा हात धरून तिला उठविलें, तेव्हां लागलाच तिचा ताप निघून गेला, व ती त्यांची सेवा करूं लागली.

३२ मग संध्याकाळीं सूर्य मावळल्यावर त्यानी सर्व दुखणाईत व भूतग्रस्त यांस त्याकडे आणिलें.

३३ आणि सर्व नगर दारासीं जमलें.

३४ तेव्हां नानाप्रकारच्या रोगानी पिडलेलीं बहुत माणसें त्याने बरीं केलीं, व बहुत भूतें काढिलीं, आणि त्या भुतानीं त्याला ओळखिलें ह्मणून त्याने त्यांस बोलूं दिल्हें नाहीं.

---

(१) मात्थ. ८:१४. लूक. ४:३८.

---

लें. यावरून अशुद्ध आत्मे आहेत असें प्रमाण पटतें, आणि येशूच्याठायीं सामर्थ्य व अधिकार आहेत असेंहि दिसून येतें.

२७,२८ "मग ते सर्व थक्क झाले." त्यानी पाहिलें कीं तो शब्द मात्र बोलून आपल्या नांवाने अशुद्ध आत्म्याला घालवितो, आणि हें केवळ देव करूं शकतो, तर हा येशू खरा मशिहा असावा असी बहुतकांची खातरी झाली.

२९–३१. एथली गोष्ट मात्थ. ८:१४,१५ यांत पाहा.

३२–३४. हें मात्थ. ८:१६,१७ एथें पाहा. भुतानी ख्रीस्ताला ओळखिलें. परंतु त्याची साक्ष नको असें त्याला वाटलें असेल, आणि याशिवाय आपण खरा मशिहा आहें असें प्रगट करण्याचा समज आला नाहीं हें जाणून त्याने त्यांस बोलूं दिल्हें नाहीं.

३५ मग तो सकाळीं मोठ्या पहांटेस उठून बाहेर गेला, व रा-
नांतल्या जागेकडे जाऊन त्याने तेथें प्रार्थना केली.
३६ नंतर शिमोन व त्याचे सोबती त्याच्या मागें गेले.
३७ मग तो त्यांस मिळाल्यावर ते त्याला ह्मणाले, सर्व तुझा शोध
करितात.
३८ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, ह्या जवळच्या मोठाल्या गांवांतही
उपदेश करावा ह्मणून आपण तेथें जाऊं, कारण कीं मी यासाठीं (१)
निघालों आहें.
३९ आणि तो सर्व गालीलांत त्यांच्या सभास्थानांमध्यें उपदेश
करीत, व भुतें काढीत चालला.
४० तेव्हां कोणीएक कोडी त्याजकडे आला (२) व त्यापुढें गुडघे
टेंकून त्याने त्याला असी विनंती केली कीं, मला शुद्ध करायाची
तुला इच्छा असली तर शक्ति आहे.

---

(१) यश. ६१:१,२. योह. १७:८. (२) मात्थ. ८:२. लूक. ५:१२.

---

३५–३७. लूक. ४:४२ एथेंहि पाहा. आमचा तारणारा जरी पूर्ण पवित्र होता तरी प्रार्थना करण्याचें मोठें अगत्य आहे असें मोजीत असे. आणि जर तो प्रार्थना करीत असे तर आह्मी विशेषेंकरून केली पाहिजे. देवाची प्रार्थना करणें हा धार्मिकपण व सद्गुण वाढविण्याचा विशेष सफल व कार्यसाधक उपाय आहे. असें दानीएलाच्या अनुभवास आलें ह्मणून तो दररोज तीनदां प्रार्थना करीत गेला. दान ६:१०. सर्व युगांतले जे देवाचे खरे भक्त ते पापमोह व सैतान यांवर केवळ प्रार्थना करून जय पावले आहेत. तर दररोज नेमाने आणि वरचेवर प्रार्थना करण्याची सवई असली पाहिजे.

३८. याचा अभिप्राय हा कीं बहुत लोक माझें ऐकायास इच्छितात तर एथें कपरणाहूमांत असें केवळ नाहीं परंतु दुसऱ्या गावांतहि उपदेश करावा, कारण कीं या संपूर्ण देशांत शुभवर्त्तमान यांपण करावें ह्मणून मी जगांत आलों आहें.

३९. मात्थ. ४:२४ यावर टीका पाहा.

४०—४५. मात्थ. ८:२–४ यावर टीका पाहा. "तुला इच्छा असली." येशूचें ईश्वरी सामर्थ्य व अधिकार ओळखून त्याने त्याची दया व साह्य मागितलें. "त्याला शिवला." शिवल्याने तो बरा झाला असें समजायाचें नाहीं, कारण नेमशास्त्राप्रमाणें कोड्याला शिवूं नये. तर ख्रीस्ताने तत्क्ष-

४१ तेव्हां येशूला करुणा येऊन तो हात पुढें करून त्याला शिवला, व त्याला ह्मणाला, माझी इच्छा आहे, शुद्ध हो.

४२ तो असें बोलतांच (१) त्याचें कोड गेलें व तो शुद्ध झाला.

४३ मग त्यानें त्याला तेव्हांच लावून दिल्हें;

४४ आणि त्याला निक्षून सांगितलें कीं, संभाळ, कोणाला कांहीं सांगूं नको, तर जा, आपणास याजकाला दाखीव, आणि त्यास साक्ष (२) पटावी ह्मणून मोश्याने जें नेमिलें तें (३) आपल्या शुद्धीविषयीं अर्पण कर.

४५ तथापि तो निघाल्यावर ती गोष्ट फार गाजवूं व हाकाटूं लागला, (४) यामुळें त्याच्याने प्रगटपणें नगरामध्यें फिरून जाववलें नाहीं, तर तो बाहेर रानांतल्या जाग्यांत राहिला, मग ते चहूंकडून त्याजकडे आले. (५)

---

(१) गीतें. ३३:९. योह. १५:३. (२) रोम. १५:४. १ करिंथ. १०:११. (३) ले. १४:२—३२. (४) गीतें. ७७:११,१२. निर्ग. १:१०. (५) मात्थ. २:१३.

---

णीं आपल्या इच्छेनें व सामर्थ्यानें त्याला बरें केलें, आणि तो शुद्ध झाला आहे हें दाखवावें ह्मणून तो बोलतांच त्याला शिवला, असें सिद्ध होतें. "माझी इच्छा आहे." येशूच्या ठायीं ईश्वरी सामर्थ्य होतें याविषयीं हें उघड प्रमाण आहे. ईश्वरच असा चमत्कार करूं शकतो. येशूनें हा चमत्कार आपल्याच इच्छेनें व शक्तीनें केला, तर तो ईश्वर असावा.

४४. त्या शुद्ध झालेल्या माणसानें याजकाकडे जाऊन नेमशास्त्राप्रमाणें अर्पण करावें ह्मणून येशूनें त्याला लागलेंच लावून दिल्हें. याप्रमाणें नेमशास्त्र पूर्ण करावें हें योग्य होतें. अणखी याजकानें पाहून हा वास्तवीक शुद्ध झाला आहे असी साक्ष घ्यावी हेंही बरें होतें. परंतु या शुद्ध झालेल्यानें लोकांस सांगून मला नावाजावें असी ख्रीस्ताची इच्छा नव्हती.

४५. "ती गोष्ट... हाकाटूं लागला." तो माणूस फार हर्ष व आश्चर्य करून ती गोष्ट हाकाटूं लागला. त्यावरून बहुत लोक ख्रीस्ताच्या मागें चालूं लागले असें कीं लोकांच्या दाटीमुळें अथवा अधिकाऱ्यांच्या द्वेषामुळें त्याला त्या शहरांत राहण्याची सोई होईना. ख्रीस्ताला त्या शहरांत जाण्याची अथवा राहण्याची शक्ति नव्हती असें समजायाचें नाहीं; तर राहिलों आणि चमत्कार करून पराक्रम दाखवीत गेलों ह्मणजे लोक मला धरून

## अध्याय २.

नंतर कांहीं दिवसानी तो फिरून कपरणाहूमांत गेला, आणि तो घरीं आहे असें ऐकण्यांत आलें.

२ तेव्हांच असे बहुत मिळाले कीं, दारापुढें देखील मावतना, तेव्हां त्याने त्यांस वचन (१) सांगितलें.

३ मग चौघानी उचललेला असा वातरोगी (२) त्याकडे लोक घेऊन आले.

४ आणि दाटीमुळें त्याजवळ त्यांच्याने जाववेना, ह्मणून तो होता तेथील छावणी त्यानी काढिली, आणि ती उस्तरल्यावर ज्या बाजेवर तो वातरोगी निजला होता ती त्यानी खालीं सोडली.

५ तेव्हां येशू त्यांचा विश्वास (३) पाहून वातरोग्याला ह्मणाला, मुला तुझ्या पापांची क्षमा झाली आहे.

६ तेव्हां शास्त्र्यांतील कित्येक तेथें बसले होते, ते आपल्या अंतःकरणांमध्यें असा विचार करीत होते कीं,

७ हा या प्रकारें दुर्भाषणें कां करितो? एक जो देव त्यावांचून कोणाच्यानें पापांची क्षमा करवती? (४)

---

(१) गीतें. ४०:९. (२) मात्थ. ९:२. लूक. ५:१८. इ.
(३) प्रेषि. १४:९. एफ. २:८. (४) यश. ४३:२५. दान. ९:९.

---

राज्यगादीवर बसवायास मयत्न करतील. मग अधिकारी अधिक द्वेष करून लवकर मला जिवें मारायास पाहतील असें ख्रीस्तानें जाणलें; आणि असें न व्हावें, ह्मणजे समय पूर्ण झाल्यापूर्वीं मरण न यावें, याकरितां त्याला तें शहर सोडून जाणें प्राप्त झालें.

१. "कपरणाहूमांत." या शहराविषयीं मात्थ. ४:१३ एथें पाहा. ख्रीस्ताने आपली कीर्ति पाहिली नाहीं. तो शहरांत एकटा आला असेल, परंतु लोकांमध्यें त्याने केलेले चमत्कार प्रसिद्ध झाल्यावरून तो आहे असें ऐकतांच ते एकत्र मिळाले.

२. "त्यांस वचन सांगितलें." देवाचें वचन ह्मणजे शुभवर्त्तमान. मनुष्याच्या तारणाविषयीं जें येशूने शिकविलें तें ईश्वरप्रणीत आहे ह्मणून त्याला देवाचें वचन ह्मटलें आहे. प्रेषि. ५:२–७ पाहा.

३—१२. या चमत्काराचें व्याख्यान मात्थ. ९:२-८ एथें पाहा. वात-

८ तेव्हां ते आपल्यांमध्यें असा विचार करीत आहेत, हें येशूनें आपल्या आत्म्यांत तत्काळ जाणून ह्मटलें कीं, तुह्मी आपल्या अंतःकरणांमध्यें असे विचार कां करितां ?

९ तुझ्या पापांची क्षमा झाली आहे, असें वातरोग्याला बोलणें, किंवा ऊठ, आपली खाट उचलून चाल, असें बोलणें, यांतून कोणतें सोपें ?

१० परंतु पृथ्वीवर मनुष्याच्या पुत्राला पापांची क्षमा करायास अधिकार (१) आहे हें तुह्मी जाणावें; तेव्हां तो वातरोग्याला ह्मणाला,

११ मी तुला सांगतों, ऊठ, आपली खाट उचलून घेऊन आपल्या घरीं जा;

१२ मग तो लागलाच उठला, व आपली खाट उचलून सर्वांच्या देखतां निघाला; यावरून सर्व थक्क झाले व देवाला गौरवीत ह्मणाले, आह्मी असें कधीं पाहिलें नाहीं. (२)

१३ नंतर तो निघून पुन्हा समुद्राकडे गेला, तेव्हां सर्व समुदाय त्याच्या जवळ आला व त्यानें त्यांस उपदेश केला.

१४ नंतर (३) त्याने जवळून जातांना अलफीचा पुत्र लेवी याला जकातीच्या नाक्यावर बसलेलें पाहिलें, व त्याला ह्मटलें, माझ्या मागें ये; तेव्हां तो उठून त्याच्या मागें गेला.

(१) प्रेषि. ५:३१. (२) योह. ७:३१. ९:३२. (३) मात्थ. ९:९. लूक. ५:२७.

रोगाविषयीं मात्थ. ४:२४. याची व्याख्या पाहा. त्या लोकांनी छावणी उतरून रोग्याला ख्रीस्ताजवळ पोंहोचतें करण्याकडून मोठा आग्रह व भरवसा दाखविला, आणि हें पाहून येशूने त्याला बरें केलें. "मुला, माया व करुणा दाखविण्यास इब्री, मुला, पुत्रा, बेटा, असें ह्मणत असत. मात्थ. २:१७. पाहा. त्या लोकांनी हा चमत्कार पाहून देवाला गौरवावें हें योग्य होतें. त्यावरून पूर्ण प्रमाण पटलें कीं हा येशू खरा तारणारा आहे; आणि त्यांस पटलें असें केवळ नाहीं तर आह्मासहि पटतें, आणि आह्मीहि देवाला गौरवावें.

१३. "समुद्राकडे गेला." ह्मणजे तिबेरयस समुद्राकडे. मात्थ. ४:१३. याची व्याख्या पाहा.

१४. "अलफीचा पुत्र लेवी." हा मात्थी, शुभवर्त्तमानकर्ता असा होता. मात्थ. ९:९.

१५ नंतर (१) असें झालें कीं तो त्याच्या घरीं जेवायास बसला तेव्हां बहुत जकातदार (२) व पापी हे येशू व त्याचे शिष्य यांबरोबर जेवायास बसले, कारण कीं असले बहुत होते व ते त्याच्या मागें चालले.

१६ तेव्हां शास्त्री व परोशी यानी त्याला जकातदार व पापी यांबरोबर जेवितांना पाहून त्याच्या शिष्यांस झटलें, जकातदार व पापी यांबरोबर हा खातो पितो हें काय ?

१७ तेव्हां येशू तें ऐकून त्यांस ह्मणाला, निरोग्यास (३) वैद्याची गरज नाहीं, तर दुखणाइतांस आहे ; मी पुण्यवंतांस नाहीं, तर पाप्यांस (४) बोलावण्यास आलों.

१८ आणि योहान्नाचे व परोश्यांचे शिष्य उपास करीत असत. तेव्हां कोणी येऊन त्याला ह्मणाले, योहान्नाचे व परोश्यांचे शिष्य उपास करितात आणि तुझे शिष्य उपास कां करीत नाहींत ?

१९ तेव्हां येशूने त्यांस झटलें, वऱ्हाड्यांबरोबर (५) वर आहे तोंपर्यंत त्यांच्याने उपास करवेल काय ? वर बरोबर आहे तोंपर्यंत त्यांच्याने उपास करवत नाहीं.

२० परंतु असे दिवस येतील कीं, वर त्यांपासून काढिला जाईल, तेव्हां (६) ते त्या दिवसांमध्यें उपास करितील.

---

(१) मात्थ. ९:१०. इ. (२) लूक. १५:१–२. (३) मात्थ. ९:१२, १३. लूक. ५:३१, ३२.
(४) मात्थ. १८:११. लूक. १९:१०. १ करिंथ. ६:९–११. तिम. १:१५.
(५) मात्थ. २५:१. (६) प्रेषि. १३:२.

---

१५. "जेवायास बसला." ही जेवणावळ लेवीने ख्रीस्ताच्या सन्मानार्थ केली. लूक. ५:२९ पाहा. "जकातदार व पापी." मूर्त्तिपूजक सरकाराला कर देणें हें नीचत्व असें समजून यहूदी हे जकातदार नीच मोजीत असत. मात्थ. ५:४६ याचें व्याख्यान पाहा. बहुत साधारण लोक ख्रीस्तावर विश्वास ठेवून त्याच्या मागें चालले व खरे शिष्य झाले, शास्त्री व परोशी अभिमानी होऊन नाकारितात इतक्यांत साधारण लोक पापें पदरात घेऊन व भाव ठेवून तारण पावतात.

१६, १७. मात्थ. ९:१२, १३. यावरील व्याख्या पाहा.

१८ "तेव्हां कोणी." ह्मणजे योहान्नाचे शिष्य. मात्थ. ९:१४. पाहा.

१९—२२. मात्थ. ९:१५–१७ याची टीका पाहा.

२१ अणखी कोऱ्या कापडाचें ठिगळ जुन्या वस्त्राला कोणी लावीत नाहीं, लाविलें तर तें नवें ठिगळ जुन्या वस्त्राला फाडितें, मग भोंक मोठें होतें

२२ नवा द्राक्षारस जुन्या बुधल्यांत कोणी घालीत नाहीं, घातला तर नव्या द्राक्षारसानें बुधले फुटतात व द्राक्षारस सांडतो, व बुधलेंही नासतात ; तर नवा द्राक्षारस नव्या बुधल्यांत (१) घातला पाहिजे.

२३ अणखी (२) असें झालें कीं तो शाब्बाथ दिवसीं शेतांमधून जात होता तेव्हां त्याचे शिष्य वाटेनें चालतांना कणसें (३) मोडूं लागले.

२४ मग परोशी त्याला ह्मणाले, पाहा, शाब्बाथ दिवसीं जें करूं नये तें हे कां करितात ?

२५ तेव्हां त्यानें त्यांस ह्मटलें, दावीदाला गरज पडली ह्मणजे त्याला व त्याच्या बरोबरच्यांस भूक लागली, तेव्हां त्यानें काय केलें (४) हें तुह्मी कधीं वाचलें नाहीं काय ?

२६ तो अब्याथार प्रमुख याजकाच्या वेळेस देवाच्या मंदिरांत कसा गेला व पुढें ठेवलेल्या ज्या भाकरी याजकांशिवाय कोणीहि खाऊं नयेत (५) त्या त्यानें कशा खाल्या, व त्या बरोबरच्यांसहि कशा खायास दिल्या ?

---

(१) ईयो. ३२:१९. गीत. ११९:८०,८३. (२) मात्थ. १२:१. इ. लूक. ६:१. इ. (३) अनु. २३:२५. (४) १ शमु. २१:६. (५) निर्ग. २९:३२,३३. ले.२४:९.

---

२३—२८. मात्थ. १२:१–८ याची व्याख्या पाहा. येशू ख्रीस्त सृष्टीचा धनी होता तरी त्यानें आपल्या शिष्यांस द्रव्य दिल्हें नाहीं. त्यानें त्यांस उद्योग करून उदरनिर्वाह करूं दिल्हें, आणि भूक लागली तेव्हां गरीब लोकांस नेमशास्त्रांत सांगितल्याप्रमाणें त्यांस जित्राबांतलीं कणसें खुडून खाऊं दिल्हें; अनु. २३:२५.

२४. "जें करूं नये." कणसें मोडावीं परंतु शाब्बाथ दिवसीं मोडूं नये असें मत धरून परोशी दोष ठेवूं लागले. तेव्हां ख्रीस्तानें त्यांच्या शास्त्रांतून वाक्यें काढून प्रमाण पटविलें कीं शाब्बाथांत असें करणें योग्य आहे.

२६. "तो अब्याथार." दाविदानें हें केलें त्या वेळेस अहिमेलेख याजक होता; १. शमु. २१:१ पाहा; परंतु अब्याथार अहिमेलेखाचा पुत्र होता

२७ अणखी तो त्यांस ह्मणाला, शाब्बाथ मनुष्यासाठीं (१) झाला, मनुष्य शाब्बाथासाठीं (२) झाला नाहीं ;
२८ यास्तव (३) मनुष्याचा पुत्र शाब्बाथाचाहि धनी आहे.

## अध्याय ३.

अणखी (४) तो पुन्हा सभास्थानांत गेला, तेव्हां तेथें एक हात वाळलेला असा माणूस होता.
२ मग त्यावर दोष ठेवावा ह्मणून शाब्बाथ दिवसीं तो त्याला बरें करील कीं काय, हें पाहायास ते टपत राहिले. (५)
३ तेव्हां त्याने हात वाळलेल्या माणसाला, मध्यें उभा राहा, असें सांगितलें.

---

(१) नहे. ९:१४. यश. ५८:१३. यहेज्क. २०:१२,२०. (२) कल. २:१६.
(३) योह. ९:१४. एफ. १:२२. प्रग. १:१०. (४) मात्थ. १२:९. इ. लूक. ६:६.
(५) लूक. १४:१.

---

आणि नंतर प्रमुख याजक असून दाविदाच्या कारकिर्दींत मख्यात झाला ह्मणून मार्कसाने अब्याथाराचें नाम लिहिलें.

२७. "शाब्बाथ मनुष्यांसाठीं झाला." मनुष्य आदीं उत्पन्न झाला, मग त्याच्या कल्याणअर्थी देवाने शाब्बाथ नेमला. मनुष्याने संसारांतलें काम व चिंता यांपासून विसावा घेऊन ईश्वराची भक्ति करावी ह्मणून हा शाब्बाथ दिवस पवित्र करून नेमला होता. आणि कोणतेंहि संस्थापन यापेक्षां मनुष्यांच्या उपयोगीं पडलें नाहीं असें दिसतें. सर्वांनी हा दिवस पवित्र पाळावा ह्मणून ईश्वराने चवथी आज्ञा लावून दिल्ही. जे ही आज्ञा मोडून शाब्बाथ दिवस पाळीत नाहींत ते वारंवार बाकीच्या सर्व आज्ञांविषयीं निष्काळजी होऊन स्वच्छंदानें चालून आपलें अनहित करून घेतात. परंतु जे शाब्बाथ बरोबर पाळितात ते देवाच्या सर्व आज्ञा पाळायास पाहतात आणि नीतीने चालून सर्व सद्गुणांत वाढतात. ते देवावर प्रीति करून देवाची भक्ति नेमाने करितात, आणि एकमेकांचें हित पाहून आपलेंहि कल्याण करून घेतात. जे हा दिवस पवित्र पाळून देवाच्या सेवेंत बरोबर घालितात ते अनंतकाळीं देवाची सेवा व भक्ति करण्यांत व सौख्य लोकाचा विश्राम भोगण्यास सिद्ध होतील.

२८. "मात्थ." १२:८ याची टीका पाहा.

१-५. याचें व्याख्यान मात्थ. १२:९-१३ एथें पाहा.

४ मग त्याने त्यांस ह्मटलें, शाब्बाथ दिवशीं चांगलें करणें किंवा वाईट करणें, जिवाला राखणें (१) किंवा मारणें, कोणतें योग्य बरें? तेव्हां ते उगेच राहिले.

५ मग त्याने त्यांच्या अंतःकरणाच्या कठीणपणावरून खिन्न होऊन त्या सर्वांकडे रागाने पाहून त्या माणसाला सांगितलें कीं, आपला हात लांब कर; तेव्हां तो लांब करतांच त्याचा हात दुसऱ्यासारिखा बरा झाला.

६ मग परोश्यांनीं लागलेंच बाहेर जाऊन त्याचा घात कसा करावा याविषयीं हेरोदी (२) यांसंगतीं त्याविरुद्ध मसलत केली.

७ मग येशू आपल्या शिष्यांबरोबर निघून समुद्राकडे गेला;

---

(१) हो. ६:६. (२) मात्थ. २२:१६.

---

४. "किंवा वाईट करणें." इ. चांगलें करण्याचा प्रसंग असल्यास चांगलें न करणें ह्मणजे वाईट करणें आहे, आणि कोणी एकाला वांचविण्याचा प्रसंग असल्यास त्याला न वांचवावें हें त्याला मारणें, असें यहूदी मोजीत असत, आणि असें मोजणें योग्य आहे. याप्रमाणें कोणतेंहि चांगलें काम करण्याची संधि असल्यास तें करणें भाग आहे, नाहीं तर दोष होईल. ईश्वर शेवटीं दुष्टांस त्यांनी जें करावयाचें होतें पण केलें नाहीं त्यावरून दंडीं ठरवील. मात्थ. २५:४५.

५. "रागाने पाहून." या रागांत अकस नव्हे, तर दुःख व खेद हीं विशेष होतीं. दुष्टांवर सर्व दिवस देवाला राग येतो. तो दुष्टांचा द्वेष करून त्यांचें वाईट पाहतो असें नाहीं, तर त्यांच्या दुष्ट वासनांचा द्वेष करितो, कारण कीं दुष्टांचा नाश व्हावा, असें नाहीं, तर त्यांनी फिरावें, व तारण पावावें असी देवाची इच्छा आहे. यहेज्क. १८:३२.३३:११.

६. "हेरोदी." मात्थ. २२:१६ याची टीका पाहा. हे हेरोदी आणि परोशी यांमध्यें परस्परें वैर होतें, तथापि परोश्यांनी ख्रिस्ताचा इतका द्वेष केला कीं त्याचा घात करायास ते आपल्या शत्रूंशीं मिळून एकोपा करण्यास तयार होते. येशू ख्रिस्त पवित्र होता, आणि त्याने त्यांचा लोभ, ढोंग इत्यादि दुर्गुण निषेधले आणि साधारण लोकांचीं अंतःकरणें आपल्याकडे ओढून घेतलीं ह्मणून परोश्यांनीं त्याचा द्वेष करून त्याला वधण्याचा निश्चय केला.

७. "समुद्राकडे." ह्मणजे गालीलाच्या समुद्राकडे. मार्क. १:१४ यावरील व्याख्या पाहा.

८ तेव्हां गालील व यहुदा व यरूशालेम व अदोम व यार्देनेच्या पलिकडचा प्रांत यांतून मोठा मेळा (१) येऊन त्याच्या मागें चालला; आणि सोर व सीदोन यांकडला मोठा मेळा त्याने जें जें केलें तें ऐकून त्याकडे आला.

९ तेव्हां आपण चेंगरूं नये, ह्मणून त्याने लोकांच्या दाटीमुळें आपल्यासाठीं एक मचवा तयार करून ठेवायाला आपल्या शिष्यांस सांगितलें.

१० कारण कीं त्याने बहुतांस बरें केलें, (२) यामुळें जितके पिडलेले होते तितके त्याला शिवावयास त्याच्या अंगावर पडूं लागले.

११ आणि जेव्हां (३) अशुद्ध आत्म्यानी त्याला पाहिलें तेव्हां ते त्याच्या पुढें पडले व ओरडत बोलले कीं, तूं देवाचा पुत्र आहेस.

१२ तेव्हां आपल्याला त्यानी प्रगट करूं (४) नये ह्मणून त्याने त्यांस निक्षूण सांगितलें.

---

(१) लूक. ६:१७. (२) मात्थ. १२:१५. १४:१४.
(३) मार्क. १:२४. लूक. ४:४१. याक. २:१९. (४) मार्क. १:२५,३४.

---

८. "गालील व यहूदा." मात्थ २:१,२२ पाहा. "यरूशलेम." लोक चहूंकडल्या प्रांतांतून आले असें केवळ नाहीं, त्यांची शोभायमान राजधानीपासूनहि आले. "अदोम." हें नांव आदीं एसावाला दिल्हें होतें, (उत्प. २५:३०.) मग ज्या प्रांतांत एसाव वसला त्यालाहि हें नांव दिल्हें होतें, तो प्रांत कनानाच्या दक्षिणेस आहे. त्या प्रांतांत ख्रीस्ताची कीर्ति आली आणि अदोमीहि त्याकडे आले. "यार्देनेच्या पलीकडचा." ह्मणजे यार्देनेच्या पूर्वेकडचा "सोर व सीदोन" मात्थ. ११:२१. याबर पाहा.

९. "आपण चेंगरूं नये." त्याने बहुतेकांस बरें केलें होतें ह्मणून जे अद्यापि रोगी होते ते फार दाटीने आले. हा मचवा शिष्यांचा असेल, आणि त्यावर बसून लोकांस उपदेश करण्याची चांगली सोई झाली.

१०. "अंगावर पडूं लागले." त्यांस वाटलें कीं ख्रीस्ताच्या अंगास शिवल्याने त्यांतून कांहीं सत्व येऊन आह्मास बरें करील.

११,१२. "अशुद्ध आत्म्यानी." यानी ख्रीस्ताला ओळखिलें ह्मणून त्यांस मनुष्यापेक्षां अधिक ज्ञान होतें असें सिद्ध आहे.* ते ख्रीस्ताच्या ताब्यांत असतात, कारण त्याच्या हुकुमावरून ते पिडलेल्या माणसांतून निघत असत.

---

* तर दुष्ट आत्मे आहेत, आणि दुष्टास लागतात हेंहि सिद्ध आहे.

१३ अणखी (१) तो डोंगरावर चढला तेव्हां त्याला जे बरे वाटले
(२) त्यांस त्याने बोलाविलें; तेव्हां ते त्याजकडे आले.
१४ मग त्याने बारा जणांस नेमिलें; यासाठीं कीं त्यानी आप-
ल्या बरोबर असावें व आपण त्यांस गाजवायास पाठवावें,
१५ आणि रोग बरे करण्याचा व भुतें काढण्याचा अधिकार त्यांस
असावा.
१६ तेव्हां त्याने शिमोन (३) याला पेत्रस हें उपनाम दिल्हें;
१७ आणि जबदीचा पुत्र याकोब व याकोबाचा भाऊ योहान्न
यांस बवानर्गेस (४) ह्मणजे गर्जण्याचे पुत्र हें उपनाम दिल्हें;
१८ आणि अंद्रयास व फिलिप्पस व बार्थलमी व मात्थी व थोमा
व अलफीचा पुत्र याकोब व थाही व शिमोन कनानी,
१९ व त्याला पराधीन करणारा यहूदा इस्कारयोते, अशीं त्यांचीं
नांवें होतीं.
२० नंतर ते कोणीएका घरांत आले, तेव्हां पुन्हा असा समुदाय
जमला कीं भाकर खायासहि त्यास फावेना. (५)

---

(१) मात्थ. १०:१. (२) योह. १५:१६. (३) योह. १:४२.
(४) यश. ५८:१. इर्म. २३:२९. (५) मार्क. ६:३१.

---

१३–१९. शिष्यांच्या नेमणुकीविषयीं मात्थ. १०:१–४ यावरील व्याख्या पाहा.

१७. "बवानर्गेस." हें नांव कशावरून त्या शिष्यांस दिल्हें होतें हें कळविलें नाहीं. कदाचित मोठा आवेश व आग्रह दाखवून आणि तीव्र वक्तृत्व करून त्यानी उपदेश केला असेल.

२०. "भाकर खायासहि त्यांस फावेना." उद्योग करणें, संसार योग्य रीतीने चालविणें हें ख्रीस्ती धर्मावरून मना केलें नाहीं. उलटया प्रकारें जो कोणी उद्योग करणार नाहीं त्याने खाऊं नये असें शास्त्रांत सांगितलें आहे. असें असतांहि आपल्या आणि इतर माणसांच्या जीवात्म्यांचें तारण साधून घ्यावें हें दुसऱ्या सर्व कामांपेक्षां विशेष आणि अगत्याचें आहे. तर प्रसंग पाहून देवाच्या सेवेंत आणि धर्मांतल्या कामांत अगदी निमग्न व्हावें हें योग्य आहे.

२१ आणि त्याचे आप्त हें ऐकून त्याला धरायाला निघाले, कारण कीं, तो वेडा झाला (१) असें ते ह्मणूं लागले.

२२ आणि यरुशलेमाहून खालीं आलेले शास्त्री ह्मणूं लागले, बालजबूल (२) त्याला लागला आहे, अणखी तो भुतांच्या अधिकाऱ्यांकडून भुतें काढितो.

२३ तेव्हां तो त्यांस बोलावून दाखले देऊन बोलूं लागला कीं, सैतान सैतानाला कसा काढील ?

२४ आणि एखादें राज्य आंतल्या आंत विभागलें तर त्या राज्याला टिकवत नाहीं.

२५ आणि एखादें घर आंतल्या आंत विभागलें तर त्या घराला टिकवत नाहीं.

२६ आणि सैतान आपणावर उठून विभागला तर त्याच्याने टिकवत नाहीं पण त्याचा शेवट होतो.

२७ बळकट माणसाला पहिल्याने बांधल्याशिवाय त्याच्या घरांत शिरून त्याचे जिन्नस कोणाच्याने लुटवत नाहींत; (३) बांधिला तरच तो त्याचें घर लुटील.

(१) हो. ९:७. योह. १०:२०. (२) मात्थ. ९:३४.१०:२५.१२:२४. लूक. ११:१५. योह. ७:२०.८:४८,५२. (३) यशा.४९:२४,२६.६१:१. मात्थ. १२:२९.

२१. "तो वेडा झाला." ख्रीस्त त्यांमध्यें सुतार असून राहिला होता, तो गरिब व कीर्तिहीन होता; तथापि तो तीस वर्षांचा झाल्यावर एकाएकीं आपला उद्योग सोडून बहुतवेळ एकीकडे रानांत घालवूं लागला, आणि तारणारा जगांत यायाचा तो मी आहें असा हक्क दाखवूं लागला, यावरून तो वेडा झाला, असें त्यांनीं ह्मटलें. त्यानें मोठे चमत्कार करून ईश्वरी शक्ति दाखविली हें पाहिलें असतांहि ते मनावर घेईनात आणि त्यावर विश्वास ठेवीनात. तसें सांप्रतकाळीं आपल्या जीवात्म्यांचें मोल सगळ्या जगापेक्षां मोठें आहे असें मोजून जे आपलें तारण साधून घेण्यासाठीं आईबापें, बहीणभावंडें, घरें, शेतें वगैरे अवघें सोडून ख्रीस्तावर विश्वास ठेवितात ते वेडे आहेत, असें बहुतेक ह्मणतात. परंतु जसा ख्रीस्त वेडा नसून जगापेक्षां शाहाणा होता, तसें जे त्याला अनुसरून सर्वकाळचें जीवन मिळविण्यासाठीं अवघें सोडायास सिद्ध आहेत तेच मात्र वास्तविक शाहाणे आहेत.

२२–३०. मात्थ. १२:२४–३२ यावर टीका पाहा.

२८ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, माणसांच्या पुत्रांच्या सर्व पा-
पांची व (१) जीं जीं दुर्भाषणें ते करितील त्या सर्वांची क्षमा होईल.
२९ परंतु जो कोणी पवित्र आत्म्याविरुद्ध (२) दुर्भाषण करील
त्याची क्षमा कधींहि होत नाहीं, तर तो सर्वकाळच्या दंडास योग्य
ठरतो.

३० त्याला अशुद्ध आत्मा लागला आहे, असें ते ह्मणत होते ह्म-
णून तो असें बोलला.

३१ यावरून त्याची आई व त्याचे भाऊ आले, (३) आणि त्यानी
बाहेर उभें राहून त्याला निरोप पाठवून त्याला बोलाविलें.

३२ तेव्हां त्याभोंवता समुदाय बसला होता; आणि त्यानी त्याला
ह्मटलें, पाहा, तुझी आई व तुझे भाऊ बाहेर तुला भेटायास पाहतात.

३३ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, माझी आई कोण ? व
माझे भाऊ कोण ?

३४ मग तो आपल्या भोंवतालच्या बसणाऱ्यांकडे पाहून ह्मणाला,
पाहा, माझी आई व माझे भाऊ;

३५ कारण कीं जो कोणी देवाच्या इच्छेप्रमाणें करील (४) तोच
माझा भाऊ व माझी बहीण व आई होय.

## अध्याय ४.

पुन्हा तो समुद्राजवळ उपदेश करूं लागला (५) तेव्हां त्यापासीं
मोठा समुदाय मिळाला, ह्मणून तो समुद्रांत तारवावर चढून बसला
व सर्व समुदाय समुद्रकांठीं भूमीवर होता.

२ तेव्हां तो दाखले (६) देऊन त्यांस बहुत उपदेश करूं लागला
व उपदेश करितांना त्यांस ह्मटलें कीं,

---

(१) मात्थ. १२:३१. लूक. १२:१०. (२) इब्री. १०:२९.
(३) मात्थ. १२:४६–४८. लूक. ८:१९–२१. (४) याक. १:२५. १ योह. २:१७.
(५) मात्थ. १३:१. इ. लूक. ८:४. इ. (६) गीतें. ७८:२. मार्क. ४:३४.

---

३१–३५. मात्थ १२:४६–५० यावर पाहा.
१—९. या दाखल्याची व्याख्या मात्थ. १३:१-९ एथें पाहा.

३ ऐका; पाहा, (१) कोणी पेरणारा पेरायास निघाला;

४ आणि असें झालें कीं तो पेरीत असतां कांहीं बीं वाटेवर पडलें, मग आकाशांतील पांखरानीं (२) येऊन तें खाऊन टाकिलें.

५ आणि फारसी माती नव्हती अशा खडकाळीवर (३) कांहीं पडलें, व माती खोल नव्हती ह्मणून तें लवकर उगवलें.

६ परंतु सूर्य उगवल्यावर तें करपलें, व त्याला मूळ नव्हतें (४) यास्तव वाळून गेलें.

७ आणि कांहीं कांटेऱ्या झाडांमध्यें पडलें, (५) मग कांटेऱ्या झाडानीं वाढून त्याला गुदमारिलें, ह्मणून त्याला कांहीं पीक आलें नाहीं.

८ आणि कांहीं चांगल्या भूमींत पडलें (६) तें उगवून व मोठें होऊन पिकास आलें; (७) मग कोठें तीसपट, कोठें साठपट, कोठें शंभरपट असें पीक आलें.

९ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, ज्याला ऐकायास कान आहेत तो ऐको.

१० तो एकांतीं गेला (८) तेव्हां बारांसुद्धां त्याभोंवते जे होते त्यानीं या दाखल्याविषयीं त्याला पुसलें.

११ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, देवाच्या राज्याची गुप्त गोष्ट जाणायास तुह्माला दिल्हें आहे; (९) परंतु बाहेरच्या लोकांस (१०) दाखल्यानीं सर्व होतें;

१२ यासाठीं (११) कीं त्यानी पाहत असतां पाहावें व जाणूं नये, आणि ऐकत असतां ऐकावें व समजूं नये. समजलें तर कदाचित ते फिरतील व त्यांच्या पापांची क्षमा होईल.

---

(१) मार्क. ४:९,२३. ७:१६. (२) उत्प. १५:११. (३) यहेज्क. ११:१९. ३६:२६.
(४) गलि. १:४; याक. १:११. (५) इर्म. ४:३. (६) इब्री ६:७,८.
(७) कल. १:६. (८) मात्थ. १३:१०. इ. (९) एफ. १:९.
(१०) कल. ४:५. १थेस्स. ४:१२. १ तिम. ३:७.
(११) यश. ६:९,१०. ये.ह. १२:४०. प्रेषि. २८:२६,२७. रोम. ११:८.

---

१०–१३. मात्थ १३:१०–१७ यावरील व्याख्या पाहा. "एकांतीं." ह्मणजे समुदायास सोडून एकीकडे गेला. शिष्य व दुसरे कितीएक त्याबरोबर गेले.

१२. जे ऐकायास व समजायास इच्छीत नाहींत त्यांस ईश्वर बळाने

१३ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, हा दाखला तुह्मास समजला नाहीं काय? तर तुह्मी सर्व दाखले कसे समजाल?

१४ पेरणारा (१) वचन पेरितो.

१५ आणि वाटेवर वचन पेरिलें तेथील जे ते हेच आहेत कीं, ऐकतात तेव्हांच सैतान (२) येऊन त्यांच्या अंतःकरणांत पेरलेलें वचन काढून घेतो. (३)

१६ आणि तसेच खडकाळीवर पेरलेले हेच आहेत कीं, वचन ऐकतात तेव्हांच तें आनंदाने घेतात;

१७ तथापि त्यांच्या मध्यें मूळ नाहीं (४) ह्मणून ते क्षणिक आहेत; (५) आणि वचनामुळें संकट किंवा पाठलाग झाला ह्मणजे ते लागलेच (६) अडखळतात.

१८ आणि कांटेऱ्या झाडांमध्यें पेरलेले हेच आहेत कीं, ते वचन ऐकतात,

१९ परंतु या काळाच्या (७) चिंता व द्रव्याची भूल (८) व दुसऱ्या वस्तूंच्या इच्छा (९) शिरून तें वचन गुदमारितात ह्मणून तें निष्फळ होतें (१०)

२० आणि चांगल्या भूमीवर पेरलेले हेच आहेत कीं, ते वचन ऐकतात व अंगीकारितात, व कोणी तीसपट (११) कोणी साठपट कोणी शंभरपट असें पीक देतात.

---

(१) यश. ३२:३०. १ पेत्र. १:२५. (२) १ पेत्र. ५:८. प्रग. ११:२.
(३) इब्री. २:१. (४) इयो. १९:२८. (५) इयो. २७:१०. (६) २ तिम. १:१५.
(७) लूक. १४:१८-२०. १ तिम. ६:९,१७. २ तिम. ४:१०. (८) नी. २३:५.
(९) १ योह. २:१६,१७. (१०) यश. ५:२,४. (११) रोम. ७:४. कल. १:१०. २ पेत्र. १:८.

---

तारीत नाहीं. जे सर्वकाळच्या जीवनाविषयीं खुशीने निष्काळजी व अंधळे होतात त्यांस ईश्वर अंधळे राहूं देतो.

१३. हा दाखला अवघड नाहीं. हा जर समजला नाहीं तर यापेक्षां अवघड ते कसे समजतील, असा ख्रीस्ताचा अभिप्राय आहे. शिष्यांनी उपदेशक होऊन सगळें शुभवर्तमान समजून लोकांस शिकवावें याचें अगत्य होतें.

१४—२०. मात्थ. १३:१८-२३ यावर पाहा.

२१ आणि त्याने त्यांस असें ह्मटलें कीं, मापाखालीं किंवा पलंगाखालीं ठेवावा ह्मणून दिवा आणितात काय? दिवठणीवर ठेवावा ह्मणून कीं नाहीं?

२२ कारण कीं प्रगट होणार नाहीं असें कांहीं गुप्त नाहीं, (१) व उघडें होणार नाहीं असें कांहीं झांकलेलें नाहीं.

२३ ज्या कोणाला ऐकायास कान आहेत तो ऐको.

२४ अणखी त्याने त्यांस ह्मटलें, तुह्मी जें ऐकतां त्याविषयीं जपा; (२) ज्या मापानें तुह्मी मोजून देतां (३) त्याच मापानें तुह्मास मोजून देतील, आणि तुह्मा ऐकणाऱ्यांस अणखी मिळेल;

२५ कारण कीं ज्याजवळ आहे त्याला मिळेल, व ज्याजवळ नाहीं त्याचें जें असेल तें देखील त्यापासून (४) काढून घेतलें जाईल.

२६ आणि त्याने ह्मटलें, देवाचें राज्य (५) असें आहे कीं कोणी माणूस बीं भूमीवर टाकितो;

---

(१) उप. १२:१४. मात्थ. १०:२६. लूक. १२:२. १ करिंथ. ४:५.
(२) १ पेत्र. २:२. (३) मात्थ. ७:२. (४) लूक. ८:१८. (५) मात्थ. १३:२४.

---

२१. प्रकाश पाडावा या हेतूने दिवा लावितात. तसें खरेंपण प्रकाशित करावें ह्मणून दाखले करून मी उपदेश करितों. तुह्मी हे दाखले समजून घ्या, आणि जसा दिवा आपलीं किरणें अंधारमय जगावर पाडितो तसा त्याचा मजकूर दुसऱ्यांस उलगडून सांगावा, हा ख्रीस्ताच्या ह्मणण्याचा अभिप्राय आहे.

२२—२५. ईश्वर सर्व जाणतो आणि गुप्त गोष्टी उघडकीस आणीलच. त्यासमोर हिशोब द्यावा लागेल. तर ऐकण्याची संधि आहे इतक्यांत कान लावून ऐका. जो मन लावून शिकून घेतो तो ज्यास्ती ज्ञान मिळवीत जातो. जो मन लावीत नाहीं त्याला जें मिळालें होतें तें विसरून जातें. हा नेम संपत्ति, ज्ञान, वगैरे सर्वांविषयीं खरा पटतो. यास्तव सुबोध मिळविण्याचा प्रसंग पडला तर संभाळून ऐकला पाहिजे आणि स्वीकारिला पाहिजे, नाहीं तर दोष होईल.

२६. "देवाचें राज्य असें आहे." ह्मणजे शुभवर्त्तमानाचा प्रसर आणि अंतःकरणांतल्या सद्गुणांची वृद्धि यांस पेरलेल्या बियाची उपमा लागती. "हें त्याला ठाऊक नसतें." बीं कसें वाढतें हें अद्यापि कोणी ज्ञानी समजत नाहींत, जमिनीची लागवड केली पाहिजे, आणि पाउसाचें व ऊनाचें अगत्य आहे

२७ मग तो रात्रीं निजतो व दिवसां उठतो, आणि तें बीं कसें उगवतें व वाढतें हें त्याला ठाऊक नसतें.

२८ कारण कीं भूमि आपोआप पीक देती, (१) म्हणजे पहिल्याने (२) अंकूर मग कणीस मग कणसांत भरलेला दाणा.

२९ नंतर पिकल्यावर तो लागलाच (३) विळा घालतो, कारण कीं कापणीची वेळ आली आहे.

---

(१) उत्प. १:११,१२. (२) उप. ३:१,११. (३) प्रग. १४:१५.

---

असें त्यांस समजतें, परंतु यापेक्षां त्यांच्याने समजवत नाहींत. तसेंच धार्मिकपण वाढावें म्हणून पवित्र शास्त्र वाचून नेमाने देवाची प्रार्थना केली पाहिजे, आणि नेमलेले संस्कार पाळिले पाहिजेत हें समजतें; परंतु हीं केल्यावर जसा ईश्वर बीं उगवितो तसा तोच माणसाच्या अंतःकरणांत भक्तिभाव, प्रेम व धार्मिकपण वाढवितो, आणि सर्वकाळच्या जीवनाच्या पिकास प्रफुल्लित आणितो. योह. ३:८. पाहा.

२८. "भूमि आपोआप पीक देती." भूमि सफळ होण्याचे गुण ईश्वराने तिला दिल्हे, आणि या गुणांशिवाय ती पीक देत नाहीं. तरी ईश्वराने हे गुण दिल्हे असतां भूमि माणसाच्या शक्तीने नव्हे तर आपोआप म्हणजे देवाने दिल्हेल्या शक्तीने पीक देती. तसेंच धार्मिकपण माणसाच्या शक्तीने नव्हे तर देवाच्या सामर्थ्याने अंतःकरणांत प्रफुल्लित होतें. असें असतांहि जसें पीक मिळविण्यास माणसानी श्रम व मेहनत केली पाहिजे, तसेंच योग्य उपाय केल्याशिवाय कोणी सद्गुणांत वाढणार नाहीं. "पहिल्याने अंकुर, मग" इ. याप्रमाणें धार्मिकपणाचाहि आरंभ व वृद्धि होत चालतात, आणि तें बरोबर वाढून पूर्णतेस यावें म्हणून मोठ्या काळजीने वाळगिलें पाहिजे.

२९. "नंतर पिकल्यावर तो लागलाच" इ. ईश्वर सिद्ध झालेला सुभक्त कधीं कधीं लवकर आपल्याजवळ घेतो, परंतु जगाच्या समाप्तीस कापणीची वेळ येईल. येशू ख्रिस्ताने शुभवर्त्तमानाचें बीं आदीं यहुद्यांत पेरिलें, मग शिष्यांस सोंपून देऊन तो आकाशलोकांत परतला. हें बीं येऊं लागलें आहे, आणि संपूर्ण पृथ्वीवर पसरून रुजेल व पिकास येईल म्हणजे शुभवर्त्तमान सर्वांस कळेल आणि तारण पावणारे ते सर्व अंगिकारितील तेव्हां येशू ख्रिस्त फिरून पवित्र दुतांबरोबर येईल आणि विळा घालून आपले सर्व खरे भक्त गोळा करून सौख्य लोकांत नेईल.

३० अणखी त्याने ह्मटलें, आपण देवाचें राज्य कशासारखें लेखूं? अथवा कोणत्या दाखल्यानें तें दाखवूं ?

३१ तें मोहरीच्या दाण्यासारिखें आहे, (१) तो भूमींत पेरितात, तेव्हां भूमीवरील सर्व दाण्यांमध्यें बारीक असतो.

३२ परंतु पेरल्यावर तो उगवून सर्व भाज्यांमध्यें मोठा होतो, (२) आणि त्याला अशा मोठया फांद्या फुटतात कीं, आकाशांतील पांखरांस त्याच्या सावलींत राहावयास सांपडतें.

३३ आणि असले बहुत दाखले देऊन जसें त्यांच्याने ऐकवलें (३) तसें त्याने त्यांस वचन सांगितलें.

३४ आणि दाखल्यावांचून तो त्यांसीं बोलला नाहीं, परंतु एकांतीं त्याने आपल्या शिष्यांस सर्व गोष्टी फोडून सांगितल्या.

---

(१) मात्थ. १३: ३१,३२. लूक. १३:१८,१९.
(२) नी. ४:१८. यश. ११:९. दान. २:४४. मला. १: ११. (३) योह. १६:१२.

---

३०. "कशासारिखें लेखूं." येशू आपल्या ऐकणाऱ्यांस समजेल असा बोध घ्यावा ह्मणून इच्छा दाखवीत असे याविषयीं सर्व उपदेशकांनी त्यासारिखें असावें. लोकांनी बरोबर समजावें व त्यांच्या मनांत बोध ठसावा ह्मणून उपदेशकांनी सवघड, साधे व ठसण्याजोगे दाखले, शब्द, व गोष्टी सांगाव्या. त्यांनी या कामांत यश पावावें ह्मणून (१.) सगळा डामडौल व अभिमान टाकून लोकांची खातरी करून द्यावी व त्यांच्या जीवात्म्यांचें तारण साधून घ्यावें ह्याच हेतूने त्याने उपदेश केला पाहिजे. (२.) त्याला चांगली अक्कल पाहिजे. उपदेश लोकांच्या मनांत ठसल्यावरून हर्ष असावा. (३.) लोकांचा सहवास करून त्यांच्या बोलण्याचालण्याची रीत समजून घेतली पाहिजे. (४.) त्याने बरेंच सुशिक्षित असावें. जो शिकलेला नाहीं तो इतरांस शिकविण्यास योग्य नाहीं. "देवाचें राज्य." याविषयीं मात्थ. ३:२ पाहा.

३१,३२. मात्थ. १३:३१,३२ यांवर पाहा.

३३. "त्यांच्यानें ऐकवलें." ते लेंकरांसारिखे होते ह्मणून त्यांस हळू शिकविणें येशूला प्राप्त झालें.

३४. "दाखल्यावांचून. .बोलला नाहीं." ह्मणजे आपल्या राज्याविषयीं बोलला नाहीं. त्यांचा मताभिमान, अज्ञान व भ्रांति पाहून ख्रीस्ताने बोधार्थ दाखल्यांनी त्यांस शिकवायास पाहिलें

३५ आणि त्याच दिवशीं संध्याकाळ झाला तेव्हां तो त्यांस ह्मणा-
ला, आपण पलिकडे जाऊं.
३६ तेव्हां ते समुदायाला निरोप देऊन तो तारवावर होता तसाच
त्याला घेऊन गेले, व त्याच्या बरोबर दुसरे कांहीं मचवे होते.
३७ नंतर (१) मोठें वादळ झालें व लाटा तारवावर अशा उस-
ळल्या कीं, तें भरूं लागलें.
३८ आणि तो वरामांत उशी घेऊन निजला होता; तेव्हां ते
त्याला उठवून ह्मणाले, हे गुरू, (२) आह्मी बुडतों, याची तुला चिंता
नाहीं काय ?
३९ तेव्हां त्याने उठून वाऱ्याला धमकाविलें व समुद्राला सांगितलें
कीं, उगाच राहा, शांत हो, मग वारा पडला व फार शांति झाली. (३)
४० नंतर त्याने त्यांस ह्मटलें, असें कां घाबरलां ? (४) तुह्माला
विश्वास कसा नाहीं ?
४१ तेव्हां ते फार भ्याले (५) व एकमेकांस ह्मणूं लागले, हा
आहे तरी कोण ? कां कीं वारा व समुद्र हे देखील याचें ऐकतात. (६)

## अध्याय ५.

मग (७) ते समुद्राच्या पलिकडे गादारेकरांच्या देशांत गेले.
२ तेव्हां तो तारवांतून उतरतांच अशुद्ध आत्मा लागलेला असा
माणूस थडयांमधून निघून त्याला भेटला.

---

(१) मात्थ. ८:२३. लूक. ८:२२. (२) गीत. १०:१. यश. ४०:२७. विल. ३:८.
(३) गीत. ८९:९. विल. ३:३१,३२. (४) गीत. ४६:१,२. यश.४३:२.
(५) योन.१:१०,१६. (६) ईयो. ३८:११. (७) मात्थ. ८:२८. इ. लूक. ८:२६. इ.

---

३५—४१. मात्थ. ८:१८—२७ यावर पाहा.
३९. "शांत हो." असा शब्द मात्र बोलून लाटा, वारा, वादळ यांस
शांतवावें हा अधिकार व सामर्थ्य केवळ ईश्वरालाच आहे, तर येशू ख्रीस्त
ईश्वर असावा.
१–२०. याचें सविस्तर व्याख्यान मात्थ. ८:२८–३४ एथें पाहा.

३ तो थड्यांमध्यें (१) राहत असे व त्याला सांखळ्यानी देखील कोणाच्याने बांधून आवरवेना.

४ कारण कीं त्याला बहुत वेळां बेड्यानी व सांखळ्यानीं बांधिलें असतां त्याने सांखळ्या व बेड्या तोडून टाकिल्या, ह्मणून कोणाच्याने त्याला वश करवेना.

५ आणि तो नेहमी रात्रंदिवस डोंगरांमध्यें व थड्यांमध्यें ओरडत असे, व आपणाला धोंड्यानी ठेंचून घेत असे.

६ तो तर येशूला दुरून पाहून धावला व त्याला नमला. (२)

७ व मोठ्याने ओरडत बोलला, हे येशू परात्पर देवाच्या पुत्रा, मला तुजसीं काय करायाचें ? त्वां मला पिडूं नये ह्मणून मी तुला देवाची शपथ घालितों.

८ कारण त्याने त्याला ह्मटलें होतें कीं, अरे अशुद्ध आत्म्या, या माणसांतून नीघ. (३)

९ मग त्याने त्याला पुसलें कीं, तुझें नांव काय ? तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, माझें नांव सैन्य, (४) कारण कीं आह्मी पुष्कळ आहों.

१० आणि त्याने त्याला फार विनंती केली कीं, आह्मास या देशांतून घालवूं नको.

११ आणि तेथें डोंगरांकडे डुकरांचा मोठा कळप (५) चरत होता.

१२ तेव्हां त्या सर्व भुतानी त्याला विनंती केली (६) कीं, आह्मी त्या डुकरांमध्यें जावें ह्मणून त्यांकडे आह्मास लावून दे.

---

(१) यश. ६५:४. (२) गीत. ७२:९. (३) प्रेषि. १६:१८. इब्री. २:१४. १ योह. ३:८.
(४) मात्थ. १२:४५. (५) ले. ११:७,८ अनु. १४:८.
(६) ईयो. १:१०,१२, २:५,६.

---

४,५. वेडया माणसाचीं लक्षणें एथें वर्णिलीं आहेत.

६-८. "त्याला नमला." असें करून हा देवाचा खरा अवतार असून आह्मा अशुद्ध आत्म्यांपेक्षा श्रेष्ठ आहे, आणि आह्मी त्याला मान्य असावें असी खातरी आहे ह्मणून त्याने दाखविलें.

९. "सैन्य." मात्थ. ८:२९ यावर पाहा.

१३ मग येशूने तेव्हांच त्यांस जाऊं दिल्हें. (१) आणि ते अशुद्ध आत्मे त्यांतून निघून त्या डुकरांमध्यें गले, मग तो कळप धडक धावत कड्यावरून समुद्रांत पडला, व समुद्रांत गुदमरून मेला ; तीं तर सुमारें दोन हजार होतीं.

१४ मग तीं डुकरें चारणारे पळाले, आणि नगरामध्यें व खेड्यांमध्यें त्यानी वर्त्तमान सांगितलें, तेव्हां काय झालें हें पाहावयास लोक बाहेर आले.

१५ आणि येशूजवळ आल्यावर सैन्य लागलेला भूतग्रस्त बसला व वस्त्र पांघरला व शुद्धीवर आला, (२) असें त्यानी पाहिलें ; तेव्हां ते भ्याले. (३)

१६ मग पाहणाऱ्यानी भूतग्रस्ताचें झालेलें वर्त्तमान व डुकरांचेंहि त्यांस सांगितलें.

१७ तेव्हां ते त्याला विनंती करूं लागले कीं, त्वां आमच्या प्रांतांतून निघून जावें. (४)

१८ मग तो तारवांत बसतांना त्या भूत लागलेल्या माणसानें, म्या आपल्याजवळ असावें, असी त्याला विनंती केली.

१९ परंतु येशूने त्याला येऊं दिल्हें नाहीं, तर त्याला ह्मटलें कीं, तूं घरीं आपल्या माणसांकडे जा, व प्रभूने तुजवर दया करून तुझ्यासाठीं जें जें केलें तें त्यांस सांग. (५)

---

(१) प्रग. १३:७. १ पेत्र. ३:२२. (२) यश. ४२:२५. कल. १:१३.
(३) इंयो. १३:११. गीत. १४:५. २ तिम. १:७. (४) इंयो. २१:१८. लूक. ५:८. प्रेषि. १६:३९. (५) गीत ६६:१६. यश. ३८:१९.

---

१५. "शुद्धीवर आला." या चमत्काराविषयीं संशय धरायाला जागा नव्हता. तो भूतग्रस्त बहुत लोकांच्या ओळखीचा होता. तो कसा वेडा होऊन आपणाला धोंड्यानी ठेंचून घेत असे हें बरेंच माहित होतें. तर एकाएकीं तो शुद्धीवर येऊन शांत आहे असें पाहून लोकांची खातरी झाली कीं हें वाह विक देवाच्या पराक्रमानें झालें. "ते भ्याले." ईश्वर जवळ आहे, आणि हा मोठा पराक्रम तोच दाखवितो असें मनांत आणून व आश्चर्य करून त्यानी भीति धरिली.

१६–१९. त्या माणसानें खीस्ताजवळ राहण्याची इच्छा धरिली याजक-

२० तेव्हां तो निघाला, व आपल्यासाठीं येशूनें जें जें केलें तें दकापलीसांत गाजवूं लागला; आणि सर्वांस आश्चर्य वाटलें.

२१ मग येशू तारवांत बसून पुन्हा पार गेल्यावर त्याजवळ मोठा समुदाय मिळाला, तेव्हां तो समुद्राजवळ होता.

२२ मग पाहा, (१) याइरस नामें सभेचा एक अधिकारी आला व त्याला पाहून त्याच्या पायां पडला.

२३ आणि त्यानें त्याला फार विनंती केली कीं, माझी लहान कन्या मरायास (२) टेंकली आहे, ती बरी व्हावी ह्मणून आपण येऊन तिजवर हात ठेवावे, ह्मणजे ती वांचेल.

२४ मग तो त्याच्या बरोबर गेला; तेव्हां मोठा समुदाय त्याच्या मागें लागला, व त्यानीं त्याला चेंगरलें.

२५ तेव्हां कोणीएका बायकोला बारा वर्षें रक्तस्राव (३) होत होता.

२६ तिनें बहुत वैद्यांच्या हातून फार सोसून, आपलें सर्व खर्चिलें तरी कांहीं गुण न येतां (४) उलटें दुखणें अधिक झालें;

२७ ती येशूविषयीं ऐकून समुदायांत मागें येऊन त्याच्या वस्त्राला शिवली. (५)

(१) मात्थ. ९:१८. इ. लूक. ८:४१. इ. (२) गीत. १०७:१८.
(३) ले. १५:१९. इ. (४) ईयो. १३:४. गीत. १०८:१२. इर्म ३०:१२,१३.
(५) २ राजे. १३:२१. मात्थ. १४:३६. प्रेषि. ५:१५. १९:१२.

न कांहीं आश्चर्य नाहीं. ख्रीस्तानें त्याला आपणाबरोबर येऊं दिल्हें नाहीं, याचें कारण हेंच असेल कीं त्यानें आपल्या घरच्या माणसांत मिळून त्यांमध्यें राहावें आणि त्यांस व त्यांच्या ओळखीच्या सर्वांस प्रमाण पटवावें कीं ख्रीस्ताच्या सामर्थ्यानें हा खरोखर चमत्कार झाला आहे.

२०. "दकापलीसांत." मात्थ. ४:२५ यावर पाहा. "गाजवूं लागला." तसें आतां जेव्हां कोणी पापी पश्चात्ताप करून क्षमा पावतो तेव्हां जें मोठें तारण झालें तें ख्रीस्ताच्या सन्मानार्थीं लोकांस सांगून त्यांसहि सुमार्गावर आणायास प्रयत्न करावें हें योग्य आहे. गीत. ६६:१६.

२२–४३. या दोन्ही चमत्कारांविषयीं मात्थ. ९:१८–२६ यांत पाहा. ह्या बायकोचा रोग दुःसह होता. तो वैद्याकडून हटेना, केवळ वाढला. ति-

२८ कारण तिने ह्मटलें कीं, मी केवळ याच्या वस्त्राला शिवलें
तर बरी होईन.
२९ तेव्हां लागलाच तिच्या रक्ताचा झरा सुकून गेला, व तिला
शरिरांत असा अनुभव आला कीं, पिडा जाऊन मी बरी झालें.
३० मग येशू आपल्यांतून सत्व (१) निघालें आहे हें तेव्हांच म-
नांत जाणून, समुदायामध्यें मुरडून बोलला कीं, माझ्या वस्त्रास कोण
शिवला ?
३१ तेव्हां त्याचे शिष्य त्याला ह्मणाले, समुदाय तुला चेंगरतो हें
तूं पाहतोस, व मला कोण शिवला हें कसें ह्मणतोस ?
३२ मग जिने हें केलें होतें तिला पाहायास तो सभोंवता पाहूं
लागला.
३३ तेव्हां ती बायको आपल्या अंगांत जें झालें तें जाणून भीत
व कांपत त्याकडे आली, व त्याच्या पुढें पडली व तिने त्याला सर्व
गोष्ट खरी सांगितली. (२)
३४ मग त्याने तिला ह्मटलें, अगे मुली, तुझ्या विश्वासाने (३)
तुला तारिलें, सुखरूप जा, (४) व तुझी पिडा जाऊन बरी ऐस.
३५ तो बोलत आहे इतक्यांत सभेच्या अधिकाऱ्याच्या एथून को-
णी येऊन सांगितलें कीं, तुझी कन्या मेली, (५) गुरूला अणखी श्र-
म कां देतोस?

(१) लूक. ६:१९. (२) गीत. ३०:२. (३) मार्क. १०:५२. प्रेषि. १४:९.
(४) १ शमु. १:१७. २०:४२. (५) योह. ५:२५. ११:२५.

ने ख्रीस्ताविषयीं ऐकलें होतें आणि तेव्हांच त्यावर विश्वास ठेवून ती त्याला शिवून बरी झाली. बहुत लोक ख्रीस्ताला शिवले परंतु तिलाच गुण आला, हें तर तिच्या विश्वासानें झालें. हा चमत्कार लोकांस कळावा आणि त्या बायकोच्या बोलण्यावरून त्यांस पूर्ण समज पडावा ह्मणून ख्रीस्ताने विचारिलें कीं माझ्या वस्त्रांस कोण शिवला. त्याने सर्व जाणलें व तिला बरें केलें होतें, पण लोकांस कळावें ह्मणून विचारिलें. ख्रीस्त चमत्कार करून आपली कीर्ति पाहत नसे आणि कधीं कधीं बरे झालेल्यांस, कोणाला सांगूं नका, असी ताकीद करीत असे. परंतु याईरसाचा विश्वास अधिक दृढ करावा यासाठीं अथवा दुसऱ्या कारणासाठीं हा चमत्कार कळावा असी त्याची मर्जी होती.
३५,३६. ख्रीस्त मेलेल्यांस उठवून जिवंत करायास समर्थ आहे हें लो-

३६ तेव्हां येशू तें सांगितलेलें वर्तमान ऐकून तेव्हांच सभेच्या अधिकाऱ्याला ह्मणाला, भिऊं नको, विश्वास मात्र धर. (१)

३७ नंतर पेत्रस व याकोब व याकोबाचा भाऊ योहान्न यांशिवाय (२) त्याने आपल्या बरोबर कोणाला येऊं दिल्हें नाहीं.

३८ मग सभेच्या अधिकाऱ्याच्या घरीं आल्यावर त्याने गलबला ह्मणजे अतिशय रडणारे व आक्रांत करणारे यांस पाहिलें,

३९ मग आंत जाऊन तो त्यांस ह्मणाला, तुह्मी कशाला गलबला करितां व रडतां? मूल मेली नाहीं, झोंपेंत आहे. (३)

४० तेव्हां ते त्याला हांसले. मग तो त्या सर्वांस बाहेर घालवून मुलीचा बाप व आई व आपल्या बरोबरचे यांस घेऊन, मूल पडली होती तेथें आंत गेला.

४१ आणि मुलीचा हात धरून तिला ह्मणाला, टालीथा कूमी, ह्मणजे मी तुला सांगतों, मुली, ऊठ. (४)

४२ तेव्हांच ती मुलगी उठून चालूं लागली, कां कीं ती बारा वर्षांची होती; तेव्हा ते अतिशय विस्मय पावले.

४३ मग कोणाला हें कळूं नये असी त्याने त्यांस निक्षूण आज्ञा केली (५) व तिला खायास द्यावें ह्मणून सांगितलें.

---

(१) २ काल. २०:२०. योह. ११:४०. (२) मार्क. ९:२. १४:३३.
(३) योह. ११:११–१३. (४) प्रेषि. ९:४०.
(५) मात्य. ८:४. १२:१६– १८. मार्क. ३:१२. लूक. ५:१४.

---

कांस अद्यापि समजलें नव्हतें असें दिसतें. भिऊं नये विश्वास मात्र धरिला पाहिजे असें ख्रीस्ताने त्यांस सांगून आपलें सामर्थ्य दाखविलें.

४१. "तालीथा कूमी." हे सैरोखाल्डी भाषेंतले शब्द होते. ख्रीस्त ही भाषा बोलत असे. त्याचा अर्थ––मुली ऊठ, असा होतो.

४३. 'तिला खायास द्यावें." ख्रीस्ताने साधारण उपाय करून तिला सशक्त केलें. आणि तिन खाऊन प्रमाण पटलें कीं ती वास्तविक सजीव आहे. याप्रमाणें ख्रीस्ताने आपल्या शिष्यांबरोबर जेवून आपण मेलेल्यांतून उठलों आहें असें सिद्ध केलें.

## अध्याय ६.

नंतर तो तेथून निघाला व आपल्या देशांत आला, व त्याचे शिष्य त्याच्या मागें गेले.

२ मग शाब्बाथ दिवस आल्यावर (१) तो सभास्थानांत उपदेश करूं लागला, तेव्हां पुष्कळ लोक ऐकून थक्क होऊन बोलले, याला हें सर्व कोठून? (२) केवढें ज्ञान याला मिळालें आहे कीं याच्या हातून असे चमत्कार होतात?

३ जो सुतार मारयेचा पुत्र आणि याकोब व योसे व यहूदा व शिमोन यांचा भाऊ तो हाच नव्हेना? (३) आणि याच्या बहिणी आपल्या बरोबर नाहींत ना? असे ते त्याजविषयीं अडखळले. (४)

४ तेव्हां येशू त्यांस ह्मणाला, (५) भविष्यवादी आपला देश व नातलग व आपलें घर यामध्यें मात्र सन्मान पावत नाहीं.

५ आणि त्याने थोडक्या रोग्यांवर आपले हात ठेवून त्यांस बरें केलें याशिवाय दुसरा चमत्कार त्याच्याने तेथें करवला नाहीं. (६)

६ आणि त्याने त्यांच्या अविश्वासामुळें आश्चर्य केलें. (७) मग तो भोंवतालच्या गांवांमध्यें उपदेश करीत फिरला. (८)

७ अणखी तो त्या बारा जणांस बोलावून (९) दोघे दोघे असे त्यांस पाठवूं लागला. तेव्हां त्याने त्यांस अशुद्ध आत्म्यांवरची सत्ता दिल्ही.

८ आणि त्यांस आज्ञा केली कीं, वाटेसाठीं काठीवांचून दुसरें कांहीं घेऊं नका, झोळणा किंवा भाकर किंवा कंबरकशांत खुर्दा घेऊं नका;

---

(१) मात्थ. १३:५४ इ. लूक ४:१६. इ. (२) योह. ६:४२. (३) गल १:१९.
(४) मात्थ. ११:६. (५) मात्थ. १३:५७. योह. ४:४४.
(६) उत्प. १९:२२. मार्क. ९:२३ (७) यश. ५९:१६. इर्म. २:११.
(८) मात्थ. ९:३५. लूक. १३:२२. प्रेषि. १०:३८.
(९) मात्थ. १०:१. इ. मार्क. ३:१३. इ. लूक. ९:१. इ. १०:३. इ.

---

१-६. याविषयीं मात्थ. १३:५४-५८ यांवर पाहा.

७. "दोघे दोघे." एकमेकांस साह्य व सोबत व्हावी ह्मणून असें त्यांस पाठविलें.

८-११. याचें व्याख्यान मात्थ. १०:९-१५ एथें पाहा.

९ तर वाहाणा पायांत घाला, (१) व दोन अंगरखे घालूं नका.(२)
१० अणखी त्याने त्यांस असें सांगितलें कीं, तुह्मी कोठेंहि एखाद्या
घरांत जाल त्या ठिकाणांतून निघाल तोंपर्यंत तेथेंच राहा.
११ आणि जे कोणी तुह्माला अंगीकारणार नाहींत व तुमचें ऐ-
कणार नाहींत त्यांविषयीं साक्ष व्हावी ह्मणून तुह्मी तेथून निघतांना
आपल्या पायांची धूळ झाडून टाका. (३) मी तुह्मास खचीत सांगतों
कीं, न्यायाच्या दिवशीं त्या नगरापेक्षां सदोम व गमोरा यांस सोपें पडेल.
१२ मग त्यांनी तेथून जाऊन पश्चात्ताप (४) करावा असें गाजविलें.
१३ आणि त्यांनी पुष्कळ (५) भुतें काढिलीं व वहुत रोग्यांस तेल
(६) लावून बरें केलें.
१४ तेव्हां त्याचें नांव प्रसिद्ध झाल्यामुळें (७) हेरोद राजाने ऐकून
ह्मटलें कीं, बाप्तिस्मा करणारा योहान्न मेलेल्यांमधून उठला आहे
ह्मणून त्याच्या हातून हे चमत्कार घडतात.
१५ दुसरे ह्मणाले, (८) हा एलीया आहे; अणखी दुसरे ह्मणाले,
हा भविष्यवादी किंवा भविष्यवाद्यांतील कोणीएकासारिखा आहे.

---

(१) एफे. ६:१५. (२) प्रेषि. १२:८. (३) नहे. ५:१३. प्रेषि. १३:५१.
(४) लूक. २४:४७. प्रेषि. २:३८. ३:१२. (५) लूक. १०:१७.
(६) याक. ५:१४. (७) मात्थ. १४:१. इ. लूक. ९:७. इ.
(८) मात्थ. १६:१४. मार्क. ८:२८.

---

**१२.** पाप वाईट आहे ह्मणून पाप्यांनी पश्चात्ताप करून त्यापासून वळावें हें सर्वदा योग्य आहे. परंतु येशू ख्रीस्त जगांत आला तेव्हां पापाची सुटका होण्याजोगी झाली ह्मणून सर्व पाप्यांनी पापें पदरांत घेऊन त्याला शरण जावें हें विशेष योग्य होतें.

१३. "भुतें काढिलीं." मात्थ. ४:२४ पाहा. "तेल लावून." इ. रोग्यांस तेल लावण्याची सवई होती. याक. ५:१४. लूक. १०:३४. परंतु ख्रीस्ताने अथवा प्रेषितांनी तेल औषधार्थी लाविलें असें समजायाचें नाहीं. जसें ख्रीस्ताने अधळ्याच्या डोळ्यांस चिखल लाविला तसें हात व तेल खुणेसाठीं लावित असत. असें असतां रोगी ईश्वरी सामर्थ्याने चमत्काराच्या योगाने बरे होत असत.

**१४–२०** याचो व्याख्या मात्थ १४:१–१२ एथें सविस्तर पाहा. "बहुत कामें करीत असे." परंतु जें करायाचें होतें ह्मणजे पापें पदरांत घेऊन सोड-

१६ परंतु हेरोद ऐकून ह्मणाला, ज्या योहान्नाचें शीर म्या तोडलें तोच हा आहे, तो मेलेल्यांमधून उठला आहे.

१७ कारण कीं हेरोदानें आपला भाऊ फिलिप्पस याची बायको हेरोदीयस इजशीं लग्न केलें होतें, इजमुळें त्यानें पाठवून योहान्नाला धरून बंदिशाळेंत बांधून ठेविलें होतें.

१८ कारण योहान्नानें हेरोदाला ह्मटलें होतें कीं, त्वां आपल्या भावाची बायको ठेवावी हें तुला योग्य नाहीं. (१)

१९ त्यामुळें हेरोदियस त्याचा द्वेष बाळगून त्याला जिवें मारायास पाहत होती, परंतु तिचें कांहीं चालेना.

२० कारण कीं योहान्न न्यायी व पवित्र असें जाणून हेरोद त्याचें भय धरी (२) व त्याला संभाळी व त्याचें ऐकून तो बहुत कामें करीत असे व हर्षानें त्याचें ऐकत असे.

२१ मग हेरोदानें आपल्या जन्मदिवसीं (३) आपले प्रधान व सरदार व गालीलांतील मोठमोठे लोक यांस जेवणावळ केली, असा सोईचा दिवस आला.

२२ तेव्हां हेरोदीयसाच्या कन्येनें आंत येऊन नाच केला, आणि हेरोदाला व त्याच्या बरोबर बसणाऱ्यांस संतोषविलें; (४) त्यावरून राजानें त्या मुलगीला ह्मटलें, तुला जें कांहीं पाहिजे (५) तें माझ्या जवळ माग, ह्मणजे मी तुला देईन.

२३ आणि तो तिला शपथ वाहून बोलला कीं, माझ्या अर्ध राज्यपर्यंत जे कांहीं तूं माझ्या जवळ मागसील तें तुला देईन.

---

(१) ले. १८:१६. (२) निर्ग. ११:३. यहेज्क. २:५-७. (३) उत्प. ४०:२०.
(४) यश. ३:१६. (५) एस्तेर. ५:३,६. ७:२.

---

ण्याचें काम तें त्यानें केलें नाहीं. तो कांहीं वेळपर्यंत योहान्नासीं कृपाळूपणानें वागला परंतु पाप करित गेला आणि शेवटीं त्यानें त्याचें शिर छेदिलें. तसें वरचेवर पापी लोक सुवार्तिकांसीं प्रेमानें वागून त्यांचा उपदेश ऐकतात परंतु मनावर घेत नाहींत, आणि पश्चात्ताप न करितां शेवटीं तारण पावत नाहींत. कित्येक बहुत प्रकारें सुधरले असतांहि एक पाप बुध्यां करीत जाऊन उत्तरोत्तर अधिक बिघडतात आणि शेवटीं नाश पावतात.

२४ मग ती बाहेर जाऊन आपल्या आईला ह्मणाली, मी काय मागूं? तेव्हां तिने सांगितलें कीं, बाप्तिस्मा करणाऱ्या योहान्नाच शीर माग.

२५ मग तिने तेव्हांच घाईने आंत राजाकडे येऊन मागितलें कीं, बाप्तिस्मा करणारा योहान्न याचें शीर (१) त्वां तबकांत घालून मला आतांच द्यावें, हें मला पाहिजे.

२६ तेव्हां राजा फार खिन्न झाला, तथापि शपथांमुळें व संगतीं बसणाऱ्यांमुळें तिला त्याच्याने नाहीं ह्मणवेना.

२७ तेव्हां लागेंच राजाने शिपाई पाठवून त्याचें शिर आणायास आज्ञा केली, मग त्याने बंदिशाळेंत जाऊन त्याचें शीर तोडिलें.

२८ आणि तें तबकांत घालून आणून त्या मुलगीला दिल्हें, मग मुलगीने तें आपल्या आईला दिल्हें.

२९ नंतर हें ऐकून त्याचे शिष्य आले (२) व त्यानी त्याचें धड उचलून नेऊन थड्यांत ठेविलें.

३० अणखी प्रेषित येशूजवळ मिळाले (३) आणि जें जें आपण केलें व शिकविलें तें सर्व त्यापासीं सांगितलें.

३१ मग तो त्यांस ह्मणाला, तुह्मी एकीकडे रानांतल्या जाग्यांत चला, व थोडा विसांवा ध्या. कारण कीं तेथें पुष्कळ येत जात होते, त्यावरून त्यांस जेवायास देखील अवकाश मिळेना.

३२ तेव्हां ते तारवांतून एकीकडे रानांतल्या जाग्यांत गेले.

३३ तेव्हां समुदायानी त्यांस निघतां पाहिलें, आणि बहुतानी त्याला ओळखिलें, आणि सर्व नगरांतून ते पायींच तिकडे धावत गेले, व त्याच्या अगोदर पोहंचले व त्याजवळ जमले.

(१) गीत३७:१२,१४. (२) प्रेषि. ८:२. (३) लूक. ९:१०.

३१. "थोडा विसांवा ध्या." त्यानीं उपदेश करितांना श्रम घेतले होते ह्मणून विसांवा पाहिजे असें पाहून ख्रिस्ताने हें सांगितलें.

३२–४४ या चमत्काराची टीका मात्थ १४:१३–२१ एथें पाहा.

३४ नंतर येशूने बाहेर येऊन मोठा समुदाय पाहिला, आणि ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं त्यांसारिखे ते होते, (१) ह्मणून तो त्यांविषयीं कळवळला; आणि तो त्यांस बहुत गोष्टी शिकवूं लागला.

३५ आणि इतक्यांत दिवस फार गेल्यावर (२) त्याचे शिष्य त्याकडे येऊन ह्मणाले, ही रानांतली जागा आहे, व आतां दिवस फार गेला आहे;

३६ त्यांनी भोंवतालच्या खेड्यांमध्यें व गांवांमध्यें जाऊन आपल्याकरितां भाकरी विकत घ्याव्या ह्मणून त्यांस निरोप दे; कारण कीं खायास कांहीं नाहीं.

३७ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुह्मी त्यांस खायास द्या. तेव्हां ते त्याला ह्मणाले, आह्मी जाऊन पांच पन्नास रुपयांच्या (३) भाकरी विकत घेऊन त्यांस खायाला द्याव्या काय?

३८ तेव्हां त्याने त्यांस ह्मटलें, तुह्माजवळ किती भाकरी आहेत? जाऊन पाहा. मग पाहिल्यावर ते ह्मणाले, पांच व दोन मासे.

३९ नंतर त्या सर्वांनी हिरव्या गवतावर पंक्तीपंक्तीने बसावें ह्मणून त्याने त्यांस सांगितलें. (४)

४० तेव्हां ते शंभर शंभर व पन्नास पन्नास असे ओळीओळीने बसले.

४१ मग त्याने त्या पांच भाकरी व ते दोन मासे घेऊन वर आकाशाकडे पाहून आशीर्वाद मागितला, (५) आणि भाकरी मोडून त्यांपुढें वाढायास आपल्या शिष्यांजवळ दिल्ह्या, आणि ते दोन मासेहि त्याने सर्वांस वांटून दिल्हे.

४२ तेव्हां सर्व जेवून तृप्त झाले. (६)

---

(१) १ राजे. २२:१७. (२) मात्थ. १४:१५. इ. लूक. ९:१२. इ. योह. ६:५. इ. (३) गण. ११:१३,२२. २ राजे. ४:४३. (४) मात्थ. १५:३५. मार्क. ८:५. (५) १ शमु. ९:१३. मात्थ. २६:२६. लूक. २४:३०. (६) अनु. ८:३.

---

३४. "ज्या मेंढरांस मेंढपाळ नाहीं." याजक व शास्त्री अभिमानी व दुर्व्यसनी असून लोकांस तुच्छ मानीत असत; आणि या लोकांस शिकविण्यास कोणी नाहीं असें पाहून ख्रीस्त कळवळला आणि त्यांस शिकवूं लागला.

४३ नंतर तुकड्यांनी बारा टोपल्या भरून त्यांनी उचलून नेल्या व मास्यांतलेंहि.

४४ त्या भाकरी खाणारे तर सुमारें पांच हजार पुरुष होते.

४५ तेव्हांच तो समुदायास निरोप देत आहे इतक्यांत त्याने आपल्या शिष्यांस तारवांत बसवून पलिकडे बेथसाइद्यास जायाला पुढें लावून दिल्हें. (१)

४६ मग त्यांस निरोप देऊन तो प्रार्थना करायास डोंगरांत गेला. (२)

४७ आणि रात्र झाल्यावर तें तारूं समुद्राच्या मध्यें होतें, व तो एकटा भूमीवर होता.

४८ तेव्हां त्याने त्यांस वल्हीं मारितां मारितां थकलेलें (३) असें पाहिलें, कारण कीं वारा त्यांस तोंडचा होता; नंतर सुमारें रात्रीच्या चवथ्या प्रहरीं तो समुद्रावर चालून त्यांकडे आला, व त्यांच्या पलिकडे जाणार (४) असें दाखविलें.

४९ ते त्याला समुद्रावर चालतां पाहून (५) भूत आहे असें समजून (६) ओरडूं लागले.

५० कारण कीं ते सर्व त्याला पाहून घाबरले; तेव्हांच तो त्यांशीं बोलूं लागला व त्यांस ह्मणाला, धीर धरा, मी आहें, (७) भिऊं नका.

५१ नंतर तो त्यांजवळ तारवांत बसतांनाच वारा (८) पडला; तेव्हां ते आपल्या मनांत फार थक होऊन आश्चर्य पावले.

५२ कारण भाकरींची गोष्ट त्यांनी ध्यानांत आणिली नाहीं, त्यांचें अंतःकरण कठीण होतें ह्मणून. (९)

---

(१) मात्थ. १४:२२. इ. योह. ६:१७. इ. (२) मात्थ. ६:६. मार्क. १:३५. लूक. ६:१२. (३) यान. १:१३. (४) लूक. २४:२८. (५) ईयो. ९:८.
(६) लूक. २४:३७. (७) यश. ४३:२. (८) गीत. ९३:३,४.
(९) यश. ६३:१७.

---

४५–५६ याविषयीं मात्थ. १४:२२–३६ पाहा.

५२. "ध्यानांत आणिली नाहीं." त्या चमत्कारावरून प्रमाण पटलें होतें कीं येशूच्या ठायीं सर्व सामर्थ्य आहे, आणि ती गोष्ट ध्यानांत राखिली असती तर ह्या नव्या अडचणींत ते त्यावर भरवसा ठेवून भ्याले नसते. जेव्हां भय व दुःख प्राप्त होतात तेव्हां मागली जी देवाची कृपा झाली ती आठवून आह्मी त्यावर भरवसा ठेवीत जावें.

५३ नंतर ते पार जाऊन गेन्नेसारेत देशास पोहंचले (१) व तडी-स लागले.

५४ आणि ते तारवांतून उतरले तेव्हांच लोकानी त्याला ओळ-खिलें.

५५ मग त्या चहूंकडल्या अवघ्या प्रांतांत धावत जाऊन (२) दुखणेकऱ्यांस बाजांवर घालून जेथें तो आहे ह्मणून ते ऐकत तेथें नेऊं लागत.

५६ आणि जेथें जेथें तो गांवांमध्यें किंवा नगरांमध्यें किंवा खेड्यां-मध्यें जाई तेथें ते रोग्यांस चवाठ्यांवर नेऊन ठेवीत, आणि तुझ्या वस्त्राच्या कांठाला आह्मी शिवावें मात्र, (३) असी त्यानी त्याजवळ विनंती केली, आणि जितके त्याला शिवले तितके बरे झाले.

## अध्याय ७.

अणखी (४) परोशी व कित्येक शास्त्री यरूशलेमापासून येऊन त्याजवळ मिळाले.

२ आणि त्यानी त्याच्या शिष्यांतील कित्येकांस अशुद्ध ह्मणजे न धुतलेल्या हातानी भाकरी खातां पाहून दोष ठेविला.

३ कारण कीं परोशी व सर्व यहूदी वडिलांचा सांप्रदाय (५) धरून हात नीट धुतल्यावांचून खात नाहींत.

---

(१) मात्थ. १४:३४. (२) मात्थ. ४:२४. मार्क. २:१–३.
(३) मात्थ. ९:२०. मार्क. ५:२७,२८. प्रेषि. १९:१२. गण. १५:२८,२९.
(४) मात्थ. १५:१, इ. (५) गला. १:१४. कल. २:८,२२,२३.

---

५४. "त्याला ओळखिलें." ख्रीस्ताने पूर्वीं तेथें येऊन चमत्कार केले होते आणि त्या लोकानी त्याची आठवण केली.

५६. त्यानी ख्रीस्ताच्या वस्त्राला शिवून आपला विश्वास दाखविला.

१–२३. या गोष्टीचें व्याख्यान मात्थ. १५:१–२० एथें पाहा. ख्रीस्तावर टपून दोष ठेवावा ह्मणून ते आले असें दिसतें.

३. "सांप्रदाय." हा मोश्याने दिल्हेल्या शास्त्रांतला सांप्रदाय नव्हता, तर केवळ पोकळ दंतकथा असी होती. असले बहुत सांप्रदाय सांप्रतकाळीं चालू आहेत. हिंदु लोक पहिल्याप्रारखे नाहींत तर आलीकडे योजलेले नेम व सांप्रदाय यांप्रमाणें चालतात.

४ आणि चव्हाठ्यांतून आल्यावर ते स्नान केल्यावांचून (१) खात नाहींत, आणि प्याले, घागरी, तांब्याचीं भांडीं, व पलंग यांचें धुणें, व असे बहुत दुसरे नेम त्यानी पाळायास अंगीकारिलें.

५ यावरून परोश्यानी व शास्त्र्यानी त्याला विचारिलें कीं, तुझे शिष्य वडिलांच्या सांप्रदायाप्रमाणें कां चालत नाहींत? आणि हात धुतल्यावांचून भाकर कां खातात?

६ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुह्मा ढोंग्यांविषयीं यशाया-ने (२) भविष्य ठीकच सांगितलें; असें लिहिलें आहे कीं, हे लोक ओंठा-नीं माझा सन्मान करितात, परंतु त्यांचें अंतःकरण मजपासून दूर आहे.

७ आणि ते माणसाच्या आज्ञा शास्त्र ह्मणवून शिकवितांना मला व्यर्थ भजतात.

८ कारण कीं तुह्मी देवाची आज्ञा सोडून (३) मनुष्यांचा सांप्र-दाय धरितां, ह्मणजे घागरी व प्याले यांचें धुणें व यांसारिखीं बहुत दुसरीं कामें करितां.

९ अणखी तो त्यांस ह्मणाला, तुह्मी आपला सांप्रदाय पाळावा ह्मणून देवाची आज्ञा बरीच रद्द करितां.

१० कारण कीं तूं आपल्या आईबापांचा सन्मान कर, (४) आणि जो बापाची किंवा आईची निंदा करितो (५) त्याला ठार मारावें, असें मोश्याने सांगितलें.

---

(१) इयो. ९:३०,३१. (२) यशा. २९:१३.
(३) यशा. १:१२. (४) निर्ग. २०:१२. अनु. ५:१६.
(५) निर्ग. २१:१७. ले. २०:९. नी. २०:२०.

---

४. "चव्हाटयांतून," अथवा बाजारांतून, जेथें कोठें लोक जमत असतात त्यांतून. जसें हात धुण्यास तसें भांडीं वगैरे धुण्यास ते फार जपत असत. सर्व खोटया धर्मांत असले पोकळ रीतिविधि बहुत आहेत, पण अंतःकरण शुद्ध असावें ही मुख्य गोष्ट आहे ह्मणून ख्रीस्ताने शिकविलें. परोशी व शास्त्री यानी देवाने लावून दिल्हेलें शास्त्र रद्द करून माणसांच्या आज्ञा शिकविल्या. तसेंच आजपर्यंत बहुत खोटे उपदेशक शिकवितात.

११ परंतु तुह्मी ह्मणतां, जेणेंकरून तुझें हित मजकडून व्हायाचें तें कुर्बान ( १ ) ह्मणजे अर्पण, असें कोणी माणसानें बापाला किंवा आईला ह्मटलें,

१२ तर तुह्मी त्याला त्याच्या बापासाठीं किंवा त्याच्या आईसाठीं अणखी कांहीं करूं देत नाहीं.

१३ या प्रकारें तुह्मी जो आपला संप्रदाय सांगतां तेणेंकरून देवाचें वचन रद्द करितां, आणि यांसारिखीं बहुत कामें करितां.

१४ तेव्हां त्यानें सर्व समुदायाला बोलावून त्यांस ह्मटलें, तुह्मी अवघे माझें ऐका व समजून घ्या. ( २ )

१५ माणसाच्या आंत गेलें असतां त्याला विटाळवील असें त्याच्या बाहेर कांहीं नाहीं, तर जें त्यांतून निघतें तेंच माणसाला विटाळवितें.

१६ ज्या कोणाला ( ३ ) ऐकायास कान आहेत तो ऐको.

१७ मग तो समुदायापासून ( ४ ) घरांत गेल्यानंतर त्याच्या शिष्यांनी त्याला त्या दाखल्याविषयीं विचारिलें.

१८ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, तुह्मीहि इतके अडाणी आहां काय? जें कांहीं बाहेरून माणसाच्या आंत जातें तेणेंकरून त्याला विटाळ होत नाहीं, हें तुमच्या ध्यानांत येत नाहीं काय ?

१९ कारण कीं तें त्यांच्या अंतःकरणांत जात नाहीं, तर पोटांत जातें ( ५ ) व शौचकुपांत बाहेर पडतें; यावरून सर्व अन्न शुद्ध आहे.

२० अणखी तो ह्मणाला, जें मनुष्यांतून निघतें तेंच मनुष्यास विटाळवितें.

---

(१) मात्थ. १५:९. २३:१८. (२) नी. ८:५. यश. ६:२. प्रेषि. ८:३०.
(३) मात्थ. ११:१५. (४) मात्थ. १५:१५ इ. (५) १ करिंथ. ६:१३.

---

१७. हे वडिलांचे सांप्रदाय पोकळ आणि पाळायाचे नाहींत असें शिष्यांस देखील समजायाला अवघड पडलें, ह्मणून त्यांनी ख्रीस्ताला एकांतीं विचारिलें. तेव्हां त्यानें त्यांस स्पष्ट करून समजाविलें कीं बाहेरल्या गोष्टींकडून विटाळ होत नाहीं. वास्तविक पाहिलें तर इतर लोकांस स्पर्श केल्यानें अथवा त्यांबरोबर पंक्तीस बसून जेवल्यानें अथवा अमुक प्रकारचें अन्न खाल्यानें विटाळ होत नाहीं, तर जें वाईट काम ते करितात तें, आणि जें माणसांतून निघतें म्हणजे वाईट शब्द आणि विचार ते त्याला विटाळवितात.

२१ कारण कीं आंतून (१) ह्मणजे माणसांच्या अंतःकरणांतून
दुष्ट विचार निघतात; व्यभिचार, शिंदळक्या, हत्या,

२२ चोऱ्या, लोभ, मत्सर, कपट, कामातुरपणा, दुष्ट दृष्टि,
दुर्भाषण, गर्व, मूर्खपणा;

२३ या सर्व वाईट गोष्टी आंतून निघतात व माणसाला
विटाळवितात.

२४ मग (२) तो तेथून उठून सोर व सीदोन यांच्या प्रांतांत
गेला; आणि घरांत गेल्यावर कोणास कळूं नये असें त्याच्या मनांत
होतें, (३) परंतु त्याच्याने गुप्त राहवेना;

२५ कारण कीं कोणीएका बायकोच्या लहान कन्येस अशुद्ध
आत्मा लागला होता, ती त्याजविषयीं ऐकून त्याकडे येऊन त्याच्या
पायां पडली.

२६ ती बायको हेल्लासीण व जातीची सुरफैनीकीण होती, आणि
माझ्या कन्येंतून भूत काढावें असी तिने त्याला विनंती केली.

२७ तेव्हां येशू तिला ह्मणाला, पहिल्याने लेंकरांस तृप्त होऊं दे,
कारण कीं लेंकरांची (४) भाकर घेऊन कुत्र्यांस घालणें हें ठीक
नाहीं.

२८ मग तिने त्याला उत्तर दिल्हें कीं, खरें प्रभू, तथापि (५) मे-
जाखालीं कुत्रींहि लेंकरांच्या भाकरीचा चूर खातात.

२९ तेव्हां त्याने तिला ह्मटलें, या बोलण्यामुळें जा, (६)तुझ्या क-
न्येंतून भूत निघालें आहे.

३० मग ती आपल्या घरीं गेल्यावर भूत निघालें (७) व कन्या अंथरु-
णावर निजली आहे, असें तिने पाहिलें.

---

(१) उत्प. ६:५. गीत. १४:१,३. ५३:१,३. इर्म. १७:२.
(२) मात्थ. १५:२१, इ. (३) मार्क. २:१. (४) मात्थ. ७:६. १०:५,६.
(५) रोम. १५:८,९. एफ. २:१२–१४. (६) यश. ६६:२. (७) १ योह. ३:८.

---

२४–३० याचें व्याख्यान मात्थ. १५:२१–२८ एथें पाहा.

२६. "हेल्लासीण" जे यहूदी नव्हते त्या सर्वांस हेल्लासी अथवा हेल्लेणी
असें यहूदी ह्मणत असत.

३१ नंतर तो सोर व सीदोन यांच्या प्रांतांतून माघारा येऊन (१) दकापलिसाच्या प्रांतामधून गालीलाच्या समुद्राकडे गेला.

३२ तेव्हां कोणीएका बहिऱ्या तोतऱ्याला त्याजकडे आणिलें, आणि आपण याजवर हात ठेवावा ह्मणून त्याला विनंती केली.

३३ मग त्याने त्याला समुदायापासून एकीकडे नेऊन आपलीं बोटें त्याच्या कानांत घातलीं,व तो थुंकून (२)त्याच्या जिभेला शिवला.

३४ मग आकाशाकडे वर पाहून (३) तो कण्हला(४) व त्याला ह्मणाला, एफ्फाथा, ह्मणजे मोकळें हो.

३५ तेव्हां त्याचे कान लागलेच मोकळे (५) झाले व त्याच्या जिभेचा बंद सुटला व तो नीट बोलूं लागला.

३६ तेव्हां हें कोणाला कळवूं नका असें त्याने त्यांस निक्षून सांगितलें, परंतु तो यांस जसजसें सांगत होता तसें ते अधिकच गाजवूं लागले.

३७ आणि ते फार थक्क होऊन (६) बोलले कीं, याने सर्व कामें चांगलीं केलीं आहेत, बहिऱ्यांस ऐकणारे व मुक्यांस बोलणार असें तो करितो. (७)

---

(१) मत्थ. १५:२९, इ. (२) मार्क. ८:२३. योह. ९:६. (३) मार्क. ६:४१. योह. ११:४१. १७:१ (४) योह. ११:३३,३८. (५) यश. ३५:५,६. मत्थ. ११:५. (६) गीत. १३९:१४. प्रेषि. १४:११. (७) निर्ग. ४:१०,११.

---

३३. "बोटें कानांत घातलीं." इ. ख्रीस्ताने असें कां केलें हें आमच्याने सांगवत नाहीं. तो कधीं कधीं असली खूण करून रोग्यांस बरें करीत असे मार्क. ८:२३. योह. ९:६.

३४. "आकाशाकडे वर पाहून." प्रार्थनेची स्थिति. गीतें. १२१:१,२. "एफ्फाथा." हा सुरी भाषेतला शब्द आहे. याचा अर्थ मोकळें हो, असा आहे. ख्रीस्ताने खूण लाविली होती तरी शब्द बोलून त्या माणसाचे कान व जीभ मोकळीं केलीं.

३६. "कळवूं नका." मनुष्यांपासून ख्रीस्त मान घेत नसे. याशिवाय परोशी त्याचा जीव घ्यायास टपत होते. आणि असल्या चमत्काराची नावाजणूक झाली तर ते अधिक द्वेष करून मला मारायास झटतील हें ख्रीस्ताला माहित होतें. परंतु आपला जीव देण्याचा समय आला नव्हता ह्मणून त्याने असें सांगितलें.

## अध्याय ८.

त्या दिवसांमध्यें (१) समुदाय फार मोठा होता व त्यांच्या जवळ खायास कांहीं नव्हतें ह्मणून येशू आपल्या शिष्यांस बोलावून त्यांस ह्मणाला,

२ मला समुदायाचा (२) कळवळा येतो, कारण कीं आज तीन दिवस ते माझ्या जवळ राहिले आहेत व त्यांच्या जवळ खायाला कांहीं नाहीं.

३ आणि म्या त्यांस उपाशी घरीं लावून दिलें तर ते वाटेंत कासाविस होतील, कारण कीं त्यांतील कित्येक लांबून आले आहेत.

४ तेव्हां त्याच्या शिष्यानी त्याला उत्तर दिल्हें कीं, यांस एथें रानांत भाकरीनी कोणाच्याने (३) कसें तृप्त करवेल?

५ मग त्याने त्यांस विचारिलें कीं, तुह्माजवळ किती भाकरी आहेत? तेव्हां त्यानी ह्मटलें, सात.

६ नंतर त्याने समुदायाला भूमिवर बसायास सांगितलें, आणि त्याने त्या सात भाकरी घेऊन आशीर्वाद मागितल्यावर मोडिल्या व वाढायाला आपल्या शिष्यांजवळ दिल्ह्या, मग त्यानी समुदायाला वाढिल्या.

७ आणि त्यांजवळ थोडक्या मासोळ्या होत्या, त्याहि त्याने आशीर्वाद मागितल्यावर (४) वाढायास सांगितल्या.

८ तेव्हां ते जेवून तृप्त झाले; (५) नंतर त्यानी (६) उरलेल्या तुकड्यानी सात पांट्या भरून उचलून नेल्या.

९ आणि जेवणारे सुमारें चार हजार होते; मग त्याने त्यांस निरोप दिल्हा.

---

(१) मात्थ १५:३२, इ. (२) गीत. १४५:८,१५. इब्री. ५:२.
(३) मार्क. ६:३६,३७, इ. (४)मात्थ. १४:१९. (५) गीत. १०७:५,६. १४५:१६.
(६) १ राजे. १७:१४–१६. २ राजे. ४:२–७,४२–४४.

---

१–९. या वाक्याचें व्याख्यान मात्थ. १५:३२–३९ एथें पाहा. "चार हजार होते." ह्मणजे बायका व लेंकरें यांशिवाय चार हजार होते.

१० तेव्हांच (१) तो आपल्या शिष्यांसुद्धां तारवांत बसून दाल्मानुथा याच्या प्रांतांत गेला.

११ तेव्हा परोशी (२) जाऊन यांशीं विवाद करूं लागले, व त्यानी त्याजवळ आकाशांतील चमत्कार मागितला; असी त्याची परीक्षा केली.

१२ तेव्हां तो आपल्या अंतःकरणांत कण्हून ह्मणाला, ही पिढी चमत्कार कां मागती? मी तुह्मास खचीत सांगतों कीं, या पिढीला चमत्कार मिळणारच नाहीं.

१३ नंतर तो त्यास सोडून फिरून तारवांत बसून पलिकडे गेला.

१४ तेव्हां ते भाकरी घ्यायास विसरले होते आणि एका भाकरीशिवाय त्यांजवळ तारवांत कांहीं नव्हतें.

१५ मग त्यानें त्यांस निक्षूण सांगितलें कीं, (३) संभाळा, परोश्यांचें खमीर व हेरोदाचें (४) खमीर यांविषयीं जपा.

१६ तेव्हां ते एकमेकांसीं विचार करून ह्मणाले, आह्माजवळ भाकरी नाहींत ह्मणून हा असें बोलतो.

१७ मग येशू हें जाणून त्यांस ह्मणाला, तुह्माजवळ भाकरी नाहींत ह्मणून तुह्मी असा विचार कां करितां? तुह्मी अझून ध्यानांत (५) आणीत नाहीं व समजतांहि नाहीं काय? अझून तुमचें अंतःकरण कठीण (६) आहे काय?

(१) माथ. १५:३९. (२) माथ. १२:३८. १६:१, इ. योह ६:३०.
(३) नी. १९:२७. लूक. १२:१ (४ नि. १२: ०. ले. २:११. १करिंथ. ५:६–८.
(५) मार्क. ६:५२. (६) मार्क. ३:५. १६:१४.

१०. माथ. १५:३९ यावर पाहा.

११–२१. याची टीका माथ. १६:१–१२ एथें पाहा.

१२. "अंतःकरणांत कण्हून." त्यांचें ढोंग व दुष्टाई पाहून तो कण्हला. "चमत्कार मिळणारच नाहीं." ह्मणजे त्यानी मागितला तसा मिळणार नाहीं.

१५. परोशी त्याचा जीव घ्यायास पाहत होते. सादुकी पुनः उठणें वगैरे पवित्र शास्त्रांतील मुख्य सिद्धांत नाकारीत होते. हेरोद हा त्यांस मिळून विरोध करीत होते. या सर्वांचें खमीर ह्मणजे खोटीं मतें यांविषयीं जपायास ख्रीस्तानें सांगितलें.

१८ डोळे असतां (१) तुह्मी पाहत नाहीं काय? आणि कान असतां तुह्मी ऐकत नाहीं काय? आणि आठवीतहि नाहीं काय? (२)

१९ ज्या पांच हजारांसाठीं पांच भाकरी मोडिल्या; (३) तेव्हां तुह्मी तुकड्यांनीं किती टोपल्या भरून उचलून नेल्या? ते त्याला ह्मणाले, बारा.

२० आणि चार हजारांसाठीं सात (४) भाकरी मोडिल्या तेव्हां तुह्मी तुकड्यांनी किती पांट्या भरून उचलून नेल्या? ते ह्मणाले, सात.

२१ नंतर तो त्यांस ह्मणाला, तुह्मी कसें समजत नाहीं!

२२ मग तो बेथसाइद्यास आला, तेव्हां त्याजकडे एका अंधळ्याला आणिलें, व आपण त्याला शिवावें (५) असी त्याजवळ विनंती केली.

२३ तेव्हां त्याने त्या अंधळ्याचा हात धरून त्याला गांवाबाहेर नेलें, आणि त्याच्या डोळ्यांत थुंकून व त्यावर हात ठेवून त्याला विचारिलें कीं, तुला कांहीं दिसतें?

२४ तेव्हां तो वर पाहून बोलला कीं, मला माणसें चालतांना दिसतात, पण झाडांसारखीं दिसतात. (७)

२५ नंतर याने त्याच्या डोळ्यांवर पुन्हा हात ठेविले व त्याला वर पाहायास सांगितलें; तेव्हां तो नीट झाला व सर्व माणसें त्याला साफ दिसूं लागलीं. (८)

---

(१) यश. ४४:१८. (२) २ पेत्र. १:१२. (३) मार्क. ६:३८.४४, मात्थ. १४:१७–२१. लूक. ९:१२–१७. योह. ६:५–१३. (४) मार्क. ८:१–९. मात्थ. १५:३४–३८. (५) मात्थ. ८:३,१५. (६) मार्क. ७:३३. (७) न्याय. ९:३६. यश. २९:१८. १ करिंथ. १३:११,१२. (८) नी. ४:१८. यश. ३२:३. १ पेत्र. २:९.

---

२२. "बेथसाइद्यास." हा गांव कोठें व कसा याविषयीं मात्थ. ११:२१ यावर पाहा. "शिवावें." ख्रीस्त त्याला शिवला ह्मणजे त्याची दृष्टि येईल असा त्यांचा विश्वास होता.

२३. "गांवाबाहेर नेलें." गांवांत त्याचे डोळे उघडले तर गर्दी होईल आणि परोशी रागें भरून माझा जीव घ्यायास पाहतील असें ख्रीस्ताला वाटलें असेल. "डोळ्यांत थुंकून." असें कां केलें हें माहित नाहीं. त्यांत कांहीं औषधाचें सत्व होतें असें दिसत नाहीं, परंतु ख्रीस्ताने आपल्या ईश्वरी सामर्थ्याने त्याचे डोळे उघडले.

२४,२५. ख्रीस्ताने त्याचे डोळे एकाएकीं उघडले नाहींत; आधीं त्याला थो-

२६ मग त्याने त्याला त्याच्या घरीं पाठवितांना सांगितलें कीं, या गांवांत जाऊं नको, व गांवांतल्या कोणालाहि सांगूं नको.

२७ अगखी येशू आपल्या शिष्यांसुद्धां फिलिप्पसाच्या कैसारीकडल्या गांवांस गेला, (१) तेव्हां वाटेंत त्यानें आपल्या शिष्यांस विचारिलें कीं, लोक मला कोण ह्मणून ह्मणतात?

२८ तेव्हां त्यानीं उत्तर दिल्हें कीं, कित्येक बाप्तिस्मा करणारा (२) योहान्न; आणि कित्येक एलीया; आणि कित्येक, भविष्यवाद्यांतील एक, असें ह्मणतात.

२९ मग तो त्यांस ह्मणाला, तुह्मी तर मला कोण ह्मणून ह्मणतां बरें? तेव्हां पेत्रसानें त्याला उत्तर दिल्हें कीं, तूं ख्रीस्त आहेस. (३)

३० मग त्याने त्यांस निक्षूण सांगितलें कीं, मजविषयीं कोणाला सांगूं नका.

३१ तेव्हां तो त्यांस सांगूं लागला कीं, मनुष्याच्या पुत्रानें फार सोसावें, व वडील व मुख्य याजक व शास्त्री यानीं त्याला अव्हेरावें व जिवें मारावें, व त्याने तीन दिवसांनंतर पुन्हां उठावें, याचें त्याला अगत्य आहे.

३२ ही गोष्ट त्यानें उघड सांगितली; तेव्हां पेत्रस त्याला जवळ घेऊन धमकावूं लागला.

---

(१) मात्थ. १६:१३, इ. लूक. ९:१८, इ. (२) मात्थ. १४:२.
(३) योह. १:४१ ४२. ६:६९. ११:२७. प्रे.पे. ८:३७. १ योह. ५:१.

---

डेसें, मग शेवटीं साफ दिसावें असें केलें. त्याप्रमाणें जेव्हां पापी मनुष्याचे डोळे उघडले जाऊन जीवात्म्यांचें मोल व तारणोपाय यांविषयीं त्याचा बरोबर समज होऊन तो पाप पदरांत घेऊन ख्रीस्ताला शरण जातो, तेव्हां त्याची खातरी उत्तरोत्तर होत जाती. प्रथम त्याला थोडीसी आत्मिक दृष्टि प्राप्त होती. मग शास्त्राकडे मन लावीत व देवाची प्रार्थना करीत जाऊन तो पूर्ण उजेडांत येतो आणि सुखदायक व ईश्वरी तेज त्याच्या अंतःकरणांत प्रकाशितो.

२७–३८. यांचें व्याख्यान मात्थ. १६:१३–२८ यावर पाहा. येशू ख्रीस्त गरीब व नम्र होता. बहुतेक त्याविषयीं लाजले. तसें आतांहि ज्यांची खातरी झाली कीं तोच खरा व एकच तारणारा आहे त्यांतील कितीएक

३३ तेव्हां त्याने मुरडून व आपल्या शिष्यांकडे पाहून पेत्रसाला (१) असें धमकाविलें, अरे सैताना, (२) माझ्या मागें हो, कारण कीं तूं देवाच्या गोष्टींकडे लक्ष लावीत नाहींस, मनुष्याच्या गोष्टींकडे लावितोस.

३४ आणि त्याने आपल्या शिष्यांसुद्धां समुदायाला बोलावून त्यांस ह्मटलें, जो कोणी (३) माझ्या मागें यायास इच्छितो, त्याने आपणाला नाकारावें व आपला खांब उचलून घ्यावा व माझ्या मागें यावें.

३५ कारण कीं (४) जो कोणी आपला जीव राखायास इच्छितो तो त्याला मुकेल; परंतु जो कोणी मजकरितां व शुभवर्तमानाकरितां आपल्या जिवाला मुकेल तो त्याला राखील.

३६ कारण कीं माणूस सगळे जग मिळवून आपल्या जिवाची हानि पावला तर त्याला काय लाभ होईल?

३७ अथवा माणूस आपल्या जिवाच्या बद्दल काय देईल?

३८ कां कीं या व्यभिचारी व पापी पिढीमध्यें जो कोणी (५) मजविषयीं व माझ्या वचनांविषयीं लाजेल त्याविषयीं मनुष्याचा पुत्र पवित्र दुतांसुद्धां आपल्या बापाच्या गौरवाने येईल तेव्हा तोहि लाजेल.

## अध्याय ९.

अणखी त्याने त्यांस ह्मटलें, मी तुह्मास खचीत (६) सांगतों कीं, एथें उभे राहणाऱ्यांतील असे कांही आहेत कां, एथें देवाचें राज्य पराक्रमाने आलें असें पाहतील, तोंपर्यंत त्यांस मरणाचा (७) अनुभव होणारच नाहीं.

(१) प्रग. ३ १९. (२) १ करिंथ. ५:५. (३) मात्थ. १०:३८. १६:२४. लूक. ९:२३. १४:२७. तित. २:१२. (४) एस्तेर. ४:१४. मात्थ. १०: ३९. १६:२५. लूक. ९:२४. १७:३३ योह. १२:२५. २ तीम. २:११. ४: ६,८. प्रग. २:१०. ७:१४-१८. (५) लूक. १२:९. २ तीम. १:८. (६) मात्थ. १६:२८. लूक. ९:२७. (७) योह. ८.५२. इब्री. २:९.

त्याला अंगीकारायास लाजतात, परंतु अस्यांनी आठवण करावी कीं जरी तो लीन व नम्र होता तरी तो पुनः ईश्वरी तेजाने व प्रतापाने येऊन जगाचा न्याय ठरवील, मग ज्यांनी इहलोकां त्याला अंगीकारिलें नाहीं त्या सर्वांस तो नाकारून दूर करील आणि त्यांस सर्वकाळचें दुःख प्राप्त होईल.

१. याची टीका मात्थ. १६:२८ यावर पाहा.

२ मग साहा दिवसांनंतर (१) येशूने पेत्रस व याकोब व योहान्न
यांस आपल्या बरोबर घेतलें, व उंच डोंगरावर एकीकडे नेलें, तेव्हां
त्याचें रूप त्याच्या देखता पालटलें.
३ आणि त्याचीं वस्त्रें चकचकीत बर्फासारिखीं (२) फार पांढरीं
झालीं, इतकीं पांढरीं करील असा पृथ्वीवर परीट नाहीं.
४ तेव्हा एलीया व मोशे यास त्यानी पाहिलें; हे येशूसीं संभाषण
करीत होते.
५ तेव्हां पेत्रस येशूला ह्मणाला, हे गुरू, आपण एथें असावें हें
बरें आहे; (३) तर तीन मंडप करूं, तुझ्यासाठीं एक, व मोशयासाठीं एक,
व एलीयासाठीं एक.
६ कां कीं ते घाबरले होते ह्मणून काय बोलावें हें त्याला सु-
चेना. (४)
७ तेव्हां त्यांवर सावली करणारा ढग आला, आणि त्या ढगांतून
असी वाणी निघाली कीं (५) हा माझा प्रिय पुत्र आहे, याचे तुह्मी
ऐका. (६)
८ मग त्यानी एकाएकीं सभोंवतें पाहिलें तेव्हां कोणाला पाहिलें
नाहीं, आपल्याजवळ एकल्या येशूला पाहिलें.
९ नंतर ते डोंगरावरून उतरत असतां त्याने त्यांस निक्षून सांगि-
तलें कीं, तुह्मी जें पाहिलें तें मनुष्याचा पुत्र मेलेल्यांमधून उठेल तोंप-
र्यंत कोणाला कळवूं नका.
१० तेव्हां त्यानी ती गोष्ट मनांत धरून आपल्यामध्यें विचार के-
ला कीं, (७) मेलेल्यांमधून उठणें ह्मणजे काय ?
११ मग त्यानी त्याला पुसलें कीं, (८) एलीया अगोदर आला
पाहिजे, असें शास्त्री कां ह्मणतात ?

---

(१) मात्थ. १७:१, इ. लूक. ९:२८, इ. (२) दान. ७:९. मात्थ. २८:३.
(३) गीत. ६३:२. ८४:१०. (४) दान. १०:१५. प्रग. १:१७.
(५) गीत. २:७. मात्थ. ३.१७. २ पेत्र. १:१७. (६) अनु. १८:१५.
(७) प्रेषि. १७:१८. (८) मल. ४:५.

---

२—१३. याची टीका मात्थ १७:१–१३ एथें आहे.

१२ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, एलीया अगोदर येऊन सर्व नीट करितो खरें, अणखी मनुष्याच्या पुत्राविषयीं कसें लिहिलें (१) आहे कीं, त्याने फार सोसावें व तुच्छ व्हावें? (२)

१३ परंतु मी तुह्मास सांगतों कीं (३) एलीया आलाच आहे, आणि त्यांस बरें वाटलें त्याप्रमाणें त्याला केलें, जसें त्याविषयीं लिहिलें आहे तसें.

१४ नंतर त्याने शिष्यांजवळ येऊन त्यांच्या सभोंवता मोठा समुदाय आहे व त्यांसीं शास्त्री संवाद करीत आहेत, असें पाहिलें.

१५ तेव्हां सर्व समुदाय त्याला पाहतांच थक्क झाला व त्यानी धावत जाऊन त्याला मुजरा केला.

१६ मग त्याने शास्त्र्यांस विचारलें कीं, तुह्मी यांसीं काय संवाद करितां?

१७ तेव्हां समुदायांतील कोणीएकाने उत्तर दिल्हें कीं, हे गुरू, म्या आपल्या मुलाला तुझ्या जवळ आणिलें, याला मुका आत्मा लागला आहे. (४)

१८ तो याला जेथें कोठें धरितो तेथें याला आपटून टाकितो, मग हा तोंडाला फेंस आणून (५) आपले दांत कडकडा खातो व सुकून जातो; यास्तव तुझ्या शिष्यानी तो काढावा ह्मणून म्या सांगितलें परंतु त्यांच्याने काढवेना.

१९ तेव्हां त्याने त्याला उत्तर दिल्हें कीं, अहा! अविश्वासी पिढी, (६) मी तुह्मांबरोबर कोठवर राहूं? तुमचें कोठवर सोसूं? त्याला मजकडे आणा.

---

(१) गीत. २२. यशा. ५३. दान. ९:२६. जख. १३:७. (२) गीत. ७८:२२. लूक. २३:११. फि. २:७. (३) मात्थ. ११:१४. लूक. १:१७ (४) मात्थ. १२:२२. लूक. ११:१४. (५) यहु. १३. (६) अनु. ३२:२०. गीत. ७८:८. इब्री. ३:१०.

---

१४—२९. याचें व्याख्यान मात्थ. १७:१४—२१ यांत पाहा.

१७. "मुका आत्मा." ह्मणजे मुलाची वाचा हरवून घेतली असा अशुद्ध आत्मा.

२० मग त्यांनी त्याला त्याजकडे आणिलें, तेव्हां त्याला पाहतांच आत्म्याने त्याला पिळून टाकिलें, व तो भूमीवर पडून तोंडाला फेंस आणून लोळूं लागला.

२१ तेव्हां त्याने त्याच्या बापाला पुसलें कीं, हें याला होऊन किती काळ झाला? तेव्हां त्याने ह्मटलें कीं, (१) बाळपणापासून.

२२ आणि त्याने याचा घात करायाकरितां याला बहुत वेळां अग्नींत व पाण्यांत टाकिलें; परंतु तुझ्याने कांहीं करवेल तर आह्मावर करुणा करून आमचें सहाय कर.

२३ तेव्हां येशू त्याला ह्मणाला, तुझ्याने विश्वास धरवेल (२) तर; विश्वास धरणाऱ्याच्याने सर्व होतें.

२४ तेव्हांच त्या मुलाचा बाप डोळ्यांस आंसें आणून असें ओरडला कीं, हे प्रभू, (३) मी विश्वास धरितों, माझ्या अविश्वासाविषयीं मला सहाय कर. (४)

२५ नंतर समुदाय एकत्र धावत येत आहे असें पाहून येशूनें त्या अशुद्ध आत्म्याला धमकाविलें कीं, अरे मुक्या व बहिऱ्या आत्म्या, मी तुला आज्ञा करितों, यांतून नीघ व पुन्हा यांत जाऊं नको.

---

(१) इयो. ५:७. गीत. ५१:५. (२) २ काल. २०:२०. मात्थ. १७:२० मार्क. ११:२३. लूक. १७:६. योह. ११:४०. इब्री. ११:६. (३) गीत. १२६:५. (४) इब्री. १२:२.

---

२२. "तुझ्याने कांहीं करवेल तर." त्याने आपल्या मुलाला शिष्यांजवळ आणिलें होतें परन्तु त्यांच्याने काढवेना, ह्मणून तो ख्रीस्तापासीं आग्रहाने विनंती करतो कीं जर तुझ्याने काढवेल तर दया कर.

२३. "तुझ्याने विश्वास धरवेल तर." त्या माणसाने ख्रीस्ताच्या सामर्थ्याविषयीं कांहीं संशय दाखविला होता. ख्रीस्ताने त्याला समजाविलें कीं विश्वास धरिला पाहिजे. विश्वास असल्यावांचून कांहीं होत नाहीं.

२४. "मला सहाय्य कर." ही प्रार्थना योग्य होती. आपला विश्वास थोडकाच आहे असें त्याला समजलें, तरी आपल्या अल्पविश्वासामुळें मुलाने दुष्ट आत्म्याच्या स्वाधीन राहावें हें त्याला अवघड वाटलें, ह्मणून आपला विश्वास वाढवावा असी विनंती त्याने ख्रीस्तापासीं केली. जो कोणी पापी ख्रीस्ताजवळ शरण येतो त्याला हीच विनंती शोभती. असी विनंती सालस मनाने केली तर ख्रीस्त ऐकून साह्य करील.

२६ तेव्हां तो ओरडून (१) व त्याला फार पिळून निघाला. तेव्हां तो मेल्यासारिखा झाला, ह्मणून तो मेला, असें बहुतेक बोलूं लागले.

२७ मग येशूने त्याचा हात धरून (२) त्याला उठविलें व तो उभा राहिला.

२८ नंतर तो घरांत गेल्यावर त्याच्या शिष्यानी त्याला एकांतीं पुसलें कीं, आमच्याने त्याला कां काढवलें नाहीं?

२९ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, ही जात (३) प्रार्थना व उपास (४) यांवांचून दुसऱ्या कशानेहि निघत नाहीं.

३० नंतर ते तेथून निघून गालीलामध्यें फिरत होते, आणि हें कोणास कळूं नये, असें त्याच्या मनांत होतें;

३१ कारण कीं तो आपल्या शिष्यांस उपदेश करीत व त्यांस ह्मणत होता कीं, मनुष्याचा पुत्र लोकांच्या हातीं दिल्हा जाईल व ते त्याला जिवें मारितील, व जिवें मारिल्यानंतर तो तिसऱ्या दिवसीं पुन्हां उठेल.

३२ परंतु ही गोष्ट ते समजले नाहींत व त्याला विचारायास भ्याले. (५)

३३ अणखी (६) तो कपरणाहूमांत आला व घरीं गेल्यावर त्याने त्यांस विचारिलें कीं, तुह्मी वाटेंत आपल्यांमध्यें काय संवाद करीत होतां?

३४ परतु ते उगेच राहिले, कारण कीं मोठा कोण, याविषयीं त्यानी वाटेंत आपल्यांमध्यें विवाद केला होता.

३५ तेव्हां तो बसून बारा जणांस बोलावून त्यांस ह्मणाला, आपण पहिला व्हावा (७) असें कोणाच्या मनांत आलें तर त्याने सर्वांचा शेवटला व सर्वांचा चाकर व्हावें.

---

(१) प्रग. १२:१२. (२) यशा. ४१:१३. (३) एफ. ६:१८. (४) १ करिंथ. ९:२७. (५) योह. १६:१९. (६) मात्थ. १८:१, इ. लूक. ९:४६, इ. २२:२४, इ. (७) मात्थ. २०:२६,२७. मार्क. १०:४३.

---

३०—३२. याची व्याख्या मात्थ. १७:२२,२३ यांत पाहा.

३१. एथें जसें सांगितलें तसें पूर्ण झालें. पाप्यांसाठीं प्रायश्चित्त करावें ह्मणून ख्रीस्ताने हें भारी दुःख सोसावें असें नेमलें होतें.

३३—३७. याविषयीं मात्थ. १८:१–५ याची टीका पाहा.

३६ मग त्याने एक बाळक घेऊन त्यांच्या मध्यें ठेविलें, व त्याला कवटाळून धरून त्यांस ह्मटलें कीं,

३७ जो कोणी (१) अशल्या एका बाळकाला माझ्या नांवाने अंगीकारील तो मला अंगीकारील, व जो कोणी मला अंगीकारील तो मला नाहीं, तर माझ्या पाठविणाऱ्याला अंगीकारील.

३८ मग योहान्नाने त्याला उत्तर दिल्हें कीं, हे गुरू, आमच्या मागें न येतां तुझ्या नांवाने भुतें काढितांना (२) कोणी एकाला आह्मी पाहिलें, तेव्हां आह्मी त्याला मना केलें, कां कीं तो आमच्या मागें येत नाहीं.

३९ तेव्हां येशू ह्मणाला, त्याला मना करूं नका, कारण कीं, (३) जो माझ्या नांवाने चमत्कार करील व माझी निंदा सहज करील, असा कोणी नाहीं.

४० कारण कीं जो आह्माला प्रतिकूळ नाहीं (४) तो आह्माला अनुकूळ आहे.

---

(१) लूक. ९:४८. (२) गण. ११:२६–२८. (३) १ करिंथ. १२:३.
(४) मात्थ. १२:३०.

---

३८. "कोणी एकाला." हा जरीं त्यांच्यामागें चालला नाहीं तरीं खरा शिष्य होता असें दिसतें.

३९. "त्याला मना करूं नका." या मनुष्याविषयीं जें ख्रीस्ताने सांगितलें तें आतांहि बोधकारक आहे. योहान्नाला वाटलें कीं हा आमच्या मागें येत नाहीं तर याला मना केलें पाहिजे. ख्रीस्ताने त्याला समजाविलें कीं ज्यापेक्षां तो माझ्या नांवाने उपदेश व चमत्कार करितो त्यापेक्षां तो खरा शिष्य आहे असें प्रमाण पटतें. तर त्याच्या चांगल्या कामाला हरकत करूं नये. सांप्रतकाळींहि बहुतेक आपले ख्रीस्ती भाऊ आपल्या मताप्रमाणें चालत नाहींत ह्मणून त्यांस मना करितात आणि नांव ठेवून त्यांच्या चांगल्या कामास प्रतिबंध करायास पाहतात. अशयानी हा ख्रीस्ताचा बोध ध्यानांत आणून ठेवावा. जे वास्तविक ख्रीस्ती आहेत. ते कोणत्याहि नांवाचे असोत, त्या सर्वांनी एकमेकांवर प्रीति करून आणि एकमेकांस आश्वासन व उत्तेजन देऊन, त्यांतील कोणीहि ख्रीस्ताच्या गौरवार्थी व मनुष्याच्या तारणासाठीं जें काय करील त्याविषयीं आनंद करावा.

४१ कां कीं तुह्मी ख्रीस्ताकडील आहां ह्मणून जो कोणी माझ्या नांवाने तुह्मास पाण्याचा प्याला पाजील (१) तो आपल्या वेतनाला मुकणारच नाहीं, हें मी तुह्मास खचीत सांगतों.

४२ आणि मजवर विश्वास ठेवणाऱ्या लाहानांतील एकाला जो कोणी अडखळवील (२) त्याच्या गळ्यांत जात्याची तळी बांधून त्याला समुद्रांत बुडवावें हें त्याला बरें.

४३ आणि तुझा हात तुला अडखळवील (३) तर तो तोडून टाक;

४४ दोन हात असून नरकांत ह्मणजे न विझणाऱ्या अग्नींत, जेथें (४) त्यांचा किडा मरत नाहीं व अग्नि विझत नाहीं तेथें जावें, यापेक्षां व्यंग होऊन जीवनांत जावें हें तुला बरें.

४५ आणि तुझा पाय तुला अडखळवील तर तो तोडून टाक.

४६ दोन पाय असून नरकांत ह्मणजे न विझणाऱ्या अग्नींत, जेथें त्यांचा किडा मरत नाहीं व अग्नि विझत नाहीं तेथें पडावें, यापेक्षां व्यंग होऊन जीवनांत जावें हें तुला बरें.

४७ आणि तुझा डोळा तुला अडखळवील तर तो उपटून टाक;

४८ दोन डोळे असून नरकाच्या अग्नींत, जेथें त्यांचा किडा मरत नाहीं व (५) अग्नि विझत नाहीं तेथें पडावें, यापेक्षां एकडोळ्या होऊन देवाच्या राज्यांत जावें हें तुला बरें.

(१) मात्थ. १०:४२. २५.४०. (२) मात्थ. १८:६. लूक. १७:१,२.
(३) अनु. १३:६. मात्थ. ५:२९. (४) यशा. ६६:२४. प्रग. १४:११. (५) लूक. १६:२४.

४१. "याला पाजलि." हें साधारण परोपकारी बुद्धीने नव्हे तर ख्रीस्तावरील प्रीतीनें केलें पाहिजे ह्मणजे फळ मिळेल. या रीतीने ख्रीस्तावर व ख्रीस्ती भावांवर प्रीति दाखवितां येत नाहीं एवढे गरीब कोणी नाहींत. सर्वांहून हलकी सेवा अस्या प्रेमाने केली तर मनुष्यांकडून विसरली असतांहि येशू तिची आठवण करलि आणि सौख्य लोकांत फळ देईल.

४२–५०. याविषयीं मात्थ. १८:७–१० याची टीका पाहा. "त्यांचा किडा मरत नाहीं," इ. हा दाखला यशा. ६६:२४. यांतून काढून घेतला असें दिसतें. ईश्वराचे भक्त जय पावतील आणि त्यांच्या शत्रूंचा पराभव होईल, तेव्हां मारलेल्यांचे इतके ढिगांवर ढीग होतील कीं किड्यांस भक्ष हमेशा मिळेल व प्रेतें जाळण्याचा अग्नि विझणार नाहीं असें यशायाने

४९ कारण कीं प्रत्येक माणसाला अग्नीच्या योगानें खारट करितील, व प्रत्येक बलिदान (१) मिठानें खारट करितील.

५० मीठ चांगलें आहे, परंतु मिठाचा (२) खारटपणा गेला तर त्याला कशानें खारटपणा आणाल? तुह्मी आपल्यामध्यें खारटपणा (३) धरा, व एकमेकांसीं शांतानें राहा. (४)

## अध्याय १०.

मग तो तेथून (५) उठून यार्देनेच्या पलिकडल्या तिरानें यहूद्याच्या प्रांतामध्यें गेला; तेव्हां पुन्हा समुदाय जमून त्याकडे आले, व तो आपल्या चालिप्रमाणें त्यांस पुन्हा उपदेश करूं लागला.

---

(१) ले. २:१३. यहेज्क. ४३:२४. (२) मात्थ. ५:१३. लूक. १४:३४.
(३) कल. ४:६. (४) गीत. ३४:१४. २ करिंथ. १३:११. इब्री. १२:१४.
(५) मात्थ. १९:१, इ. योह. १०:४०.

---

वर्णिलें, तर या वर्णनावरून अतिशय दुःख दाखविलें आहे. यास्तव ख्रीस्तानें हा दाखला दुष्ट लोकांच्या परलोकींच्या दुःखावस्थेस लाविला. नरकदंड प्राप्त होईल, त्यांत कांहीं खरोखर किडा अथवा अग्नि होईल असें समजायाचें नाहीं. त्या दुःखाचें निरूपण होत नाहीं परंतु त्याविषयीं कांहीं समज पाडावा ह्मणून ख्रीस्तानें इहलोकीं जें सर्वांहून दुःसह दुःख त्याचा दाखला लावून नरकवास दर्शवायास पाहिलें.

४९. "अग्नीच्या योगानें खारट" इ. पापी लोकांनी पश्चात्ताप करून आपल्या जीवात्म्यांचें तारण साधून घेण्यास ख्रीस्ताला शरण जावें आणि त्याला माणसांसमोर अंगीकारून जीं नुकसानें, निंदा वगैरे दुःखें लागतील तीं सोसावीं, ह्मणजे देवाच्या कृपेनें व साह्यानें ते शुद्ध होऊन सौख्य लोकांत राहण्यास योग्य होतील. असें न केलें तर मरणानंतर जें दुःख अग्नीसारिखें दुःसह आहे तें सर्वकाळपर्यंत सोसावें लागेल.

५०. "खारटपणा धरा." मात्थ. ५:१३ यावर पाहा. आपणाला नाकारावें, ख्रीस्ताकरितां निंदा व दुःख सोसावें, एकमेकांचें हित पाहून शांतीनें राहावें, असे जे सद्गुण मिठासारिखे रक्षणार्थ आहेत ते धरिले पाहिजेत.

१—१२. याविषयीं मात्थ. १९:१–१२ याची टीका पाहा. हाच विवाहाचा नेम आहे आणि सर्वांस पाळणें भाग आहे. आणि कोणी आपल्या

२ मग परोश्यानी येऊन त्याची परीक्षा पाहण्याकरितां त्याला विचारिलें कीं, नवऱ्याने बायको टाकावी हें योग्य आहे काय ?

३ तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, मोश्याने तुह्मास काय आज्ञा केली ?

४ मग ते ह्मणाले, सूटपत्र लिहायास व तिला टाकायास मोश्याने (१) परवानगी दिल्ही.

५ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुमच्या अंतःकरणाच्या कठीणपणामुळें त्याने ही आज्ञा तुह्मासाठीं लिहून ठेविली.

६ परंतु उत्पत्तीच्या प्रारंभीं देवाने पुरुष व स्त्री (२) असीं तीं उत्पन्न केलीं.

७ याकरितां (३) पुरुष आपल्या आईबापांस सोडून आपल्या बायकोसीं जडून राहील,

८ आणि तीं दोघें एकशरीर (४) होतील; ह्मणून तीं त्यानंतर दोन नाहींत तर एकशरीर आहेत.

९ याकरितां देवाने जें जोडिलें आहे तें माणसाने तोडूं नये.

१० नंतर घरांत त्याच्या शिष्यानी फिरून त्याच गोष्टीविषयीं त्याला विचारिलें.

११ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, (५) जो कोणी आपल्या बायकोला टाकील व दुसरीसीं लग्न करील तो तिजविरुद्ध व्यभिचार करील.

१२ आणि जी बायको आपल्या नवऱ्याला टाकील व दुसऱ्यासीं लग्न करील ती व्यभिचार करील.

१३ मग त्याजकडे बाळकें (६) त्याने त्यांस शिवावें ह्मणून आणिलीं, परंतु शिष्यानी आणणाऱ्यांस धमकाविलें.

---

(१) अनु. २४:१. माथ्थ. ५:३१. (२) उत्प. १:२७. ५:२. मल. २:१५.
(३) उत्प. २:२४. (४) १ करिंथ. ६:१६. एफ. ५:३१. (५) माथ्थ. ५:३२. १९:९. लूक. १६:१८. रोम. ७:३. १ करिंथ. ७:१०,११.
(६) माथ्थ. १९:१३. लूक. १८:१५.

---

बायकोला टाकून दुसरीसीं लग्न करावें हें ज्यापेक्षां अनुचित आहे त्यापेक्षां पहिली बायको असून दुसरीसीं लग्न करावें हेंहि अयोग्य आहे.

१३—१६. याचें व्याख्यान माथ्थ. १९:१३–१५ एथें पाहा. "त्याने

१४ तें पाहून येशूला वाईट वाटलें, (१) आणि तो त्यांस ह्मणाला, बाळकें माझ्या जवळ येऊं द्या, त्यांस मना करूं नका, कारण कीं देवाचें राज्य (२) असल्यांचें आहे.

१५ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, जो जो कोणी देवाचें राज्य बाळकासारिखें घेणार नाहीं तो त्यांत जाणारच नाहीं.

१६ तेव्हां त्याने त्यांस कंवटाळून धरून त्यांवर हात ठेवून त्यांस आशीर्वाद दिल्हा.

१७ मग तो निघून वाटेंत चालत असतां (३) कोणीएकाने धावत येऊन व त्याच्या पुढें गुडघे टेंकून त्याला विचारिलें कीं, हे उत्तम गुरू, सर्वकाळच्या जीवनाचें वतन मिळावें ह्मणून म्या काय करावें?

१८ तेव्हां येशू त्याला ह्मणाला, मला उत्तम कां ह्मणतोस? एक जो देव (४) त्यावांचून कोणी उत्तम नाहीं.

१९ आज्ञा तुला ठाऊक आहेत, (५) व्यभिचार करूं नको, हत्या करूं नको, चोरी करूं नको, खोटी साक्ष देऊं नको, कोणाला ठकवूं नको, आपल्या आईबापांचा सन्मान कर.

---

(१) एफ. ४:२६. (२) मात्थ. १८:१०. १ करिंथ. १४:२०. १ पेत्र. २:२. प्रग. १४:५. (३) मात्थ. १९:१६. इ. लूक. १८:१८, इ. (४) गीत. ८६:५. ११९: ६८. (५) निर्ग. २०. रोम. १३:९.

---

त्यांस शिवावें." ह्मणजे हात ठेवावे. आशीर्वाद देऊन हात ठेवीत असत. उत्प. ४८:१४. "देवाचें राज्य." ह्मणजे शुभवर्तमान (मात्थ. ३:२.) "बाळकासारिखें." ह्मणजे बालकाच्या सालस व नम्र स्वभावाने. "त्यांस कवटाळून" इ. ख्रीस्ताने केवढी ममता दाखविली. तो लहान बालकांस जवळ येऊं देतो व आशीर्वाद देतो यांवरून ख्रिस्ती आईबापांनी आनंद करून आपल्या लेंकरांस आणून ख्रीस्ताला अर्पून घ्यावें, हें आमचें कर्तव्य, असें केवळ नव्हे, तर त्यांत मोठें सुख आहे असें मानावें. आपल्या लेंकरांवर देवाची कृपा मिळवावी ही सर्वांहून मोठी देणगी आहे असें मोजून आईबापांनी लेंकरांस जन्मापासून ईश्वराच्या सेवेस लावावें आणि रोज रोज त्यांसाठीं प्रार्थना करीत जावें.

१७—२१. यावर मात्थ. १९:१६—३० याची टीका पाहा. "धा-

२० तेव्हां त्याने उत्तर दिल्हें कीं, हे गुरू, म्या आपल्या लहानपणापासून (१) हें अवघें पाळिलें आहे.

२१ तेव्हां येशूने त्याजकडे पाहून त्याजवर प्रीति केली, व त्याला ह्मटलें का, (२) एक गोष्ट तुला उणी आहे; जा, तुझें आहे तितकें विकून दरिद्र्यांस दे, ह्मणजे तुला आकाशांत (३) संपत्ति मिळेल; चल, खांब उचलून घेऊन माझ्या मागें ये.

२२ परंतु तो त्या बोलण्यावरून खिन्न होऊन दुःखाने निघाला, कारण कीं त्याची बहुत मालमत्ता होती.

२३ तेव्हां येशूने सभोंवतें पाहून आपल्या शिष्यांस ह्मटलें, धनवानांस देवाच्या राज्यांत जायाला किती कठीण आहे?

२४ तेव्हां शिष्य त्याच्या बोलण्यावरून थक्क झाले; मग येशूने त्यांस फिरून उत्तर दिल्हें, लेंकरानो, जे धनावर (४) भरवसा ठेवितात त्यांस देवाच्या राज्यांत जायाला किती कठीण आहे?

(१) यश. ५८:२. यहेज्क. ३३:३१,३२. मात्थ. ३:८. रोम. ७:९. फि. ३:६.
(२) याक. २:१०. (३) मात्थ. ६:१९,२०. लूक. १२:३३. १६:९. (४) ईयो. ३१:२४. गीत. ५२:७. ६२:१०. हब. २:९. १ तीम. ६:१७. प्रग. ३:१७.

वत येऊन." सर्वकाळचें जीवन मिळवायास आवेश व घाई दाखवावी हें योग्य आहे. यासारिखी अगत्याची, मोलवान आणि मोठा प्रयास व घाई करण्याजोगी असी दुसरी कोणतीहि गोष्ट नाहीं.

२१. "त्याजवर प्रीति केली." हा सद्गुणी व बहुत प्रकारें प्रियकर असें ख्रीस्तानें पाहिलें, तरीं हा वास्तविक खरा भक्त नाहीं असेंहि पाहिलें. त्या तरण्यानें माझ्याठायीं काय उणें आहे असें विचारिलें होतें. (मात्थ. १९:२०.) येशूने त्याला समजाविलें कीं कांहीं उणें आहे; मग जें झालें त्यावरून सिद्ध होतें कीं त्याची देवावरील प्रीति कमी होती. तो धनलोभी होता, आणि आपल्या संपूर्ण जिवानें व अंतःकरणाने देवावर प्रीति करीत नव्हता. जर त्यानें येशूचें ऐकून आपलें सर्वस्व विकून दरिद्र्यांस दिल्हें असतें तर मी देवावर पूर्ण प्रीति करितों व सर्वकाळचें जीवन मिळवावें हीं माझी सर्वांहून मोठी उत्कंठा आहे असें त्यानें दाखविलें असतें. "तो उणा सांपडला." ख्रीस्त तारण पावण्याचे संकेत कमी करीना. आतांहि तो कमी करीत नाहीं. तर आपल्याठायीं कांहीं उणें नाहीं असें जे मोजतात त्यांतून उणे सांपडतील असे सांप्रतकाळीं कोणी नसतील काय?

२४. "लेंकरानो." हें बोलणें प्रेमाचें आणि त्यांत कांहीं निषेधाहि

२५ धनवानाला देवाच्या राज्यांत जाणें यापेक्षां उंटाला सुईच्या नाकांतून जाणें सोपें आहे.

२६ तेव्हां ते अत्यंत विस्मित होऊन आपल्यामध्यें ह्मणाले, तर तारण कोण पावेल?

२७ मग येशूने त्यांकडे पाहून ह्मटलें, हें माणसांच्याने होत नाहीं परंतु देवाच्याने होतें, कारण कीं (१) देवाच्याने सर्व करवतें.

२८ तेव्हां पेत्रस त्याला ह्मणूं लागला, पाहा, आह्मी सर्व सोडून तुझ्या मागें आलों आहों.

२९ मग येशूने उत्तर दिल्हें कीं, मी तुह्मास खचीत सांगतों, ज्याने घर किंवा भाऊ किंवा बहिणी किंवा बाप किंवा आई किंवा लेंकरें किंवा शेतें मजकरितां व शुभवर्तमानाकरितां सोडिलीं,

३० तो या सांप्रत काळीं शंभरपट घरें व भाऊ व बहिणी व आया व लेंकरें व शेतें हीं पाठलागांसुद्धां आणि पुढल्या काळीं सर्वकाळचें जीवनाहि पावल्यावांचून राहील असा कोणी नाहीं.

३१ परंतु पहिले ते शेवटले व शेवटले ते पहिले, (२) असे बहुत होतील.

---

(१) उत्प. १८:१४. ईयो. ४२:२. इर्म. ३२:१७. लूक. १:३७.
(२) मात्थ. २०:१६. लूक. १३:३०.

---

येतो. शिष्य लेंकरांसारिखे समजायास मंद होते ह्मणून ख्रिस्ताला तेंच पुनः सांगावें लागलें.

३०. "शंभरपट." हें अक्षरानीं नव्हे तर सारांशानें पूर्ण होतें. शंभरपट आया वगैरे होत नाहींत. तर अर्थ हाच कीं ख्रिस्ताला अंगिकारल्यामुळें जें नुकसान होईल त्यापेक्षां शंभरपट लाभ होईल; ह्मणजे पापांची क्षमा, देवाची कृपा, मनांत शांति, संकटामध्यें चैन व समाधान, आणि ज्यांस ख्रिस्ताकरितां सोडिलें त्यांबद्दल अधिक प्रिय मित्र, या सर्वांकडून इहलोकीं शंभरपट लाभ, आणि परलोकीं सर्वकाळचें जीवन, असें मिळेल. असें होतें ह्मणून सर्व ख्रिस्ती लोकांच्या अनुभवास आलें आहे. "पाठलागांसुद्धां." दुष्टजगामध्यें पाठलाग होईलच होईल हें ख्रिस्तानें समजाविलें, परंतु ख्रिस्ती होण्याकडून पाठलाग असतांहि शंभरपट लाभ होईल असेंहि त्यानें शिकविलें.

३२ आणि (१) ते यरूशलेमास वाटेने वर चालत असतां येशू
त्यांच्या पुढें चालला, आणि ते थक झाले व भीत भीत पाठीमागें
चालले. तेव्हां तो पुन्हा बारा जणांस जवळ घेऊन आपल्याला जें
होणार तें त्यांस सांगूं लागला कीं,

३३ पाहा, (२) आपण वर यरूशलेमास जातों, आणि मनुष्याचा
पुत्र मुख्य याजकांच्या व शास्त्र्यांच्या हातीं दिल्हा जाईल, व ते त्याला
मरणदंड ठरवितील व त्याला विदेश्यांच्या स्वाधीन करितील.

३४ आणि (३) ते त्याची थट्टा करितील व त्याला फटके मारिती-
ल व त्यावर थुंकतील व त्याला जिवें मारितील, मग तिसऱ्या दिवशीं
तो पुन्हां उठेल.

३५ अणखी जबदीचे पुत्र याकोब व योहान्न हे त्याकडे जाऊन
ह्मणाले, हे गुरू, जें कांहीं आह्मी मागूं तें त्वां आह्मासाठीं करावें, असें
आमच्या मनांत आहे.

३६ मग तो त्यांस ह्मणाला, म्यां तुह्मासाठीं काय करावें ह्मणून
तुमच्या मनांत आहे?

३७ तेव्हां ते त्याला ह्मणाले, तुझ्या गौरवांत एकाने तुझ्या उज-
वीकडे व एकाने तुझ्या डावीकडे बसावें असें आह्मास दे.

---

(१) मात्थ. २०:१५, इ. लूक. १८:१३, इ. (२) प्रेषि. २०:२२.
(३) गीत. २२:६,७,१३.

---

३२—३४. यावर मात्थ. २०:१७—१९ याची व्याख्या पाहा. "येशू त्यांच्या पुढें चालला." शास्त्री व परोशी ख्रिस्ताचा जीव घ्यायास पाहतात हें शिष्यांस समजलें, ह्मणून ते भीत होते. ते मला जिवें मारितील असें ख्रिस्ताने शिष्यांस सांगितलें, तथापि भय न धरितां त्यांचा पुढारी होऊन आपला जीव देण्यासाठीं तो वर यरूशालेमास चालत गेला.

३५—४५. याविषयीं मात्थ. २०:२०—२८ यावरची टीका पाहा. "याकोब व योहान्न." यानी आपल्या आईकडून ही अर्जी केली. "बार्तीमी अंधळा." मात्थी ह्मणतो कीं दोन अंधळे होते. एकच होता असें मार्कस ह्मणत नाहीं. तो एकाची गोष्ट लिहितो याचें कारण हेंच असेल कीं बार्तीमी हा बहुत लोकांच्या ओळखीचा होता.

३८ परंतु येशूने त्यांस ह्मटलें, तुह्मी जें मागतां तें तुह्मास (१) स-
मजत नाहीं; जो प्याला मला प्यायाचा आहे तो तुमच्याने पिववेल, व
जो बाप्तिस्मा (२) मला घ्यायाचा आहे तो घेववेल काय?

३९ तेव्हां ते त्याला ह्मणाले, घेववेल. मग येशूने त्यांस ह्मटलें,
जो प्याला (३) मला प्यायाचा आहे तो तुह्मी प्याल (४) व जो बाप्ति-
स्मा मला घ्यायाचा आहे तो तुह्मी घ्याल खरें.

४० पण माझ्या उजवीकडे व माझ्या डावीकडे बसणें हें ज्यांसाठीं
तयार केलें आहे (५) त्यांवांचून कोणास देणें हें मजकडे नाहीं.

४१ तेव्हां दाहा जण हें ऐकून याकोब व योहान्न यांवर रागें
भरूं लागले.

४२ परंतु येशूने त्यांस बोलावून ह्मटलें, विदेश्यांचे अधिकारी त्यां-
वर धनीपणा करितात, व त्यांचे मोठे लोक त्यांवर सत्ता करितात, (६)
हें तुह्मास ठाऊक आहे.

४३ परंतु तुह्मामध्यें तसें होऊं नये, तर जो कोणी (७) तुह्मामध्यें
मोठा व्हायास पाहील त्याने तुमचा चाकर व्हावें.

४४ आणि जो कोणी तुह्मामध्यें पहिला व्हायास पाहील त्याने
सर्वांचा दास व्हावें.

४५ कारण कीं मनुष्याचा पुत्रहि सेवा घ्यायास नाहीं तर सेवा
करायास (८) व बहुतांची खंडणी व्हावी ह्मणून आपला जीव द्याया-
स (९) आला.

४६ नंतर (१०) ते यरीहोस आले; मग तो व त्याचे शिष्य व
मोठा समुदाय हे यरीहोपासून बाहेर जात असतां तीमी याचा पुत्र
बार्तीमी अंधळा वाटेवर भीक मागत बसला होता.

४७ तेव्हां नाजारेथकर येशू आहे हें ऐकून, तो असें ओरडूं
लागला कीं, हे दावीदाच्या पुत्रा येशू, मजवर दया कर.

---

(१) याक. ४:३. (२) लूक. १२:५०. (३) मार्क. १४:३६. (४) मात्थ. १०:२५. योह. १७:१४. (५) मात्थ. २५:३४. इब्री. ११:१६. (६) लूक. २२:२५. (७) मात्थ. २०:२६,२८. मार्क. ९:३५. लूक. ९:४८. (८) योह. १३:१४. फि. २:७. (९) यश. ५३:११,१२. दान. ९:२६. २ करिंथ. ५:२१. गल. ३:१३. १ तीम. २:६. तित. २:१४. (१०) मात्थ. २०:२९, इ. लूक. १८:३५, इ.

४८ तेव्हां उगाच राहा असें बहुतेकानी त्याला धमकाविलें, परंतु तो (१) अधिकच ओरडला कीं, हे दावीदाच्या पुत्रा, (२) मजवर दया कर.

४९ तेव्हां येशूने उभें राहून त्याला बोलवायास सांगितलें, मग ते त्या अंधळ्याला बोलावून त्याला ह्मणाले, धीर धर, ऊठ, (३) तो तुला बोलावितो.

५० तेव्हां तो आपलें वस्त्र टाकून (४) उठून येशूकडे आला.

५१ तेव्हां येशूने त्याला उत्तर दिल्हें, म्या तुजसाठीं काय करावें ह्मणून मागतोस? तेव्हां तो अंधळा त्याला ह्मणाला, गुरूजी, मला दिसावें.

५२ तेव्हां येशू त्याला ह्मणाला, जा, तुझ्या (५) विश्वासाने तुला तारिलें आहे; तेव्हांच त्याला दिसूं लागलें, व तो वाटेने येशूच्या मागें चालला.

## अध्याय ११.

नंतर (६) ते यरूशलेमाजवळ जाइत झाडांच्या डोंगरापासीं बेथफागे व बेथानी एथवर आले, तेव्हां त्याने आपल्या शिष्यांतून दोघांस पाठवितांना त्यांस सांगितलें कीं,

२ आपल्या समोरच्या गांवांत जा, व त्यांत जातांच ज्यावर कोणी माणूस कधीं बसला नाहीं असें बांधलेलें शिगरूं तुह्मास अढळेल, तें सोडून आणा.

३ आणि तुह्मी हें कां करितां? असें कोणी तुह्मास ह्मटलें, तर प्रभूला याची गरज (७) आहे असें सांगा, ह्मणजे तो तेव्हांच तें इकडे पाठवील.

---

(१) इर्म. २९:१३. (२) गीत. ६२:१२. (३) योह. ११:२८. (४) फि. ३:७—९. (५) मात्थ. ९:२२. मार्क. ५:३४. (६) मात्थ. २१:१, इ. लूक. १९:२९, इ. योह. १२:१४, इ. (७) प्रेषि. १७:२५.

---

५०. "आपलें वस्त्र टाकून." हर्ष करून अधिक त्वरेने यावें ह्मणून त्याने वस्त्र टाकिलें. तसें ख्रीस्ताकडून तारण होईल असें समजून प्रत्येक पाप्याने सर्व विघ्न दूर करून त्याकडे हर्षाने व उतावळीने जावें.

१—११. या वाक्याचें व्याख्यान मात्थ. २१:१—१६ एथें पाहा.

४ तेव्हां ते निघाले व बाहेर चवाठ्यावर एका दारासीं बांधलेलें शिंगरूं त्यांस अढळलें; आणि तें ते सोडूं लागले.

५ तेव्हां उभे राहणाऱ्यातील कित्येक त्यांस ह्मणाले, तुह्मी शिंगरूं सोडून काय करितां ?

६ तेव्हां येशूने आज्ञा केल्याप्रमाणें त्यानी त्यांस सांगितलें, मग त्यानी त्यांस जाऊं दिल्हें.

७ नंतर त्यानी तें शिंगरूं येशूकडे आणून त्यावर आपलीं वस्त्रें घातलीं, मग तो त्यावर बसला. (१)

८ आणि बहुतेकानी आपलीं वस्त्रें वाटेवर पसरलीं, व दुसऱ्यानी झाडाच्या डाहळ्या तोडून वाटेवर पसरिल्या.

९ आणि पुढें चालणारे व मागें चालणारेहि ओरडत बोलले कीं, होसान्ना, प्रभूच्या नांवाने येणारा (२) धन्यवादित असो.

१० आमचा बाप दाविद याचें प्रभूच्या नांवाने येणारें (३) राज्य धन्यवादित असो, परम उंचामध्यें (४) होसान्ना.

११ नंतर येशू यरूशलेमांत येऊन देवळांत गेला, आणि (५)त्याने चहूंकडे सर्व पाहिलें तेव्हां संध्याकाळ झाला, व तो बारा जणांसुद्धां बेथानीस निघून गेला.

१२ आणि दुसऱ्या दिवशीं (६) ते बेथानीहून निघाल्यावर त्याला भूक लागली.

१३ तेव्हां ज्या अंजिराच्या झाडावर पानें होतीं तें दुरून पाहून, व अंजिराचा हंगाम आला नव्हता ह्मणून कदाचित् त्यावर कांहीं तरी मिळेल असें समजून तो त्याकडे गेला, परंतु गेल्यावर पानांवांचून (७) त्याला कांहीं मिळालें नाहीं.

(१) जख. ९:९. (२) गीत. ११८:२६. (३) यश. ९:७. इर्म. ३३:१५.
(४) गीत. १४८:१. (५) जफ. १:१२. यहेज्क. ८: ९. (६)मात्थ. २१:१८, इ.
(७) यश. ५:७.

६. "त्यांस जाऊं दिल्हें." शिंगऱ्याचा धनी ख्रिस्ताचा शिष्य झाला असावा, नाहीं तर त्याच्या मनांत विशेष प्रेरणा आली असावी कीं त्याला जाऊं द्यावें.

११—२६. यास मात्थ. २१:१८—२२ याची टीका लावावी.

१४ येशूने त्याला उत्तर दिल्हें कीं, यापुढें कोणी तुझें फळ कधीं न खावो. तें त्याच्या शिष्यानी ऐकिलें.

१५ मग ते यरूशलेमास आले, (१) व येशू देवळांत जाऊन देवळांत विकत देणारे व विकत घेणारे यांस बाहेर घालवूं लागला, आणि सरफांचे (२) चौरंग व खबुत्रें विकणाऱ्यांच्या बैठकी त्याने उलथ्या केल्या.

१६ आणि त्याने कोणाला देवळामधून कांहीं भांडें वाहूं दिल्हें नाहीं.

१७ आणि त्याने त्यांस असा उपदेश केला कीं, माझ्या घराला सर्व राष्ट्राकरितां प्रार्थनेचें घर ह्मणतील, (३) असें लिहिलें नाहीं काय? परंतु तुह्मी तें लुटाऱ्यांची गुहा (४) असें केलें आहे.

१८ तेव्हां शास्त्र्यानी व मुख्य याजकानी तें ऐकिलें, व त्याचा घात कसा करावा याविषयीं योजीत होते; कारण कीं सर्व समुदाय त्याच्या उपदेशावरून थक्क (५) झाल्यामुळें ते त्याला भ्याले.

१९ नंतर संध्याकाळ झाल्यावर तो नगरांतून बाहेर गेला.

२० मग पाहांटेस ते त्या अंजिराच्या झाडाजवळून जात असतां तें मुळांपासून वाळलें असें त्यानी पाहिलें.

२१ तेव्हां पेत्रसाला आठवण होऊन तो त्याला ह्मणाला, हे गुरू, पाहा, त्वां अंजिराच्या झाडाला शाप दिल्हा तें वाळून गेलें.

---

(१) मात्थ. २१:१२, इ. लूक. १९:४५, इ. योह. २:१४, इ. (२) अनु. १४: २५,२६. (३) यश. ५६:७. (४) इर्म. ७:११. (५) मात्थ. ७:२८. मार्क. १: २२. लूक. ४:३२.

---

१५. "देवळांत विकत देणारे." हें काम पवित्र स्थानांत नव्हे पण बाहेरल्या अंगणांत चालत होतें. त्या अंगणांत यज्ञयाग सिद्ध करणें वगैरे देवळाचें काम चालविणें योग्य होतें, परंतु त्यानी आपलें संसाराचें काम त्यांत आणावें हें ठीक नव्हतें ह्मणून ख्रिस्ताने त्यांस बाहेर घालविलें.

१८. "समुदाय....थक्क." इ. लोकांची खातरी झाली कीं हा ईश्वरी अवतार असावा यावरून शास्त्री व याजक हे अधिक द्वेष व ईर्षा करून त्याचा घात करायास पाहत गेले.

२१. "तें वाळून गेलें." या गोष्टीवरून शिष्यांस आणि सर्व पाहणाऱ्यांस

२२ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, देवावर विश्वास ठेवा.

२३ कारण मी तुह्मास खचीत सांगतों कीं, जो कोणी (१) या डोंगराला, तूं उपटून समुद्रांत टाकिलें जा, असें ह्मणेल, व आपल्या अंत:करणांत संशय न धरितां जें आपण ह्मणतों तें घडेल असा विश्वास धरील, तो जें जें ह्मणेल तें त्याला घडेल.

२४ यामुळें मी तुह्मास सांगतों कीं, प्रार्थना करतेवेळेस जें कांहीं तुह्मी मागाल (२) तें सर्व तुह्माला मिळेल असा विश्वास धरा, ह्मणजे तें तुह्मास घडेल.

२५ आणि तुह्मी उभे राहून प्रार्थना कराल तेव्हां कोणी तुमचा अपराधी असला तर त्याची क्षमा करा, (३) तुमच्या आकाशांतील बापानेंहि तुमच्या अपराधांची क्षमा करावी ह्मणून.

२६ परंतु तुह्मी जर क्षमा करणार नाहीं (४) तर तुमचा आकाशांतील बापहि तुमच्या अपराधांची क्षमा करणार नाहीं.

२७ मग ते फिरून यरूशलेमांत आले, आणि तो देवळामध्यें फिरत असतां (५) त्याकडे मुख्य याजक व शास्त्री व वडील येऊन त्याला ह्मणाले,

---

(१) मात्थ. १७:२०. लूक. १७:६. (२) मात्थ. ७:७. लूक. ११:२. १८:१. योह. १४:१३. १५:७. १६:२४. याक. १:५,६. (३) मात्थ. ६:१४. कल. ३:१३. (४) मात्थ. १८:३५ (५) मात्थ. २१:२३, इ. लूक. २०:१, इ.

---

समजायाचें होतें कीं हिरव्या झाडाने इतकें लवकर वाळून जावें असें करण्यास जो समर्थ आहे तो देव असावा आणि आपल्या सर्व शत्रूंचा नाश करूं शकतो.

२२. "देवावर विश्वास ठेवा." तुह्मीहि असें करावें ह्मणून विश्वासच पाहिजे.

२५. "उभे राहून प्रार्थना." शास्त्रांतल्या उदाहरणावरून असें दिसतें कीं कधीं उभे राहून व कधीं गुडघे टेंकून प्रार्थना करीत असत. तर अंगाची स्थिति यापेक्षां अंत:करणाची स्थिति व भावना ह्या विशेष आहेत असें समजावें. मान दाखविण्याकरितां उभे राहून प्रार्थना करणें आणि गुडघे टेंकूनहि करणें शोभतें.

२७–३३. यावर मात्थ. २१:२३–२७ याची टीका पाहा.

२८ कोणत्या अधिकाराने (१) हें करितोस? आणि हें करायाला हा अधिकार तुला कोणी दिल्हा?

२९ तेव्हां येशूने उत्तर दिल्हें कीं, मीहि तुह्मास एक गोष्ट पुसतों तिचें उत्तर मला द्या, ह्मणजे कोणत्या अधिकाराने हें करितों हें तुह्मास सांगेन.

३० योहान्नाचा बाप्तिस्मा आकाशापासून किंवा माणसांपासून झाला? मला उत्तर द्या.

३१ तेव्हां ते आपआपल्यांमध्यें विचार करूं लागले कीं आकाशापासून ह्मणूं तर तो ह्मणेल कीं असें असतां तुह्मी त्यावर विश्वास कां ठेविला नाहीं.

३२ आणि माणसांपासून ह्मणूं तर लोकांस ते भ्याले, कारण कीं योहान्न भविष्यवादी खरा असें सर्व (२) मानीत होते.

३३ तेव्हां त्यानी येशूला उत्तर दिल्हें कीं, आह्मास ठाऊक नाहीं. (३) मग येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, मीहि कोणत्या अधिकाराने हें करितों हें तुह्मास सांगत नाहीं. (४)

## अध्याय १२.

आणि तो दाखले देऊन त्यांस ह्मणूं लागला कीं, कोणीएका माणसाने (५) द्राक्षमळा लाविला व त्याभोंवतें कुंपण घातलें व द्राक्षारसासाठीं कुंड खणिलें व माळाहि बांधिला, नंतर तो माळ्यांस सोंपून देऊन आपण प्रवासास गेला.

२ मग हंगामीं आपण माळ्यांपासून द्राक्षमळ्याचीं कांहीं फळें घ्यावीं (६) ह्मणून त्याने माळ्यांकडे चाकर पाठविला.

३ तेव्हां त्यानी त्याला धरून ठोकिलें, व रिकामें लावून दिल्हें.

(१) गण. १६:३. (२) मात्थ. ३:५,६. १४:५. मार्क. ६:२०. (३) यश. १:३. २९:१४. इर्म. ८:७. हो. ४:६. (४) लूक. १०:२१,२२. (५) मात्थ. २१:३३. लूक. २०:९, इ. (६) मा. ७:१. लूक. १२:४८. योह. १५:१-८.

१-१२. या दाखल्याचें व्याख्यान मात्थ. २१:३५-४६ एथें आहे.

४ नंतर त्याने फिरून दुसरा चाकर त्यांकडे पाठविला, त्यालाहि त्यांनी धोंडमार (१) करून त्याचें डोकें फोडिलें व त्याचा अपमान करून लावून दिल्हें.

५ मग त्याने फिरून अणखी एक पाठविला; आणि त्याला त्यांनी जिवें मारिलें; नंतर अणखी (२) बहुत पाठविले, त्यांतून कित्येकांस त्यांनी ठोकिलें व कित्येकांस जिवें मारिलें. (३)

६ यास्तव त्याचा एक प्रिय पुत्र होता, त्यालाहि (४) त्याने शेवटीं त्यांकडे पाठविलें, कारण कीं माझ्या पुत्राची भीड धरतील, असें त्याने ह्मटलें.

७ परंतु ते माळी आपापल्यांमध्यें ह्मणाले, हा वतनदार आहे, चला, आपण याला जिवें मारूं, ह्मणजे वतन आपलेंच होईल.

८ मग त्यांनी त्याला धरून जिवें मारिलें व द्राक्षमळ्याबाहेर टाकिलें. (५)

९ यास्तव द्राक्षमळ्याचा धनी काय करील? तो येऊन त्या माळ्यांचा नाश (६) करील, व द्राक्षमळा दुसऱ्यांस देईल.(७)

१० हें शास्त्र तुह्मी वाचिलें नाहीं काय? जो धोंडा (८) बांधणाऱ्यांनी अव्हेरिला तोच कोपऱ्याचा मुख्य धोंडा झाला आहे.

११ हें प्रभूकडून झालें व आमच्या पाहण्यांत आश्चर्याचें आहे.

१२ तेव्हां (९) ते त्याला धरायास पाहत होते परंतु लोकांस भ्याले, कारण कीं हा दाखला त्याने आह्मावर दिल्हा आहे असें ते समजले; मग ते त्याला सोडून निघाले.

१३ नंतर (१०) बोलण्यामध्यें त्याला पाशांत पाडायाकरितां त्यांनी परोशी व हेरोदी यांतून कित्येकांस त्याकडे पाठविलें.

---

(१) इब्री. ११:३७. (२) नहे. ९:३०. इर्म. ७:३५, इ. (३) मात्थ. २३:३७.
(४) इब्री. १:१,२. (५) इब्री. १३:१२. (६) गी. १:२४–३१. यशा. ५:५–७. दान. ९:२६. (७) इर्म. १७:३. (८) गीत. ११८:२२. (९) मार्क. ११:१८. योह. ७:३०. (१०) मात्थ. २२:१५. लूक. २०:२०, इ.

---

१३–२७. याची टीका मात्थ. २२:१५–३३ एथें पाहा.

१४ मग ते येऊन त्याला ह्मणाले, हे गुरू, आह्मास ठाऊक आहे कीं तूं खरा आहेस, व कोणाची काळजी धरीत नाहींस, कारण कीं तूं माणसांच्या तोंडाकडे पाहत नाहींस, तर देवाचा मार्ग खरेपणाने सांगतोस. कैसाराला पट्टी देणें हें योग्य आहे किंवा नाहीं?

१५ आह्मीं द्यावी किंवा न द्यावी ? तेव्हां तो त्यांचें ढोंग जाणून त्यांस बोलला, माझी परीक्षा कां पाहतां ? पाहण्यास पावली मजकडे आणा.

१६ तेव्हां त्यानी आणिली; मग त्याने त्यांस ह्मटलें, हा मुखवटा व पत्ता कोणाचा ? तेव्हां ते त्याला ह्मणाले, कैसाराचा.

१७ मग येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, कैसाराचें कैसाराला (१) व देवाचें देवाला (२) भरून द्या. तेव्हां त्यानी त्याजविषयीं आश्चर्य केलें.

१८ मग (३) पुन्हा उठणें नाहीं असें ह्मणणारे सदोकी यानी त्याकडे येऊन त्याला विचारिलें कीं,

१९ हे गुरू, मोश्याने (४) आह्मासाठीं असें लिहिलें कीं, कोणीएकाचा भाऊ लेंकरें नसतां मेला, व त्याची बायको राहिली तर त्याच्या भावाने (५) त्याची बायको घेऊन आपल्या भावासाठीं संतति उत्पन्न करावी.

२० तर सात भाऊ होते, आणि पहिल्याने बायको केली, व तो संतति नसतां मेला;

२१ मग दुसऱ्याने तिला केलें, तोहि संतति नसतां मेला, व तिसराहि तसाच.

२२ याप्रमाणें त्या सातानी तिला केलें व त्याची कांहीं संतति राहिली नाहीं; सर्वांच्या मागून बायकोहि मेली.

२३ तर पुन्हां उठण्यामध्यें तीं उठतील तेव्हां ती त्यांतून कोणाची बायको होईल ? कारण कीं ती त्या सातांची बायको होती.

---

(१) मात्थ. १७:२५-२७. रोम. १३:७. १ पेत्र२: १७. (२) उप. ५:४,५. मल. १:६. (३) मात्थ. २२:२३. लूक. २०:२७, इ. प्रेषि. २३:८. (४) अनु. २५: ५. (५) रुथ. १:१२, १३.

२४ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, तुह्मी शास्त्र व देवाचें सामर्थ्यहि जाणत नाहीं यामुळें चुकतां कीं नाहीं ?

२५ कारण कीं लोक मेलेल्यांमधून उठतात तेव्हां ते लग्न करून घेत नाहींत व लग्न करून देतहि नाहींत, तर आकाशांतील दुतांसारिखे (१) असतात.

२६ आणि मेलेले उठतात त्यांविषयीं मोश्याच्या पुस्तकांतील झुडपाचें प्रकरण तुह्मी वाचिलें नाहीं काय ? त्यांत देवाने त्याला असें ह्मटलें कीं, (२) मी आब्राहामाचा देव व इझाकाचा देव व याकोबाचा देव आहें.

२७ तो मेलेल्यांचा देव नव्हे, जीवंतांचा देव आहे; यास्तव तुह्मी फार चुकतां. (३)

२८ तेव्हां (४) एका शास्त्र्याने येऊन त्यांचा संवाद ऐकिला, आणि त्याने त्यांस बरें उत्तर दिल्हें असें पाहून त्याला विचारिलें कीं, सर्व आज्ञांतील पहिली कोणती ?

२९ तेव्हां येशूने त्याला उत्तर दिल्हें कीं, सर्व आज्ञांतील पहिली ही कीं, (५) हे इस्राएला, ऐक; आमचा देव प्रभु एकच प्रभु आहे.

३० आणि तुझा देव प्रभु यावर तूं आपल्या सर्व अंतःकरणाने व आपल्या सर्व जिवाने व आपल्या सर्व मनाने व आपल्या सर्व शक्तीने प्रीति कर, हीच पहिली आज्ञा.

---

(१) १ करिंथ. १५:४२–५३. (२) निर्ग. ३:६. (३) ओ. २४.
(४) मात्थ. २२:३५. (५) अनु. ६:४,५. लूक. १०:२७.

---

२५. "दूतांसारिखे असतात." दूतांचे कसे काय संबंध आहेत हें सांगितलें नाहीं, परंतु विवाहाचा संबंध नाहीं असें सिद्ध होतें. तथापि याची व इहलोकांतल्या सर्व प्रिय संबंधांची आठवण परलोकीं होणार नाहीं, असें सांगितलें नाहीं.

२६,२७. उठण्याविषयीं हें पूर्ण प्रमाण आहे. निर्ग. ३:६.

२८–३४. यांविषयीं मात्थ. २२:३४-४० याची टीका पाहा. पुन्हा उठणें होईल असें परोश्यांचें मत होतें ह्मणून ख्रीस्ताने दिल्हेलें उत्तर त्यांस बरें वाटलें. "एकच प्रभु आहे." अनु. ६:४,५. परके लोक अनेक देवांचा

३१ आणि दुसरी ती इजसारिखी आहे कीं, (१) जसी आपणावर तसी आपल्या शेजाऱ्यावर प्रीति कर; यांहून कोणतीही आज्ञा मोठी नाहीं.

३२ तेव्हां तो शास्त्री त्याला ह्मणाला, हे गुरू, बरें, खरें बोललास, कारण कीं एक देव आहे, (२) त्याशिवाय दुसरा नाहीं.

३३ आणि सर्व अंतःकरणानें व सर्व बुद्धीनें व सर्व जिवानें व सर्व शक्तीनें त्यावर प्रीति करणें व जसी आपणावर तसी शेजाऱ्यावर प्रीति करणें, (३) हें सर्व होम व यज्ञ यांपेक्षां अधिक आहे.

३४ तेव्हां त्यानें शाहाणपणानें उत्तर दिल्हें हें येशूनें पाहून त्याला ह्मटलें कीं, तूं देवाच्या राज्यापासून दूर नाहींस; आणि तेव्हांपासून कोणीहि त्याला अणखी विचारायास धजेना. (४)

३५ अणखी येशूनें देवळांत उपदेश करितांना उत्तर दिल्हें कीं, (५) ख्रीस्त दावीदाचा पुत्र आहे, असें शास्त्री कसें ह्मणतात?

---

(१) ले. १९:१८. मात्थ. २२:३९. रोम. १३:९. (२) अनु. ४:३९. यश. ४५:५,६,१४. ४६:९. (३) शमु. १५:२२. हो. ६:६. मी. ६:६–८.
(४) मात्थ. २२:४६. (५) मात्थ. २२:४१. लूक. २०:४१, इ.

---

पूजा करीत असत परंतु यहुदी लोकांचा देव एकच होता. ही गोष्ट सर्वकाळ त्यांच्या मनांत राहावी आणि त्यांनी अन्य व हलक्या देवांची पूजा कधीं न करावी ह्मणून देवानें त्यांस इतर राष्ट्रांपासून वेगळें करून ठेविलें. परमेश्वर एकच असतां अन्य देवांकडे जाणें अथवा मूर्तींच्या पायां पडणें हें मोठें पाप आहे. तो एकच देव असतां त्यावर जसें एथें सांगितलें तसी प्रीति करावी हें सर्वांस अवश्य आहे. "तूं देवाच्या राज्यापासून दूर नाहींस' हा शास्त्री नीति व देवशास्त्र चांगलें समजतो असें ख्रीस्तानें पाहिलें. हा ख्रीस्ताचा शिष्य होण्यासारिखा होता. ख्रीस्ताला सर्व अंतःकरणानें अंगीकारून त्याच्यामागें चालावें एवढेंच राहिलें. "विचारायास धजेना." ह्मणजे त्याला पाशांत पाडण्यासाठीं विचारायास धजेना. सालस मनानें अधिक समजून घेण्यासाठीं विचारायास धजले नाहींत, असा अर्थ नाहीं.

३५–३७. यावर मात्थ. २२:४१–४६ याची टीका पाहा. "साधारण लोकांनी....ऐकिलें." तसें सांप्रतकाळींहि आहे. शुभवर्तमान हर्षानें ऐकायास लीन व नम्र बुद्धि पाहिजे. जे असी बुद्धि धरितात ते ख्रीस्ताला अंगीका-

३६ कारण कीं दावीदानें स्वतां पवित्र आत्म्याकडून ह्मटलें, (१)
प्रभूनें माझ्या प्रभूला (२) सांगितलें कीं, मी तुझ्या शत्रूंस तुझ्या पायां-
चें आसन करीन तोंपर्यंत तूं माझ्या उजवीकडे बैस.

३७ यास्तव दावीद स्वतां त्याला प्रभु असें ह्मणतो, मग तो त्याचा
पुत्र कसा होईल ? तेव्हां साधारण लोकांनी हर्षानें त्याचें ऐकिलें.

३८ आणि तो उपदेश करितांना (३) त्यांस ह्मणाला, शास्त्र्यांविषयीं
जपा, (४) कारण कीं झगे घालून फिरणें व चवाठ्यांत मुजरे घेणें,

३९ व सभास्थानामध्यें मुख्य आसनें (५) व जेवणामध्यें मुख्य
बैठकी हीं त्यांस आवडतात.

४० ते विधवांचीं (६) घरें खाऊन टाकितात व ढोंगानें लांबलां-
ब प्रार्थना करितात, ते अधिक दंड पावतील.

४१ अणखी (७) येशू भांडारासमोर बसून लोक भांडारांत पैका
कसे टाकितात हें पाहत होता, तेव्हां बहुत धनवान फार टाकीत होते.

४२ आणि एका दरिद्री विधवेनें येऊन दोन टोल्या ह्मणजे एक
दमडी टाकिली.

---

(१) २ शमु. २३:२. २ तीम. ३:१६. (२) गीत. ११०:१. (३) मार्क. ४:२.
(४) माथ्थ. २३:१. लूक २०:४६, इ. (५) लूक. ११:४३. (६) २ तीम. ३:६.
(७) लूक. २१:१, इ.

---

रून तारण पावतात. परंतु मातबर, धनवान यांसहि तारण पाहिजे. सर्व-
काळचें जीवन हें सर्व धनांपेक्षां, होय, सगळ्या जगापेक्षां मोलवान आहे, आ-
णि जेव्हां धनवान लोक असें मोजून नम्र बुद्धि धरितात आणि ख्रीस्ताला
अंगीकारून आपलें सर्वस्व त्याच्या सेवेस लावून देतात तेव्हां त्यांच्या अनु-
भवास येतें कीं शुभवर्तमानाकडून जसें गरीबांस तसें मातबरांसहि अक्षय सु-
ख, अत्यंत मोलाचें वतन प्राप्त होण्याजोगें आहे.

३८–४०. "विधवांचीं घरें." इ० ह्मणजे माल, पोषणार्थ जें होतें तें. विधवा
अज्ञानी व निरुपाय असतां त्यांस मदत देण्याच्या मिषानें हे शास्त्री त्यांचें
सर्वस्व हरवून घेत असत. या पापाबदल ईश्वर जो विधवा व अनाथ यांचा
मित्र आहे तो कठीण दंड लावीलच.

४१–४४. "त्या सर्वांपेक्षां....अधिक टाकिलें आहे." एक दमडी बहुत
रुपयांपेक्षां अधिक आहे असें नाहीं, तर त्या गरीब विधवेनें आपलें सर्वस्व
टाकिलें आणि दुसऱ्यानीं आपल्या मालाचा जरासा हिस्सा टाकिला ह्मणून

४३ मग तो आपल्या शिष्यांस बोलावून त्यांस ह्मणाला, मी तुह्मा-
स खचीत सांगतों कीं, ज्यांनी भांडारांत टाकिलें त्या सर्वांपेक्षां या दरि-
द्री विधवेने अधिक टाकिलें आहे. (१)

४४ कारण कीं त्या सर्वांनी आपल्या भरपुरांतून टाकिलें (२)
परंतु हिने आपल्या कमतींतून आपलें जितकें होतें, ह्मणजे आपली
सर्व (३) उपजीविका टाकिली.

## अध्याय १३.

मग (४) तो देवळांतून जात असतां त्याचा एक शिष्य त्याला
ह्मणाला, हे गुरू, पाहा, कसे धोंडे व कशा इमारती!

---

(१) २ करिंथ. ८:२,१२. (२) १ काल. २९:३,१७. २ काल. २४:१०.
(३) अनु. २४:६. (४) मात्थ. २४:१, इ. लूक. २१:५. इ.

---

ख्रीस्ताने असें ह्मटलें. या गोष्टीवरून सिद्ध होतें कीं (१) ईश्वराच्या सेवेस देणें त्याला पसंत होतें. (२) जें आह्माजवळ आहे तें अवघें ईश्वरापासून आहे, तर तें त्याला अर्पून देणें भाग आहे. (३) बहुत दिल्हें यावरून नव्हे, तर आमचा सर्व माल पाहून त्यांतून जो वांटा दिल्हा त्याजवरून आमच्या देवावरील प्रीति कळून येती. (४) उदरनिर्वाहासाठीं देवावर भरवसा ठेवून आपली सर्व उपजीविका द्यावी हें अमुक प्रसंगीं कदाचित योग्य होईल. (५) सर्वांहून लहान देणगी जर भाविक मनाने दिल्ही तर ईश्वराला नापसंत होणार नाहीं. (६) त्याच्याने देववत नाहीं इतका गरीब कोणी नाहीं. देवाच्या गौरवार्थी जें काम तें चालविण्यासाठीं गरीब व मातबर, बाल व वृद्ध या सर्वांनी आपापल्या शक्तीप्रमाणें द्यावें आणि तरुणपणांत देण्याची सवई करून द्यावी. (७) मी किती देतों असें नव्हे, तर माझा सर्व माल पाहून किती देतों व कोणत्या हेतूने देतों याविषयीं प्रत्येकाने आपली परीक्षा पाहावी.

या अध्यायांतील मुख्य गोष्टीविषयीं मात्थ. २४ ची टीका पाहा.

१. "कसे धोंडे." हे धोंडे पांढऱ्या संगमरवराचे होते, आणि योसेफस ह्मणतो कीं त्यांतील कित्येक धोंडे ५० फूट लांब, २४ फूट रुंद व १६ फूट जाड असे होते.

२ तेव्हां येशूने त्याला उत्तर दिल्हें कीं, या मोठ्या इमारती पाहतोस काय? (१) जो पाडून टाकला जाणार नाहीं असा दगडावर एक दगड एथें राहूं दिल्हा जाणार नाहीं.

३ नंतर तो जाइत झाडांच्या डोंगरावर देवळासमोर बसला होता, तेव्हां पेत्रस व याकोब व योहान्न व अंद्रयास यानी त्याला एकांतीं विचारिलें कीं,

४ या गोष्टी केव्हां होतील, व या सर्व गोष्टी पूर्ण होणार आहेत तेव्हां याचें चिन्ह कोणतें, हें आह्मास सांग.

५ तेव्हां येशू त्यास उत्तर देऊं लागला कीं, तुह्मास कोणी फसवूं नये ह्मणून जपा. (२)

६ कारण कीं बहुत माझ्या नामानें येऊन (३) मीच तो आहें असें ह्मणतील, व बहुतांस फसवितील.

७ अणखी तुह्मी लढाया व लढायांच्या आवया ऐकाल, तेव्हां घाबरूं नका, (४) कारण कीं त्या अवश्य व्हायाच्या आहेत, परंतु तितक्यांत शेवट होणार नाहीं.

८ कारण कीं राष्ट्र राष्ट्रावर व राज्य राज्यावर उठेल, आणि जागोजागीं भूमिकंप व दुकाळ व दंगे होतील; या गोष्टी वेदनांचा प्रारंभ आहेत.

९ तेव्हां आपल्याविषयीं जपा, (५) कारण कीं ते तुह्मास न्यायसभांच्या स्वाधीन करितील, आणि सभास्थानांमध्यें तुह्मास ठोकतील, आणि सुभेदार व राजे यांस साक्ष व्हावी ह्मणून तुह्मास त्यांसमोर माझ्याकरितां उभें करितील.

---

(१) लूक. १९:४४. (२) इर्म. २३:८. एफ. ५:६. २ थेस्स. २:३. प्रग. २०:७,८. (३) प्रेषि. ५:३६—३९. १ योह. ४:१०. (४) गीत. २७:३. ४६:१,२. नी. ३:२५. योह. १४:१,२७. (५) मात्थ. १०:१७, इ. प्रग. २:१०.

---

३. "जाईत झाडांच्या डोंगरावर." या डोंगरावरून देऊळ फार सुंदर व शोभायमान असें दिसून येत असे.

९. "यांस साक्ष व्हावी ह्मणून." ईश्वराचे भक्त योग्य रीतीनें साक्ष देतात तेव्हां पाठलागाकडून लोकांच्या मनांत ख्रिस्ताची गोष्ट अधिक ठसती आ-

१० परंतु अगोदर (१) सर्व राष्ट्रांस शुभवर्त्तमान गाजविलें पाहिजे.

११ आणि ते तुह्मास नेऊन पराधीन करितील तेव्हां आपण काय बोलावें याविषयीं अगोदर काळजी करूं नका व विचारहि करूं नका, तर त्याच घटकेस ज्याची सूचना तुह्मास होईल तेंच बोला, कारण कीं बोलणारे तुह्मी नव्हां, (२) तर पवित्र आत्मा तो.

१२ तेव्हां (३) भाऊ भावाला व बाप लेंकाला जिवें मारण्याकरितां पराधीन करील, आणि लेंकरें आईबापांवर उठतील व त्यांस जिवें मारवितील.

१३ आणि माझ्या नामामुळें (४) सर्व तुमचा द्वेष करितील, परंतु शेवटपर्यंत (५) टिकणारा तोच तरेल.

१४ परंतु ओसाड करणारा अमंगळ पदार्थ, (६) दानीयेल भविष्यवाद्याने सांगितला आहे, तो जेथें नसावा तेथें उभा राहिलेला पाहाल, (वाचणाऱ्याने ध्यानांत आणावें) तेव्हां जे यहूद्यांत असतील त्यांनी डोंगरांवर पळून जावें.

---

(१) मात्थ. २८:१९. प्रग. १४:६. (२) प्रेषि. २:४. ४:८,३१. ६:१०.
(३) मी. ७:६. (४) लूक. ६:२२. योह. १७:१४. (५) दान. १२:२. प्रग. २:१०.
(६) दान. ९:२७.

---

णि त्याची खातरी होऊन ख्रिस्ती मंडळी वाढती. प्रेषितांच्या वेळेस असें झालें (प्रेषि. ४ व ६:७ आणि २३ व २४:२४,२५.) आणि आलिकडे मादगास्कर बेटावर चांगलें उदाहरण झालें आहे. तेथें भारी पाठलाग चालत असतांहि, होय ख्रिस्ती झालेल्यांस मरणापर्यंत दंड व दुःख सोसावीं लागत असतांहि ते ख्रीस्ताला नाकारीनात, आणि त्यांचा कित्ता पाहून अणखी बहुतेकांची खातरी झाली कीं हा मार्ग खरा आहे ह्मणून त्यांनीहि स्विकारिला आणि ख्रिस्ती मंडळी फार वाढत चालली.

११. "तर पवित्र आत्मा तो." या वचनावरून पूर्ण प्रमाण पटतें कीं जें जें प्रेषितांनी प्रत्युत्तर देऊन सांगितलें तें सर्व ईश्वरप्रणीत होतें. हें वचन प्रेषितांसच दिल्हें होतें. अभ्यास केल्याशिवाय चांगला उपदेश होईल अथवा अन्यभाषेत बोलतां येईल असें सांप्रतकाळीं कोणी समजूं नये.

१२. "तेव्हां भाऊ भावाला." इ० माणसांचा जन्मस्वभाव किती भ्रष्ट झाला आहे ! असा अकरीत कोणी करील ह्मणून वाटतें, तथापि या वाक्यांत सांगितल्याप्रमाणेंच वरचेवर झालें आहे.

१५ आणि जो धाब्यावर असेल त्याने घरांत उतरूं नये व आप-
ल्या घरांतून कांहीं नेण्याकरितां आंत जाऊं नये.

१६ आणि जो शेतांत असेल त्याने आपलें वस्त्र नेण्याकरितां
माघारें येऊं नये.

१७ आणि त्या दिवसांमध्यें ज्या गरोदर व ज्या थान देणाऱ्या
त्यांस हायहाय.

१८ परंतु तुमचें पळणें हिंवाळ्यांत होऊं नये ह्मणून प्रार्थना करा.

१९ कारण कीं जी सृष्टि देवाने उत्पन्न केली तिच्या प्रारंभापासू-
न आजपर्यंत झालें नाहीं व होणारहि नाहीं, असें संकट त्या दिवसां-
मध्यें होईल. (१)

२० आणि ते दिवस प्रभु थोडे न करिता तर कोणी मनुष्य न
निभावता. परंतु ज्यांस त्याने निवडिलें त्या निवडलेल्यांमुळें त्याने ते
दिवस थोडे केले आहेत.

२१ तेव्हां पाहा, (२) ख्रीस्त एथें, किंवा पाहा तेथें, असें कोणी
तुह्मास ह्मटलें तर विश्वास धरूं नका.

२२ कारण कीं खोटे ख्रीस्त व खोटे भविष्यवादी उठतील व
असीं चिन्हें व चमत्कार दाखवितील कीं साधेल तर निवडलेल्यांस
देखील फसवितील.

२३ तुह्मी तर जपा, (३) पाहा, म्या तुह्मास अगोदरच सर्व सांगि-
तलें आहे.

२४ अगखी त्या दिवसांमध्यें त्या संकटानंतर (४) सूर्य अंधक हो-
ईल, व चंद्र आपला उजेड देणार नाहीं;

२५ आणि (५) आकाशांतील तारे पडतील, व आकाशांतील
सैन्यें डळमळतील.

२६ तेव्हां मनुष्याच्या पुत्राला मोठ्या सामर्थ्याने व गौरवाने ढगांत
येतांना पाहतील. (६)

---

(१) दान. १२:१. यो. २:२. (२) लूक. १७:२३. (३) २ पेत्र. ३:१७.
(४) दान. १२:१. जफ. १:१५–१७. (५) यश. १३:१०. २४:२०,२३. इर्म ४:
२८. २ पेत्र. ३:१०,१२. प्रग. ६:१२–१४. २०:११. (६) दान. ७:९–१४.
माथ. १६:२७. २४:३०. मार्क. १४:६२. प्रेषि. १:११. १ थेस्स. ४:१६.
२ थेस्स. १:७,१०. प्रग. १:७.

२७ तेव्हां तो आपल्या दुतांस पाठवून, आपल्या निवडलेल्यांस पृथ्वीच्या शेवटापासून आकाशाच्या शेवटापर्यंत चहूंकडून जमा करील.

२८ आतां अंजीर झाडाच्या दाखल्यावरून शिका; त्याच्या डाहळींत रस येऊं लागला व पानें फुटूं लागलीं, ह्मणजे उन्हाळा जवळच आला असें तुह्मी समजतां.

२९ तसेंच तुह्मी या गोष्टी होतांना पाहाल तेव्हां तो काळ जवळ दारांशीं आहे असें समजा.

३० मी तुह्मास खचीत सांगतों कीं, या सर्व गोष्टी होतील तोंपर्यंत ही पिढी टळून जाणार नाहीं.

३१ आकाश व पृथ्वी टळून जातील, (१) परंतु माझीं वचनें टळून जाणार नाहींत.

३२ अणखी त्या दिवसाविषयीं व त्या घटकेविषयीं कोणाला ठाऊक नाहीं, आकाशांतील दुतांसहि नाहीं, व पुत्रालाहि नाहीं केवळ बापाला ठाऊक आहे.

३३ जपा, (२) जागे असा व प्रार्थना करीत जा, कारण कीं तो वेळ केव्हां येईल हें तुह्मास ठाऊक नाहीं.

३४ जसें कीं, प्रवासास जाणारा माणूस आपलें घर सोडितां आपल्या चाकरांस अधिकार देऊन ज्याचें त्याला काम नेमून देतो, व द्वारपाळाला जागें राहायास आज्ञा करितो.

(१) यशा. ४०:८. (२) माथ. २४:४२. २५:१३. लूक. १२:४०. २१:३४. रोम. १३:११,१२. १ थेस्स. ५:६. प्रग. १६:१५.

३२. "पुत्रालाहि नाहीं." येशू ख्रिस्त हा ईश्वर असतां त्या दिवसाविषयीं त्याला ठाऊक नव्हतें असें कसें होतें ह्मणून कित्येकांस वाटतें, आणि ते या वाक्यावरून ख्रिस्ताच्या देवपणाविषयीं दिकत घेतात. परंतु ख्रिस्ताच्याठायीं जसा देवपणा होता तसा मनुष्यपणाहि होता असें ध्यानांत ठेविलें पाहिजे. लूक ह्मणतो कीं (अ० २:५२.) तो ज्ञानांत व शरिरांत वाढला. हें तर त्याच्या मनुष्यपणाविषयीं ह्मटलें होतें, आणि त्याच अर्थानें याला अमुक गोष्टी ठाऊक नव्हत्या असें ह्मणायाला बाध नाहीं.

३४—३७. घरधन्याची ही उपमा ख्रिस्ताला बरीच लागती. तो आपली मंडळी सोडून जाणार होता, आणि फिरून यायाचा होता, ह्मणून

३५ ह्मणून जागे राहा, नाहीं तर घरधनी एकाएकीं येऊन तु-
ह्मास झोंपेंत असतांना पाहील. (१)

३६ कारण कीं तो केव्हां येईल, संध्याकाळीं किंवा मध्यरात्रीं
किंवा कोंबडा ओरडण्याच्या वेळेस किंवा सकाळीं, हें तुह्मास ठाऊक
नाहीं.

३७ आणि जें मी तुह्मास सांगतों तें सर्वांस सांगतों, जागे राहा.

## अध्याय १४.

मग दोन दिवसांनंतर वल्हांडण व बेखमीर भाकरी यांचा सण
होता; तेव्हां त्याला कपटाने कसें धरून जिवें मारावें याविषयीं मुख्य
याजक व शास्त्री योजीत होते.

२ परंतु हें सणांत करूं नये, केलें तर कदाचित् लोकांमध्यें
गलबला होईल, असें त्यांनी ह्मटलें.

३ आणि (२) तो बेथानीमध्यें कोडी शिमोन याच्या घरीं असतां
जेवायाला बसला, तेव्हां कोणीएक बायको खरानार्द नामें मोलवान
सुगंध तेलाची आलाबास्त्र कुपी घेऊन आली व तिने ती आलाबास्त्र
कुपी फोडून त्याच्या डोक्यावर तें ओतिलें.

४ तेव्हां कित्येक आपापल्यांमध्यें रागें भरून ह्मणाले, या सुगंध
तेलाचा असा नाश कशाला केला?

(१) मात्थ. २५:५. (२) मात्थ. २६:६, इ. लूक. ७:३७. योह. १२:१, इ.

---

त्याने त्यांस जागें राहण्यास आज्ञा केली. यरुशालेमाचा नाश होणार व
मोठीं संकटें यहुदी लोकांस प्राप्त होणार असें ख्रिस्ताने त्यांस कळविलें.
परंतु त्या संकटांची वाट जे पाहत होते त्यांस जशी ही आज्ञा पाळायाचें
अगत्य होतें तशी सर्वांसहि सांप्रतकाळीं अगत्य आहे. मरण किती लवकर
येईल हें कोण जाणें. तें येईल व मग परलोकीं जाऊन ख्रिस्तासमोर हिशोब
द्यावा लागेल. तर जागे राहून त्यासाठीं सिद्ध व्हावें. असें कीं नरकवास
चुकवून सर्वकाळचें जीवन मिळवावें याविषयीं सर्वांनी किती जपून प्रयत्न
करावें. धनी येईल तेव्हां जागा राहून सांपडेल तो धन्य आहे.

**१—११. यावर मात्थ. २६:१—१७ याची टीका पाहा.**

५ कारण कीं हें तेल विकलें असतें तर त्याचे शेंपन्नास रुपये आले असते, व ते दरिद्र्यांस देतां येते; असी त्यांनी तिजवर कुरकूर केली.

६ तेव्हां येशू बोलला कीं, इला असूं द्या, इला त्रास कां देतां? इने मजसाठीं चांगलें काम केलें आहे.

७ कारण कीं (१) दरिद्री सर्वकाळ तुह्मामध्यें आहेत, व तुह्मास पाहिजे तेव्हां त्यांचें बरें करितां येतें, परंतु मी सर्वकाळ तुह्मामध्यें नाहीं.

८ इच्याने करवलें तें केलें, इने उत्तरकार्यासाठीं माझ्या शरिराला अगोदरच तेल लावून ठेविलें आहे.

९ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, सर्व जगामध्यें जेथें जेथें हें शुभवर्तमान गाजवितील तेथें इने केलें आहे हें देखील इच्या आठवणीसाठीं सांगतील.

१० मग बारांतील एक (२) यहुदा इस्कार्योते हा त्याला मुख्य याजकांच्या स्वाधीन करायाकरितां (३) त्यांकडे निघून गेला.

११ त्याचें ऐकून त्यांस आनंद झाला, आणि त्याला त्यांनी पैका देऊं केला; (४) मग त्याला सोईने पराधीन कसें करावें हें तो पाहूं लागला.

---

(१) अनु. १५:११. (२) मात्थ. २६:१४, इ. लूक. २२:३, इ.
(३) योह. १३:२. (४) १ राजे.२१:२०. ती. १:१०-१६.

---

"बेखमीर भाकरी." हा सण पाळितांना यहूदी आपल्या भाकरींत खमीर कधीं घालीत नसत.

"कपटाने." लोकांस भिऊन प्रसिद्धपणें ख्रीस्ताला धरून मारावें हें त्यांस बरें वाटलें नाहीं. ह्मणून लोकांस न उठवावें असी त्याला जिवें मारण्याची युक्ति योजून ते संधि पाहूं लागले.

८. "इच्याने करवलें तें केलें." मारयेने हें करून आपल्या शक्तीप्रमाणें प्रीति दाखविली आणि हें ख्रीस्ताला पसंत झालें. ख्रीस्ताच्या सन्मानार्थी जें जें केलें जातें तो फुगाच खर्च होतो असें भय कधीं धरायाचें नाहीं.

१२ नंतर बेखमीर भाकरींच्या सणाच्या (१) पहिल्या दिवसीं वल्हांडणाचा यज्ञपशु मारित असत, तेव्हां त्याचे शिष्य त्याला ह्मणाले, त्वां वल्हांडण सणाचें भोजन करावें याकरितां आह्मी कोठें जाऊन तयार करावें, याविषयीं तुझी आज्ञा काय?

१३ मग त्याने आपल्या शिष्यांतील दोघांस पाठवितांना त्यांस सांगितलें कीं, (२) नगरांत जा ह्मणजे पाण्याची घागर घेऊन जाणारा माणूस तुह्माला भेटेल, त्याच्या मागें जा.

१४ आणि जेथें तो आंत जाईल तेथल्या घरधन्याला असें सांगा कीं, गुरु ह्मणतो, (३) म्या आपल्या शिष्यांसुद्धां वल्हांडण सणाचें भोजन करावें (४) असी उतरायाची जागा कोठें आहे?

१५ मग तो तुह्मास सामान लावून तयार केलेली एक मोठी माडी दाखवील; तेथें आमच्या साठीं तयार करा.

१६ मग त्याचे शिष्य निघून नगरांत गेले, आणि त्याने सांगितल्याप्रमाणेंच त्यांस आढळलें, (५) व त्यानी वल्हांडण सणाचें भोजन तयार केलें.

१७ मग संध्याकाळ झाल्यावर तो बारांसुद्धां आला.

१८ नंतर ते बसून जेवीत असतां येशू बोलला, मी तुह्मास खचीत सांगतों कीं, मजबरोबर जेवणारा (६) तुह्मांमधील एक मला पराधीन करील.

१९ तेव्हां ते खिन्न होऊन एक एक त्याला ह्मणूं लागला कीं, तो मी काय? आणि दुसरा, तो मी काय?

२० तेव्हां त्याने त्यांस उत्तर दिल्हें कीं, मजबरोबर ताटांत बुचकळणार बारांतील एक तो.

(१) निर्ग. १२:८, इ. (२) मार्क. ११:२,३. इब्री. ४:१३. (३) योह. ११:२८. १३:१३. (४) प्रग. ३:२०. (५) योह. १६:४. (६) गीत.४१:९. ५५:१३,१४.

१२—४२. या सर्वांविषयीं मात्थ. २६:१७—४६ याची टीका पाहा.

१३. "नगरांत." ह्मणजे यरूशालेमांत. तेथें कोण भेटेल हें ख्रिस्ताने पूर्वी जाणिलें, यावरून प्रमाण पटतें कीं तो वास्तविक देव होता, आणि त्याच्याठायीं भविष्यज्ञान होतें.

२१ मनुष्याच्या पुत्राविषयीं असें लिहिलें आहे तसा तो जातो खरा, परंतु जो माणूस मनुष्याच्या पुत्राला पराधीन करितो त्याला हायहाय. तो माणूस जन्मला नसता तर त्याला बरें होतें. (१)

२२ आणि ते जेवीत असतां (२) येशूने भाकर घेतली व आशीर्वाद मागून ती मोडिली, व त्यांस देऊन ह्मटलें कीं, घ्या, खा,(३) हें माझें शरीर आहे.

२३ नंतर त्याने प्याला घेतला, व आशीर्वाद मागून तो त्यांस दिल्हा मग ते सर्व त्यांतून प्याले.

२४ आणि त्याने त्यांस ह्मटलें कीं, हें माझें रक्त, (४) हें नव्या कराराचें, हें बहुतांसाठीं ओतिलें असें आहे.

२५ मी तुह्मास खचीत सांगतों कीं, देवाच्या राज्यांत नवा (५) पिईन त्या दिवसापर्यंत द्राक्षवेलाचा उपज आतांपासून पिणारच नाहीं.

२६ नंतर गीत गाऊन ते निघून जाइत झाडांच्या डोंगरास गेले.

२७ मग येशू त्यांस ह्मणाला, तुह्मी सर्व याच रात्रीं मजमुळें अडखळाल; कारण असें लिहिलें आहे कीं, (६) मी मेंढपाळाला मारीन ह्मणजे मेंढरांची दाणादाण होईल.

२८ परंतु मी उठल्यावर (७) तुमच्या अगोदर गालीलांत जाईन.

२९ तेव्हां (८) पेत्रस त्याला ह्मणाला, जरी सर्व अडखळले तरी मी अडखळणार नाहीं.

३० मग येशू त्याला ह्मणाला, मी तुला खचीत सांगतों कीं,आज याच रात्रीं कोंबडा दोन वेळां ओरडल्याअगोदर तूं मला तीन वेळा नाकारसील.

३१ तेव्हां तो फार अधिक बोलूं लागला कीं, जरी मला तुझ्या बरोबर मरावें लागलें तरी मी तुला नाकारणारच नाहीं; सर्वांनीहि तसेंच ह्मटलें.

---

(१) मात्थ. १८:६,७. (२) मात्थ. २६:२६, इ. लूक. २२:१९. १ करिंथ. ११:२३ इ. (३) योह. ६:४८–५८. (४) १ करिंथ. १०:१६. योह. ६:५३. (५) यो. ३:१८. आम. ९:१३,१४. (६) जख. १३:७. (७) मार्क. १६:७. (८) मात्थ.२६:३३,३४. लूक. २२:३३,३४.योह. १३:३७,३८.

३२ नंतर (१) ते गेथसेमने या नांवाच्या ठिकाणीं आले, मग तो आपल्या शिष्यांस ह्मणाला, मी प्रार्थना करीन तोंपर्यंत एथें बसा.

३३ तेव्हां पेत्रस व याकोब व योहान्न यांस बरोबर घेऊन तो फार घाबरा व कष्टी होऊं लागला.

३४ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, माझा (२) जीव मरण्यासारिखा फार खिन्न आहे, एथें राहा व जागे असा.

३५ मग तो कांहींसा पुढें जाऊन भूमीवर पडला, व त्याने असी प्रार्थना केली कीं (३) साधेल तर ही घटका मजपासून टळून जावो.

३६ अणखी तो बोलला कीं, (४) हे आब्बा बापा, तुझ्याने सर्व करवतें, हा प्याला मजपासून दूर कर, परंतु (५) माझी इच्छा आहे असें नको, तुझी इच्छा आहे तसें होवो.

३७ मग तो आला, आणि ते झोंपीं गेले आहेत असें पाहून पेत्रसाला ह्मणाला, शिमोना, झोंपीं गेलास काय ? घटकाभरहि तुझ्याने जागें राहवेना काय ?

३८ तुह्मी परीक्षेंत येऊं नये ह्मणून जागे राहा व प्रार्थना करा; (६) आत्मा तयार आहे खरा, परंतु देह अशक्त.

३९ नंतर त्याने फिरून जाऊन तेंच वाक्य ह्मणून प्रार्थना केली.

४० मग माघारा येऊन ते पुन्हा झोंपीं गेले आहेत असें त्याने पाहिलें. कारण कीं त्यांचे डोळे जड झाले होते, आणि त्याला काय उत्तर द्यावें हें त्यांस सुचेना.

४१ नंतर तो तिसऱ्याने येऊन त्यांस ह्मणाला, अझून झोंप व विसांवाहि घेतां! हें पुरे, (७) घटका आली आहे; पाहा, मनुष्याचा पुत्र पाप्यांच्या हातीं दिल्हा जातो.

(१) मात्थ. २६:३६, इ. लूक २२:३९, इ. योह. १८:१, इ. (२) योहा. १२:२७.
(३) इब्री. ५:७. (४) रोमे. ८:१६. गल. ४:६. (५) गीत. ४०:८. योहा. ४:३४. ५:३०. ६:३८,३९. १८:११. फि. २:८. (६) रोम. ७:१८-२५. गल. ५:१७.
(७) योह. ७:३०. ८:२०. १३:१.

३६. "आब्बा." या सुरी भाषेंतल्या शब्दाचा अर्थ बाप, असा आहे.
४०. "काय उत्तर द्यावें." त्या वेळेस झोंप येऊंच नये असी साक्ष त्यांचें मन देत होतें ह्मणून ते निरुत्तर होते.

४२ उठा, आपण जाऊं, पाहा, मला पराधीन करणारा जवळ आला आहे.

४३ तेव्हांच (१) तो बोलत आहे इतक्यांत बारांतला एक यहूदा आला, आणि त्यांसंगतीं मुख्य याजक व शास्त्री व वडील यांकडला मोठा समुदाय (२) तरवारी व सोटे घेऊन आला.

४४ आणि त्याला पराधीन करणाऱ्याने त्यांस असी खूण सांगून ठेविली होती कीं, मी ज्याचें चुंबन घेईन (३) तोच तो आहे, त्याला धरा व बंदोबस्ताने न्या.

४५ मग त्याने येऊन व त्याजकडे जाऊन, हे गुरू, (४) हे गुरू, असें ह्मटलें, व त्याचें चुंबन घेतलें.

४६ तेव्हां त्यानीं आपले हात त्यावर टाकून त्याला धरिलें.

४७ मग जे जवळ उभे होते त्यांतून एकाने तरवार उपसून प्रमुख याजकाच्या चाकराला मारिलें व त्याचा कान कापून टाकिला.

४८ तेव्हां येशूने त्यांस उत्तर दिल्हें कीं, जसे लुटाऱ्यावर तरवारी व सोटे घेऊन जातां तसे तुह्मी मला धरायास बाहेर आलां काय?

४९ मी प्रतिदिवसीं तुह्माजवळ असतां देवळांत उपदेश करीत होतों, तेव्हां तुह्मी मला धरिलें नाहीं; परंतु (५) शास्त्र पूर्ण व्हावें ह्मणून असें झालें.

५० तेव्हां सर्व त्याला सोडून पळाले. (६)

---

(१) मात्थ. २६:४७. लूक. २२:४७, इ. योह. १८:३. इ. (२) गीत. ३:१२. २:२. (३) २ शमु. २०:९. गीत ५५:२१. नी. २७:६. (४) लूक. ६:४६. (५) गीत. २२. यश. ५३. लूक. २४:४४. (६) गीत. ८८:८, यश. ६३:३. मार्क. १४:२७.

---

४१. "हें पुरे." ह्मणजे झोंप पुरी झाली आहे. त्यांस गाढ झोंप लागली याचें एक कारण त्यांचें भारी दुःख असेल. ख्रीस्ताने त्यांस जागे राहून प्रार्थना करायास सांगितलें होतें, तरी तीनदां ते झोंपीं सांपडले. आतां यहूदा आला ह्मणून त्याने त्यांस उठविलें.

४३–७२. याची टीका माथ. २६:४७–७५ यांत पाहा.

४५. "हे गुरू, हे गुरू." यहुदा प्रभूला भेटायाचा आनंद दाखविण्यासारिखें हें बोलला. त्याचें केवढें ढोंग पाहा.

५१ मग कोणीएक तरणा नागव्या अंगावर तागाचें वस्त्र घेऊन त्याच्या मागें चालत होता, मग तरण्यानी त्याला धरिलें.

५२ तेव्हां तो तें वस्त्र टाकून (१) त्यांपासून नागवाच पळाला.

५३ नंतर त्यानी येशूला प्रमुख याजकाकडे नेलें; (२) तेथें त्याजवळ सर्व मुख्य याजक व वडील व शास्त्री जमले.

५४ पेत्रस तर दुरून त्यांच्या मागें चालून प्रमुख याजकाच्या वाड्यांत गेला, व चाकरांबरोबर विस्तवाजवळ शेकत बसला.

५५ तेव्हां मुख्य याजक व सर्व न्यायसभा यानी येशूला जिवें मारायाकरितां त्याविषयीं साक्ष पाहिली, परंतु त्यांस ती मिळेना.

५६ कारण कीं (३) बहुतानी त्याविरुद्ध खोटी साक्ष दिल्ही, परंतु त्या साक्षी सारिख्या नव्हत्या.

५७ तेव्हां कित्येकानी उठून त्याविरुद्ध असी खोटी साक्ष दिल्ही कीं,

५८ आह्मी याला असें बोलतां ऐकिलें कीं, हें हाताने बांधलेलें देऊळ मी मोडून टाकीन, (४) व हाताने बांधलें नाहीं असें दुसरें देऊळ तीन दिवसांत रचीन.

५९ परंतु हीहि त्यांची साक्ष सारिखी नव्हती.

६० तेव्हां प्रमुख याजकाने मध्यें उभें राहून येशूला विचारिलें कीं, तूं कांहींच उत्तर देत नाहींस काय? हे तुझ्या विरुद्ध साक्ष कसी देतात? (५)

(१) मार्क. १३:१६. (२) मात्थ. २६:५७, इ. लूक. २२:५४. इ. योह. १८:१३, इ. (३) गीत. ३५:११. (४) मार्क. १५:२९. योह. २:१९. (५) मात्थ. २६:६२. इ.

५१. "मग कोणीएक तरणा." हा कोण होता हें आह्मास ठाऊक नाहीं. तरण्यानी ह्मणजे रोमी शिपायानी त्याला धरिलें. हा येशूचा एक शिष्य असें त्यांस वाटलें असेल. पण तो शिष्य होता असें कांहीं प्रमाण नाहीं. केवळ मार्कमाने त्याविषयीं लिहिलें आहे. रात्रीं गडबड ऐकून तो कोणी गांवकरी उठून पाहायास गेला असेल.

या अध्यायाच्या बाकीच्या गोष्टी मात्थ. २६:५७–७५ याच्या टीकेंत सविस्ताराने उलगडून दाखविल्या आहेत.

६१ तथापि (१) तो उगाच राहिला व त्याने कांहीं एक उत्तर दिल्हें नाहीं. फिरून प्रमुख याजकाने त्याला विचारिलें कीं, स्तुतिमानाचा पुत्र ख्रीस्त तो तूं आहेस काय ?

६२ तेव्हां येशूने ह्मटलें, तो मी आहें, आणि (२) तुह्मी मनुष्याच्या पुत्राला पराक्रमाच्या उजवीकडे बसलेलें, व आकाशाच्या ढगांवर येतांना पाहाल.

६३ तेव्हां प्रमुख याजक आपलीं वस्त्रें (३) फाडून बोलला, आह्मास अणखी साक्ष्यांची गरज काय ?

६४ तुह्मी हें दुर्भाषण ऐकिलें, तुह्माला कसें दिसतें ? तेव्हां तो मरावा, असा सर्वांनी त्यावर दंड ठरविला.

६५ मग कित्येक त्यावर थुंकूं (४) व त्याचें तोंड झांकूं व त्याला बुक्क्या मारूं व त्याला ह्मणूं लागले, तूं भविष्यवादी असल्यास सांग; आणि चाकरानीहि त्याला चपराका मारिल्या.

६६ पेत्रस तर खालीं वाड्यांत असतां (५) प्रमुख याजकाच्या दासींतून एक आली,

६७ व पेत्रसाला शेकतांना पाहून त्याकडे दृष्टि लावून ह्मणाली, तूंहि नाजारेथकर येशूबरोबर होतास.

६८ परंतु तो नाकारून (६) बोलला कीं, तूं काय ह्मणतीस हें मला ठाऊक नाहीं व समजतहि नाहीं. मग तो बाहेर देवडींत गेला, तेव्हां कोंबडा ओरडला.

६९ मग ती दासी दुसऱ्याने त्याला पाहून जे जवळ उभे होते त्यांस सांगूं लागली कीं, हा त्यांतला एक आहे.

७० फिरून त्याने नाकारिलें; मग कांहीं वेळाने जवळ उभे राहणारे पेत्रसाला फिरून ह्मणाले, खराच तूं त्यांतला आहेस, कारण कीं तूं गालीली (७) आहेस, व तुझी बोलीहि तसीच आहे.

---

(१) गीत. ३९:९. यश. ५३:७. १ पेत्र. २:२३. (२) दान. ७:१३. मात्थ. २४:३०. २६:६४. लूक. २२:६९. प्रग. १:७. (३) यश. ३७:१. (४) यश. ५०:६. मार्क. १५:१९. (५) मात्थ. २६:६०. इ. लूक. २२:५५, इ. योह. १८:१६, इ. (६) २ तीम. २:१२,१३. (७) प्रेषि. २:७.

७१ तेव्हां तो शापानी व शपथानी बोलूं लागला, ज्या माणसा-
विषयीं तुह्मी बोलतां त्याला मी ओळखत नाहीं.

७२ तेव्हां दुसऱ्याने कोंबडा ओरडला; मग येशूने पेत्रसाला जी
गोष्ट सांगितली होती कीं, कोंबडा दोन वेळां ओरडल्या अगोदर तूं
तीन वेळां मला नाकरसील, ती त्याला आठवली. मग तिजविषयीं
तो विचार करून रडूं लागला. (१)

## अध्याय १५.

तेव्हांच पहांटेस वडील व शास्त्री व सर्व न्यायसभा यांबरोबर मुख्य
याजकानी मसलत (२) केल्यावर येशूला बांधून नेलें व पिलातसाच्या
स्वाधीन केलें.

२ तेव्हां पिलातसाने त्याला विचारिलें कीं, तूं यहूद्यांचा राजा
आहेस काय? मग त्याने त्याला उत्तर दिल्हें कीं, तूं ह्मणतोस तसेंच.

३ तेव्हां मुख्य याजकानी त्याजवर बहुत दोष ठेविले.

४ मग पिलातसाने त्याला फिरून विचारिलें कीं, तूं कांहीं उत्तर
देत नाहींस काय? पाहा, तुझ्या विरुद्ध किती गोष्टींची साक्ष देतात?

५ तेव्हां देखील (३) येशूने कांहींच उत्तर दिल्हें नाहीं, यावरून
पिलातसाला आश्चर्य वाटलें.

६ अणखी (४) त्या सणांत ज्या कोणत्या एका बंदिवानाला लोक
मागत त्याला तो त्यांकरितां सोडून देत असे.

७ आणि कित्येक बंडखोरानी बंडांत खून केला होता, त्यांबरोबर
बांधलेला असा बाराब्बा नामें माणूस होता.

८ तेव्हां आपल्याकरितां तो नेहमी करीत असे त्याचप्रमाणें त्याने क-
रावें ह्मणून लोक ओरडून मागूं लागले.

९ मग पिलातसाने त्यांस उत्तर दिल्हें कीं, म्या तुह्माकरितां यहूद्यां-
च्या राजाला सोडावें, ह्मणून मागतां काय?

---

(१) २ करिंथ.७:१०. (२) गति. २:२. मात्थ. २७:१, इ. लूक. २३:१, इ.
योह. १८:२८, इ. प्रेषि. ३:१३. ४:२६. (३) यशा. ५३:७. योह. १२:९.
(४) मात्थ. २७:१५. लूक. २३:१७. योह. १८:३९.

१० कारण कीं मुख्य याजकानी त्याला हेव्याने पराधीन केलें हें त्याला ठाऊक होतें. (१)

११ तेव्हां मुख्य याजकानी समुदायाला मागायास चिथाविलें कीं, तो नको, आपण आह्माकरितां बाराब्बाला (२) सोडावें.

१२ तेव्हां पिलातसाने त्यांस फिरून उत्तर दिल्हें कीं, ज्याला तुह्मी यहूद्यांचा राजा (३) ह्मणतां त्याला तर म्या काय करावें ह्मणून मागतां?

१३ तेव्हां ते फिरून ओरडले कीं, त्याला खांबीं दे.

१४ मग पिलातसाने त्यास ह्मटलें कीं, कां? त्याने काय वाईट केलें आहे? (४) परंतु ते अधिक ओरडले कीं, त्याला खांबीं दे.

१५ तेव्हां पिलातसाने समुदायाला खुशी करावें या हेतूने त्यांकरितां बाराब्बाला सोडिलें, आणि येशूला फटके मारून खांबीं देण्याकरितां स्वाधीन केलें.

१६ तेव्हां (५) शिपायानी त्याला प्रायतोऱ्यम ह्मणजे कचेरी एथें नेलें, व त्यानी सगळें पलटण जमा केलें.

१७ मग त्यानी जांवळें वस्त्र त्याच्या अंगांत घातलें व कांट्यांचा मुगूट गुंफून त्याला घातला.

१८ नंतर ते मुजरा करून त्याला ह्मणूं लागले कीं, हे यहूद्यांच्या राजा, सलाम.

१९ आणि त्यानी त्याच्या मस्तकावर वेताने मारिलें व त्याजवर थुंकून (६) गुडघे टेंकून त्याला नमन केलें.

---

(१) नी. २७:४. उप. ४:४. प्रेषि. १३:४५. तित. ३:३. (२) प्रेषि. ३:१४. (३) गीत. २:६. इर्म. २३:५. प्रेषि. ५:३१. (४) यश. ५३:९. (५) मात्थ. २७: २७. योह. १८:२८,३३. १९:९. (६) मार्क. १४:६५.

---

या अध्यायांतील मुख्य गोष्टींविषयीं मात्थ. २७ ची व्याख्या पाहा.

१६. "प्रायतोऱ्यम." रोमी सुभेदाराला प्रायतोर ह्मणत आणि त्याच्या न्यायसभेला प्रायतोऱ्यम ह्मणत असत.

१७. "जांवळें वस्त्र." मात्थी किरमिजी झगा ह्मणतो. रोमी सेनापति व सुभेदार काळ्या तांबड्या रंगाचा झगा नेसत असत. असला एक जुनापाना झगा येशूवर त्यानी थट्टा करून घातला.

२० मग त्यानी त्याची थट्टा (१) केल्यावर जांबळें वस्त्र त्याच्या अंगांतून काढिलें व त्याचींच वस्त्रें त्याच्या अंगांत घातलीं, आणि त्याला खांबीं देण्याकरितां बाहेर नेलें.

२१ तेव्हां कोणीएक कुरेनेकर शिमोन, ह्मणजे आलेक्षांद्रस व रूफस यांचा बाप, तो रानांतून येऊन जवळून जात होता तेव्हां त्याने त्याचा खांब वाहावा ह्मणून त्यानी त्याजवर बलात्कार केला.

२२ नंतर (२) गलगथा जागा ह्मणजे कंवटीची जागा तेथें त्यानी त्याला नेलें.

२३ आणि बोळ मिसळलेला द्राक्षारस त्यानी त्याला प्यायास दिल्हा, परंतु तो घेईना.

२४ मग त्याला खांबीं देऊन कोणी कोणतें घ्यावें याविषयीं चिठ्ठ्या टाकून त्यानी त्याचीं वस्त्रें वांटून घेतलीं. (३)

२५ त्यानी त्याला खांबीं दिल्हें तेव्हां दुसरा प्रहर लागला होता.

२६ आणि त्याच्या दोषारोपाचा पत्ता वर असा लिहिला होता, यहूद्यांचा राजा.

२७ तेव्हां त्यानी त्याच्या बरोबर दोन लुटारू, एक उजवीकडे व एक डावीकडे असे खांबीं दिल्हे.

---

(१) इयो. १३:९. गीत. ३५:१६. माथ. २०:१९. मार्क. १०:३४. लूक. २२: ६३. २३:११, ३६. (२) माथ. २७:३३, इ. लूक. २३:३३, इ. योह. १९:१७, इ. (३) गीत. २२:१८.

---

२५. "दुसरा प्रहर लागला होता." योहान्न म्हणतो कीं सुमारें दुपार होती. दुसरा प्रहर म्हणजे नऊ वाजल्यापासून दुपारपर्यंत. मार्कस म्हणतो कीं दुसरा प्रहर लागला होता. कोणी म्हणतात कीं पुरातन काळीं नक्कल करण्यांत चूक झाली असेल. अंक मांडण्यांत चूक घडावी हें साध्य आहे खरें, परंतु चूक झाली असें समजण्याचें अगत्य नाहीं. जर दुसरा प्रहर लागला होता तर दुपार जवळ होती, आणि दुपार आलीच होती असें नाहीं, तर सुमारें दुपार होती असें योहान्न म्हणतो. अश्या जराश्या अंतरावरून चांगलें प्रमाण पटतें कीं शुभवर्तमान कर्त्यांनी पूर्वीं एकमेकांचें मत घेऊन सारिखेंच लिहिलें असें नाहीं. तरी फेरफार असूनहि सारांश एकच आहे.

२८ तेव्हां दुष्टांमध्यें त्याला लेखिलें, (१) हा शास्त्रलेख पूर्ण झाला.

२९ आणि (२) जवळून जाणाऱ्यांनी आपलीं डोकीं डोलवितांना
त्याची असी निंदा केली कीं, अरे देऊळ मोडून तीन दिवसांत बां-
धणाऱ्या, (३)

३० आपणाला तार, व खांबावरून उतर.

३१ आणि तसेंच मुख्य याजकहि शास्त्र्यांसुद्धां आपापल्यांमध्यें थ-
ट्टा करीत बोलले कीं, त्याने दुसऱ्यांचें तारण केलें, आपलें तारण त्या-
च्याने करवत नाहीं;

३२आह्मी पाहून विश्वास धरावा, (४) ह्मणून इस्राएलाचा राजा
ख्रीस्त याने आतां खांबावरून उतरावें. त्याच्या बरोबर खांबीं दिल्हेले
यांनीहि त्याची निंदा केली.

३३ तेव्हां (५) दोन प्रहरांपासून तिसऱ्या प्रहरापर्यंत सर्व देशावर
अंधार पडला.

३४ आणि तिसऱ्या प्रहरीं येशू मोठ्याने ओरडत बोलला, (६) ए-
लोहि एलोहि, लमा शबाखथानी, ह्मणजे माझ्या देवा, माझ्या देवा, त्वां
मला कां टाकून दिल्हें ? (७)

३५ तेव्हां जे उभे होते त्यांतील कित्येकांनी हें ऐकून ह्मटलें कीं,
पाहा, तो एलीयाला बोलावितो.

३६ तेव्हां एकाने धावत जाऊन स्पंज आंबीने भरून वेतावर घा-
लून त्याला पाजतांना (८) ह्मटलें कीं, असूं द्या, एलीया याला खा-
लीं काढायास येतो किंवा नाहीं हें पाहूं.

---

(१) यश. ५३:१२. (२) गीत. २२:७. (३) मार्क. १४:५८. योह. २:१९.
(४) रोम. ३:३. २ तीम. २:१३. (५) माथ. २७:४५. लूक. २३:४४.
(६) गीत. २२:१. (७) गीत. ४२:९. ७१:११. विल. १:१२. (८) गीत. ६९:२.

---

"२८. दुष्टांमध्यें त्याला लेखिलें." यश. ५३:१२ पाहा. तो दुष्ट होता अथवा ईश्वराने त्याला अपराधी मोजलें असें नाहीं. तर यहुद्यांनी त्याला अपराधी ठरवून दुष्टांमध्यें त्याला जिवें मारिलें. तो वास्तविक निर्दोष व परमपवित्र होता. तो न्यायी असून अन्यायांबद्दल मरण पावला, आणि असें करून पाप्यांवर अत्यंत प्रीति दाखविली.

३७ मग (१) येशूने मोठा शब्द काढून प्राण सोडिला.

३८ तेव्हां देवळांतील पडदा वरपासून खालपर्यंत फाटून त्याचे दोन तुकडे झाले.

३९ मग त्याने असें ओरडून प्राण सोडिला हें पाहून, त्याच्या समोर जवळ उभा राहिलेला शतपति याने ह्मटलें कीं, खरा हा माणूस देवाचा पुत्र होता.

४० आणि बायकाहि दुरून (२) पाहत होत्या, त्यांमध्यें माग्दालीणी मारया व धाकल्या याकोबाची व योस्याची आई मारया व सलोमे अशा होत्या;

४१ या, तो गालीलांत होता तेव्हां त्याच्या मागें चालून त्याची सेवा करीत असत, (३) व ज्या त्याच्या बरोबर यरूशलेमास आल्या अशा बहुत दुसऱ्याहि पाहत होत्या.

४२ तितक्यांत संध्याकाळ झाला, व तयारी करण्याचा दिवस ह्मणजे शाब्बाथाच्या पूर्वींचा दिवस होता,

४३ ह्मणून अरिमथाईंतील योसेफ नामांकित सभासद होता, तोहि देवाच्या राज्याची वाट पाहत होता, (४) तो आला, व धैर्य धरून आंत पिलातसाकडे जाऊन त्याने येशूचें शरीर मागितलें.

४४ तेव्हां तो इतक्यांत मेला याविषयीं पिलातसाला आश्चर्य वाटलें; मग त्याने शतपतीला बोलावून त्याला पुसलें कीं, त्याला मरून कांहीं वेळ झाला काय?

(१) मात्थ. २७:५०. लूक. २३:४६. योह. १९:३०. (२) गीत. ३८:११.
(३) लूक. ८:२,३. (४) लूक. २:२५,३८.

४३. "योसेफ नामांकित सभासद." यहुदी सभासद सद्गुण व धार्मिकपणा यांविषयीं कांहींसा प्रख्यात होता असें दिसतें. तो मशिहाची वाट पाहत होता असें केवळ नाहीं तर हा येशू तो खरा मशिहा आहे असा विश्वास तो धरीत होता. त्या दिवसापर्यंत त्याने आपला विश्वास लोकांसमोर दाखविला नव्हता. त्याला लोकांचें भय वाटलें असेल. परंतु दुष्ट लोकानी ख्रीस्ताला वधस्तंभीं दिल्हें आहे, असें पाहून त्याने धैर्य धरिलें आणि इतर तुच्छ मानीत असतांहि त्याने ख्रीस्ताला प्रसिद्धपणें अंगिकारिलें. हें उदाहरण अनुसरण्याजोगें आहे ह्मणून शुभवर्त्तमानांत लिहून ठेविलें आहे.

४४. "पिलातसाला आश्चर्य वाटलें." वधस्तंभीं दिल्हेल्यांस मरण याव-

४५ तेव्हां हें शतपतीकडून समजल्यावर त्याने योसेफाला शरीर
दिल्हें,

४६ नंतर त्याने तागाचें वस्त्र विकत घेऊन, व त्याला खालीं का-
ढून त्या वस्त्राने त्याला गुंडाळिलें, आणि खडकांत खोदिलेलें थडें हो-
तें त्यांत त्याला ठेविलें व थड्याच्या दारावर धोंडा (१) लोटून लाविला.

४७ तेव्हां त्याला कोठें ठेविलें हें माग्दालीणी मारया व योस्याची
आई मारया यानी पाहिलें.

## अध्याय १६.

नंतर (२) शाब्बाथ गेल्यावर माग्दालीणी मारया व याकोबाची
आई मारया व सलोमे, यानी त्याला लावण्याकरितां सुगंध द्रव्यें (३)
विकत घेतलीं होतीं.

२ आणि सतकाच्या पहिल्या दिवसीं मोठया सकाळीं सूर्य उगव-
ण्याच्या वेळेस थड्याजवळ त्या आल्या.

(१) मार्क. १५:३,४. (२) मात्थ. २८:१, इ. लूक. २४:१, इ. योह. २०:१, इ.
(३) लूक. २३:५६.

यास दोन तीन दिवस देखील लागत असत. असें असतां येशू इतका लव-
कर मेला यावरून आश्चर्य वाटलें आणि शतपतीला पुसल्याशिवाय तो वि-
श्वास धरीना.

४६,४७. एथें जी प्रीति येशूवर दाखविली ती सर्वकाळ ध्यानांत ठेव-
ण्याजोगी आहे. या बायकांची प्रीति कोणत्याहि अडचणींत अथवा संकटांत
कधीं थंडावली नाहीं. स्थिर विश्वासाने व प्रेमाने ह्या बायका येशूच्यामागें
वधस्तंभाकडे चालल्या, आणि जेव्हां त्याचें शरीर काढून नेलें तेव्हां तें
कोठें ठेवितात हें त्या जाऊन पाहतात. बडे, बळवंत व तरणे यानी त्याला
सोडिलें असतांहि ह्या बायकानी त्याला सोडिलें नाहीं. हीच खरी प्रीति आ-
हे. अडचणींत व संकटांत ती पूर्वीपेक्षां बळकट होती. दरिद्र, दुःख, हाल,
संकट, मरण, यांत जी प्रीति टिकून राहती ती खरीच आहे.

१-८. यावरील टीका मात्थ. २८:१-८ एथें पाहा.

१. येशू मेलेल्यांतून उठला आहे असें जर वाटलें असतें तर त्यानी हीं
सुगंध द्रव्यें आणिलीं नसतीं. जरी ख्रीस्ताने आपल्या शिष्यांस पूर्वीं सांगितलें
होतें तरी तो खरोखर उठेल असा पूर्ण विश्वास त्यानी धरिला नाहीं; आणि
यावरून तो वास्तविक उठला याविषयीं त्याची साक्ष अधिक प्रबळ होती.

३ तेव्हां त्या एकमेकींस ह्मणाल्या, आह्माकरितां थड्याच्या दाराव
रून धोंडा कोण लोटील?

४ परंतु त्यानी दृष्टि लाविली तों धोंडा एकीकडे लोटलेला आ-
हे असें पाहिलें; तो तर फार मोठा होता.

५ मग त्यानी थड्यांत जाऊन उजव्या बाजूस बसलेला व पांढरा
झगा घातलेला असा तरणा पाहिला, व त्या घाबरल्या;

६ तेव्हां तो त्यांस ह्मणाला, घाबरूं नका, खांबीं दिल्हेला येशू ना-
जारेथकर याचा शोध तुह्मी करितां; तो उठला आहे (१) एथें नाहीं,
त्यानी त्याला ठेविलें होतें ती ही जागा पाहा.

७ जा, त्याच्या शिष्यांस व पेत्रसाला सांगा कीं, तो तुमच्या
आगोदर गालिलांत जातो; त्याने तुह्माला सांगितल्याप्रमाणें त्या-
ला तेथें पाहाल.

८ मग त्या लवकर निघून थड्यापासून पळाल्या, आणि कांपून व
घाबरून त्यानी कोणाला कांहीं सांगितलें नाहीं, कारण कीं त्या भ्या-
ल्या होत्या.

९ सप्तकाच्या पहिल्या दिवशीं सकाळीं तो पुन्हा उठल्यावर, ज्या
माग्दालीणी मारयेमधून त्याने सात भुतें काढिलीं होतीं तिला तो प-
हिल्याने दिसला.

१० तिने जाऊन जे त्याजकडले लोक शोक करीत व रडत होते
त्यांस वर्तमान सांगितलें.

११ परंतु तो जीवंत आहे व तिने पाहिला, हें ऐकून त्यानी वि-
श्वास धरिला नाहीं.

---

(१) गीत. ७१:२०.

---

७. "पेत्रसाला." पेत्रसाने ख्रीस्ताला नाकारिलें होतें परंतु पश्चात्ताप करू-
न तो फार रडला, आणि प्रभूने क्षमा करून त्यासाठीं प्रार्थना केली होती,
आणि आतां उठल्यावर जो पहिला निरोप शिष्यांस लावून देतो त्यांत तो
पेत्रसाचें नाम घेतो. काय ही प्रीति !

९,१०. येशू तिला कसा दिसला हें योह. २०:१४ यांत वर्णिलें आहे.

११. "त्यानी विश्वास धरिला नाहीं.' यावरून प्रमाण पटतें कीं ते फ-

१२ यानंतर त्यांतील दोघे (१) जण गांवांत चालत जात होते, त्यांस तो दुसऱ्या रूपानें दिसला.

१३ मग त्यानीं जाऊन वरकडांस सांगितलें, परंतु त्यानीं त्यांवरहि विश्वास ठेविला नाहीं.

१४ नंतर (२) अकरा जण जेवायास बसले असतां तो त्यांस दिसला, आणि त्याने त्यांचा अविश्वास व अंतःकरणाचें कठीणपण (३) यांचा त्यांस दोष लाविला, कारण कीं ज्यानीं तो उठलेला असा पाहिला होता त्यांवर त्यानीं विश्वास ठेविला नाहीं.

१५ आणि त्याने त्यांस सांगितलें कीं, अवघ्या जगांत (४) जाऊन सर्व सृष्टीला शुभवर्त्तमान गाजवा. (५)

---

(१) लूक. २४:१३. (२) लूक. २४:३६. १ करिंथ. १५:५. (३) लूक. २४:२५.
(४) मात्थ. २८:१९. योह. २०:२१. (५) रोम. १०:१८. कल १:२३.

---

सले नाहींत. पक्कें प्रमाण पाहिल्याशिवाय ते विश्वास धरीनात. तर मागून त्यांची खातरी झाल्यावर त्यानीं साक्ष दिल्ही ती भरवस्यास योग्य आहे.

१२. "तो दुसऱ्या रूपानें दिसला." हें लूक. २४:१३ एथें वर्णिलें आहे.

१४. "त्यांस दोष लाविला." ते दोषी होते खरे आणि निषेध पावण्यास योग्य होते तथापि त्यांचा अविश्वास जगाच्या उपयोगी पडला आहे. त्यांस अविश्वास धरितां येई तोंपर्यंत ते खातरी धरीनात, तर ज्यापेक्षां प्रमाण पाहून व ख्रीस्ताला समक्ष पाहून त्यानीं शेवटीं पूर्ण विश्वास धरिला, आणि प्रभु उठला आहे असी साक्ष देण्यांत व शुभवर्तमान घोषण करण्यांत आपलें आयुष्य घालविलें त्यापेक्षां त्यांची साक्ष खरी असें मानणें भाग आहे.

१५. "अवघ्या जगांत." त्याला ख्रीस्ताची शेवटली आज्ञा असें ह्मटलें आहे. त्यांच्या मताप्रमाणें केवळ इस्राएलांस शुभवर्तमान घोषण करून तारण घ्यायास बोलवायाचें होतें असें नाहीं, तर परप्रजांसहि, होय सर्व सृष्टीला बोलवायाचें होतें. परंतु अद्यापि शिष्य समजायास व ऐकायास मंद होते, आणि प्रभूनें दृष्टांत देऊन पेत्रसाला समजाविलें तोंवर तें शुभवर्तमान परप्रजास गाजवीनात. सर्व मनुष्य जातीला तारण सादर करावें असी ईश्वराची आज्ञा आहे. त्याची कृपा अत्यंत व प्रीति अपार आहे. तो सर्वांस तारण द्यायास समर्थ व खुशीहि आहे. जर कोणी तारण घेणार नाहीं तर त्याचा दोष याच्या माथ्यावर राहील.

१६ जो विश्वास धरील व बाप्तिस्मा घेईल त्याचें तारण होईल;(१) परंतु जो विश्वास धरणार नाहीं तो अन्यायी ठरेल.(२)

१७ आणि विश्वास धरणाऱ्यांजवळ हे चमत्कार राहतील,(३) ह्मणजे ते माझ्या नांवाने भुतें काढितील, नव्या नव्या भाषा बोलतील.(४)

(१) योह. ३:१८,३६. प्रेषि. १६:३१–३३. रोम. १०:९. १ पेत्र. ३:२१.
(२) योह. १२:४८. २ थेस्स. २:१२.
(३) लूक. १०:१७. प्रेषि. ५:१६. ८:७. १६:१८. १९:१२.
(४) प्रेषि. २:४. १०:४६. १ करिंथ. १२:१०,२८.

१६. "जो विश्वास धरील." ह्मणजे जो शुभवर्तमान खरें आहे असें मानून स्वीकारील आणि त्याप्रमाणें चालेल. मनुष्य पापी आहे. तर असें समजून त्याने पश्चात्ताप करावा. एकच देव आहे. तर मनुष्याने असें मानून त्याचीच भीड राखावी, त्यावर प्रीति करावी व त्याची कृपा शोधावी. प्रभु येशू ख्रीस्ताने पापी मनुष्यांसाठीं आपला जीव दिल्हा. तर आपण त्याला शरण जावें, त्यावर भाव ठेवावा, आणि मनुष्यांसमोर त्याला अंगीकारावें. स्वर्गलोक आहे आणि नरकलोक आहे. तर असें मानून नरकवास चुकवावा आणि अक्षय सुख मिळवावें ह्मणून प्रयत्न केले पाहिजेत. मरण जवळ आहे, ह्मणून मरणास सिद्ध असावें. ह्या गोष्टी खऱ्या आहेत असा विश्वास जो धरितो व याप्रमाणें वर्ततो तो ख्रिस्ती होतो. जो याप्रमाणें वर्तत नाहीं तो पाखंडी असून आपल्या जीवात्म्याचा नाश करून घेतो. "व बाप्तिस्मा घेईल." बाप्तिस्मा घेण्याचें अगत्य आहे असें ख्रीस्ताने दाखविलें. बाप्तिस्मा घेतल्याशिवाय तारण होतच नाहीं असें त्याने सांगितलें नाहीं, परंतु घेण्याचा हुकूम दिल्हा. तर असें समजून जो कोणी बाप्तिस्मा घेण्यास हयगई करितो अथवा नाकबुल होतो त्याचा विश्वास खरा आहे असें कांहीं प्रमाण नाहीं. "त्याचें तारण होईल." तो पापापासून व सर्वकाळच्या दंडापासून मुक्त होऊन स्वर्ग लोकांत सर्वकाळचें जीवन पावेल. "अन्यायी ठरेल." ह्मणजे न्याय दिवसीं ख्रीस्त त्याला दंडास योग्य ठरवील, आणि त्याला दूर करून दुष्ट दूत व माणसें यांबरोबर नरकांत घालील. हें योग्य, असें सर्व सृष्टीला समजेल, कारण १. सौख्यलोकांत घेतलें जावें असा कांहीं हक्क पापी माणसांस नाहीं. २. जो एकच तारणोपाय देवाने नेमिला तो त्यानी समजून नाकारिला तर नरकवास प्राप्त व्हावा आणि सर्वकाळचें दुःख भोगावें हें योग्य आहे.

१७. "हे चमत्कार." ख्रीस्ताच्या व प्रेषितांच्या वेळेस हे चमत्कार घडत असत. प्रेषि. १६:१६–१८ व २:४–११. १करिंथ. १२:१० पाहा. तर

१८ साप धरून उचलतील, (१) व कांहींएक मरणकारक पदार्थ प्याले तरी तो त्यांस बाधणार नाहीं, आणि त्यांनी रोग्यांवर हात ठेविले ह्मणजे ते बरे होतील. (२)

१९ मग प्रभु त्यांसीं बोलल्यानंतर तो वर आकाशांत घेतला गेला(३) व देवाच्या उजवीकडे बसला. (४)

२० नंतर ते निघून सर्व ठिकाणीं गाजवूं लागले, आणि प्रभु त्यांबरोबर कार्य करीत असतां जे चमत्कार त्यांच्या जवळ राहिले त्यांकडून वचनाला प्रमाण पटवीत गेला. (५) आमेन.

(१) लूक. १०:१९. प्रेषि. २८:५. (२) प्रेषि. ५:१५,१६. २८:८. याक. ५:१४,१५. (३) प्रेषि. १:२,३. लूक. २४:५१. (४) गीत. ११०:१. १ पेत्र. ३:२२. प्रग. ३:२१. (५) प्रेषि. ५:१२. १४:३. इब्री. २:४.

ख्रीस्ताचें वचन पूर्ण झालें. चमत्कार करण्याची शक्ति सर्वकाळ ख्रिस्ती मंडळींत राहील असें ख्रीस्तानें सांगितलें नाहीं. मंडळीची स्थापना होत चालली त्या वेळेस चमत्कारांची गरज होती. स्थापल्यावर चमत्कारांचें अगत्य नाहीं. हा धर्म मजपासून आहे असें एकदां देवानें प्रमाण चमत्कारांवरून पटविलें ह्मणजे पुरें; युगानुयुगीं चमत्कार घडविण्याचें अगत्य नाहीं.

१८. "साप धरून." इ. प्रेषि. २८:५,६. ३:६,७.९:३६ इ. पाहा.

१९. "वर आकाशांत घेतला." ढगानें त्याला घेतलें. प्रेषि. १:९. ज्या कामावर ख्रीस्त अवतरला तें त्यानें सिद्धीस नेलें होतें ह्मणून तो परत सौख्य लोकांत गेला आणि मान, गौरव व सामर्थ्य जीं एकीकडे ठेवून तो जगांत आला होता तीं पावून सर्वसमर्थ देव असून सृष्टीच्या सिंहासनावर बसला. एफ. १:२०–२२.

२०. "नंतर ते निघून" इ. याचें वर्णन विस्तारानें प्रेषितांच्या कृत्यांत व पत्रांत केलें आहे तें पाहा.

हें मार्कसाचें शुभवर्तमान बाकीच्यांपेक्षा संक्षिप्त आहे. हें मात्थीच्या शुभवर्तमानासीं फारकरून मिळतें. परंतु थोडें बहुत ज्यास्ती, विशेषेंकरून या शेवटल्या अध्यायांत वर्णिलें आहे. या अध्यायावरून स्पष्ट कळण्यांत येतें कीं शुभवर्तमान संपूर्ण जगांत घोषण करायाचें आहे. सर्वकाळचें जीवन सर्व मनुष्य जातीला सादर करून गाजवायाचें आहे. जो विश्वास धरीत नाहीं त्याची गत भयंकर आहे. येशू ख्रीस्त जो जगाचा न्याय ठरवील त्यानें पूर्वीं सांगून ठेविलें आहे कीं जो विश्वास धरीत नाहीं त्याला सर्वकाळचें दुःख प्राप्त होईल.

## खीस्त उठल्यावर दिसण्याचे समय.

१. मारया माग्दालीणीला दिसला. यो. २०:१४; मार्कस १६:९.
२. इतर स्त्रियांस. मात्थी. २८:९.
३. पेत्रसाला. १ करिं. १५:५. लूका. २४:३४.
४. एम्माऊसाला जातांना दोघे शिष्यांस. मार्क. १६:१२,१३. लूका. २४:१३–३२.
५. थोमाशिवाय बाकीच्या प्रेषितांस. १ करिं. १५:५. मार्क. १६:१४; लूका. २४:३६. यो. २०:१९,२४.
६. थोमासुद्धा प्रेषितांस. यो. २०:२४–२९.
७. गालीलांत कितीएक प्रेषितांस. यो. २१:१–१४.
८. गालीलांत डोंगरावर शिष्यांस. मात्थी. २८:१६.
९. एकदम पांचशांपेक्षां अधिक भावांस. १ करिं. १५:६.
१०. याकोबाला. १ करिं. १५:७.
११. मग सर्व प्रेषितांस. १ करिं. १५:७.
१२. वर जातेवेळेस प्रेषितांस. लूका. २४:५०,५१. प्रेषि. १:९,१०.
१३. पौलसाला. १ करिं. १५:८; प्रेषि. ९:३,४,५; २२:८.

## खीस्ताचें आकाशांत वर जाणें.

१. उठल्यावर चाळीस दिवसांनी. प्रेषि. १:३.
२. जाईती म्हटलेल्या डोंगरावरून. लूका. २४:५०; प्रेषि. १:१२.
३. सर्व प्रेषितांच्या देखतां. लूका. २४:५०; प्रेषि. १:९,१०.
४. तो मेघाने आच्छादला जाऊन आकाशलोकांत चढला. प्रेषि. १:९,११; लूका. २४:५१; एफ. १:२०–२२.

